


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.



अनुक्रमणिका






वार्षिक साहित्य कला संगम

वर्ष १७ वें नोव्हेंबर १९६१

संपादक :
**दीनानाथ दलाल**




दलाल आर्ट स्टुडिओ प्रकाशन

## श्रेयनामावलि

*बहुरंगी कलाकृति :* ■ भैरव ■ तोडी ■ आसावरी ■ सारंग ■ पूरिया ■ भूप ■ मेघ ■ वसंत ■ वागेश्री ■ मालकंस

*विंगचित्र माला :* ■ जग ही एक रंगभूमीच

*कांहीं अवशिष्ट राग :* व्यंगचित्रें : ■ शहाणा ■ छायानट ■ झिंझोटी ■ मियाचा मल्हार ■ खट ■ जयजयवंती ■ भैरव ■ तिलंग ■ मुलतानी ■ चित्रांवरील काव्य : ■ शां. शं. रेगे

*साहित्य :* ■ वि. स. खांडेकर ■ पु. भा. भावे ■ अनंत काणेकर ■ बा. भ. बोरकर ■ पु. ल. देशपांडे ■ चित्रकार द. ग. गोडसे ■ कुसुमाग्रज ■ अरविंद गोखले ■ मं. वि. राजाध्यक्ष ■ व्यंकटेश माडगूळकर ■ सौ. वसुंधरा पटवर्धन ■ मंगेश पाडगांवकर ■ राजा बढे ■ वामन चोरघडे ■ जी. ए. कुलकर्णी ■ रणजित देसाई ■ इंदिरा ■ अच्युत बर्वे ■ शां. शं. रेगे ■ बाळ सामंत ■ शिरीष पै ■ मधुसूदन वैराळे ■ श्रीराम कामत ■ श्रीपाद काळे ■ रा. रं. बोराडे ■ वि. म. कुलकर्णी ■ निर्मला देशपांडे ■ मधुकर केचे ■ अंबादास माडगूळकर



## संद्भावांची अंजुली...........

कित्येक वर्षे हृदयाशीं जपलेलें संयुक्त महाराष्ट्राचें स्वप्न गेल्या वर्षी साकार झालें. गेल्या वर्षीची दिवाळी आपण उतूं जाणाऱ्या आनंदांत साजरी केली; हा आनंद अजून वातावरणांत विरला नव्हता. त्याचे पडसाद उमटतच होते; पण एकाएकीं उभ्या महाराष्ट्रावर निसर्ग कोपला. कोंकणपट्टी उध्वस्त झाली. तिथल्या लोकांचें जीवन विसकटलें. त्यांचें सांत्वन नुकतेंच कुठें चालू होतें; तोंच जुलैच्या मध्यावर पानशेतचें धरण फुटलें आणि पुण्यामध्यें भीषण जलप्रलय झाला. हजारों लोकांचें नुकसान झालें. आणि आतां तर विदर्भ व मराठवाडाहि पुराच्या संकटानें चांगलाच दबळून निघाल्याच्या वातम्या आहेत. थोडक्यांत सबंध महाराष्ट्रावरच निसर्ग कोपलेला आहे. दुःखित जिवांचें कण्हणें अजून संपलेलें नाहीं. जखमा अजून बुजलेल्या नाहींत.

अशाहि परिस्थितींत कर्तव्याला उभें राहणें हा महाराष्ट्रीयांचा मनोपिंड आहे. उत्सव हें आज कर्तव्य राहिलेलें आहे. या वर्षीच्या दीपावलीचा वार्षिकांक, रसिक वाचकांच्या हातीं देतांना उपरनिर्युक्त विचारांनीं मन व्यापलेलें आहे; पण कर्तव्य म्हणून सर्व जबाबदाऱ्यांची योग्य जाणीव ठेवलेली आहे. या जबाबदाऱ्यांतून पार पडल्याचा आनंद होत असला तरी तो आनंद निर्मळ नाहीं. वरील दुःखद विचारांची त्यावर काजळी आहे.

दीपावलीचें हें सतरावें वर्ष. नित्य कांहीं तरी नवें द्यावें यासाटीं आम्ही कित्येक महिने आधीं योजना करतों; परंतु ही योजना सफल करण्याचें सारें श्रेय दीपावलीवर अफाट प्रेम करणाऱ्या आमच्या मान्यवर मित्रांना आहे. महाराष्ट्राचे आजचे थोर विडंबनकार श्री. पु. ल. देशपांडे यांनीं कामाच्या रगाड्यांत असून देखील दीपावलीच्या वाचकांना एक अमोलिक आणि दीर्घकाल स्मरणांत राहाण्यासारखी भेट दिलेली आहे. ख्यातनाम चित्रकार श्री. द. ग. गोडसे यांनीं फार परिश्रम करून आपल्या संकल्पित लेखमालेंतला उत्तरार्ध लिहून दिला. चित्रांच्या बाबतींत तोच तोपणा न यावा म्हणून यंदा आम्हीं रागमाले-सारखा विकट विषय निवडला. त्यावर संशोधन करून हीं दहा चित्रें सादर करीत आहोंत. श्री. वि. स. खांडेकर, पु. भा. भावे, मं. वि. राजाध्यक्ष, अरविंद गोखले, ही सर्व एका परीनें दीपावलीची कुटुंबीय मंडळी. शां. शं. रेगे, अच्युत बर्वे, बाळ सामंत, गोपालकृष्ण भोवे, या सर्वांचें संपादनांतलें सहकार्य अत्यंत मोलाचें. या सर्वांचे आभार मानणें औपचारिक होईल; पण तेंहि एक फार मोटें कर्तव्य आहे.

दीपावलीचा जाहिरात विभाग समृद्ध व्हावा म्हणून अत्यंत आपुलकीनें अविश्रांत श्रम करणारे आमचे परमस्नेही तांबे (टॉम एन्ड बे) यांचे आभार कसे मानावे कळत नाहीं. या कामीं श्री. श्री. स. दाभोळकर यांनींहि बहुमोल कामगिरी बजाविली आहे.

नागपूरच्या राष्ट्रविख्यात शिवराज फाईन आर्टचे सर्वश्री बाबुरावजी धनवटे श्री. मारोतराव धनवटे, व इतर सर्व धनवटे बंधूंना दीपावलीच्या रंगीत चित्रछपाईचें सर्व श्रेय द्यायला हवें. मौज प्रिन्टिंग ब्यूरोचे चालक श्री. विष्णुपंत भागवत व मौजेचे कामगारबंधू यांनीं छपाईचें काम सुबक करून दिल्याबद्दल त्यांचे आभार मानतों. जगदीश्वर प्रेसचे श्री. भालचंद्रपंत, बॉम्बे प्रोसेसचे श्री. मोहनराव कामत, दीपावलीला विनसंकोच सर्व प्रकारची मदत करायला सज्ज असतात. श्री. विष्णुपंत कडव (प्रभात प्रोसेस) यांचेंहि उत्तम सहकार्य (ब्लॉक्सच्या बाबतींत) लाभलेलें आहे. वितरण–क्षेत्रांतले ख्यातनाम श्री. बाबुराव बागवे हे तर दीपावली व रसिकवाचक यांच्यामधला दुवाच आहेत. गेलीं कित्येक वर्षे त्यांनी दीपावलीच्या बाबतींतली आपली जबाबदारी यशस्वीरीतीनें पार पाडलेली आहे. निर्मिति क्षेत्रांतले आमचे सहकारी श्री. परब, श्री. श्रीकृष्ण टाकूर हे दीपावलीचे आधारस्तंभ आहेत.

अशा अनेक नामवंत व्यक्ति, जाहिरातीच्या रूपाने मदत करणाऱ्या कितीतरी संस्था, आपुलकीनें मदत करणारे स्नेही यांचा ऋणनिर्देश करतांना अंतःकरण भरून येतें. या सर्वांच्या सहकार्यानें निर्माण झालेलें हें चित्र-साहित्याचें वैशिष्टयपूर्ण संकलन चोखंदळ रसिक वाचकाला आवडेल अशी खात्री वाटते. मागणें एवढेंच कीं या सर्वांचा लोभ असाच राहो, प्रतिवर्षी वाढो!

दीपावलीच्या वाचकांना, जाहिरातदारांना, मित्रमंडळींना नूतन वर्षाच्या शुभकामना!!

—दीनानाथ दलाल


| प्रकाशन स्थळ : | ऑफसेट प्रिन्टिंग : | मुद्रण स्थळ : | ब्लॉक्स् : |
|---|---|---|---|
| दलाल आर्ट स्टुडिओ<br>४०/४२ केनेडी ब्रिज,<br>मुंबई ४ | श्री शिवराज फाईन आर्ट लिथो वर्क्स<br>नागपूर | मौज प्रिन्टिंग ब्यूरो<br>खटाववाडी, मुंबई ४<br>आवाज प्रिंटर्स<br>मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रिज, मुंबई ४ | बॉम्बे प्रोसेस स्टुडिओ,<br>प्रभात प्रोसेस स्टुडिओ<br>मुंबई |




खो खो हसत नारद
म्हणाले—'कालिदासा,
अरे हें तिकीट काढणारं,
पोस्ट-खातं तुझ्यावेळीं
असतं तर तुझ्या यक्षानं
बायकोला मेघाबरोबर संदेश
पाठविला नसता! त्यानं
तिला 'एक्सप्रेस पत्र'
धाडलं असतं"....!

खूपखूप खाली काळेकाळे ढग संथपणें तरंगत चालले होते. डुलत डुलत जाणाऱ्या हत्तीच्या पिल्लांसारखे!

त्या ढगांकडे तो निश्चल दृष्टीने पाहत होता. कितीतरी वेळ तो तसाच पाहत राहिला. नंदनवनाच्या या बाजूला त्या वेळीं कुणी आलें असतें, तर पृथ्वीकडे पाहणाऱ्या मानवाची ही कोरीव आकृति पाहून त्याला मोठें नवल वाटलें असतें.

पलीकडून पैंजणांचे अस्फुट मंजुळ ध्वनि झुळझुळत जात होते!

गीतलहरी कानांत गुदगुल्या करीत होत्या.

ते संगीताचे सूरच होते का? की वायुलहरींनीं केसांत माळलेल्या नंदनवनांतल्या फुलांचा सुगंध होता तो?

त्याला कांहीं कळेना!

खूपखूप खाली तरंगत असलेल्या काळ्या ढगांकडे तो तसाच टक लावून पाहत राहिला. त्या ढगांखेरीज त्याला दुसरें कांहीं कांहीं दिसत नव्हतें. पाहतां पाहतां तो गुणगुणूं लागला, 'आषाढस्य प्रथमदिवसे मेघमाश्लिष्ट सानुम्—'

पुढचा चरण त्याच्या मुखांतून बाहेर पडण्याआधीच कुणीतरी पैंजणांच्या बोलांसारखी हाक मारली, 'कविराज!'

तो चमकला. ऋषीच्या समाधीचा भंग व्हावा, तशी त्याची स्थिति झाली. त्याने रुष्ट मुद्रेनें वळून पाहिलें. समोर उर्वशी उभी होती.

तिच्याकडे पाहतां पाहतां त्याच्या मनांत आलें, 'महेंद्राचं सुकुमार प्रकरण म्हणून मी जिचं वर्णन केलं, ती हीच का उर्वशी? छेः! माझ्या नाटकाची नायिका होण्यासारखं काय आहे हिच्यांत?'

नाजुकपणाने हात जोडून आणि लाडिकपणाने मस्तक किंचित् झुकवून उर्वशी म्हणाली, 'महाकवि, मी आलें आहे.'

'तें दिसलं मला!'

'मी बोलवायला आलें आहे.'

'कुणाला?'

'इश्श! हें काय बाई विचारणं? इथं दुसरं कोण आहे?'

'कुणीं बोलावलंय् मला?'

'देवेन्द्रांनी.'

'कशाला?'

'देवांनीं अमृत मिळविलं, त्या शुभ दिवसाचा उत्सव आहे आज!'

'तें ठाऊक आहे मला! पण—खरं सांगूं उर्वशी? अमृत हा देवांना मिळालेला वर नाही; तो शाप आहे!'

उर्वशी त्याच्याकडे आश्चर्याने पाहूं लागली. तो काय बोलत आहे, हें तिला कळेना! कवि अनेकदां वेड्यासारखे वागतात, हें तिने ऐकलें होतें. महाकवि कालिदासाची ही अशीच एक वेडाची लहर असावी असें तिला वाटलें!

कवि पुढे बोलूं लागला, 'शाकुंतलापेक्षां सुंदर नाटक लिहिण्याचा विचार करतोंय मी! सारखा तोच एक विचार—'

'मग माझ्यावर लिहा ना पुन्हा दुसरं नाटक!'

तिचें बोलणें ऐकलें न ऐकलेंसें करून कवि म्हणाला, 'इथं कशावर लिहायचं तेंच कळत नाही मला. माझ्या साऱ्या भावना गोठून गेल्या आहेत! अगदी कंटाळा आलाय् मला या स्वर्गाचा!'

आपल्या मानेला नाजुक हिसका देत उर्वशी म्हणाली, 'इश्य, हे

काय बाई बोलगं झालं? स्वर्गाचीं दारं सताड उघडीं टाकलीं तर पृथ्वीवरले सारे लोक हां हां म्हणता इथं गर्दी करतील.'

एक सुस्कारा सोडून कालिदास म्हणाला, 'माझं दुःख तुला समजायचं नाही. तूं देवलोकांतली अप्सरा आहेस. मी मानवांचा कवी आहें!'

'दुःख? या आमच्या स्वर्गात दुःख औषधाला सुद्धा मिळायचं नाही कविराज! त्याच्यासाठी त्या भिकार पृथ्वीवरच जायला हवं!'

'तोच विचार करतोंय् मी!'

भ्रुकुटिभंग करीत उर्वशी म्हणाली, 'सावकाश विचार करा तो! आधी नंदनवनांत चला. सारे देव तिष्ठत बसले आहेत तिथं. नारदमुनि आले आहेत. तेच देवेन्द्रांना म्हणाले—'

कालिदासाने उत्सुकतेनें विचारलें, 'काय म्हणाले?'

'नारदमुनि देवेन्द्रांना म्हणाले, 'मोठे अरसिक आहांत तुम्ही सारे देव! कालिदासा सारखा महाकवि स्वर्गात असून ह्या उत्सवावरली त्याची कविता ऐकायची कांही इच्छा होत नाही तुम्हांला!'

'नारदमुनि असं म्हणाले?'

'हो. अस्सं म्हणाले. देवेन्द्रांना राग आला तें ऐकून!. पण तो त्यांनी हसण्यावारी नेला. लगेच त्यांनीं माझ्याकडं पाहिलं, माझ्याकडं हं! त्या रंभेकडं नाही की मेनकेकडं नाही!'

उर्वशीकडे पाठ फिरवून खूपखूप खालून तरंगत जाणाऱ्या कृष्ण-मेघाच्या मालिकेकडे कालिदास पहू लागला. पाहतां पाहतां तो गुणगुणूं लागला,

'तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वम् ।
भावस्थिराणि जननान्तर सौहृदानि ॥'

उर्वशीची मुद्रा मलूल झाली! तिने आपला अधरोष्ठ चावला. पण लगेच सारा राग गिळून ती म्हणाली, 'कविराज, काय सांगू मी देवेन्द्रांना!'

'कवीची येण्याची इच्छा नाही म्हणून सांग.'

जातांजातां उर्वशी फणकाऱ्याने म्हणाली, 'बोलूनचालून मी तुमच्या एका सामान्य नाटकाची नायिका! तुमच्या त्या लोकप्रिय शकुंतलेची सुंदर आई बोलवायला आल्यावर येणार असाल तुम्ही! बरं बाई, असशी जातें नि तिला पाठवून देतें!'

उर्वशी चडफडत निघून गेली. तिच्या पायांतले पैंजणसुद्धा रागावले होते!

खूर खूर खालून जाणाऱ्या काळ्या ढगांकडे पाहत कालिदास तसाच बसून राहिला. त्याचें मन आज विलक्षण पर्युत्सुक झालें होतें. क्षणाक्षणाला तें पृथ्वीवर धाव घेत होतें! मंदाकिनीपेक्षा क्षिप्रेच्या तरंगांचें सौंदर्य अधिक आहे, असें राहून राहून त्याच्या मनांत येत होतें. मालवांतल्या एका वनभागांत स्वच्छंद भ्रमण करीत असतांना पाहिलेले ते दोन निरागस डोळे त्याला दिसत होते! ते त्याला पृथ्वीवर बोलावीत होते! त्या मुग्ध, मृगनयनेच्या चिंतनांतूनच शकुंतलेच्या कथेकडे तो वळला होता!

त्याच्या मनांत आलें, 'नंदनवनांतनं या खालच्या काळ्या ढगांवर आणि त्या काळ्या ढगांवरून महाकालाच्या मंदिरांत सहज उडी मारतां आली असती, तर किती बरं झालं असतं!'

वीणेच्या झंकाराने तो आपल्या विचारतंद्रींतून जागा झाला. त्याने वळून पाहिलें. हसतमुख नारदमुनींची स्वारी लगबगीनं येत होती.

कालिदास झटकन् पुढे झाला आणि चरणस्पर्श करीत म्हणाला 'मुनिवर्य, कालिदास आपल्याला अभिवादन करीत आहे.'

'नारायण, नारायण !' असें म्हणत नारदांनीं त्याला आशीर्वाद दिला. मग ते हसत म्हणाले, 'नुसता कालिदास नाही; कवि कालिदास ! ज्याला त्याची जन्मभूमि अजूनहि विसरली नाहीं, असा महाकवि कालिदास !'

'अजून माझी आठवण आहे भरत खंडांतल्या लोक ना ?'

'नुसती आठवण नाही; ते तुला डोक्यावर घेऊन नाचताहेत ! तें सारं तुला मी सवडीनं सांगेन. आधी तुझी प्रकृति बरी होऊंदे ! स्वर्गांत सुद्धा माणसं आजारी पडायला लागलीं, म्हणजे मोठी पंचाईत झाली म्हणायची !'

कालिदासाने हसून विचारलें, 'माझी प्रकृति बरी नाही, असं कुणी सांगितलं आपणाला ?'

'उर्वशीनं !'

कालिदास स्वतःशीच हसला. शाकुन्तलाच्या पांचव्या अंकांत स्त्रियांच्या अशिक्षितपटुत्वाचें आपण जें वर्णन केले आहे, ते किती मार्मिक आहे याचा त्याला पुन्हा एकदा प्रत्यय आला ! मग गंभीर स्वराने तो म्हणाला, 'मुनिवर्य, माझी प्रकृति ठीक आहे. पण मन मात्र या स्वर्गांतल्या कुठल्याच गोष्टींत रमत नाही. तेंच अमृत, त्याच अप्सरा, तींच गीतं, तींच नृत्यं—इथ सारं तेंच तेंच आहे ! ज्या जगांत दुःखाला जागा नाही, तिथलं सुख वेचत्र होतं ! म्हणून मी असा एका बाजूला येऊन बसतों. मीं मेघदूत लिहिलं तेव्हां माझी पत्नी माहेरीं गेली होती. त्या विरहाच्या दिवसांची आठवण करीत मी इथं बसतों ! माझी शकुन्तला मला जिथं दिसली त्या वनभागाचं चिंतन करीत मी इथं बसतों ! पण या साऱ्या आठवणींनी मन अधिकच व्याकुळ होतं. वाटतं, ती सुंदर अवंती पुन्हा एकदा पाहावी ! त्या नगाधिराज हिमालयाच्या चरणांवर पुन्हा एकदा मस्तक ठेवावं ! कांही दिवस मृत्युलोकांतच रहावं नि एखादं नवं सुंदर नाटक लिहावं—शाकुंतलाहूनहि सरस असं नाटक—'

नारदमुनि त्याच्या पाठीवर थाप मारीत म्हणाले, 'एवढंच ना ! मग चल माझ्याबरोबर. पृथ्वीवरनं स्वर्गांत नि स्वर्गांतनं पृथ्वीवर माझ्या फेऱ्या सुरू आहेत अजून ! अरे हो—' एकदम आठवण झाल्यासारखें करून नारद म्हणाले, 'तुला सांगायला हवं होतं तेंच विसरलों. तुझ्या 'अजविलापां'तला नारद म्हातारा झालाय् आता !'

'काय सांगणार होतां मला आपण मुनिवर्य !'

'भरतखंडांत सुरू झालेला तुझा उत्सव पाहून तुझं मन फुलेल—नव्या नाटकाची स्फूर्ति तुला निश्चित मिळेल !'

'उत्सव ? माझा उत्सव ?'

'हो. तुझ्या जन्मभूमींत सर्वत्र तुझा उत्सव सुरू आहे. तूं देशाला फार मोठा सांस्कृतिक वारसा देऊन गेलास, म्हणून लोक तुझा जयजयकार करताहेत ! अवंतीत, मुंबापुरींत, पुण्यपुरींत, हस्तिनापुरांत—प्रत्येक नगरांत तुझं गुणगान चाललं आहे. तुझं चित्र असलेलं पोस्टाचं तिकिट सुद्धा—'

'माझं चित्र ? मी कसा दिसत होतों, हें त्या लोकांना कसं कळलं मुनिराज ? तुम्ही नाहीना माझं एखादं वेडंवाकडं चित्र त्यांना काढून दिलंत ?'

'शांतं पापम् ! शांतं पापम् !' असें म्हणत नारदमुनींनी आपला त्या चित्राशीं कांहीं संबंध नाही असें दर्शविलें !

कालिदासाचें मन अभिमानाने भरून गेलें. त्याचें कुतूहल शिगेला पोचलें. त्याने उत्सुकतेने प्रश्न केला, 'तुम्ही तिकीट का काय म्हणालांत ! हें काय प्रकरण आहे ?'

( पान १९८ पाहा )

## स्वप्नांची लय उतरेना



**वा. भ. बोरकर**

इंद्रदिनांचा भ्रमर सरेना
विसरूं म्हणतां विसरेना
चंद्र मदिर जरि सरल्या रात्री,
स्वप्नांची लय उतरेना
त्या पहिल्या कापूर दुपारीं
झाडें झालीं उजवाती
सुरवातीची वाट चालतां
घडल्या अंतम रुजवाती
फुलपंखांचीं निळीं पिसोळीं
भिडलीं माझ्या अधराला
फडफडुनी क्षण, मुकाट जडलीं
तुझ्या हिऱ्याच्या पदराला
करांत कर गुंतला, अबोली
थरथरली पण विसरेना
क्षण ठरला तो व्रण हृदयीं पण
रंगांची लय उतरेना
विसरूं म्हणतां विसरेना
तरुशिखरें अन् घुमट उजळतां
सांध्य सनईच्या प्रहराला
कोळिष्टक ही कनकजळानें
भिजुनी येतां बहराला
अभिरगुलाल बुक्याच्या घडिला
झडतां सर मम कवनाची
शर रुतल्या गत सय आली तुज
सासरच्या जळभरणाची
कचचंपक गेलीस फेकुनी
दंवांत भिजतें जरी अहर्निश
गंधाची लय उतरेना
विसरूं म्हणतां विसरेना
व्यथाकथा बोललों किनीं ग
चांदण्यांतल्या अपरात्रीं
पूल फुलांचा झुला होइतों
बघत एकटक जळपात्रीं
होउनि स्वामी बदलिम अंतीं
'नकळत आंतुनि ढळलें मी
सावरुं दे मज, दूर हो कसा
ऋण फेडिन पुढल्या जन्मीं'
जखम गाळितो लाल चंद्रमा
क्षितिज बरूनी निसरेना
थारोळें जरि उरीं गोठलें
रुधिराची लय उतरेना
विसरूं म्हणतां विसरेना



# दिपावली अभिष्टचिंतन

आमच्या ग्राहकांना व मित्रांना दिपावली अभिष्टचिंतन

## खास जनता

घरांतील आवश्यक उपयोगी वस्तु, वापरण्यास सोपा, मजबूत बनावट व उत्तम सेवा ह्याकरितां खास जनता केरोसीन कुकरनें लौकिक मिळवला आहे. हे वातीचे केरोसीन स्टोव्ह तुमच्या वेळेची व इंधनाची बचत करतात.



## दीप्ति ब्रॅन्डची एनॅमलची भांडी

ह्या एनॅमलच्या भांड्यांनी फार थोड्या अवधित सर्वांची पसंती मिळवली आहे.










## दीप्ति कंदील

दीप्ति कंदीलांना शिफारस कशाला. त्यांची लोकप्रियता त्यांच्या उत्तम दर्जाची, त्रासविरहीत सेवेची व कमी केरोसीन खर्चाची हमी देते.



दि ओरिएन्टल मेटल इंडस्ट्रीज प्रायव्हेट लि.

[illegible], बौबझार स्ट्रीट, कलकत्ता-१२

KALPANA OM-M





अनुक्रमणिका

अनुक्रमणिका








सत्तेचा 'एकच प्याला'

"कशि या त्यजूं पदाला नाथा"

'संशय कल्लोळ'

"संशय कां मनि आला कळेना"

# जग ही एक

नाटक काय, संसार काय किंवा राजकारण काय या तिन्हीं क्षेत्रांत जो तो आपली भूमिका चोख वठविण्यांत गढलेला असतो.

'स्वयंवर'

"करिन यदु मनीं सदना"




**‘शारदा’**

“ वधुनि त्या भयंकर भुता
फोडिली तिनें किंकाळी ”

**‘भाऊबंदकी’**

काका, काका, मला वांचवा ”




# रंगभूमीच

लवकरच निवडणुकीची सांथ सुरू होणार आहे; आणि राजकारणाच्या रंगभूमीवर नावाजलेले जुने नट पुन्हां एकदां आपल्या लोकप्रिय भूमिका जनतेपुढें सादर करणार आहेत.




**‘भावबंधन’**

“ कुंवारपणाला न शोभणारं असं मीं तुमच्यापैकीं कोणालाहि कांहींहि करूं देणार नाहीं. ”

**'हॅम्लेट'**

"जगावं कीं मरावं ?"





**'सौभद्र'**

"मोडुनि दंडा फेकुनि देईन
भिकार भगवीं वस्त्रें"




**'विद्याहरण'**

"अहंकार माझा
विदेही ऽऽऽ कराया"

बत्तीस वर्षांच्यां आयुष्यांत तसं कांहीं कधीं मीं केलं नाहीं; पण आज माझी मला ओळख पटली. हें सगळं कसं झालं हो ताई, मीं म्हणतें माझ्या हातून कसं झालं?........





पु. भा. भावे

शशी शिकला मला आपल्या वडील वहिणी सारखी मानते. तशी कांहीं मी शशीपेक्षां फारशी वडील नाहीं. शशी बत्तीस वर्षांची असली तर मी चौतीस वर्षांची आहे इतकंच. म्हणजे कांहीं हें जमेस धरण्याइतकं मोठं अंतर नाहीं. शशीचं शिक्षणसुद्धां माझ्यापेक्षां थोडं जास्तच झालं आहे. मी इंटर असलें तर ती बी. ए. आहे. म्हणजे शिक्षणानं ती माझ्यापेक्षां मोठीच आहे. पण मला मोठेपणा मिळण्याचं कारण मला वाटतं वेगळंच आहे. माझं लग्न झालेलं आहे. गेलीं चौदा वर्षं मी संसार करतें आहें. चार मुलांची मी आई आहें. मला वाटतं माझ्या ह्या आईपणानंच मला आपोआप मोठेपणा मिळाला आहे. बत्तीस वर्षांची शशी माझ्या शालन-सारखीच माझ्या कुशींत शिरते. आपलीं सगळीं सुखदुःखं ती मला सांगते. मन मोकळं करून मला वाटलं ती केवळ माझ्याशींच बोलते. शशीचं लग्न झालेलं नाहीं. सुखदुःखाच्या गोष्टी करायला तिला आपलं असं माणूस नाहीं. शशी सगळ्यांची आहे. पण शशीच कोणी नाहीं. तिला आई आहे. भाऊ आहे, बहिणी आहेत त्यांचं पालनपोषण करण्यासाठींच तर शशी गेलीं दहा वर्षं नोकरी करीत आली आहे. एके काळीं फार निरोगी आणि चुणचुणीत दिस-णाऱ्या शशीची प्रकृती आणि तिचं तारुण्य त्या माणसांसाठींच तर पिचून गेलं आहे. बाप गेल्यावर ह्या माणसांसाठीं शशीनं लग्न करण्या-ऐवजीं नोकरी धरली. आणि एकेका भावंडाला पायावर उभं करतां करतांच शशी खचत चालली, झिजत चालली. शें दोनशें रुपये मिळविणाऱ्या शशीनं आपल्यासाठीं कोणतीं दिव्यं केलीं आहेत ह्याची तिच्या भावंडांना बहुतेक जाणच नव्हती. शशीनं आपलं भावंड पायावर उभं केलं रे केलं, कीं तें तिला टांच दाखवून निघून



## स्वधर्म

कुसुमाग्रज

दिवसाचा गुण प्रकाश आहे
  रात्रीचा गुण श्मामलता

गुण गगनाचा निराकारता
  मेघांचा गुण व्याकुलता.

श्रेयस्कर तें असो नसो वा
  निजधर्माविन नाहिं गति

कैद जित्राजिव अपुल्या ठायीं
  त्यांत मुक्तता त्यांत रति.

सांगशील का कधी घरेला
  वहात जा तूं जलापरी

धगधगत्या विजळीस बसाया
  दंवाप्रमाणें फुलावरी?

तसेंच मीपण आहे माझें
  तयासारखें तेंच असें

अपार काळामधें बनावट
  एकाची दुसऱ्यास नसे.

अभेद्य असलें अजिंक्य असलें
  भलेंबुरें पण तुटेल का?

तुटल्यावरती आणिक कांही
  शून्यावाचुनि उरेल का?

जात असे. आणि सगळा जणूं कांहीं शशीचाच दोष आहे, असं मानून तिची दमेकरी आई तिच्यावर चिडचिड करीत असे. आईनं अजून शशीला सोडलं नव्हतं. कारण अजून तिच्या दोन मुलांना पंख फुटायचे होते. आणि ज्यांना पंख फुटले होते ते आपल्या आईचा दमा जवळ करायला सिद्ध नव्हते. भावंडाचं दुखणं विकत घ्यायला राजी नव्हते. ते केवळ शशीला दोष देत होते. त्यांचं जितकं करायला पाहिजे होतं तितकं शशीनं केलं नव्हतं. वडील जिवंत असते तर त्या राजर्निंड्यांना उत्तमोत्तम कपडे मिळाले असते, विलायतेला जातां आलं असतं. शशीकडे झाले तसे त्यांचे हाल झाले नसते. जणू कांहीं शशीचे हाल होतच नव्हते. पण शशी सारे हाल मुकाट काढीत होती. अजून ती आपल्या तोंडचा घास आपल्या भावंडांना भरवीत होती. अजून तिनं आपला धर्म कधीं सोडला नव्हता. कधीं कोणती वावगी गोष्ट केली नव्हती. कित्येक दिवस स्वतः-विषयीं शशी माझ्यापाशीं कधीं कांहीं बोलत नसे. आपली व्यथा, आपले प्रश्न, आपल्या इच्छा ह्या विषयीं सहसा कांहीं सांगत नसे. तो एका परीनं तिला आपला कमीपणा वाटत असे. पराभव वाटत असे. पण अलीकडे शशी माझ्यापाशी अगदीं सगळं सगळं बोलते. एका परीनं ह्याचा मला आनंद वाटतो. आणि एका परीनं दुःख वाटतं एकट्यानं सारं कांहीं सोसण्याची शशीची शक्ती संपुष्टांत आली आहे. अस्वस्थता, चीड, निराशा, आतां तिच्या मनांत मावत नाहीत. आयुष्याचीं दुःखं एकटीनं पेलणं आतां तिला शक्य होत नाहीं. म्हणून ती मला भागीदार करते. धावत येऊन कुठलीहि गोष्ट ती मला सांगते. मग तो तिच्या मनांत अगदीं पुसटपणें येऊन गेलेला एखादा विचार कां असेना. मन हलकं करायला माझ्या-विना शशीला इतर कुणी सांपडूं नये, ह्या सालस मुलीकडे कुणाचं लक्ष जाऊं नये, कुणी हिच्यावर प्रेम करूं नये, हिला मागणी घालूं नये, ह्याचं मला फार फार वाईट वाटतं. तिला कुणी मागणी घातली तर ती आजच्या स्थितींत लग्न करील कीं नाहीं, लग्न करणं तिला शक्य होईल कीं नाहीं, हेंहि सांगणं कठीण आहे. शशीचं सारंच एकंदरींत कठीण आहे. आणि तें जास्त जास्त कठीणच होत चाललं आहे. पुष्कळदां मी शशीचा विचार करतें. तिच्या भवितव्याचा विचार करतें. तसाच आजहि करीत होतें. तेवढ्यांत शशी आली.

"ये." मी तिला म्हणालें. "शंभर वर्षं आयुष्य!"

"काय करायचं आहे येवढं आयुष्य घेऊन?" शशी म्हणाली.

तिला काय उत्तर द्यावं तें मला सुचेना. खरंच येवढ्या मोठ्या आयुष्याचं शशीसारख्या मुलीनं काय करायचं? मोठं आयुष्य म्हणजे जास्ती अडचणी, मोठीं दुःखं. जास्ती थकवा. —मी शशीच्या झिजून गेलेल्या काळ्या-सावळ्या शरीराकडे पाहिलं. तिच्या, संभार न करतांच पिंजूं घातलेल्या केसांकडे पाहिलं. तिच्या जाड्याभरड्या कपड्यांकडे पाहिलं. आणखी मग माझ्या पोटांत कसं तुटल्यासारखं झालं. खोट्या समाधानाचे शब्द सुद्धां मला सुचेनात. शशीसुद्धा गप्प होती. पण स्वस्थ नव्हती. मध्येच ती कोचाच्या पाठीवर मान टेकत होती. मध्येच डोळे मिटून घेत होती. मध्येच कपाळावर पंजा टेकत होती. आज शशीला कांहीं तरी झालं होतं. काय नवं झालं होतं कुणास ठाऊक. पण तिला कांहींतरी बोचत होतं. तिला एकदम बोलतां येत नव्हतं. पण तिला कांहींतरी सांगायचं होतं. म्हणून चहाचं आधण ठेवून मींच शशीला विचारलं, "फारा दिवसांनीं आलीस शशी."

"हो."

"इतके दिवस कां आली नाहींस?"

"घरांत आजार होता."

"आतां बरी आहेत ना मंडळी?"

"बरी आहेत."

"घरांत आजार होता तर मला कां बोलावलं नाहींस शशी?"

"अशानं तुम्हांला आमच्या घरीं नेहमींच रहावं लागेल."

तेंहि खरंच होतं. दमेकरी आई म्हणजे जन्माचं दुखणं. हें दुखणं आतां शशीला कायमचंच घरांत बसलं होतं. त्यांत कुणाला वांटा देतां येणंहि कठीण, घेतां येणंहि कठीण. विषय पालटायचा म्हणून मीं विचारलं, "आतां कुठून येते आहेस?"

"सिनेमाला गेलें होतें."

शशी सिनेमाला गेली होती हें ऐकून मला बरं वाटलं. तेवढाच जिवाला विरंगुळा. नाहीं तर महिनोगणती शशी कधीं सिनेमाचं नुसतं नांव सुद्धां काढीत नसे. तिच्या हिशेबांतच ते बसत नव्हतं. शशीनं एकाच चौकोरींत गुदमरून जावं, तिच्या मनाला विश्रांति म्हणून मिळूं नये, ही गोष्ट मला ठीक वाटत नव्हती. म्हणून शशी सिनेमाला गेल्याचं ऐकून मला आनंद वाटला. मी तिला विचारलं, "बरोबर कोण होतं?"

"कुणी नव्हतं बरोबर." शशीचा स्वर एकाएकी तीव्र झाला.

"छोटी बरोबर नव्हती?"

"नाहीं."

"मधूसुद्धां बरोबर नव्हता?"



अनुक्रमणिका

"नाहीं, नाहीं." शशीनं आवेशानं मान हलवली.

"असं बरं सोडलं त्यांनीं तुला आज एकटीला."

"मोठ्या आनंदानं सोडलं." शशी सांगूं लागली. "खरं म्हणजे मी आमची तिघांचींहि तिकिटं काढून ठेवलीं होतीं. किती तरी वेळ मी रांगेत उभी होतें तिकिटासाठीं. उन्हांत राहून डोकं फिरायला लागलं माझं."

"मधू नाहीं तर छोटी कां नाहीं गेली तिकिटं काढायला?"

"तीं कधींच नाहीं जात. आईसुद्धां म्हणते, त्या पोरांना काय कामाला लावतेस? त्यांचे वडील असते तर त्यांनी नसती का काढलीं तिकिटं?" शशीचे ओठ थरथरले. मी शशी-कडे पाहिल...'वडील असते तर!' खरंच शशीचे वडील असायला पाहिजे होते. तिला वडीलपणा देऊन त्यांनीं असं जायला नको होतं. म्हणजे मग शशीला असं तिकिटासाठीं उन्हां-तान्हांत उभं रहावं लागलं नसतं. एवढं उन्ह सोसून शशी खरंच गेली तरी कां सिनेमाला? मीं तिला चटकन् तोच प्रश्न विचारला. मी म्हणालें, "येवढं उन्हातान्हांत उभं राहून कशाला सिनेमाला गेलीस शशी?'

"मी जाणार नव्हतें. मी कधीं जातें का सिनेमाला? पण हीं मुलंच केव्हांपासून हट्ट धरून बसलीं होतीं. सारखीं टोमणे मारून म्हणत होतीं कीं गेल्या वर्षभरांत शशीताईनी आम्हांला एकहि सिनेमा दाखविला नाहीं. ती पहात असेल एकटीच दुपारचे शो. आम्हांला थोडेच पैसे मिळतात!—म्हणून मग मीं काढलीं तिकिटं."

शशीनं कानशीलावर पंजा ठेवला. तिच्या बांगड्या खालीं घसरल्या. तिच्या हातांत नुसत्याच कांचेच्या बांगड्या होत्या. रया गेलेल्या शशीच्या कोपराकडे पहात. मी म्हणालें, "एवढी तूं तिकिटं काढलींस, मग तुझीं भावंडं कां नाहीं आलीं सिनेमाला?"

"चंदू भाऊ त्यांना घेऊन गेला. सिनेमालाच घेऊन गेला."

"आज चंदू तुमच्याकडे आला होता?"

"हो. आला होता. बहुतेक मला हिणवाय-लाच आला होता. आपल्या बायकोला घेऊन तो आला. तेव्हां आम्ही सगळीं सिनेमाला जायच्या बेतांतच होतों."

"मग बिनसलं कुठें!"

"त्यानं विचारलं, तुम्हीं कुठल्या सिनेमाला जाणार? मीं त्यांना सांगितलं. मग त्यानं विचा-रलं, ह्या पोरांना तूं कुठं बसवणार? तेव्हां मी सांगितलं, आम्हीं सगळींच खालच्या वर्गात बस-णार. तशी तो म्हणतो काय की जन्माच्या कर्मांत आज त्यांना सिनेमाला नेते आहेस, मग त्यांना त्या पांजरपोळांत कां बसवतेस? तेव्हां मी त्याला म्हटलं, तीच आमची जागा आहे. तेव्हां तो मला वेडावून म्हणाला, तुझी जागा ती असेल, पण ह्या मुलांना मी आज बाल्कनींत बसवणार आहें. त्याला कुठले तरी पास मिळाले होते. ते कडकावीत तो म्हणाला, उत्तम थेटरांतला उत्तम सिनेमा आज मी त्यांना दाखविणार आहें. चला रे पोरांनो सिनेमाला."

"आणि पोरं त्याच्याबरोबर गेलीं?"

"हो, गेलीं—आनंदानं उड्या मारत गेलीं."

"तुला नाहीं त्यांनीं नेलं?"

"नाहीं, चंदूभाऊ मला म्हणतो कसा, सॉरी शशी, माझ्यापाशीं चार जणांचीच जागा आहे."

"मग?"

"मग काय? तुम्ही जा सगळीं बरोबर, मी जाईन एकटीच—मी चिडून उत्तर दिलं. त्यावर तो नुसता हसला. आणखी मग मी खरोखरच एकटी सिनेमाला गेलें. खालचीं तिकिटं परत करून मी अगदीं वरच्या वर्गात बसलें. तिथे मी आइस्क्रीम आणि बटाट्याचे काप घेतले. टॅक्सी करून मी सिनेमाला गेलें आणि टॅक्सी करूनच परत आलें. आजपर्यंत कधीं मी हें असं केलं नव्हतं ताई. आज केलं."

"केलंस तें बरं झालं. कसा होता सिनेमा?"

"सिनेमा?" एकाएकीं शशी अंगभर कापली आणि ताठ झाली. ताठ डोळ्यांनीच ती पहात राहिली. ती असं काय करते आहे तें मला कळेना. तिला बोलत ठेवण्यासाठीं मी म्हणालें,

"हो, सिनेमाची काय गोष्ट होती तें तर मला सांगशील!"

"सिनेमाची काय गोष्ट होती ते मला कळ-लंच नाहीं ताई!"

"म्हणजे?"

"सांगतें-सांगतें–" शशी गुदमरलेल्या स्वरांत म्हणाली, "तेंच तुम्हांला सांगायला कर-करीत तिन्हीसांजाची मी इथे आलें आहे."

"सांग." तिच्यापुढें चहाचा कप ठेवीत मी म्हणालें. शशीनं चहाचा घोट घेतला. क्षणभर ती स्तब्ध राहिली व मग सांगूं लागली,

"टॅक्सींतून मी खालीं उतरलें तेव्हां खेळ सुरू व्हायला पांचसात मिनिटं असतील. घरून मी निघालें, तेव्हां माझा जीव वैतागला होता. डोकं सुन्न झालं होतं. टॅक्सी भरधांव निघाली तेव्हां मला कसं भिरभिरल्यासारखं वाटत होतं. कितीक युगांनीं मी आज मोटारींत बसत होतें. फुंकर घातल्यासारखा मोटारचा वारा मला वाटला. माझ्या जिवाची काहिली थोडी कमी झाल्यासारखी वाटली.



सुस्वागतम्
महालक्ष्मी
धनदात्रीच धीमती-
दीपावलिच्या पुनरागमनीं-दीपपंक्ति किति प्रकाश देती
आनंदाच्या पुनरागमनीं दुःखतिमिर अस्तंगत होती
सज्ज घरोघर सहर्ष सारे, पुष्प निरांजन माला हातीं
लक्ष्मीच्या स्वागता उभे ते-ती धनदात्री तीच धीमती
अशा ह्या मंगल व शुभ प्रसंगीं दी बँक ऑफ इंडिया लि.
आपणां सर्वांना ही दिवाळी व नवें वर्ष अत्यंत सुखाचें व भरभराटीचें
जावो अशी मनःपूर्वक इच्छा प्रदर्शित करीत आहे.
दीपावलिच्या आगमनार्थ लक्ष्मीपूजन करून आपला
भावी काळ सौख्य व भरभराटीनें समृद्ध करण्याचा एकमेव
आदर्श मार्ग म्हणजेच दी बँक ऑफ इंडिया लि. मध्यें
सेव्हिंग्ज खातें उघडणे हा होय.
असें खातें उघडून आपल्या सवडीप्रमाणें शक्यतेनुसार योग्य ती रक्कम आपण
त्यांत भरूं शकतां. आपले पैसे सुरक्षित तर राहातातच पण आपणास हवे तेव्हां
ते मिळूंही शकतात-आणि शिवाय आपल्या खात्यांतील रकमेवर
दरसाल दरशेंकडा ३ टक्के दरानें चक्रवाढ व्याज मिळतें.
दी बँक ऑफ इंडिया लि. मुदतीच्या ठेवी
३ दिवसांपासून ते १० वर्षेंपर्यंत
३% ते ५% व्याजाच्या दरानें स्वीकारते.
दी बँक ऑफ इंडिया लि.
टी. डी. कंसारा, जनरल मॅनेजर




अनुक्रमणिका

मी बाल्कनीचा जिना चढून गेलें, तेव्हां मला आणखी वेगळं वाटलं. मला सुख वाटलं असं मी म्हणत नाहीं. पण माझं दुःख कमी झालं. फार वेळ नाकतोंड दाबून धरलेल्या माणसाला श्वास घेतल्यावर वाटाव, तसं मला वाटलं. खेळ दुपारचा होता. तरी गर्दी बरीच होती. वरच्या माडींत सुद्धां पुष्कळ माणसं होतीं. फ्रॉक घातलेल्या ख्रिस्ती मुली कुणा तरी पुरुषाबरोबर आलेल्या दिसत होत्या. सलवार-खमीसांतल्या सिंधी बायका, सुटांतले पारशी, दाढीवाले शीख, कितीतरी तऱ्हेचीं माणसं वर बाल्कनींत होती. त्या सगळयांचे वेष कसे स्वच्छ होते. किती तरी उंची उंची कपडे त्यांनीं घातले होते. थिएटरांत रंगीबेरंगी दिव्यांचा प्रकाश पडला होता. आसनावर पंखे फिरत होते. सगळीं माणसं कशीं आनंदांत दिसत होतीं. तें सगळं मला खरंच वाटेना. मला कांही तरी चमत्कारिक वाटत होतं कीं माणसं खरंच इतके सुंदर सुंदर कपडे घालूं शकतात का? तीं इतक्या आनंदानं कशी हसूं शकतात? मी ह्या रंगीबेरंगी दिव्यांनी सजविलेल्या जागेंत मऊमऊ आसनावर पंख्याखालीं बसलें आहे हे खरं का? खरंच मी तीच आहें का! ह्या माणसांच्या आनंदी जमावाचाच मीहि एक भाग आहे का? तर मग मी आमच्या दीड खणाच्या अंधाऱ्या जागेंत इतकी वर्षे कशी राहिलें! इथे जमलेली हीं सगळीं माणसं तशा जागेंत रहात नसतील. मीं घातले आहेत तसे कपडे कांहीं हीं घालत नसतील. माझ्यासारखीं कांहीं हीं माणसं जगत नसतील. हीं माणसं जास्त आनंदानं जगत असलीं पाहिजेत. ह्यांच्या सहवासांत दोन घटका घालवणं, ह्यांचे सुंदर कपडे आणि टवटवीत चेहेरे पाहणं, ह्यांत सुद्धां आनंद आहे. तर मग ह्यापूर्वींच मी इथे कां आले नाहीं? ह्या गांवांत मी वर्षेच्या वर्षे काढलीं. ह्याच गांवांत ही जागा होती. इथला उल्हास होता. मग कसंहि करून मी इथं कां नाहीं आले!

मी आजूबाजूला पाहिलं. माणसं हसत खिद्ळत होतीं. जवळ जवळ बसलेलीं जोडपीं एकमेकांच्या अंगावर रेलून कांही तरी कुजबुजत होतीं. एक ख्रिस्ती तरुण एका तरतरीत मुलीच्या कंबरेभोंवती हात लपेटून आंत आला, आणि सगळ्या मोकळ्या जागा सोडून दूरं कोपऱ्यांतल्या खुर्चीवर जाऊन बसला. मला वाटलं, मी एक वेगळंच जग पाहतें आहें. तें जग पाहतां पाहतां मला फिरल्यासारखं वाटायला लागलं.



धड मला सुख होत नव्हतं, की दुःख होत नव्हतं. मला इतकंच वाटत होतं कीं वर्षांच्या वर्षे ज्या रीतीनं मी जगलें, त्या रीतीनं जगलेच कशी? जगलेच कां म्हणून? मला कांहींच कळेनासं झालं. पुसल्या जागाऱ्या पाटीसारखा भास मला व्हायला लागला. तेवढ्यांत पहिली घंटा वाजली. दुसरी वाजली. थिएटरांतले बरेचसे दिवे गेले. माणसांच्या आकृती स्वप्नांतल्या आकृतींसारख्या दिसूं लागल्या. मी समोरच्या सुंदर मखमली पडद्याकडे पहात होतें. त्या पडद्याचा मऊपणा माझ्या डोळ्यांना जाणवत होता, माझ्या अंगाला जाणवत होता. पडद्यावर गुलाबी, निळसर, हिरवा, पिवळा असा अनेकरंगी प्रकाश विजेचे दिवे फेंकत होते. तो धूसर प्रकाश, तो मखमली पडदा आणि माणसांच्या त्या अस्पष्ट आकृती पाहून माझ्या अंगावर शहारे आले. मी कुठल्यातरी वेगळ्याच सृष्टींत वावरतें आहें, मी कुणीतरी वेगळीच आहें असें मला वाटूं लागलें. मी एकप्रकारच्या गुंगींत गेलें. मला थकल्यासारखं वाटूं लागलें. पण तो थकवा त्रासदायक नव्हता. मला वाटत होतें थकव्याच्या गाद्यागिरद्यांवरच मी लोळतें आहें. त्या थकव्यांत सुद्धां एकप्रकारचा विसावा होता. तो थकवाहि मला आवडत होता. सारी धडपड बंद करून एखाद्यानें त्या थकव्यावरच टेकावं तसं मला वाटत होतें. फारा दिवसांनीं आज इतकी स्वस्थ मी बसलें होतें, त्याचीच मला धुंदी चढली होती. आनंदानें ही अशीच ह्या आसनावर मी बसून राहिलें असतें. माझ्या उजव्या अंगाची खुर्ची मोकळी होती. माझ्या डाव्या अंगाची खुर्ची मोकळी होती. माझ्या मागेहि कुणी नव्हतं. माझ्या डोक्यावर पंखा फिरत होता. फारा दिवसांत इतक्या निरामयपणें मी बसलें नव्हतें. त्या निरामयपणाच्या जाणीवेनें मी डोळे मिटून घेतले. तेवढ्यांत तिसरी घंटा झाली. कुणीतरी धडपडत माझ्या शेजारच्या खुर्चीवर येऊन बसलं. मी एकदम दचकले. आणि डोळे उघडून पाहिलें. माझ्या शेजारी एक थोराड शरीराचा पुरुष येऊन बसला होता त्यानें शुभ्र सूट आणि लालभडक टाय घातला होता. वर्णानें तो गोरा होता आणि वयाने पंचेचाळीसाच्या पुढं असेल. त्याच्या उलट्या फिरविलेल्या दाट केसांत रुपेरी बटा उमटून दिसत होत्या. तो कोण होता. आणि किती शिकलेला असेल, हे ओळखणें कठीण होतें. तो पंजाबी असेल, पुरभय्या असेल, किंवा मराठीमुद्धां असेल. तो जवळ येऊन बसला, तेव्हां कसल्यातरी अत्तराचा सुवास सभोंवार दरवळला. तो आला, तसा त्याचा पाय माझ्या पायाला प्रथम लागला. त्या अर्धवट अंधारांत असं होणं साहजिक होतं. "सॉरी" म्हणून तो शेजारच्या खुर्चीवर बसला. एव्हाना समोरचा मखमली पडदा दुभंगला, आणि जाहिराती दिसूं लागल्या. माझ्या शेजारचा तो उंचनिंच पुरुष चांगला ऐसपैस हात लांबवून बसला होता. तेवढी ती जागा त्याच्या देहाला बहुतेक पुरत नव्हती. म्हणूनच तो खुर्चीच्या पाटीवर हात लांबवीत होता. त्याचा तो हात माझ्या पाटीपर्यंत येत होता. त्याचा हात माझ्या पाटीपर्यंत येत आहे, हें त्याच्या लक्षांत येतांच आपला तो हात तो

आवरून घेत असे व दुसऱ्या अंगाला दुसरा हात पसरत असे. प्रथम प्रथम त्याच्या हालचालींकडे माझें लक्ष होतें. परंतु ह्या सगळ्या हालचाली सहजगत्या घडूं शकण्यासारख्या होत्या. त्यांत विशेष असं कांहीं मला वाटलं नाहीं. मध्येंच चुकून त्याचा हात एक-दोनदां माझ्या अंगाला लागला, त्याचंहि मला फारसं कांहीं वाटलं नाहीं. आमच्या कार्यालयांत किती तरी पुरुष आहेत. त्यांच्या शेजारी बसण्याचा प्रसंग पुष्कळदां आम्हांला येतो. सहजगत्या स्पर्शहि होऊन जातो. नोकरीचाकरी करणाऱ्या आणि स्वतःची सगळीं कामं स्वतःच करणाऱ्या माझ्यासारख्या मुलीला पुरुषाचा स्पर्श पूर्णपणे चुकविणं शक्य नाहीं. वाटेवर, बसमध्यें, बाजारांत, कुठेना कुठें पुरुषाचा स्पर्श हा आम्हांला होतोच. मग त्या स्पर्शाचं विशेष कांहीं वाटेनासं होतं. तसंच आतांही मला झालं. शेजारी बसलेल्या पुरुषाचा स्पर्श होतो, म्हणून ती जागाच सोडावी, असं कांहीं मला वाटलं नाहीं. त्या पुरुषाला भपकेदार कपड्यांची आवड आहे. तो अंगाला अत्तर फांसून आला आहे. तो सारखा पान चघळतो आहे. हें मला दिसतच होतं. तो कदाचित् रंगेल असेल. शेजारीं बसलेल्या बाईविषयीं कुठलंहि किल्मिष मनांत न येऊं देण्याइतका तो साधुवृत्तीचा नसेल. येवढंच काय पण आपल्या शेजारीं एक बाई बसली आहे ह्या कल्पनेनं त्याला सुख वाटत असेल. हें सारं मला सुचत होतं. पण म्हणून मी माझी जागा कां सोडायची? शेजारी बसलेल्या पुरुषाच्या मनांत कांहीं काळं बेरं येईल, म्हणून ती जागाच सोडायची असं जर मुलींनीं ठरवलं, तर त्यांना आजकालच्या जगांत जागाच उरणार नाहीं. कारण जवळ आलेल्या बाईविषयीं कांहीं चुटपुटता विचार सुद्धां ज्याच्या मनांत येत नाहीं असा पुरुषच सापडणं दुरापास्त आहे. माझ्याविषयीं त्याच्या मनांत कांहीं विचार तर आला नसेल ना? हा विचार मलासुद्धां सुचलाच होता की नाहीं? तसाच कदाचित् त्यालाहि माझ्याविषयीं विचार सुचला असेल. ह्या क्षणीं मी जसा त्याच्याविषयीं विचार करतें आहें, तसाच तोहि माझ्याविषयीं करीत असेल. ह्या विचारानं मला जरा चमत्कारिक वाटत आहे, तसंच त्यालाहि वाटत असेल. पण म्हणून तेवढ्यासाठीं मी माझी जागा कां सोडावी? मीं आजूबाजूला पाहिलं. अजून कांहीं जागा रिकाम्या होत्या. पण त्याचा शेजार टाळण्यासाठीं मी माझी जागा सोडली नाहीं. तो माझ्या शेजारीं आहे, हेंच मुळीं मी विसरून गेलें. मी समोरच्या पड्द्यावर आसामचा वार्तापट पहात होतें. गर्द रान, प्रचंड नद्या, उंच डोंगर, आणि फुलं घालून नाचणाऱ्या वन्य मुली—मला असं वाटत होतं कीं त्या रानांतून मी भटकतें आहें, ते डोंगर मी चढून गेलें आहें आणि गळ्यांत फुलांच्या माळा घालून मी नाचतें आहे. त्या नाचण्याचा मला थकवा येतो आहे, आणि तो थकवा नाचण्याच्या आनंदांत बुडून जातो आहे. मला आसामांत फिरवून आणणारं तें चित्र संपलं. माझ्या शेजारच्या पुरुषानं आणखी एकदां हातपाय चाळवले. माझं त्याच्याकडे म्हटलं तर लक्ष होतं. म्हटलं तर मुळींच नव्हतं. नंतर मुख्य बोलपट सुरूं झाला. बोलपट हिंदी होता. सुरुवातीलाच एक चंद्रमोळी घर दिसलं. दाराशीं एक म्हातारी भिकारीण बसली होती. घरांत दारिद्र्य अठराविश्वे होते. आंत भांडणं चालू होतीं. मुलं आणि मुली एकमेकांच्या अंगावर ओरडत होतीं. शिव्या देत होतीं. वस्तू फेकत होतीं त्या फेंकण्या-ओरडण्याचा ध्वनी मला अगदी असह्य झाला. माझ्या मनांत तरंगणारे आसामचे सुंदर देखावे क्षणार्धांत पुसले गेले. एखादं भिंग तडकावं, तसं माझं मन तडकलं. त्या फुटक्या भिंगांतून मला माझं विटकं, ओलसर, अंधारं घर दिसूं लागलं. दांडीवर वळत घातलेले जाडेभरडे कपडे दिसूं लागले. रिकामे होत आलेले धान्याचे डबे दिसू लागले. आईचा खोकला मला ऐकूं येऊं लागला. मधू, छोटी, चंदू...

कांहीं वेळ मी वेगळाच चित्रपट पहात राहिलं. समोरच्या पड्द्याकडे माझे लक्षच नव्हतं. बाबांचा शेवटचा आजार, माझं बी. ए. पाशींच थांबलेलं शिक्षण, तिरडीवर लटलटणारं बाबांचं डोकं, आमचा लिलावांत गेलेला बंगला...

माझ्या मनांत एकदम अंधारून आल्यासारखं झालं. जीव कसा मळून गेला. वाटलं कीं असंच आपण कुठवर जाणार? निराधार, एकटं?

त्याच वेळीं शेजारच्या माणसाचा हात पुन्हा एकदां माझ्या पाठीपर्यंत लांबला. मी एकदां त्याच्याकडे पाहिलं व मग पड्द्याकडे पाहूं लागलं. मध्यें काय झालं तें मला ठाऊकच नव्हतं. पण आतां दृश्य पालटलं होतं. मंद संगीताचे स्वर सुरू झाले होते. जिन्याच्या पायऱ्या चढून एक सुंदर तरुण स्त्री, आणि तिचा तितकाच सुंदर नवरा खोलीच्या दारापाशी आले. त्यानं दार लोटलं. आंत सजविलेल्या पलंगावर बिछाने टाकलेले दिसत होते. त्या तरुणानं एकदम त्या मुलीचे हात धरले.

—त्याच क्षणीं माझ्या हातावर कुणाचा तरी बळकट, राकट पंजा पडला. माझा हात खुर्चीच्या हातावर होता. आणि तोच माझा हात उचलला जात होता आणि दाबला जात होता. कुरवाळला जात होता. क्षणार्धांत मी सावध झालें. काय घडलं तें तत्काळ माझ्या ध्यानांत आलं. त्या शेजारच्या पुरुषानं माझा हात आपल्या हातांत धरला होता. मी त्याच क्षणीं उठायला पाहिजे होतं. ओरडायला पाहिजे होतं. निदान त्याचा हात त्याच क्षणी














दिसडून टाकायला पाहिजे होता. तसा प्रयत्न तरी माझ्या हातून घडायला पाहिजे होता. आपोआपच घडायला पाहिजे होता. पण काय सांगूं. माझ्या हातून ह्यापैकीं कांहीहि घडलं नाहीं. मी सावध होते, तरी बेसावध बनलें, शुद्धीवर होतें, तरी बेशुद्ध झालें. त्यानं माझा हात धरलेला होता. माझा हात तो कुरवाळीत होता. आणि तरीहि त्याला अडविण्यासाठीं मी कांहीसुद्धां केलं नाहीं. उलट माझीं कानशिले एकाएकी तापलीं. माझ्या शरीरभर मुंग्या आल्या. माझी छाती धडधडूं लागली. माझी सारी शक्तीच जणू संपून गेली. एका अनोळखी पुरुषानं माझा हात धरला होता. आणि नावड किंवा राग दाखविण्यासाटीं मी कांहींसुद्धां केलं नव्हतं. करायला पाहिजे हें कळत असून केलं नव्हतं. एका परक्या पुरुषानं माझा हात धरला होता, आणि निःशंकपणें तो माझ्या हाताशीं चाळा करीत होता. भानावार असून भूल पडल्यासारखी मी वागत होतें. मी हालत नव्हतें कीं बोलत नव्हतें. मंतरलेल्या बाहुलीसारखी मी नुसती खेळविली जात होतें. वेळ फार झाला नसेल. फार तर अर्धा एक मिनिट माझा हात त्याच्या हातांत असेल. पण तेवढ्यांत माझ्या तोंडाला शोष पडला होता. किती तरी वेळ गेल्यासारखं मला वाटत होतं. हें सारं संपविलंच पाहिजे असं मला वाटत होतं, आणि तें मला संपवितां मात्र येत नव्हतं. त्या पुरुषाच्या स्पर्शानं मला अगदीं हतबल करून सोडलं होतं. माझा हात त्याच्या हातांत असाच किती वेळ राहिला असता कुणास ठाऊक. पण तेवढ्यांत खालीं कुणीतरी मोठ्यानं शिंकलं. क्षणार्धांत मी माझा हात त्याच्या हातांतून हिसडून घेतला आणि त्याच क्षणीं मध्यंतराची घंटा वाजली. सर्वत्र प्रकाश पडला.

त्या प्रकाशानं माझे डोळे दिपले. मी कुठे आहे हे काय झालं, आणि कसं झालं तेंच मला कळेना. माझी मान खाली गेली होती. कुणाकडे डोळे उचलून पाहण्याचा मला धीर होईना. माझं तोंड कोरडं पडलं होतं. सर्वांगाला कांपरं भरलं होतं. जें झाल तें कुणी पाहिलं तर नसेल ? माझ्या बरोबर काम करणाऱ्या एखाद्या मुलीनं ? एखाद्या शेजाऱ्यानं ? कष्टानें मी मान वर उचलली. तो उठून उभा राहिला होता. आणि माझ्याकडे पाहात होता. हंसून, सलगीनं पाहात होता. जणू त्याच्यांत अणि माझ्यात कांहीं रहस्य उत्पन्न झालं होतं, कांहीं नाते उत्पन्न झालं होतं. आणि तें केवळ त्याला आणि मलाच ठाऊक होतं. त्या नात्याच्या अधिकारानं, कांहींशा विजयी मुद्रेनंच जणू तो माझ्याकडे पहात होता. त्याच्या त्या दृष्टीची जाणीव होतांच माझ्या चेहेऱ्यावर रक्त चढलं. आणि माझी दृष्टी खाली गेली. निषेधाचा, रागाचा शब्दहि उच्चारणं मला शक्य झालं नाहीं. इतकी मी मनोमन संकोचलें होतें. आतां मी त्याचा निषेध करण्यांतहि कांही अर्थ नव्हता. कारण त्यानं मला ओळखलं होतं. माझा त्या क्षणींचा दुबळेपणा ओळखला होता. मोह ओळखला होता. त्यानें मला पकडलं होतं. आणि याहिपेक्षां अधिक भयंकर म्हणजे मी स्वतःला पकडलं होतं. त्या मिनिटभरांत माझं एक अगदीं अनोळखी रूप मला दिसलं होतं. माझा अशक्तपणा, माझा मोह, त्याच्याइतकाच मी स्वतः ओळखला होता. म्हणून निषेधाचा शब्द

उच्चारायला माझी जीभ वळलीच नाही. माझी खाली गेलेली मान वर झालीच नाही. तो निघून गेला. तें मला कळलं. तो गेला, आणि पुन्हा परत आलाहि नाहीं. पण मी मात्र माझ्या जागीं खिळल्यासारखी बसलें होतें. मोठ्यानें ओरडावं, ती जागा सोडून धांवत सुटावं असं मला फार वाटत होतं. पण कुठलीहि कृति करण्याइतकं आतां माझ्यांत त्राणच नव्हतं. मला एक प्रकारची विलक्षण ग्लानी आली होती. माझ्या मनाला चटके बसत होते. आणि तरी ते मला भासत नव्हते. मला कांहीं दिसत नव्हतं. चित्र संपेपर्यंत मी तशीच बसून होतें. मग एकाएकी थपकन सगळीकडे प्रकाश फाकला. दारावरचे पडदे सरकले. गोंगाट करीत माणसं उठलीं. मला वाटले तीं सगळीं माणसं माझ्याकडे पहात असतील. तीं मला ओळखतील. तीं ओरडून म्हणतील कीं साधीभोळी वाटणारी ही मुलगी वाईट आहे. ह्या कल्पनेनंच माझ्या अंगावर कांटा आला. मी वर पाहिलंच नाहीं. खालच्या मानेनं तडक टॅक्सींत येऊन बसलें. घरीं जावं असंहि मला वाटेना. आईला तोंड दाखवावं असं वाटेना. आजपर्यंत माझी मान वर होती. उंच मानेनं आजवर मी साऱ्यांशी बोलत आलं. आईसमोर, चंद्रूसमोर, मधू आणि छोटी समोर मान खाली घालण्याचा प्रसंग माझ्यावर कधीं आला नाहीं. बत्तीस वर्षांच्या आयुष्यांत तसं कांहीं कधीं मी केलं नाहीं. पण आज माझी मला वेगळीच ओळख पटली. हें सगळं असं झालं हो ताई, मी म्हणतें माझ्या हातून कसं झालं?"

बोलतां बोलतां शशीचे ओठ कापायला लागले. तिचा गळा दाटून आला. मी तिच्या जवळ गेलें, आणि तिच्या पाठीवर हात फिरवीत म्हणालें. "इतकं वाईट वाटून घेण्यासारखं काय झालं आहे शशी?"

"झालं आहे. झालं आहे." शशी खोल गेलेल्या रडव्या स्वरांत बोलूं लागली. "आज माझा स्वतःवरचा विश्वासच उडून गेला आहे. ताई, आजपर्यंत मीं निर्भयपणानं पुरुष माणसांत वावरत आलें. कुणा पुरुषासमोर कधीं माझी दृष्टि खालीं गेली नाहीं. पुरुषांशीं माझा प्रसंग पदोपदीं येत होता. त्यांच्या मनांतलं किल्मिषहि मला कळत होतं. एखाद्या अनाथ, अविवाहित मुलीविषयीं ज्याच्या मनांत कांही किल्मिष येत नाहीं. असा पुरुषच विरळा. माझ्यापाशीं कांहीं रूप नाहीं. मी कांहीं तरुण नाहीं. ते मला ठाऊक आहे. म्हणून माझ्यासारखीशीं कुणी सध्या लग्नाचा विचार करणार नाहीं. तेंहि मला ठाऊक आहे. पण रूपवान नसलें, तरुण नसले, तरी मी एक स्त्री आहे. आणि येवढंच पुष्कळशा पुरुषांना पुरतं. लग्नासाठीं नव्हे. पण रूचिपालट म्हणून, करमणूक म्हणून. पुष्कळसे पुरुष गिधाडासारखे माझ्यासारख्या स्त्रीभोंवतीसुद्धां घिरट्या घालतात. तोहि अनुभव मी घेतला आहे. पण असा पुरुषांचं आजवर मला कधीं भय वाटलं नाहीं. आजवर मला माझ्या चांगुलपणाचा विश्वास होता. मी सरळ मार्ग कधीं सोडला नव्हता. क्षणभर सुद्धां कुणा पुरुषाच्या सहवासांत कधींच चळलें नव्हतें. चौदाव्या वर्षीं मी वयांत आलें, ताई. आणि गेलीं अठरा वर्षें ही अशीच मी वागत आलें. अशीच जगत आलें. कधीं मनाला कांहीं इच्छा झाल्या. त्या मी मारल्या. वासना जाग्या झाल्या. त्या मीं जिंकल्या. सतत हेंच मी करीत आलें. पण आज मला कळलं, कीं ज्या वासना मी जिंकल्या असं मला वाटत होतं त्याच मला आंतून पोखरीत होत्या. ज्या इच्छा मारल्या असं मला वाटत होतं त्याच मला मारत होत्या. मी स्वतःला ओळखलं आहे. स्वतःची शक्ती ओळखली आहे असं मला वाटत होतं. पण मी स्वतःला खरोखर ओळखलंच नव्हतं. स्वतःची शक्तीहि ओळखली नव्हती. माझी शक्ति आज खरोखर मला कळली. आज खरोखर मी स्वतःला ओळखलं. दुसऱ्या कोणी मला पाहिलं नसलं म्हणून काय झालं? माझं मी स्वतःला आज पाहिलं आहे. मला पुरुषाचा मोह पडूं शकतो. पुरुषाच्या स्पर्शाची गुंगीमला चढूं शकते. कुणी तरी एक अनोळखी रांगडा पुरुष माझा हात धरूं शकतो. आणि तो स्पर्श झिडकारणं मला शक्य होत नाहीं. हें सगळं आतां मी कसं विसरूं ताई? स्वतःविषयीं माझ्या मनांत उत्पन्न झालेलं हें किल्मिष मी आतां कसं नाहींसं करूं? आज मला कळलं, कीं माझ्याहि मनांत कसले तरी रोगजंतू उत्पन्न झाले आहेत. ते अखेर केव्हांतरी माझा घात करतील. कुठलाहि पुरुष मला चकवूं शकेल. माझा गळा कापूं शकेल. आतां ह्यापुढं केव्हांहि मी घसरूं शकेन. पडूं शकेन. हो—हेंच—हेंच खरं आहे! पुरुषाविषयींच माझ्या मनांत कुठे तरी तहान उत्पन्न झाली आहे. मग तो पुरुष अर्ध्या वयाचा असो, पांढऱ्या केसांचा असो, अनोळखी असो! कोणताहि धटिंगण पुरुष आतां मला चाळूं शकेल. त्याची मला भूल पडूं शकेल. पुरुषांच्या जगांत ह्यापुढें मला निर्धास्तपणें वावरतां येणार नाहीं. त्याच्या डोळ्यांना डोळा देतां येणार नाहीं. आज मी खरोखर संपले असंच मला वाटूं लागल आहे.

ताई—ताई—जरा माझ्याकडे पहा तरी! ही तुमच्या ओळखीची शशी नव्हे बरं कां! ही माझ्याहि ओळखीची शशी नव्हे! ह्या शशीला तुम्हीं शहाण्या असाल तर पुन्हां कधीं घरांत पाऊल सुद्धां टाकूं देऊं नका! ह्या शशीपासून तुमच्या भावाला भय आहे, तुमच्या यजमानांना भय आहे, ह्या शशीपासून तुम्हांला भय आहे! साऱ्या संसारी बायका पुरुषांनीं ह्या शशीला आतां दूर ढकललं पाहिजे. ताई, दूर ढकललं पाहिजे!"

हमसाहमशी रडत शशी ताडकन् उभी झाली. मी तिला घट्ट छातीशीं कवटाळत आणि आंसवं गिळत म्हणालें, "रडूं नको, माझ्या शशी, रडूं नको ग बाई!"

• • •



अनुक्रमणिका





अरविंद गोखले

*शोक करायची शक्ति गंजते. वासना विरून जाते. दुसऱ्याचे अश्रू मात्र माझी जराशी चलनिचल करतात. आठवणी काळजावर डंख करतात. आकाशाच्या चतकोरावर ऋतूंचे रंग बदलतात. मीं अलिप्तपणें पहात राहतों........*

सकाळीं वहिनीचीं बोलणी खायचीं व संध्याकाळीं बहिणीचा उपदेश ऐकायचा ह्याची आता मला इतकी संवय झाली आहे कीं त्याशिवाय माझी झोप पुरी होत नाहीं. सकाळीं न्याहारी घेऊन दादा कामावर गेला कीं आमच्या वहिनीसाहेब त्राग्यानें मला उठवायला येतात. "उन्हांनी पांवरुणांतून वाफा यायला लागल्या...उठा आतां राजाभाऊ काय झोप ही!" असा पुकारा झाल्याशिवाय मला अंथरूण सोडवत नाही. माझं रात्री उशीरा येणं, भूक नाही म्हणून अन्न वाया जाऊं देणं, अपरात्रीपर्यंत पुस्तकं वाचीत अगर रेडियोवर परदेशी स्टेशनं लावीत जाग्रणं करणं—ह्यावर वहिनी तोंड धुतांना, चहा घेतांना, पेपर वाचतांना भाष्य करते. शेवटी तीव कंटाळून कामाला लागली कीं मला तरतरी येते. दिवसभर इकडे तिकडे करण्यास मी मोकळा होतों. लहानशा बाळू नि बेबीच्या ओढीनें दिवेलागणीला बहिणीच्या घरीं पाय वळतात. मुलांशी खेळण्यांत मी गुंगून जातों आणि आमच्या बहिणाबाई तिथेच बसून मला उपदेशाचे घास भरवतात. "राजा, कां रे असा वागतोस? कांहीं करीत नाहीस. कुणाशी मोकळं बोलत नाहींस. परवां चांगली शिकवणी आलेली नाकारलीस...हवं तर अजून एम्. एससी. ला बस...अन् लग्नाचं तर नांवच काढायचं नाही ना?—का रे इतका बदललास?—' ताई कळवळ्यानं बोलते. कधी तिचे डोळेहि पाणावतात. आपला बरोबरीचा भाऊ वाया जात आहे याबद्दल तिला एकंदरींत दुःखच होत आहे. पतिराज कचेरींतून येईपर्यंत ती माझा पाठपुरावा करते. त्यांचं आगमन व्हायच्या आंत मात्र मी तिथून सटकतों भटकत राहतों. कुठे तरी खेळाचें मैदान अगर सिनेमागृहाच्या आवारांत उभा राहतों. रात्र करून परततों, अपरात्रीपर्यंत जागा असतों व मग सकाळ संपली तरी अंथरुणांत पडून राहतों.

सगळ्यांच्या दृष्टीनें मी वाया गेलेलो आहें. आळशी, अयशस्वी.






दोन वेळां जेवावं व तिन्ही त्रिकाळ वाचावं, झोपावं, भटकावं, एवढंच मला मानवतं असा सगळ्यांचा निर्णय आहे. आम्हा तिघां भावंडांत माझं वर्तन फारच हिणकस दिसतं. वडिलांच्या पश्चात् माझं पालन करणारा दादा यशस्वी कारखानदार आहे. बंगला, मोटर ठेवून आहे. एका प्रसिद्ध कलावंताचा नेटका संसार करणारी माझ्या पाठची ताई समाजकार्य करून आयुष्य सार्थकीं लावीत आहे. आणि मी मात्र कांहीं कार्य करीत नाहीं की द्रव्य कमावीत नाहीं. विश्वरत्नांतल माझ्या जीवनाचं पान किडलेलं आहे. ताई व दादा सुखी वैभवांत जगत असतांना त्यांचा लाडका राजा मात्र उदास आहे. रिकामा आहे. आयुष्य फाटक्या वावडीसारखं वाऱ्यावर झोकून देत आहे. उगाचच!

होय—उगाचच. मी असा अकारण वागतों असं माझे मेहुणे नेहमी म्हणतात. तेवढंच एक माझ्या विषयांत ते बोलतात. शून्यमनस्क व्हायला मीं काय कलावंत आहें? परदेशी शिकायला जायची संधी मीच लाथाडली ना? पदवी परीक्षेत प्रथम वर्ग मिळाल्यावर मग एम्. एस्सी होणं मला कठीण कां आहे? पण मला कांहीं करायचंच नाही. वडिलांनी ठेवलेल्या पैशावर आयुष्य आळसांत काढायचंय. मेहुणे माझ्या बाबतीत असे आडाखे बांधून पाठ फिरवून आहेत. आणि माझ्या मुंजींत मातृभोजनाच्या वेळीं मला जवळ घेणारी, आईमागें मला वाढवणारी वहिनी हेच गाऱ्हाणं गिरवीत आहे. लग्नाचं वय उलटून चाललं तरी मी मुली पाहायचं टाळतों म्हणून ती नाराज आहे. एके काळीं सुरूबरोबर स्नेह ठेवून तिला मी अखेर दगा दिला असा तिचा आरोप आहे! एवढं मुलासारखं वाढवलं, भावासारखं मानलं, पण अखेर सगळ्यावर पाणी पडलं म्हणून ती निराश आहे. दादासारखं तुटक वागणं जमत नाही म्हणून ती बोचत राहते. पोटीं अपत्य नाही म्हणून ह्या वेड्या दिराबरची माया टिकवू पाहते.

माझीं माणसं माझ्या बाबतींत कंटाळलीं आहेत; आणि मीहि स्वतःबद्दल निराश आहे. मला उमेद कसली ती उरलीच नाही. संसार थाटायचीं स्वप्नं कधीच कोळपून गेलीं आहेत. शपथेवर सांगायचं तर सुरूची आठवण सुद्धां मी विसरून चाललों आहें. अपरात्रीचा चांदण्याच्या प्रकाशांत खिडकींतून पाहत बसलों म्हणजे चोरट्या सावल्या दिसतात, बंगल्याची वेल लवलवतांना दिसते, कांकणांचा आवाज ऐकूं येतो, कुणी तरी वाट पाहात आहे असा भास होतो—पण सुरूची आकृति कांहीं डोळ्यांपुढें उभी राहत नाही. सुरूचीं पत्रं चाळवीत दुपार घालवितों; पण काळजांत आकांत होत नाही. दुःख करायची, धडपड करायची माझी शक्तीच ढासळला आहे. एखादा कॉलेजचा मुलगा शिकवणीसाठी येतो व मी त्याला तसाच परत पाठवितों. फार तर डिफिकल्टीज सोडवून देतों. माझीं पुस्तकं देतों. माझीं पुस्तकंनोटस्, देऊन टाकणं एवढंच मला कळतं. उच्च पदवीचा, परदेशच्या शिष्यवृत्तीचा मोह कसा तो वाटतच नाही. बरोबरीचे व मागे असलेले कित्येक मित्र अमेरिकेला, इंग्लंडला, जर्मनीला जात आहेत. कुणी चांगल्या नोकऱ्या पटकावीत आहेत. संसार थाटीत आहेत. आणि मी सगळी अनुकूलता असून सुनक्यासारखा बाजूला होत आहें. संधी, स्नेह, सुख सगळं भरभरून आहे आणि माझं मन फुटक्या रांजणासारखं झपाट्यानं रिकामं होत आहे. इच्छाशक्ति पंगुळली आहे, शरीरभर आळस भरला आहे. तोंडाला कडू चव आली आहे, कांहीं वाटून घ्यायचाहि वीट आला

आहे. एके काळी मी उत्साहानें निथळत होतों, परीक्षेंत पदक मिळविल्यावर संशोधनकार्यांत पडायचे मनोरे बांधीत होतों, सातासमुद्रापलिकडे जायची तयारी करीत होतों व कॉलेज होस्टेलमध्यें राहणाऱ्या एका सावळ्या मुलीबरोबर भिरभिरत होतों हेंहि मला दुसऱ्यांनीं सांगावें लागतं आहे व तें ऐकून मी थकलों आहें. कांहीं तरी घडलं—कदाचित् कांहीं न घडतांच ते उभारीचं आयुष्य एकदम गोठलं, विरघळलं अन् मी अश्वत्थाम्यासारखं नुसतं भटकत राहिलों ह्याचा सगळ्यांना वाटणारा विस्मय मला आता त्रासदायक वाटतो. अन् माझं काय होणार ह्याची जगाला लागलेली काळजी माझ्यावर कांहींच परिणाम करीत नाहीं.

कां माझं मन असं भकास झालं ? आकांक्षेनं भरलेलं माझं आयुष्य एकदम कां विझलं ? कुणामुळें—कोणत्या क्षणीं ? जवळचे लोक अनेक तर्कवितर्क करतात. सकाळीं गाद्या काढतांना, चहा करताना वहिनीचं तेंच दळण चालूं असतं. "भाऊजी, कॉलेजच्या गॅदरिंगचे मुख्य होते. खेळाच्या, करमणुकीच्या कार्यक्रमांत रंगले होते. नाटकांत मला नेलं होतं त्यांनी. सुलूशी तेव्हांच ओळख करून दिली. सगळं कसं दृष्ट लागण्यासारखं होतं...दृष्टच लागली कुणाची तरी ! मग भावजी एकदम बदलले...कायमचे बदलले..." वहिनी बरेच वेळां स्वतःशीं बडबडते. त्या माउलीचा जीव तिळतिळ तुटतो व मी मात्र मख्खपणें वर्तमानपत्र चाळीत बसतों. जणूं तिनें मला नावं ठेवलीं कीं मला बरं वाटतं. कधी आपलीं आसवं लपवायला ती न्हाणीघरांत जाते. मग मात्र मी उठतों. दिवसभर भुतासारखं भटकून तिन्हीसांजेचा बहिणीकडे एखाद्या घेणेकऱ्यासारखा हजर होतों. ताईची तशीच तक्रार ऐकायला. तिच्या सुखी संसारांत डोकावायला. ताई कंटाळली, कावली की कधीतरी घरीं परततों. खिडकीशी बसतों व विहिरीशीं डोकावून पाहावं तसं आकाशांत निरखून पाहत राहतों. माझंच गतायुष्य ! झपाट्यानं पुसट होत जाणारं. अस्ताव्यस्त झालेलं. माझं रिकामं मन खडखडूं लागतं. मायेचे तुटलेले पाश काळजांत भरलेल्या वैराण उन्हांत चिवडीत बसतं.

× × ×

कडाक्याची थंडी पडली होती आणि अंधाऱ्या वाटेनें आम्ही घरीं चाललों होतों. रिकामी होत जाणारी निरुंद वाट, मागें जाणारे झगझगीत दिवे अन् मध्येच येणारा गार वारा आम्हाला अबोल करीत होता. चित्रपटांतल्या अखेरच्या भव्य दृश्यांनी सुली हेलावली होती; थंडीनें कुडकुडत मला बिलगून चालत होती. रात्रीच्या सिनेमाला जायचं धाडस आम्हीं प्रथमच केलं होतं. त्या उन्मादात सुली अजून गुंगली होती. मला मात्र तिची सोबत अगर नुकत्याच संपलेल्या चित्रपटांतील समस्या —कांहीं आठवत नव्हतं. चित्रपटगृहांत जें अचानक दिसलं होतं, त्यानें मला धक्का बसला होता ! सुचेनासं झालं होतं. पोटांत भीतिचा, काळजीचा गोळा उठला होता. सुलूच्या स्नेहांतला आणिक एक टप्पा ओलांडल्याचा आनंद केव्हांच उडून गेला होता व कधी एकदां घरीं जाईनसं झालं होतं.

"कां रे अगदी गप्प ? —पिक्चरच्या शेवटाचा परिणाम ?" सुली मान मोडून, माझ्या पायांत अडखळत विचारीत होती.

"हूं—" मीं मख्खपणें म्हटलं.

"त्या हिरॉईनचा त्याग खरोखरच मन हेलावणारा आहे, नाही ! स्त्री खरं म्हणजे त्याग शब्दापलिकडेहि कांहीं करूं शकते—"

मी कांहीं बोललों नाहीं. सुली काय म्हणाली तें मला ऐकूं आलं



## ईप्ह.......

मंगेश पाडगांवकर

लाटांच्या फुगीर झग्याशीं झोंबणारा
तारवटलेल्या रक्ताचा खारट वारा,
लुसलुशीत एक ढग स्तनाकार ओथंबून
क्षितिजाशीं झुकलेला अंग झांकून...

तापलेल्या कानशिलाची थडथड जशी
अंग-घुसळी काळीभोर होडी तशी...
काय तुझा केला होता गुन्हा म्हणून
इथें आणलेंस भुलवून मला गर्दीतून ?

घरें सगळीं आपल्या मागें लागलेलीं
अर्ध्यावरच थकलीं, धुक्यांत बुडून गेलीं...
दूर एक आहे-नाहीं असा दिवा
पेटलेल्या कचकड्याची शुरी हवा...

संस्कारांच्या पायऱ्यांवरून कोसळलों
आणि तुझ्या चिवट मिठींत घट्ट आलों...
ताठर ओलसर वक्षावर फिरतांच हात
कळ्यांचीं फुलें झालीं अंधारांत...

किती शपथा घातल्यास तेव्हां दंशतीव्र ओठांनीं
किती विजा जाग्या केल्यास थरथरणाऱ्या बोटांनीं
सुटणाऱ्या नाडीसारखे ताण सगळे सैल झाले
हुंकारांचे गर्भ घेऊन शब्द जड होऊन आले

मींच मला नाकारलें : माझें रक्त होण्यासाठीं !
विजेच्या तीव्र विळख्यांत जन्मांच्या सुटल्या गांठी...
लाटांसारखे हिनकळत ओल्या वाळूंत कोसळलों
निळा निळा चुरा होऊन एकमेकांत मिसळलों...

मऊ किरमिजी ग्लानीच्या डोहांतून
तरंगतांना मिटले डोळे तृप्त थकून:
खोल गाज लाटांची समजूतदार-प्रौढ झाली
पांघरूण होऊन दोघांना संथ संथ झांकून गेली...

■ ■ ■







अनुक्रमणिका

नाहीं. माझ्या डोळ्यांपुढें चित्रगृहांत बॉक्समध्यें बसलेला दादा सारखा दिसत होता. तो दादाच ह्यांत शंका उरली नव्हती. दादा असं करील यावर विश्वास ठेवायला मन कचरत होतं. पण मीं सारं प्रत्यक्ष पाहिलं होतं. दादानें त्या स्त्रीच्या खांद्यावर हात टाकलेलाहि पाहिला होता. माझ्या मनांत तुफान माजत होतं आणि मला सारखी वहिनीचीच आठवण येत होती. ती स्त्री नाही, सुलू नाही—केवळ वहिनीच मला सारखी दिसत होती. दिसत होती व मी अधिकाधिकच कासावीस होत होतों—

"तुझं चित्त ठिकाणावर नाही—" सुलू होस्टेलपाशी थांबून म्हणत होती. "केवढा वेळची मी बडबडतेंय्. आंत येतोस का?—"

मी भानावर आलों. सुलीची खोली दिसतांच सुटल्यासारखं वाटलं. चटकन् म्हटलं, "आता नको. तूं जा—"

"उद्यां भेटशील? लायब्ररीशीं येऊं?"

मी कांहींतरी उत्तर दिलं. कदाचित् मी कांहींच उत्तर दिलं नाहीं. तिरीमिरीनें घराकडे आलों. वाटत होतं की दादाचं मनगट पकडावं व म्हणावं, 'कोण होती ती? बॉक्समध्यें बसून वाटेल ते चाळे चालू होते तुझे!—किती दिवस चाललाय हा तमाशा—"

वहिनींनी माझी चाहूल लागतांच दार उघडलं. "सिनेमाला गेलां होतां?—हे अजून मीटिंगहून आले नाहींत—" ती जांभई देत म्हणाली. वहिनीला पाहतांच मी हळूक पडलों. ती बिचारी अंधारांत होती. तिच्या संसाराला वाळवी लागली होती. आणि ती जांभया देत होती. मला वहिनीची काळजी वाटूं लागली. ती मला आईच्या जागीं होती—अन् तिच्या सुखाला सुरुंग लागत होता. कसं तिला वाचवायचं? कसं तिला सोडवायचं?...

दादा आला. दिवे लागले, विझले निजानीज झाली. मी मात्र अंथरुणांत सताड डोळे उघडे ठेवून पडून राहिलों. खरं म्हणजे सुलूच्या सहवासाच्या स्पर्शांच्या आठवणींत गुंगून पडायची ही वेळ! पण मला मात्र त्या कुणा स्त्रीच्या गळ्यांत हात टाकून बसलेला दादा दिसत होता. सुखाच्या शिरशिरीऐवजीं किळस येत होती. चीड भरत होती. दादाच्या बेफाम वर्तनाला कसा लगाम घालावयाचा ह्याचा विचार करून डोकं शिणत होतं. माझ्याहून पंधरा वर्षांनी तो मोठा होता. वडिलांसारखा होता. त्याच्यापुढें जायची मलाच लाज वाटेल. अन् तो मला कशाला दाद देईल? त्याला कसली पर्वा? कसली कमतरता? त्याच्या कारखान्यांत खूप बाया आहेत. हल्ली एक झगेवाली स्टेनोहि त्याच्या पदरीं आहे. त्यानें बाहेरख्यालीपणा करायचं ठरवलं तर कोण त्याला अडवणार? मी तरी किती लहान? मी काय करूं?

...थंडीचा मोसम संपत आला. गारवा कमी झाला व परीक्षांच्या तारखा जवळ येत चालल्या. इंटरच्या अभ्यासांत सुलू गढून गेली. प्रतिदिनीं तिची भेट घ्यायच्या कार्यक्रमांत खंड पडूं लागला. जादा तास व ग्रंथालयांत वाचन—ह्यांतच तिचा वेळ जाऊं लागला. कधी तरी भेटली कीं ती म्हणे,

"सॉरी हं. मला संध्याकाळीं सुद्धां सवड मिळत नाही. तुझ्या शब्दांत सांगायचं म्हणजे मरायलाहि वेळ नाहीं. गाइडांच्या नि एक्स्ट्रा पीरियड्सच्या पुरांत बुडून गेल्येंय अगदी—"

"मला भेटण्यासाठी वेळ घालवूं नको. परीक्षा झाल्यावर भरपूर वेळ आहेच."

"पण मी लगेच घरीं जाईन ना!" ती व्याकुळ होऊन म्हणे, "–हां सगळं आयुष्य आहे आपल्याला असं म्हणायचंच तुला—?"

ती मान वेळावून हंसे व ग्रंथालयाकडे चालूं लागे. प्रेमभावनेचं तेवढं प्रदर्शन करणंहि आजकाल अवघड वाटत होतं. सुलूच्या भेटी होत नाहीत हें माझ्या पथ्यावरच पडलं होतं. सारा वेळ मी दादाच्या पाळतीवर होतों. तो जाईल तिथें जात होतों. कारखान्यांत, क्लबांत, बँकेंत. दादाचं घरीं वागणं पूर्वीसारखंच होतं. आणि बाहेरहि कांहीं वाकडं वर्तन मला आढळत नव्हतं. मग मला सिनेमागृहांत दिसल तो भास तर नव्हे? तसं असेल तर किती चांगलं! माझ्या वहिनीचं सौभाग्य अस्पर्श राहील...तसं व्हावं म्हणून मी प्रार्थना करीत होतों. अन् तरीहि सगळं सोडून दादाचा पाठलाग करीत राहिलों होतों.

जर्मन सरकारची पदार्थविज्ञानाच्या अभ्यासासाठी देऊं केलेली शिष्यवृत्ती मिळण्याची शक्यता होती आणि त्यासाठी मी मार्चच्या पहिल्या आठवड्यांत मुंबईला गेलों. आवश्यक ती माहिती गोळा केली, फॉर्म्स भरले. मेट्रोला सिनेमा पाहिला व सुलूसाठी एक पर्स खरेदी केली.

फोयेंतून रमत गमत हिंडतांना मला एकदम आठवलं की फॅक्टरीच्या कसल्याशा मीटिंगला दादा परवांच मुंबईला आला आहे. दचकून भर गर्दींत मी दगडासारखा उभा राहिलों. अन् मग माझं मस्तक भणभणलं व पायांना भिंगरी लागली. त्याच्या मुंबईच्या एजंटाकडे, सरदारगृहांत, मित्रांकडे, सतरा ठिकाणी चौकशी करून अखेर दिवे लागल्यावर मी रेडियो क्लबशीं रेंगाळूं लागलों.

समुद्राचं पाणी स्तब्ध वाटत होतं. दूरवर नांगरून उभ्या असलेल्या परदेशी बोटीवर दिव्यांच्या माळा लटकत होत्या. ताजमहाल हॉटेलची गार, दगडी इमारत तटस्थ होती. रेडिओक्लबकडे तोंड करून मी उभा होतों. अस्थिरा, अन् तरीहि हालचाल न करतां. माझा श्वास मलाच ऐकूं येत होता. कांहीं तरी वाईट दिसणार म्हणून मी मनोमनी घाबरलों होतों.

क्लबांतून तुरळक माणसं बाहेर येत होतीं. प्रत्येकाचा चेहरा मी दुरून अंधारांतून टिपत होतों. मला फार वेळ थांबावं लागलं नाही. चित्रगृहांत पाहिलेल्या त्या स्त्रीसह दादा बाहेर आला. मागें सरावं कीं पुढें धावावं तें मला कळेना. दादा तिच्यापासून दूर चालत होता व ती समोर उभ्या असलेल्या मोटरमध्यें शिरत होती. मोटरमध्यें ती बसल्यावर दादानें दार बंद केलं व दाराला रेलून तो तिच्याशीं बोलत उभा राहिला. किती तरी वेळ त्यांचा हास्यविनोद चालू होता. मला ते क्षण मुंग्यांच्या वारुळांत उभं राहिल्यासारखे असह्य झाले.

तिची मोटर गेली, दादा अंमळ तिथेंच थांबला व मग माझ्याच दिशेनें चालत आला. मी दचकलों. पण तो आपल्याच नादांत होता. सिगरेट शिलगावून त्यानें काडी फेकायला बाजूला पाहिलं व मी दिसतांच तो एकदम चमकला.

"राजा—तूं?"

त्याच्या चेहऱ्यावर एवढीशी शरम नव्हती. देवतास्वरूप वहिनीची तो निर्लज्जपणें वंचना करीत होता. विचारीत होता,

"इकडे कसा रे? ताईच्या नवऱ्याला परत अटॅक आलाय का?"

एकदां वाटलं की 'हो' म्हणावं. मेंदूणा सिरियस आहे असं सांगून त्याला या मोहनगरींतून, ह्या मायावतीपासून दूर न्यावं! पण असं तात्पुरतं—

एकाएकी मला बळ आलं. चेहरा तांबारला. त्याचं मनगट धरून मी म्हटलं,

"अटॅक वहिनीला येणार आहे. सगळ्या घराचे प्राण जात आहेत. दादा, काय चालवलं आहेस तूं?"

तो चपापला. गळ्याशीं बांधलेल्या बोची बाजू सुटून लोंबूं लागली. चेहरा फटक पडला व हातांतली सिगरेट खाली पडली.

"तूं पाहिलंस वाटतं?" तो हलकेच म्हणाला, पण तेवढ्यांत त्यानें स्वतःला बेमालूम सावरलं, "मिस बतीनबरोबर पाहिलंस—एवढंच ना? अरे, आमच्या नव्या धंद्यांतली पार्टनर आहे ती. बतीनला पार्टनर होणं धंद्यांतल्या अडचणीमुळें शक्य नाही, म्हणून त्यांच्या बहिणीला नांवापुरती घेतली आहे—" तो पुन्हा पुन्हा हसूं लागला.

"लाइफमध्ये नाहीं ना पार्टनर घ्यायचा विचार? मी पाहिलं ते भलतंच—म्हणून विचारतों." एखाद्या मोठ्या भावासारखं मी बजावून म्हटलं, "दोन महिन्यांपूर्वी थिएटरमध्यें पाहिलं तुम्हा दोघांना...नंतर एकदां हॉटेलांत पाहिलं...एकदा..."

त्याचं अवसान ओसरलं. पकडले गेलों—अशा आविर्भाव त्यानें केला. अनेक ठिकाणीं आपल्याला व बतीनबाईला प्रणय करतांना राजानें पकडलं अशी त्याची समजूत झाली. जराबेळ तो दूर पाहत उभा राहिला. मग आम्ही दोघे धक्क्याच्या कडेनें चालूं लागलों.

धक्क्याला समुद्राच्या लाटा जोरानें धडका देत होत्या, ताजमहालशीं थांबणाऱ्या मोटरींचे कर्णकटू ब्रेक्स अंगावर कांटा उठवीत होते. दादाला पकडल्याचं मलाच दुःख होत होतं. त्याच्या गळ्याला मिठी मारून रडावं असं सारखं वाटत होतं.

मध्येच तो थांबला. शांतपणे त्यानें सिगरेट काढली, मला एक दिली. प्रथमच मी त्याच्यासमोर सिगरेट ओढूं लागलों. सगळ्याच प्रसंगाचं मला आश्चर्य वाटत होतं. भय वाटत होतं. वडिलांच्या पश्चात् बोट धरून वाढविणाऱ्या दादाकडे मी वेड्यासारखा पाहत होतों.

"राजा, त्या सुलभाबरोबर तूं हिंडतोस ना? तिच्या मागें असतोस ना सारखा—"

त्याच्या वाक्याचा रोख मला रुचला नाही. मी फटकन म्हटलं,

"माझं प्रेम आहे तिच्यावर. मी लग्न करणार आहें तिच्याशी. तिची, अगर कुणाची फसवणूक करणार नाही—"

हें बोलणं त्यानें अपेक्षिलं होतं. दोन मिनिटं शांतता पाळल्यासारखं करून तो म्हणाला,

"मिस बर्तीनवर माझं प्रेम आहे, राजा!"

मी दचकेन, भडकेन हेंहि त्यानं अपेक्षिलं होतं. वेड्यासारखा मी त्याच्याकडे बघत राहिलों. माझ्या हातापायांना घाम सुटला व घशाला कोरड पडली. तो पुढें म्हणाला,

"तुला प्रेमाचा अनुभव आला आहे...प्रेमभाव कांहीं जाणत नाही हे कळतं ना तुला? मीहि बर्तीनची फसवणूक करीत नाही. तीं डायव्होर्सी आहे. माझं लग्न झालेय हें तिला माहींत आहे. तरीहि आम्ही एकमेकांना..."

"म्हंजे-तूं-तूं हे डायव्होर्स घेणार? दादा, वहिनीला—वहिनीला—"
मला पुढे बोलवेना. वहिनीच्या आठवणीनें मला हुंदका आला. माझ्या वागण्यानें दादाहि जरा विरघळला. मला पाठीवर थोपटीत म्हणाला,

"तसंच नाही. तुझ्या वहिनीला मी सोडणार नाहीं. तिला कांहीं कळूं देणार नाहीं. पण—पण मी काय करू? स्वतःला कसं आवरूं? तूंच सांग...

...उन्हाळा जवळ आला. सगळं पारोसं वाटूं लागलं. परीक्षा आटोपून सुरू गांवीं निघून गेली जवळजवळ रोज तिचीं पत्रं येत व मी छोटींशीं व कधींमधीं पत्रं लिहितों म्हणून ती सारखी तक्रार करी. प्रयोगशाळेंत जाणं मी सोडूनच दिलं होतं. प्रोफेसरहि माझ्या अनियमितपणाला कंटाळले होते. अभ्यासांतलं माझं मन एकदम कसं उडालं ह्याचं सगळ्यांनाच आश्चर्य वाटत होतं. मला तें जाणवत होतं. सुरूला लिहायला पाहिजे, प्रोफेसरांना भेटायला पाहिजे असं मला पटत होतं. पण—

संधी मिळेल तेव्हां दादाला गाठायचं व त्याच्या पाया पडायचं—एवढंच माझं ध्येय उरलं होतं. तो मला हुलकावण्या दाखवीत होता, टाळीत होता. बहुतेक वेळां तो मला टाकून बोले. कुठनधून बर्तीनला भेटायला तो स्टेशनवर जात असतांना मी त्याला अडवलं व गाडीची वेळ चुकवली—तेव्हां त्यानें माझ्या थोबाडीत मारली. चारचौघांत माझा अपमान केला...तरीहि मी त्याला मिठी मारीत होतों, मागें खेचीत होतों.

अगदीच निराश होऊन अखेर मीं त्याच्या खोलींतच त्याला अडवलं.

"दादा—वहिनीचा विचार कर रे जरा. तिचा काय अपराध? आज इतकीं वर्षं तिनं संसार केला. मूल नाही तरी समाधानानं राहते आहे ती. तुझ्यावर फार फार प्रेम करते—"

तेवढं एकच अस्त्र मला माहीत होतं. पण त्याचा दादावर आतां प्रभाव पडत नव्हता. तो बेफान होत चालला होता. तिरस्कारानें तो म्हणाला,

"तुझ्या वहिनीचं बुजगावणं बस्स कर! मीच तिला सांगतों सगळं—होऊं दे काय व्हायचं तें!"

"नको—नको, दादा—" मी घाबरून एकदम म्हटलं. "वहिनीला सगळं समजलं, नुसती कुणकुण लागली तरी ती जीभ हासडून प्राण देईल. आपला नवरा आपली वंचना करणार ही कल्पनाहि तिला आकाश कोसळणारी वाटेल—"

"मग चूप बस तर! माझ्या भानगडींत पडूं नको. हवं तर वाटणी घे नि काळं कर. जर्मनीला निघून जा. कुठे अडलंय् तुझं स्कॉलरशिपचं? मी करतों खटपट—"

भाऊबंदकीच्या कल्पनेनं माझं आतडं पिळवटलं. पूर्वी मी त्याला वहिनीची आठवण करून ठिकाणावर आणूं पाहत होतों. वहिनीच्या नांवाची भीति दाखवीत होतों. आतां वहिनीला सगळं सांगून संसार उधळायची धमकी तो मला देत होता. वहिनीचं नांव पुढं करून माझं तोंड बंद करू पाहत होता.

"तूं खटपट करणार?—" मी चमत्कारिक हसलों, "म्हंजे मी इथून गेलों कीं तुला रान मोकळं! मी हें गांव सोडून जाणार नाहीं. हें घर सोडून तर मुळीच जाणार नाहीं—"

दादानं जळजळीत नजरेनं माझ्याकडे पाहिलं. मला उभा जाळावा असं त्याला वाटत होतं. "शट् अप्—" तो ओरडला, "उद्यां तुझी वाटणी घे नि इथून चालता हो—"

मी पुढें होऊन त्याला धरणार होतों. पण तेवढ्यांत वहिनीची चाहूल लागली. वहिनी धापा टाकीत जिना चढून आली होती. तिनें आमचं सगळं बोलणं ऐकलं नाही म्हणून मला जरा सुटल्यासारखं वाटलं. अन् तरीहि मीच शरमलों.

वहिनी क्षणमात्र टकमका पाहत राहिली. दादाचं वाक्य तिच्या कानांत घुमत असावं. माझ्याकडे विचित्रपणें पाहत ती म्हणाली,

"वाटणी मागतां राजाभाऊ? घर सोडायचं म्हणतां? काय अवदसा आठवली ही? भावाचं प्रेम विसरलांत? माझी माया विसरलांत?" तिचे डोळे डबडबले होते व माझ्या चेहेऱ्याकडे ती वेड्यासारखी पाहत होती.

...उन्हाळ्याची काहिली वाढत गेली व मग वळवाचे वेडेवाकडे पाऊस कोसळले. आंधीचे लोट उधळले व मग सगळीकडे चिखलच चिखल झाला. वहिनींत व माझ्यांत अंतराय निर्माण झाला होता. ती मध्येच विचित्रपणें पाही. मध्येच कांहींतरी कळवळून बोले. माझ्या तुटक वर्तनाचं आश्चर्य करी...मी तिच्याशी काय बोलणार? काय सांगणार?

कॉलेज परत सुरू झालं आणि पहिल्या पावसाच्या दसऱ्या सरीसारखी सुरू माझ्यासमोर आली. मीलनाची सगळी उत्कंठा तिच्या बदामी डोळ्यांत उचंबळली होती.








"मला येऊन तीन दिवस झाले. भेटायला आला नाहींस. लॅबमध्यें चौकशी केली तर कळलं तूं जातच नाहीस तिकडे. अजून फीहि भरली नाहीस—"

सुलूच्या भेटीनें माझं विस्कटलेलं मन एकदम निवलं. आज तीन महिने मीं फार विचित्र अवस्थेंत घालवले होते. दादाचा रोष, वहिनीची नाराजी, दादाशीं सामना, वहिनीचा गैरसमज...कुणाला न कळूं देतां चाललेली माझी धडपड...

मीं तिचा हात हातांत घेत म्हटलं, "तुला काय वाटलं, मी जर्मनीला गेलों म्हणून?"

"मुळींच नाहीं. तूं स्कॉलरशिप् रिफ्यूज केल्याचं तुझ्या प्रोफेसरांनी सांगितलं मला" ती मला बिलगून म्हणाली, "त्यांना काय वाटतं, माहीत आहे?—माझा विरह नको म्हणून तूं जर्मनीला जायचं टाळलंस. —हाय!"

"होय—तुझ्यासाठीं—" मीं तिची नजर चुकवीत म्हटलं.

"माझ्यासाठीं केवढं केलंस—" भरल्या स्वरानें ती म्हणाली, "तूं जर्मनीला गेला असतास तर तूं मोठा होशील म्हणून विरह सहन केला असता. दोन वर्षं काढलीं असतीं. आतां तूं एम्. एस्सी तरी करून टाक. उद्यांपासून दिवसभर लॅब नि संध्याकाळीं सुलू—हो म्हण!"

मीं हो म्हटलं व संध्याकाळीं कर्तव्य म्हणून सुलूबरोबर फिरायला जाऊं लागलों. तिच्यासाठीं प्रयोगशाळेंत खेप घालूं लागलों. प्रयोगशाळेंत माझं मन रमत नव्हतं. माझे साहाध्यायी मला हसत होते. ह्या वेळेला मी जर्मनीची वाटचाल चालूं लागायचा! पण मी कॉलेजची वाटहि विसरत होतों. प्रोफेसरांची नाराजी अजून जात नव्हती. रीसर्च प्रॉब्लेम देण्याऐवजी मला ते कांहीं वाचन करायला सांगत. मनाची एकाग्रता आणायला सांगत. आणि पुस्तकाचे भारे घेऊन मी रिकामा हिंडत होतों. सुलूबरोबर असें, तेव्हांहि रिकाम्या मनानें हिंडत होतों.

...ऑगस्टचे अंधारे दिवस सुरू झाले. पाऊस वेळींअवेळीं कोसळत होता. रोज संध्याकाळीं न चुकतां सुलू प्रयोगशाळेशी भेटे. मी दारांतच सिगरेटी फुंकत बसलेला असें. उद्यानांत, डोंगरांत आम्ही भटकत होतों. सिनेमाला, सहलीला जात होतों. माझ्या अबोल स्वाभावाची ती थट्टा करी व रोज मला गावांतल्या गावांत पत्र धाडी. तिच्याबरोबर नुसतं हिंडणं हाच मला आता आधार होता. दादा माझा द्वेष करीत होता व वहिनी संशयानें माझ्याकडे पाहत होती. सुलूचीं पत्रं वाचायचीं हाच माझा कार्यक्रम उरला होता.

त्याच आह्निकांतून मला पत्र लिहायची कल्पना सुचली. सुलूला प्रेमपत्रं नाहींत, तर बतीनबाईला धमकीचीं पत्रं. निनांवी पत्रं! दारं लावून व दिवे लावून मी रोज तिरप्या अक्षरात पत्र खरडूं लागलों. त्या बयेनें दादाच्या धंद्यांतून व आयुष्यांतून दूर सरावं म्हणून मी सुचेल तें लिहीत होतों. बतीन कन्सर्न्स जाळून टाकण्यापासून त्या स्त्रीची बेअब्रू करीपर्यंत वाटेल ते उपाय! माझ्या करणीनें ती दादाला अधिकच चिकटून राहील हे मला उमजत होतं—पण दुसरं कांही करणं अशक्य असल्यानं मी चिडीला आलों होतों. निराशेनें आततायी बनलों होतों.

पाऊस संपुष्टांत आला. पहिली टर्म आटोपली आणि सुलू परत घरीं निघून गेली. सुलूच्या भेटी बंद झाल्या अन् मला अंधारी आल्यासारखं झालं. पण मग ती गेली हें एका परीनें बरंच होतं! प्रेयसीजवळहि घरची किळसवाणी गोष्ट उघड करणं मला कठीण वाटत होतं. सगळं शल्य विसरून तिच्याबरोबर हसत हिंडायचं म्हणजे एक दिव्यच होतं! आता तात्पुरतं तरी तें सरलं. सुलू गेल्यावर प्रयोगशाळेंतली माझी फेरीहि बंद झाली. निनांवी पत्रं लिहिण्याचाहि मला कंटाळा आला. मी पराभूत होतों. अगदी एकाकी होतों. तिन्ही त्रिकाळ कॉलेजसमोरच्या हॉटेलांत सिगरेटी फुंकणं एवढंच मला करवत होतं.

अशाच कुठल्या तरी दिवशीं, कुठल्याशा वेळीं दादा माझा शोध घेत कॉलेजशीं आला. मी हॉटेलशीं दिसतांच त्यानें हॉर्न वाजवला व मला घाईनें बोलावून घेतलं. मी मुकाट्यानें मोटारींत बसलों व त्यानें गाडी सुरू केली.

"भयंकर बातमी आहे—" तो रस्त्यावरची नजर काढतां म्हणाला. त्याचा चेहरा उतरला होता. मला एकदम वाटलं, त्याची भानगड बोंबलली! तसं असेल तर फार उत्तम बातमी असणार! मी आरामांत बसत म्हटलं,

"बतीनबाईची का?"

"हॅंग हर—" तो भुंकल्यासारखं म्हणाला व मध्येमध्ये येणाऱ्या साय-कलवाल्यांना शिव्या देऊं लागला.

"का रे?—काय झालं? प्रेम आहे ना? पार्टनर आहे ना तुझी ती?"

मला आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. दादाचा पराजय झाला. दादा परत आमचा झाला. माझ्या वहिनीचं—मला वाटलं, घरीं जाऊन ल्हानपणीं सारखं वहिनीच्या मांडीवर डोकं ठेवून पडून राहावं.

"दॅट चॅप्टर इज क्लोज्ड्. लॉंग बॅक—" दादा म्हणाला, "मार्चेच आम्ही भांडून दूर झालों. आमचा कन्सर्न उभा राहूं शकला नाहीं नि ती जयपूरला निघून गेली...तिला हल्ली कुणी निनांवी पत्र लिहितं नि तिला वाटतं मीच तिच्या राशीस लागलों आहें..."

माझा हर्ष कुठेच मावेना. मीं बेहोषपणें म्हटलं,

"ब्रॅव्हो...एक सिगरेट दे रे..."

घराशीं त्यानें घाईनें गाडी थांबवली व चाकावर डोकं ठेवून तो फुटक्या फुग्यासारखं होऊन म्हणाला,

"राजा, आपली ताई विधवा झाली. ही तार आलीय आत्ता—" माझ्या अंगावर ॲसिड पडल्यासारखं झालं. आनंदानें दादाला मिठी मारायच्या मनःस्थितींत मी होतों. आणि हें काय घडलं!...ताईला बसलेल्या दुर्दैवाच्या आघातानें मी एकमद कळवळलों. माझ्याच वयाची ताई—तिचं आयुष्य उजाड झालं. मेव्हण्यांचा हृदयविकार काळजीचाच होता, पण हें दुःस्वप्न कुणालाच पडलं नव्हतं. ताईच्या आठवणीनें मी कासावीस झालों. माझे डोळे वाहूं लागले व डोकं टेकून बसलेल्या दादाला मी मिठी मारून रडूं लागलों.

...दिवाळी दुःख माखून आली. घरांत दिवे लावण्याचंहि भान कुणाला नव्हतं. ताई घरीं आली होती व सारखी शोक करीत होती. दादाला बतीन प्रकरणांत बसलेल्या फटकाऱ्यानें धंद्यांत अधिक लक्ष घालणं भाग होतं. तो सारखा बाहेर असे. कारखान्यांत, दौऱ्यावर. मी मोकळा होतों, मला वेळ होता, अन् दादा-वहिनीपेक्षां ताईला माझाच जास्त लळा होता. माझ्याकडे पाहून तिला रडूं येत होतं अन् माझ्यामुळेच ती हुंदके आवरीत होती.

ताईचं सांत्वन करायचं, तिला सोबत करायची ह्याव्यतिरिक्त मला दुसरं कांहीं सुचत नव्हतं. दादाच्या प्रकरणावर पडदा पडला होता आणि ताईनं माझं मन व्यापून टाकलं होतं. वहिनी माझा राग करते हेंहि मी विसरलों होतों. ताईबरोबर चहा घ्यायचा, तिला वर्तमानपत्र वाचून दाखवायचं, दुपारीं रेडियो ऐकवायला बसवायचं, कॅरम खेळतेस का म्हणून विचारायचं, रात्रीचीं जेवणं झाल्यावर घरामागच्या बागेंत खुर्च्या टाकून तिला बोलवायचं...ताईसाठी मी रोज नवं शोधीत होतों. माझी ताई परत हसावी, पोटभर जेवावी, मोकळ्या हवेंत यावी—

नवी टर्म सुरू झाली व सुलू सुट्टी संपवून कॉलेजला आली. सुट्टींत तिच्या पत्रांना उत्तर धाडलं नाही, तिचे वडील आले होते त्यांची भेट घेतली नाहीं म्हणून ती रागावली होती. मी भेटायला येईन म्हणून आठ दिवस तिनें कळ काढली अन् ताईची बातमी कळतांच धावत आमच्या घरीं आली.

तिन्ही सांजेची सुलू घरीं आली हें मला कसंसंच वाटलं. विज्ञानाचा अभ्यासक मी—पण सुलूनें प्रथम माझ्या घरीं प्रवेश करावा तो भावी नणंदेच्या समाचाराला ही घटना मला शुभ वाटली नाही. सुलूच्या स्नेहाची ताईला कल्पना देतांच तिला बरेच दिवस बंद झालेला हुंदका अचानक आला. भावी वहिनीचं कौतुक करण्याच्या अवस्थेंत आपण नाहीं ह्या जाणिवेनें ती मनस्वी खिन्न झाली.

"माफ कर हं, मी तुझ्यावर उगाच रागावलें—" माझ्या खोलींत सुलूला नेतांच ती म्हणाली, "तुझ्या ताईवर काय प्रसंग आला आहे रे! किती तरुण आहेत त्या, किती नाजुक..."

"खूप गुणी आहे सुले ती—गाण्याबजावण्याची, वाचनाची खूप आवड आहे तिला. संसार करायची तर केवढी हौस! पण हें तिचं प्राक्तन होतं. चार वर्षं संसार केलान्—त्यांत वर्षभर नवरा आजारीच होता—"

सुलू कांहीं बोलली नाहीं. खोलीभर पाहत बसली. लग्नानंतर ह्या खोलींत राहायचं ही कल्पना सारखी तिच्या मनांत येत असेल. खोलीभर पसरलेलीं पुस्तकं, थोटकं अन् उस्कटलेली गादी पाहून ती म्हणाली,

"लॅब मध्यें अजिबात जात नाहींस ना? वर्ष फुकट गेलं हें! पुन्हा फॉरेनचा ट्राय करतोस का?—"

"ताईपुढं कांहींच सुचत नाहीं ग सुलू. अन् एकदा नाकारलेली स्कॉलरशिप पुन्हा मिळेल का? प्रोफेसर कांहीं उत्साही नाहीत माझ्याबाबत आतां...अन् माझ्या अभ्यासाचं काय एवढं—ताईचा जन्म वाया चालला आहे—

सुलू उठली. घड्याळाकडे पाहत, खिडकीबाहेर पाहत निघाली. "पुन्हा कधी भेटशील?" तिनें खोलीबाहेर पडतांना विचारलं. बागेबाहेर पडतांना विचारलं.

मीं कांहीं तरी उत्तर दिलं. कदाचित् मी कांहींच उत्तर दिलं नाही. ताईला एकटं सोडून, दुःख करीत ठेवून मी सुलूबरोबर एकांत करायची कल्पनाच भयंकर होती. तिच्या स्वप्नांचा चुराडा झाला असतांना मी माझं सुख फुलवायचं?

...थंडीचा कडाका वाढत चालला. रात्रीं बागेंत खुर्च्या टाकून बसण्याचा कार्यक्रम रद्द करून आम्ही माझ्या खोलींत बसूं लागलों. वहिनी फार करून आमच्यांत येईनाशी झाली. घरचं आवरतांना व दादाची वाट पाहून ती थकून जाई. दादा दमून, उशीरा येई. न चुकतां ताईची चौकशी करी व झोपी जाई. ताई नि मी मात्र जागत गप्पा मारीत असूं. लहानपणच्या किती तरी आठवणी! खेळांच्या, जुन्या वाड्याच्या, स्नेह्यांच्या...दुःखाचा पहिला भर ओसरल्यावर आता ताई बोलकी झाली होती. मी विसरलेल्या गोष्टी तिला स्पष्टआठवत होत्या. तिच्या संगीताच्या आवडीसाठी मी मित्राचा टेपरेकॉर्डर घरीं आणला व त्यावर बिस्मिल्लाची शहनाई व भीमसेनचं गाणं ऐकण्यांत ताई तल्लीन होऊं लागली. अशींच ही हालचाल करूं लागली, कुठे रमली तर मी धन्य होईन. माझ्या श्रमाचं, प्रेमाचं सार्थक होईल...

माझ्या शिक्षणाची वाताहत झाली होतीच, पण सुलू ज्यूनिअरचं वर्ष असल्यानें मोकळीच होती. दिवाळीची सुटी आटोपून परततांना किती तरी कार्यक्रमांची यादी तिनें केली होती. दर शनिवारीं सिनेमा, नाताळांत अजंटा, जानेवारींत क्रिकेट मॅच. एकदां स्वैपाक करून ती मला वाढणार होती. दोघांचे एकत्र फोटो आजवर काढले नव्हते—तेहि काढायचे होते, शिवाय...










"हें सगळं कधीं करायचं? निदान संध्याकाळचं फिरणं तरी—" एका सकाळीं माझ्या दारांत येऊन ती विचारूं लागली, "आठ आठ दिवसांत तुझं दर्शनहि नाही—"

तिच्या आवाजांत निराशेची धार होती. डोळ्यांत रक्त साकळलं होतं. मला तिची कणव आली. तिचा काय अपराध? तिला कां शिक्षा?

"आज जाऊं भटकायला! आजच फक्त...उद्यापासून ताईला घेऊन मी पार्कवर जाणार आहें संध्याकाळचा. तूं ये हवी तर आमच्याबरोबर. —खरंच येशील?"

ती यावी असं मला एकदम तीव्रतेनें वाटलं. पण तिनें माझं बोलणं पुरं ऐकलं नाही. फुरंगटून ती म्हणाली,

"मग आज तरी कशाला?"

मी पुढं झालों. बाजूनं झेप घेणाऱ्या रंगून वेलीचा झुपका खुडला व तिच्यापुढं धरून म्हटलं,

"असं काय करतेस सुले? जरा कळ धर ना!—ताई जरा हसूं खेळूं दे...दोनचार महिनेच फक्त, मग फक्त आपला कार्यक्रम सुरू करूं..."

तिनें गुच्छाचा स्वीकार केलाहि नाही. "माझा अगदीच विचार करायचा नाही का? मला आता दूर राहवत नाही. बाबांनीहि लिहिलंय् —लग्न करायचं असलं तर ह्या मे महिन्यांतच करायचं म्हणून—"

खुडलेलीं फुलं परत वेलीवर चिकटवतां आलीं तर फार बरं होईल असं मला वाटलं. सुलीची समजूत घालीत मी तिला होस्टेलवर पोचवलं. रोज ताईबरोबर फेरफटका करून आलो की सुलूला भेटायला जाऊं लागलो. माझी ओढाताण झाली तरी सुलू दुखवूं नये हीच इच्छा! पण आमच्या गांठीभेटींतला निर्भरपणा गेला होता. जुलमानें आम्ही भेटूं लागलों. अवघडलेल्या मनःस्थितींत एकमेकांना धरून ठेवायचा आटापिटा करूं लागलों.

...परत उन्हाळा येऊन ठेपला. परत परीक्षेची दंगल जवळ आली. परीक्षा नसल्यानें सुलू आधीच घरीं निघून गेली. ताईला दिलरुबा आणून द्यायच्या गडबडींत मला स्टेशनवर जायला उशीर झाला. गर्दीत आम्हांला मोकळेपणानें बोलतां आलं नाही. माझी बाही धरून ती सारखी माझ्याकडे पाहत होती. तिचं काळीज तीळतीळ तुटत होतं. माझ्याबद्दलच्या प्रेमानें व शंकेनें ती घोळून निघाली होती. आदल्या रात्रींच माझ्या बाहीवर आसवं वाहूं देत ती म्हणाली होती,

"तूं परदेशी जाऊन कीर्ति मिळवायची संधी सोडलीस...आता मलाहि सोडतोस..."

"काय वेड्यासारखं बोलतेस? तुला दूर करायची कल्पनाहि मला सहन होत नाही, सुलू—"

"मग आपण लग्न करूं! पुढल्या महिन्यांतच. पहिल्या मुहूर्तावर. तुमचे प्रोफेसर परवां तेंच नाही का म्हणाले? माझ्या जमदग्नी बाबांनी तर मला अल्टिमेटम् दिलाय—"

"कसं शक्य आहे? पैशाचा, नोकरीचा प्रश्न नाही—पण ताई?— घरांत तरुण विधवा बहीण असतांना—"

सुलूनें तोंड फिरवलं. नाराजीचे, निराशेचे तीव्र भाव तिच्या मुद्रेवर वाढत होते. गाडी हालतांच तिच्या डोळ्यांत दडवलेलं पाणी हिंदकळलं. माझा हात सोडतांना तिचं काळीज जणूं तोडलं जात होतं—

मी घरीं आलों नि खोलींतल्या अंधारांत डोकं धरून बसलों. वहिनी स्वयंपाकघरांत काम करीत होती व ताई नव्या दिलरुब्यावर वाजवीत बसली होती. सुलूनें संयम करून वर्षभर कळ काढली तर? मग सगळं ठीक होईल. माझं शिक्षण, आमचं लग्न...पण आत्ता कसं शक्य आहे? ताई आत्ताच कुठं दुःख विसरूं पाहत आहे तोंच मी घरांत एक मुलगी आणायची? येण्या आणाव्याच्या, नजराणे आणायचे, हास्यांनीं, शृंगारांनी, स्वप्नांनी घर सजवायचं?...

...एकाएकी दिवसांचें तापमान चढत गेलें. उन्हाळा असह्य होऊं लागला. सगळं रुक्ष, बोडकं दिसूं लागलं. डोळे जळत आहेत व अंगाला क्षत पडत आहेत असं वाटूं लागलं. सगळं सुसह्य करण्यासाठीं ताई सारखी दिलरुबा वाजवीत बसूं लागली. दिलरुबा शिकायला तिनें पूर्वीच्या ओळखीचा एक मास्तरहि ठेवला. अनेक वाद्यं वाजविणाऱ्या व संगीत-कलेंत सगळं विसरणाऱ्या कलावंताच्या संगतीनें ताईची साधना सुरू झाली. ताई वाजवी, हसे, गुणगुणे नि माझं मन निवून जाई. दिलरुब्याच्या स्वरांच्या मोहून टाकणाऱ्या लाटा अंगावर घेत मी बागेत एकटाच बसून राही. माझं दीशाहीन आयुष्य मनाआड करीत, सुलूचा विरह सहन करीत...

"किती सुंदर वाजवते नाही ताई?—" बागेंत फुलं वेचायला वहिनी आली तेव्हां तिला अडवून मी म्हणालों. ताई एकदां माणसांत आली कीं वहिनीचं मन परत जिंकणं मला सुचणार होतं. त्यांची नांदी करण्यासाठीं मी म्हटलं, "मी कांहीं करीत नाही म्हणतेस ना? बघ सहा महिन्यांत ताई सुधारली...हसूं खेळूं लागली...माझ्यामुळें, आपल्या सगळ्यांच्या-मुळें—"

माझ्याकडे न पाहतां वहिनी हसली. मग एकदम माझ्यासमोर येऊन म्हणाली,

"ताई अशा सुधारल्या असल्याच. नवऱ्याचा आजार त्यांना माहीत होता...अन् नवऱ्याचं नि त्यांचं अजिबात पटत नव्हतं, माहीत आहे?"

वहिनीचं हंसणं, बोलणं—मला कांहींच आवडलं नाही. वहिनी म्हणाली तें सारं मला माहीत होतं. तिच्या नवऱ्याचा हृदयविकार, नवऱ्याचं नि तिचं भांडण. पण म्हणून तिचं दुःख काय वेगडी होतं? मी कांहीं बोललों नाहीं. वहिनी माझ्यावर आणिक रुष्ट होणं मला नको होतं. वहिनी आणिक कांहीं बडबडेल ह्याची मला भीति वाटत होती.

ताई आपल्या नादांत गुंगू लागली. दिलरुब्याच्या जोडीला ती संध्याकाळची मोलकरणीला व तिच्या मुलीला लिहायला शिकवूं लागली.







आतां मी एकटाच बाहेर जाऊं लागलों. लांबलांब भटकत राहूं लागलों. सकाळचा पोहायला जाऊं लागलों व रात्रीचं दिलरुबा ऐकत सुलूला पत्र लिहीत बसूं लागलों.

...उकललेल्या जमिनीवर वळवाचे पाऊस कोसळले. झाडांची व पागोळ्यांची सरमिसळ होऊं लागली. सगळं कसं उतावीळ दिसूं लागलं. सुलूच्या आगमनाची मी उत्कंठेनें प्रतीक्षा करीत होतों. तिचं एकहि पत्र नव्हतं. माझ्या पत्रांना उत्तरं आलीं नव्हतीं. तडजोड म्हणून मी हवं तर साखरपुडा करायला तयार होतों. सुलू आली कीं तिच्या कानांत हें सांगून तिला खूष करावं म्हणून आतुरलों होतों.

परंतु कॉलेज सुरू झालं तरी सुलू आली नाही. माझ्या मनाची पाल उलटसुलट होऊं लागली. रडव्या चेहऱ्यानें माझी कोटाची बाही धरून ठेवलेली तिची थरथरती आकृति मला सारखी दिसूं लागली. 'आतां मलाहि सोडतोस...माझ्या जमदग्नी बाबांनी तर अल्टिमेटम् दिलाय...' तिची वाक्यं आठवलीं की काळीज चिरून निघे. वाटलं, असंच उठावं व सुलूच्या गांवी जावं. ताईसाठी माझ्या प्रेमाची फरपट आणखी नको—

कॉलेजसमोर हॉटेलमधून सिगरेटी खरेदी करून मी बाहेर पडत होतो तेव्हां मला दादा दिसला. तो थांबेल अशी माझी कल्पना नव्हती. पण मला पाहून त्यानं कडेला गाडी थांबवली.

"का रे?" मी त्याच्या जवळ जाऊन दचकून म्हटलं, "थांबलास? मी लॅबमध्यें जातोंय—" नकळत मी सिगरेटचं पाकीट त्याच्यापुढं केलं.

"सुलू येणार नाही म्हणून?"

"म्हंजे?"

"तेवढ्यसाठीच थांबलो. तुला कळलं नाही? मघाशीच तुझे प्रोफेसर भेटले तें सांगत होते. सुलूनें कॉलेज सोडलं. तिचं लग्न झालं, राजा परवांच तिचं लग्न झालं—प्रोफेसर म्हणाले, तू टाळाटाळ करूं लागलास, तिला फसवूं लागलास म्हणून ती निराश झाली, तिचे वडील भडकले नि—"

माझी भकास मुद्रा पाहून तो एकदम गप्प झाला. माझा चेहरा भयंकर झाला. सगळं अंग पेट घेत आहे असं वाटूं लागलं. पाय लटलटूं लागले. वाटलं, धावावं—सुलूकडे जाऊन तिला घट्ट धरावं! असं कसं करील ती? मी तिचा खरंच अंत पाहिला? तिला इतकं दुखवलं?—तिच्याशी खेळलों, फसवलं—असं वागलों? कांहीं करण्यापूर्वी तिनें मला कळवायचं तरी? कां कुणी आमच्या दोघांत विष कालवलं? कुणी—दादांनी? मी दादाकडे वेड्यासारखा पाहूं लागलों. बाबांच्या प्रेतापुढं मला पोटाशी घेऊन माझा सांभाळ करीन म्हणून शपथ घेणारा दादा असं करील? माझा सूड घेईल? त्याच्या सुखासाठीच मी त्या बयेपासून त्याला दूर ओढलं! माझ्यामुळें यांचा प्रणय उधळला असं थोडंच आहे?—मग दादामुळें आमचं प्रेम विस्कटलं असं तरी कसं मानायचं? मीच दुर्दैवी, मीच अपराधी—

मला वाटलं, ढसढसा रडावं, वहिनीच्या मांडीवर डोकं ठेवून मनसोक्त रडावं. मला तरी दुसरं कोण होतं आतां? वहिनीच्या पदराखाली मी वाढलों नव्हतों का? माझ्यावर नाराज झालेली वहिनी मला दूर लोटील? आळशी, उडाणटप्पू म्हणून हिणवील? तिच्यासाठी मी काय केलंय ह्याची तिला अंधुक तरी कल्पना आली तर—

एकदम मला बतीन बाईची आठवण आली. बतीनला मिठी मारून दादा बसलेला दिसला. सगळं जग फिरल्यासारखं झालं. काय घडलं हें भलतंच! वहिनीसाठी...मग बहिणीसाठी! एकाएकी ताईची आकृति पुढं आली, मास्तरला आलिंगन देऊं पाहणारी! काय भयंकर पाहत होतों मी! ताई तिच्या मार्गानें चालली? माझा रुमाल आसवांनी ओला करून तिनें फेकून दिला नि मग ती आयुष्यांत झेप घेऊं लागली. अन् प्रेयसीला विसरून तिच्या भोवती रिंगण घालणारा मी भोवळ येऊन... मला घेरी येणारसं वाटलं. आतडं पिळवटलं व सगळं गरगरूं लागलं. मी डोळे मिटले; त्याच क्षणीं माझं भान हरपलं.

× × ×

आता ऋतुचक्राचं रहाटगाडगं दोर सुटल्यासारखं गरगरतं आहे. उन्हाळ्याची काहिली होते, वळवाचे पाऊस कोसळतात, कार्तिकाची थंडी काटा उठवते. कॉलेजचीं संमेलनं होतात, परीक्षा होतात. टर्म सुरू होते व संपते. मी प्रयोगशाळेंत जात नाहीं, होटेलातहि बसत नाहीं. उन्हापावसांत कुठे तरी हिंडत राहतों. अंथरुणात पडून छतावरच्या आकृत्या बघतों. कुठेच न बघतां, कांहींच न करतां वेळ घालवितों.

दिवस जात आहेत आणि माझं आयुष्य अंधाऱ्या, अडगळीच्या खोलीसारखं होत आहे. रिकामं, भकास. एके काळीं मी बी. एस्सीला पहिला आलों हेंहि मला आठवत नाही. पदार्थविज्ञानाचीं पुस्तकं मला परकी वाटतात. टेपरेकॉर्डवरची बिस्मिल्लाची सनई बेचव वाटते. सनईच्या सुरांनी विवाहाचं वातावरण दिसूं लागतं व मी सारखा सिगरेटी ओढूं लागतों. सुलूचीं पत्रं एकामागून एक उलटीं सुलटीं करीत बसतों. खरं म्हणजे प्रेमभंगाच्या इंगळ्या माझ्या बधिर काळजावर डंख करतात व मोडून पडतात. शोक करायची माझी शक्तीच गंजून गेली आहे. कुणाशीं बोलावं, कांहीं करावं ही वासनाच विझून गेली आहे.

सकाळीं वहिनीचं माझ्यावरचं भाष्य ऐकलं कीं दिवस सुरू झाल्यासारखं वाटतं. मी वाटणी मागायच्या भानगडींत पडत नाहीं ह्याचं तिला आश्चर्य वाटतं. दोन वेळां मी खातों व सारा वेळ लोळत राहतो हें तिला अगदी आवडत नाही. सुलूला मी फसवलं असा ती उघड आरोप करते व लग्नाचं नांव मी काढूं देत नाहीं म्हणून रागावते. लहान असतों तर तिनें मला मारायला कमी केलं नसतं. पण एवढ्या मोठ्या पुरुषाला काय बोलायचं म्हणून ती स्वतःला मूल नाही, पण लहानग्या दिराला अपत्यासारखं वाढविलं—त्यांतहि यश नाही, माया फुकट गेली म्हणून ती डोळ्याला पदर लावते. तिचे अश्रू मात्र माझी जराशी चलबिचल करतात. मग मी तोंड लपवतों. कुठे तरी भटकत राहतों. एकटा, अनिर्बंध. अंधार पडतो नि ताईच्या मुलांची आठवण येते. बाळू व बेबी माझ्या खांद्यावर चढतात. आणि ताई माझी कानउघाडणी करत राहते. आदर्श संसार करणारी, कलावंत पतीला साथ देणारी, दोन गोजिरी मुलं वाढवणारी, माफक समाजकार्य करणारी ती स्त्री तिच्या नादान, वाया गेलेल्या भावाला बोलत राहते. मी शिकावं, नोकरी करावी, लग्न करावं म्हणून शपथा घालते. ती विनवण्या करते, दमते मग नवऱ्याला सामोरी जाते. तिच्या सुखी संसारांतून मी खालच्या मानेनें सटकतों. मेव्हण्याची शिष्ट नजर टाळतों. घरीं आल्यावर दादाची सावली टाळतो. खिडकीशी खाट ओढून बसतों व सारी रात्र जागरण करतों. आकाशाच्या चतकोरावर ऋतूंचे रंग बदलत राहतात. आणि केव्हातरी घालविलेलं आयुष्य मी आलिप्तपणें पाहत बसतों. कधी काळीं उत्साहानं व उमेदीत लपेटलेलं आयुष्य उजाड मनानें आठवीत राहतों... ● ● ●



अनुक्रमणिका



*उन्हें उतरलीं कीं देवळांत आणि ओवरींत शास्त्री पंडित कसबी कलावंत जमूं लागत. काय त्या माणसांची विद्वत्ता आणि रसिकता ! आहा ! सहज तिकडून फिरत्लें तरी कानावरून चार व्युत्पन्न शब्द जायचे; तिथल्या सुस्वरांनीं मन भरून जायचें....!*



# फुकट्या मारुती

मं. वि. राजाध्यक्ष

यंदाच्या जलप्रलयांत पुण्यांतलें बरें आणि वाईट काय काय वाहून गेलें याची मोजदाद अजून संपलेली नाहीं. वाड्यांपासून ताटवाट्यांपर्यंत नुकसानीच हिशेब तयार होत आहेत. भरपाई, मदत, सगळें ठीक चालूं आहे. जुन्या वास्तू नव्या वेषांत, किंवा जुन्यालाच ठिगळें लावून, उभ्या राहतील लवकरच; कांहींना स्थलांतर करावें लागणार. पण एका जुन्या देवस्थानाचा मात्र ठावठिकाणा उरलेला नाहीं; तें संपूर्णपणें मुठार्पण झालें. जीर्णोद्धार करावा म्हटलें तर एकहि चिरा जागेवर राहिलेला नाहीं...

त्याचा जीर्णोद्धार खरें म्हणजे शेंपाऊणशें वर्षांपूर्वींच व्हायला हवा होता; त्यापूर्वींचत्तें मोडकळीला आलें होतें. कोठें बूड टेकावें म्हटलें तर जागा नव्हती. तेथें कधीं पणती लावल्याचें कोणाला आठवत नसे कीं कोणी फूल वाहिल्याचें. पुण्याला पुढें जीर्णोद्धाराची आणि इतिहास संशोधनाची संवय लागली. तरीहि त्या देवाचें नशीब उघडलें नाहीं. तो उपेक्षितच राहिला. इतका कीं गेल्या दोनतीन पिढ्यांत त्याचें नांव देखील कोणाला ऐकून ठाऊक नाहीं. अगदीं त्या वस्तींतल्या, कसब्यांतल्या लोकांनाहि 'फुकट्या मारुती'ला कोण्या एके काळीं मोठी वर्दळ असे, आणि तीहि शास्त्रीपंडितांची आणि कलावंतांची याचा बिलकुल पत्ता नव्हता. असणार कसा ! नदीकाटीं चार चिरे एकत्र पडलेले असले आणि त्यांतून कुबट वास येत असला म्हणजे देव तेथेंच जाणावा असें होत नाहीं. अशा बेवारशी दगडांचा कशाकशासाठीं उपयोग होत असेल तें कोणी सांगावें !

या फुकट्या मारुतीचा पत्ता आमच्या एका विद्वान् स्नेह्यांना लागला तो अकस्मात् आणि अनपेक्षितपणें. मशारनिल्हे स्नेही आपलें नांव जाहीर करण्यास राजी नाहींत; सबब त्यांचा अधिकार सांगतों. त्यांनीं सगळे पाश सोडले आणि जन्मभर महाराष्ट्राच्या इतिहासाचें सूक्ष्म अध्ययन केलें. त्यांच्या दप्तरांत गडगंज माहिती आहे; नुसत्या सदाशिवभाऊंच्या तोतयाचे तीन रुमाल आहेत; आणि कायकाय मुन्योद्गत आहे ! आनंदीबाईच्या एकंदर पैठण्या किती, शालू किती, तें सगळें विणकरांच्या नांवनिशीपासून आणि खऱ्याखोट्या किंमतीसकट घडाघडा सांगतील. पुण्यांतील अन्य संशोधक कौतुकाचा आव आणून त्यांना 'इतिहास विषयांतले किडे' (बहुमानार्थी अनेकवचन) म्हणतात, पण तें साफ बुद्धीनें नव्हे. म्हटलेंच आहे—बोद्धारो मत्सरग्रस्ताः (राहवत नाहीं म्हणून कंसांत सांगतों—प्रस्तुत स्नेह्यांना तें आवडलें नाहीं तरी—त्रिंबकजी डेंगळ्याची स्वहस्तुरची कांहीं पत्रें त्यांना सापडलीं आहेत. त्यांतलीं दोन ठाण्याच्या तुरुंगातून लिहिलेलीं आहेत. त्यावरून मराठ्यांच्या इतिहासाच्या शेवटच्या प्रकरणावर नवा प्रकाश पडून इंग्रजांच्या विरुद्ध लढणारा पहिला क्रांतिकारक असें त्रिंबकजीचें नांव उजळेल) असो. या स्नेह्यांकडे डॉक्टरेटसाठीं मराठी इतिहासावर प्रबंध लिहिणारे विद्यार्थी माहिती जमविण्यासाठीं नेहमींच येतात. (त्यांचे औपचारिक 'मार्गदर्शक' अर्थात् निराळे असतात.) अशाच एका विद्यार्थ्याला नेमका तपशील पुरविण्यासाठीं ते पुण्यांतल्या कोणा साठ्ये सरदाराच्या जमाखर्चाच्या कीर्दवह्या पाहात होते. त्यांत शके १७१२–१३ च्या सुमारास दर शनिवारीं 'फुकट मारुतीस' सव्वा पळी (आणि हनुमान जयंतीस सव्वा पावशेर) तेल खर्ची पडल्याचा

(पान १७६ पहा)





*शरिरानें केळीच्या कन्यासारखी, दिसायला केवड्याच्या कणसासारखी, व वागायला इरकली लुगड्यासारखी कुलवंत, अशी ही रमा. गेलीं सहा वर्षे तिनें संसार कसा देवीच्या आरतीसारखा केला; पण आज........!*



जी. ए. कुलकर्णी



आतापर्यंत अर्धे स्वयंपाकघर ओलसर होऊन गेलें होतें, आणि भिंतीच्या कडेनें मांडलेली सारीं भांडीं पाण्यानें भरलीं होतीं. भरून आणलेली कळशी रमानें तशीच जमिनीवर ठेवली, आणि आतां हें पाणी कुठें ओतावें याचा ती विचार करूं लागली. मोठीं पातेलीं, तपेलीं तर राहूं द्याच, पण लहान वाट्या, तामलीं, वापरांत नसलेला एक काळामिट्ट तांब्या देखील तिनें पाण्यानें भरला होता, आणि चुलीभोंवतालची थोडी जागा सोडली तर आतां तेथें तीळ ठेवायला कोरडी जागा नव्हती. इकडे तिकडे पहात असतांनाच तिला जाणवलें कीं आपलें आंग सारें भिजलें आहे. तिला आतां कांकडल्यासारखें वाटूं लागलें होतें. तिनें घाईघाईनें कोंचण पिळलें. शेवटीं तिनें फळीवरील पितळी डबा काढला, व त्यांतील साखर सुपांत ओतली. डबा रिकामा करतांना तिचें लक्ष त्यावरील नांवाकडे गेलें. "रमेस–शांतूकडून भेट.' रमा उगाचच हंसली, व डब्यांत पाणी ओतूं लागली. तो भरून वाहूं लागला तरी तिनें कळशी तशीच ओतली, कारण पाणी ओतत असतां ती शांतूच्या पाठीवर थाप मारून हंसत होती, तिची वेणी ओढत होती, आणि तिच्या हिरव्या कांकणांचें कौतुक करत होती...



"रमे, अग दहा वाजायला आले, पाणी संपलं कीं नाहीं अजून!" किंचित् त्रस्त आवाजांत म्हणत आई आंत आल्या, पण पाण्यानें भरलेलीं भांडीं, सर्वत्र झालेली ओल, आणि मध्यभागीं राहून स्वतःशीं हरवलेली रमा, हें सारें पाहून "हें काय विलक्षण!" म्हणत त्यांनीं ओठांवर हात ठेवला व त्या पहातच राहिल्या. रमानें भानावर येऊन वेंधळेपणानें पदर पिळला, व किंचित् शरमून ती त्यांच्याकडे पाहूं लागली.

"बावळट! हजार खेपा घातल्या असशील तळ्याकडे! जळलं तें तरी जवळ आहे!" हताशपणें आई म्हणाल्या "जा आतां, लुगडं तरी बदल. परवां त्यांच्यापर्यंत भिजलीस, आतां

अगदीं न्हाऊनच आलीस. कसलं व्रतवीत घेतलं आहेस कीं काय? आणि हें इतकं पाणी कशाला आणलंस? काय गांवजेवण घालणार आहेस कीं तळं आटणार आहे उद्यां? गाढव!"

रमाचें लक्ष त्यांच्या शब्दांकडे नव्हतेंच. ती त्यांच्याकडे निरखून पहात होती. त्यांचा चेहरा वाळल्यासारखा होता, व धुण्याचा पिळा चुकून वाळत घालायचा राहून जाऊन सारा दिवस तसाच रहावा त्याप्रमाणें त्या कुसकरल्यासारख्या दिसत होत्या. आतां जणुं दुसऱ्याच क्षणीं त्या जमिनीवर आडव्या होणार व प्राण सोडणार असल्याप्रमाणें रमाच्या मनांत कालवाकालव झाली.

"तुम्हांला सोवळ्याचं पाणी लागतंय पुष्कळ," ती म्हणाली "संध्याकाळीं थेंब उरत नाहीं कांहीं वेळां. तें काय तुम्ही आणणार? चार पावलं टाकली कीं तुम्हांला धाप लागते. मग माझ्याशिवाय कोण आणणार बरं? आतां चार दिवस पाण्याची काळजी नाहीं बघा तुम्हांला!"

डोळे मोठे करून आई गप्प राहिल्या, कारण काय बोलावें हें त्यांना समजेना. हें सारें पाणी उद्यां का वापरायला येईल, म्हणून विचारावें असें त्यांना वाटलें, पण रमाच्या चेहऱ्याकडे पाहून त्यांना एक शब्द हलेना. त्या एकदम संतापल्या, व त्यांनीं तिच्याकडे पाठ वळवली.

"बरं जा आतां. पाणी पुरे आज. पान घाल," त्या म्हणाल्या. "त्याची जायची वेळ झाली." रमा लुगडें बदलण्यासाठीं आंत आली त्यावेळीं त्यांना वाटलें, कसली बाधा झालेय कारटीला कुणास ठाऊक!

त्या गांवांत कुठेंहि बाधा होऊं शकली असती, अशी जुनाट कळा त्यावर होती. भूतकाळाचा पिंजर चिकटल्यामुळें सारें गांवच भूताप्रमाणें वाटे, आणि लग्न झाल्यापासून रमानें तें कधींच जिवंत झालेलें पाहिलें नव्हतें. गांवाच्या एका बाजूला मोठे पोपडे उठल्याप्रमाणें डोंगर होते, व त्यांवर शेकडों वर्षांपूर्वीचें एक देऊळ, किल्ल्याचा पडका तट, आणि एका वाड्याचे अवशेष होते. कुणी अज्ञात शिल्पकारांनीं रात्रीचा दिवस करून तेथले काळे खडक माणसाळले होते. त्यांनीं त्यांत अखंड खांब कोरून त्यावर नाजुक दगडी सांखळ्या निर्माण केल्या. त्यावर लवचिक कमरेच्या, पुष्ट नितंबांच्या देवतांना एक विशिष्ट नृत्यरीतीनें उभें रहायला लावलें, व ते सारे स्वतःची मुद्रादेखील कुठें न ठेवतां नाहींसे झाले. ते खांब व त्या स्तब्ध कोरीव देवता जणुं त्यांच्या येण्याची वाट पहात विंध्याप्रमाणें तशाच उभ्या राहिल्या. देवळांत मूर्तीच नाहींत, व गाभारा आंधळ्या खोबणीप्रमाणें आहे. त्यामुळें हें सारें शिलामय रेपाधुंद जग सुटकेच्या क्षणाची वाट पहात बंदीवासांत असल्याप्रमाणें अतृप्त, असहाय वाटे. वाड्याचे आतां समोरील बत्तीस खांब मात्र आहेत, व त्यांमधून अरुंद पायऱ्यांचा उंच जिना खालच्या तळघरांतील अगदी निळसर पाण्यापर्यंत उतरला आहे. त्यावरून एकेकाळीं खांबावरील देवतांप्रमाणें वाटणाऱ्या स्त्रिया लचकत, डौलानें लाटेप्रमाणें हलत जलक्रीडेसाठीं खालीं उतरल्या. पण आतां तिकडे कुणी क्वचितच जातें. बाहेरून आलेला एखादा प्रवासी वणवण करीत त्या थडग्यांभोंवतीं फिरतो, कांहींवेळां मोजमाप, फोटो घेऊन वहींत नोंद करतो व जातो, परंतु पुन्हा तोच प्रवासी परत येत नाहीं. पांचदहा वर्षांत भिंतीचा एखादा भाग कोसळे. लोक तेथील दगड आणून पाटे उखळ करत, पायऱ्या म्हणून वापरत. खालीं गांवांत दोन रस्त्यांवर









चौकोनी दगड बसवले होते. हजार वर्षे त्यांवरून चालत गेल्यामुळें ते झिजून गुळगुळीत झाले होते. त्यावरून नालाच्या जाड वहाणा घालून लोक चालले कीं, खणखणाट होत असे. रात्र झाली कीं, धूर सोडणारे दिवे लावून दहाबारा दुकानें उघडीं रहात, आणि साडेआठला सारें गांव विझल्याप्रमाणें होऊन अंधारांत रुतून बसे. परंतु सूर्यास्ताच्या वेळीं देऊळ, पायऱ्या, बत्तीस खांब यांचें प्रतिबिंब खालच्या पंपासरोवरांत पडलें, कीं पाण्यांतून एखादें तंतुवाद्य वर आल्याप्रमाणें वाटे, आणि त्या उदास सोनेरी क्षणीं नृत्यमग्न आकृतींना देखील बाधा झाल्याप्रमाणें होत असे.

चारचौघींसारखेंच रमाचें लग्न झालें. चारसहा ठिकाणीं कुंडली हुंडा यासाठीं मोडल्यावर ती गोपाळरावांच्या घरीं आली. तिला त्याबद्दल कुणीसुद्धां विचारलें नाहीं. तिला शाळेंत दोनच मैत्रिणी. शांतू आणि अंबू. पण त्यांच्यापैकीं कुणीसुद्धां लग्नाला आले नाहीं, कारण त्यांना कुणी बोलावलेंच नाहीं. रमानें सारे संस्कार मूकपणें सहन केले. गौरीहरापुढें स्तब्ध बसायला तिला फारसा त्रास पडला नाहीं. पूर्वीचें नांव कमला गेलें त्यावेळीं मात्र तिच्यांत असहाय हुरहुर निर्माण झाली, पण ती देखील नंतर विरून गेली. शेवटीं ती त्या मरगळलेल्या, म्हाताऱ्याच्या पाठीवरील आवाळूप्रमाणें वाटणाऱ्या गांवांत आली. प्रथम तर तिला आपले कान एकदम गच्च झाले कीं काय असा संशय येई. पण तीहि शांतता तिनें पचवली. आल्या दिवसापासूनच खांद्यावर पिळे घेऊन धुणें वाळत घालायला सुरुवात केली. तिनें कामाचा रगाडा मानेवर घेतला आणि आपल्या कण्याभोवतीं ती गोपाळरावांचा उग्र, केसाळ वासाचा संसार बिनतक्रार फिरवूं लागली.

इतक्या वर्षांत रमा एकदांच माहेरीं आली होती. त्या स्तब्धतेंतून शहरांत आल्यावर आवाजांचा एक फटकाराच तिच्यावर आदळला. रस्त्यांतून बँड गेला तर रमा लहान मुलीप्रमाणें धांवली, आणि काडीचे आईस्क्रीम घेऊन ती अर्धातास चघळत बसली. दादाचा संसार वाढला होता, पण तो अगदीं एकाकी, त्रस्त झाला होता. त्यानें एक सुरेख, वीतभर कांठाचें रेशमी लुगडें आणून दिलें. अंबू भेटली व तिच्याकडून बरीच माहिती समजली. शांतूला वाळंतपण मानवलें नाहीं. ती कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें झाली व ती निघून गेली. रमाच्या लग्नानंतर तिची एकदांहि भेट झाली नव्हती. ती कमरेवर गोऱ्यापान पोटाचा बारीकसा पट्टा दाखवायची, आणि रमानें तेथें हळूच बोट लावलें कीं, हुळहुळून खूप हंसायची. गप्पा मारतां मारतां रमाचे शब्दच संपले. तिला दिवाकराविषयीं बोलायचें होतें, पण शब्दच येईनात. अंबू झाली तरी आपल्याच नादांत बडबडणारी मुलगी. इतकें तिनें सांगितलें पण दिवाकराविषयीं एक शब्द त्यांत नव्हता. रमा दिवाकराशीं कधीं एक शब्दहि बोलली नव्हती. परंतु अंबूच्या घरीं गेलें कीं, ती त्याची ओळख करून देईल असें तिला वाटे, व त्या कल्पनेनें तिचें अंग थरथरत असे. पण तें कधीं झालें नाहीं. पण तो नेहमीं भोंवतालीं, कुठें ना कुठें असायचाच. हो, तें चित्र दिवाकरानें काढलंय, हें त्याचें कपड्यांचें कपाट, छे ग, मी काय वाचतें इंग्रजी कप्पाळ! हीं सारीं त्याचीं पुस्तकें...पुष्कळदां एकटी असतांना रमाला वाटे, दादानें तेथें एकदां विचारून पहावें, फार तर नाहीं म्हणतील. त्याची तिला संवयच झाली होती. शाळीग्रामासारख्या एका रेव्हेन्यू कारकुनानें तिला नकार दिला होता, एका सिमेंटचुनावाल्या ओव्हरसियरनें पांच हजार हुंडा मागितला होता! पण तेंहि झालें नाहींच. अखेर अंबूच्या साऱ्या जंजाळांत तो मुंबईला गेला, तेथें त्याला बऱ्यापैकीं नोकरी आहे एवढीच माहिती मिळाली. नंतर संभाषण संपलें. शब्दांचीं पावलें जड झालीं, व ते मागें आले. अंबूनें चहा घेतला, कुंकू लावून घेतलें, आणि ती निघून गेली. ती गेल्यावर रमामधली कमला नाहींशी झाली. रमा परत त्या गांवांत आली आणि तेथल्या कुंद वातावरणाच्या बुरशींत गुरफटली.

त्या बुरशीनें कदाचित् रमाला कायम गिळून टाकलें असतें, पण तिचें वागणें बदलून हें असें झालें, आणि तें कितीतरी दिवस चालू होतें. शेजारीपाजारी कुजबुजूं लागले होते. तोंडाळ, गोचिडीप्रमाणें चावरी रखमाकाकू तर मुद्दाम वेळ काढून यायची, कुत्सित प्रश्न विचारायची व नंतर गांवभर खाजुली वाटत हिंडायची. "काय हो लक्षुंबाई, पहावं तें एकेक अरिष्टच तुमच्या रमेचं! पिंपळाला महिन्याच्या प्रदक्षिणा एकाच दिवशीं घालतेय काय, भिकारणीला पातेल्यासकट भात देऊन टाकते काय! अहो, तुम्ही आमच्या गौरीला नाक मुरडलंत, आणि असलं अर्धवट पदरांत घेतलंत! दाखवा तरी कुणा देवरशाला! बनशंकरीला एक माणूस आहे, चांगला सांगतोय. मागं एकदां माझ्या नणंदेला..."

## कांही अवशिष्ट राग



भार्येचीं स्वगतें तशीं विलसितें ज्यानें सदा साहिलीं
देई ना कधीं साद जो परिसुनी आव्हान शब्दांजली।
राही मूक सदा सुहास्यवदनी तप्ता जरी भावना
विश्वीं मानव श्रेष्ठ एक समजा तोचि खरा—

'शाहणा'॥

त्या बडबडींत आई गप्प बसत. त्यांनीं कुणाला न कळत दोघां जंगमांना विचारलेंहि होतें, पण कुठें कांहीं गुण नाहीं. त्यांनीं एकदां ताईत करून आणला, तर राधूनें सदऱ्याचें एक झगझगीत लाल बटण घेऊन तो कुणालातरी देऊन टाकला. आईंना देखील हें सारें कसें समजलें नाहीं. खरें म्हणजे ओबडधोबड, झाडाच्या बुंध्यासारख्या गौरीपुढें रमा केळीच्या कण्यासारखी होती. ती दिसायला केवड्याच्या कणसासारखी, वागायला इरकली लुगड्यासारखी कुलवंत. पांचसहा वर्षे संसार कसा देवीच्या आरतीसारखा झाला. पण दोनचार महिन्यांपासून हें सारें सुरू झालें. त्या दिवशीं संध्याकाळीं एक कळशी तळ्यावरून आणली, आणि अगदीं करकरीत संध्याकाळीं अर्धा तास भर उंबऱ्यावर पाय सोडून भ्रमिष्टासारखी बसली. खरें म्हणजे लक्ष्मी यायच्यावेळीं रमा आंगण झाडून उंबऱ्यावर रांगोळी घालून आंत असायची. पण हें सारें विपरीत पाहून आई तिला ताडताड बोलल्या. तिच्या लहानपणींच वारलेल्या आईचादेखील त्यांनीं उद्धार केला. एकदम गोठून गेल्याप्रमाणें रमा सुन्न झाली. तिनें थिजलेल्या चेहऱ्यानें रात्रीच्या भांड्यांचा ढिगारा संपवला, अंथरुणें







घातलीं, धुतलेल्या कपड्यांच्या घड्या घातल्या आणि सगळयांमागून अंथरुणावर पडून ती तासभर हुमसत राहिली. केंबळा लोंबणारें वाशांचे छप्पर, जाड काळवंडलेले दरवाजे, आईच्या पार फुटक्या फुटक्या टांचा, गोपाळ-रावांच्या आंगाचा कपाळांत तिडीक आणणारा उग्र वास, राघूचे वेडेवांकडे दांत–हीं सारींच तिच्या मनाचे लचके तोडूं लागलीं, आणि रमा त्या लहानपणींच वारलेल्या आईच्या पदराखालीं लहानपणींप्रमाणेंच रडली.

त्यादिवशीं पाण्याला गेली असतां ती प्रथमच वरच्या देवळांत गेली होती. त्या गांवांत आल्यापासून तिला तें देऊळ जणुं बोटानें खूण करून आपल्याकडे बोलावत होतें, व तिलाहि तिकडे एकदां जाऊन येण्याची भीतियुक्त उत्सुकता होती. उंच उंच शेंदीडशें पायऱ्या चढून ती जेडाच्या सईबरोबर वर आली, व बावरलेल्या मुलीप्रमाणें थोडा वेळ भटकली. अनेक वर्षांच्या कोंदलेल्या शांततेनें ओलसर झालेल्या फरशीवर तिचीं पावलें उमटलीं. खांबावरील देवतांना तिच्या बोटांचा हल्काच स्पर्श झाला. तिच्या दुप्पट उंचीच्या दोन अजस्त्र द्वारपालांचे हात तुटले होते. त्यांच्यापुढें उभी रहातांच तिचें आंग थरथरूं लागलें. डोक्यांत वारा घुमूं लागल्याप्रमाणें चमत्कारिक आवाज होऊं लागला, आणि डोळ्यांवर पातळ, लालसर पापुद्रा चढल्याप्रमाणें सारेंच लालसर दिसूं लागलें. सई बाहेर पडली होती. दुबळे पाय ओढत, तिला हांक मारण्याचा प्रयत्न करत रमा तेथून भेदरून निघाली. परंतु तिला कोणीतरी उभ्या जागीं कायमची शिलाकृति केल्याप्रमाणें ती खिळली. कोंपऱ्यांतील अंधाऱ्या खांबाकडे कुणीतरी उभें होतें. तो त्या अर्धवट अंधारांतच थोडा बाजूला झाला. त्याला पहातांच रमाला आपल्या भीतीचा क्षणभर विसर पडला, व ती एकदम ओठांवर बोट ठेवून विस्मयानें म्हणाली, "तूं इथं रे कसा ! इथं कसा आलास दिवाकर !" परंतु दिवाकर कांहीं न बोलतां फक्त तिच्याकडे पाहून हंसला.

बाहेरून सईची हांक ऐकूं आली, आणि रमाच्या हातांचें थरथरणें थांबलें, डोक्यांतील सुसाट आवाजहि बंद झाला. रमानें शून्य नजरेनें समोरच्या खांबाकडे पाहिलें, आणि ती निमूट-पणें बाहेर पडली. वाटेंत सईवर गजगे उडवल्याप्रमाणें खूप बडबडली, परंतु रमाचे ओठ मात्र हलले नाहींत. आपणाला न सांगतां सईनें रमाला त्या भयाण ठिकाणी नेलें म्हणून आई फार रागावल्या. त्यांच्या पुढ्यांतले मुठभर शेंगदाणे घेऊन तोंडांत टाकत सई कोडगेपणानें हंसली आणि निघून गेली. पण रमा मात्र तेव्हांपासून बदलली.

गेल्या महिन्यांत तर फारच. ती जणुं वरचें टरफल काढून टाकूनच जगत होती. संध्याकाळीं पाण्याला गेली कीं, तिला फारच उशीर लागूं लागला. सूर्य मावळूं लागला कीं, त्या देवळांतून सोनेरी प्रवाह पायऱ्यांवरून खालीं आल्या-प्रमाणें तलावाचें पाणी पिवळसर होऊन जात असे. साऱ्या पायऱ्या पाण्यांत उतरत, व त्यांच्याकडे पहात रहातां रमाचें मन भरल्या सुबाप्रमाणें होत होतें. नंतर एक दिवस अगदीं वरच्या पायरीवर दिसला. हळूहळू पायऱ्या उतरून तो तिच्याकडे येत होता. परवां तो अगदीं दांडीभर अंतरावर आला होता. रमा छातीभर पाण्यांत उभी होती. तेंच हंसणें, तेंच मूक आमंत्रण. पण अगदीं ऐनवेळीं धागा तुटला, आणि पाण्याचा सोनेरी रंग नासल्या-प्रमाणें विटून गेला. तिला एकदम राघूची आठवण झाली. आपण येण्याची वाट पहात पोर भुकेजून राहिलें होतें. आणि भोळ्या कांब-ळ्यासारख्या खेडवळ पण उदार मनाचे, आप-णाला बसळींची भाजी आवडते म्हणून कुठें कुठें तरी हिंडून खिसाभर पाला आणणारे गोपाळ-राव! त्यांचीहि यायची वेळ झालीच. या साऱ्या आंतड्याच्या वेटोळ्यांनीं तिचे पाय गुरफटले. अर्धीच कळशी डचमळत ती वात झाल्याप्रमाणें घरीं आली. आणि सगळेजण आपली वाट पहात काळजी करत आहेत हें पाहून तिचा जीवहि अगदीं डचमळून गेला.

दुसऱ्या दिवशीं रमा पांचच्या ऐवजीं चार-लाच उठली, व झपाटल्याप्रमाणें अंधारांतच आंगण झाडूं लागली. हें काम प्रथम आईच करत. त्यांना झोपच येत नसे कुठें टप् झालें कीं विरत चाललेली, कशीबशी जगत असलेली झोप नाहींशी होत असे. पण त्यांना हल्लीं धुळीचा फार त्रास होऊं लागला, म्हणून रमानेंच त्यांच्या हातांतील झाडणी हट्टानें हिसकावून घेतली होती. रमानें आतां स्वतःचें आंगण झाडतां झाडतां शेजारच्यांचेंहि आंगण लख्ख करून टाकलें. आंत येऊन झाडणी ठेवतां ठेवतां ती म्हणाली, "बघा तरी, आज मी असं झाडलं आहे कीं तुम्हांला आतां महिनाभर पहायला नको." तिचें हंसणें पाहून आईचा त्रस्तपणा पुसला व त्यांना भडभडून आलें. अशा सोन्यासारख्या संसाराला कुणी चेटुक केलें हें त्यांना समजेना. त्यांनीं रमाला "तुला काय होतंय ? आईप्रमाणें सांग मला मोकळेपणानं." म्हणून पुष्कळदां विचारलें. पण दर खेपेला ती "छे, मला काय होतंय ?" म्हणून हंसायची. पण त्या वेळीं तिच्या गळ्याची शीर ताठायची, डोळे आंत ओढल्यासारखे दिसायचे. आणि मग हताशपणें "कारटीला

कसली बाधा झालेय कुणास ठाऊक!" असें म्हणून आई गप्प बसत असत.

रमानें घाईघाईनें लुगड्याचें पोतेरें बदललें, व चटकन पान वाढलें. पण बाजूलाच एक छोटें, जेवलेलें स्टेनलेस ताट होतें. राघूस त्याच्या मामानें दिलेलें. साऱ्या गल्लींत तसलें एकच ताट होतें. जेडाची सई कधींतरी टेकायला आली कीं त्यांत आरशाप्रमाणें चेहरा पहायची, आणि नाकांतील मुगबट उगाचच सांवरायची.

"म्हणजे राघू जेवून गेला कीं काय?" रमानें आश्चर्यानें, किंचित् रागानें विचारलें.

"त्याला तर आज घाईच झाली होती जायची," हात झिडकारत आई म्हणाल्या, "वचावचा दोन शितं चघळलीं झालं कशींतरी."

"पण त्याला मी वाढल्याखेरीज चालत नाहीं."

"मी वाढलं म्हणून विघडलं कुठं? मी कांहीं वाटेवरची नाहीं." चिडून आई म्हणाल्या. "तूं कुठं गेलीस हें देखील त्यानें विचारलं नाहीं."

रमा चिरडल्यासारखी झाली. खरंच? मग इतके दिवस तो हट्ट धरून बसायचा तो, तें सारें खोटेंच? तिनें ताट उचलून न्हाणींत ठेवलें. तेथूनच तिनें मोठ्या विजयी आवाजांत विचारलें, "मग तुम्ही त्याला लिंबाचं लोणचं घातलंत? त्याला फार आवडतंय तें." आई-कडून कांहीं उत्तर न आल्यानें तिला हायसें वाटलें. लिंबाच्या लोणच्याच्या गुपिताचा एक धागा अद्यापहि तिच्या हातांत राहिला होता.

गोपाळराव माडीवरून खालीं आले, आणि खालीं मान घालून पानावर बसले. हातांत कांकणें असलीं तर बायको, नाहीं तर आई वाढत आहे एवढें त्यांना समजे. भात, भाकरी भात या तीन अवस्था झाल्या कीं त्यांचें जेवण आपोआप संपत असे. मध्यें भाकरी न वाढतां पुन्हां भात वाढला, तर आपण आज भाकरी खाल्ली नाहीं हें त्यांच्या ध्यानांत आलेंच असतें असें नाहीं. ते शेवटचा एक घांस बाजूला पानांत ठेवत पाणी पितांना भांड्याला उजव्या पालथ्या हातानें आधार देत, व दांत घांसण्यासाठीं मीठ घेऊन हात धुण्यासाठीं उठत. आज काकणांचे हात भाकरी वाढत असतां त्या गोऱ्या अशक्त हाताकडे त्यांचें लक्ष गेलें. त्यावर रुंद, जांभळसर रंगाचा भाजलेला डाग होता.

"हें काय करून घेतलं आहेस आज आणखी?" त्यांनीं विचारलें.

रमा एकदम दचकली त्यांच्या बोलण्यानें. जेवतांना बोलण्याचा प्रसंग हा अगदीं आकस्मिक. तिनें गोंधळून हाताकडे पाहिलें, व पदरानें तो डाग पुसण्याचा प्रयत्न केला. तो न जातां आंतली आग मात्र किंचित् उजळली, व तिनें बोट मागें घेतलें.

"कांहीं नाहीं. मला वाटतं काल इस्त्री लागली." ती शरमून म्हणाली.

गोपाळराव खालीं मान घालून जेवूं लागले. आई कांहीं बोलल्या नाहींत. पण एकमेकांच्या मनांत काय चाललें होतें हें दोघांनाहि माहीत होतें. आतां साडेदहा वाजून गेले होते. रमानें मागला भात वाढला, व ती लगबगीनें माडीवर गेली.

तेथें तिनें काल रात्र जागून इस्त्री करून ठेवलेल्या कपड्यांचा ढिगारा होता. शर्ट-कोटापासून चादरीपर्यंत तिनें सगळ्या कपड्यांना वेडीवाकडी इस्त्री केली होती. इस्त्री नंतर विझत गेल्यामुळें नंतरचे कांहीं कपडे कुमट झाले होते. आपल्या या कामाकडे पाहून तिला फार अभिमान वाटला. आपण जर हरघडी मदत केली नसती तर गोपाळरावांना दररोज धुतलेला शर्ट तरी मिळाला असता कीं नाहीं कुणास ठाऊक! अगदींच भाबडा, सरळ स्वभाव आहे त्यांचा! थोडा वेंधळाहि. टोपी तेलकट झाली आहे, व खिशांत हातरुमाल मिळायचा नाहीं. कधीं त्यांतून भाजी, फुलें आलीं कीं तो हरवलाच. मग तो कधीं तरी कपाटाखालीं दिसायचा किंवा उंदरानें पळवलेला असायचा! तिनें त्यांचा एक शर्ट काढला, व त्याला बटणें लावलीं. पण हातीं दोनच बटणें लागतांच ती बावरली. कालच्या घाईंत तें कुठें घरंगळलें कुणास ठाऊक! तिनें जमिनीवर हात टेकून टेबलाखालीं कोपऱ्यांत देखील शोधून पाहिलें. पण नाहीं. तिनें घाईघाईनें सुई-दोरा घेतला, व खालच्या काजाला एक टाका घातला. शर्टाला तिच्या मळकट हाताची धूळ लागली, व त्या कुमट कपड्याला चिकटून बसली. बरं झालं बाई आधीं पाहिलें तें, नाहीं तर ऐनवेळीं गडबड झाली असती!

ती खालीं परत आली, त्या वेळीं आई हलक्या आवाजांत गोपाळरावांशीं बोलत होत्या, म्हणून रमा तेथेंच रेंगाळली.

"अरे गोपाळ, असं किती दिवस चालायचं रे? माहेरीं तरी पाठवतोस का बघ तिला चार-सहा महिने"

"होय, मी तरी त्याचाच विचार करतोय. पण इथं तुझं कसं होणार? तुला तर तांब्या देखील उचलत नाहीं."

रमाचें मन ताणल्यासारखें झालें. साऱ्या संसाराचा भार आपल्यावर आहे हें पाहून ती हंसली, तिनें उगाचच पदर खोचून घेतला.

"माझं काय, मी सांभाळेन कसंतरी!" आई म्हणाल्या, "लग्नाआधीं तीच होती कीं काय? नशिबांत असेल तें कांहीं चुकत नाहीं हेंच खरं."

रमा सैलावली. तिला एकदम पोकळ वाटलें. मनाचा एक पीळ सुटून गेला. पण तिला तें खरें वाटलें नाहीं. आई सगळं सांभाळतील आपलं? उपास, सोवळं ओवळं यांतूनच त्यांना वर येतां येणार नाहीं. मग बाकी काय जमणार, कपाळ? छट्, नाहीं म्हटलं तरी सारा आटाला आपणच सांभाळला पाहिजे. आपले हात आतां कायमचे गुंतून गेले आहेत!

ती आंत येतांच आईनीं विषय थांबवला, व गोपाळराव हात धुवायला गेले.

"म्हणजे तुम्ही सगळं सांभाळाल, सोवळं, उपासतपास?" रुखरुखीनें रमानें विचारलें.

आपले शब्द तिनें ऐकले, म्हणून आई किंचित् शरमल्या. पण त्या लगेच हंसल्याहि.

"मग काय करणार बरं सांग? तुलाहि थोडी विश्रांति मिळेल. चार महिने रहा, सहा महिने रहा. बरं वाटलं कीं तुझा दादा तुला आणून पोहोंचवील्च कीं."

रमानें एक निश्वास सोडला, व उष्टें काढण्यास सुरवात केली. फार दिवस असलेली एखादी जुनी पेटी कायमची फेकून द्यावी त्याप्रमाणें विच्या आयुष्यांतील एक कोपरा सुना झाला: म्हणजे आई आतां स्वतंत्रपणें राहूं शकतील तर! तिला थोडें हायसें वाटलें, पण हुरहुर देखील. कांहींतरी कायमचें संपलें अशी विषण्णता तिच्यांत निर्माण झाली. लग्न झाल्यापासून तिनें आईना अंगावर तोलून धरलें होतें. आतां त्या आपल्या मदतीशिवाय राहूं शकतील. एका ऋणानुबंधाची गाठ सुटली.

आई मात्र स्वतःशीं विचार करत होत्या. रमानें आपले शब्द ऐकले हें एका दृष्टीनें बरेंच झालें म्हणायचें. नाहीं तरी आज ना उद्यां तिला सांगावें लागलेंच असतें म्हणा! आतां या रविवारीं तिला माहेरीं पाठवून द्यायला हरकत नाहीं. राहील बिचारी तिथं! नाहींतरी गोपाळच्या संसाराकडे पहायला नको का? असल्या बाईशीं कसला संसार नी काय! सीताबाई कालच सांगत होत्या, कुठल्या तरी वेड्या बाईनें म्हणे नवऱ्याच्या डोक्यांत वरवंटाच घातला. तेव्हां आतां गोपाळानें दुसरा मार्ग पहावा हेंच बरें. सीताबाईचीच एक भाची होती लग्नाची. फारशी शिकलेली नाहीं, पण कामाला कशी खणखणीत, वीस जणांचा अटाला रेटून नेईल! रमाच्या लग्नांत पैचाहि हुंडा मिळाला नव्हता. आतां तोहि मिळेल, साऱ्या घराला फरशी करतां येईल...ओल्सर भुईवर










पाबलें उमटत हिंडणाऱ्या रमाकडे पाहून आईना आपल्या विचारांची भीति वाटली. पण हट्टानें त्यांनीं तिच्याकडे रोखून पाहिलें, व त्या म्हणाल्या, "मग काय झालं? गोपाळच्या संसाराकडे पहायला नको का मला?"

हात धुवून गोपाळराव माडीवर आले. त्यांना नेहमींप्रमाणें वेळ झालाच होता. त्यांनीं लगबगीनें शर्ट उचलला, व आंगावर पसरला. तिसऱ्या काजाला टांका असल्यानें तो अडकल्यासारखा झाला, व त्यांनीं चिडून हिसका देऊन तो तोडून टाकला. परंतु शर्टाच्या कुबट वासानें त्यांची चीड वाढलीच.

"काल तुमच्या सगळ्या कपड्यांना इस्त्री केली मीं." रमा उंबऱ्यावरून भीत भीत म्हणाली.

"हो. तें दिसतंच आहे," गोपाळराव तुटकपणें म्हणाले, "याचं आणखी एक बटण कुठं आहे?" ज्या प्रश्नाला रमा घाबरत होती तो प्रश्न अखेर आलाच. "मी सारं शोधून पाहिलं, पण कुठं मिळालं नाहीं. म्हणून टांका घालून ठेवला मी." ती म्हणाली. तिचे डोळे कुत्र्याप्रमाणें ओलसर दीन होते.

त्यांच्याकडे पाहून तर गोपाळरावांचा संताप फार वाढला. तिचें तोंड असलें दीन नसतें तर तिला केव्हांच हांकून देतां आलें असतें. पण आतां ही तात गळ्याला कायमची बसली. त्यांनी बोलण्याकरितां तोंड उघडलें, पण त्यांनी तो प्रयत्न सोडला. थोड्यावेळानें ते शांतपणें म्हणाले, "हें बघ, तूं कपड्यांना इस्त्रीबिस्त्री करूं नको. कशाला उगाच त्रास घेतेस? मला नुसती धुतलेली शर्टे चालतील! नाहीं तर पंधरवडा महिन्यानें देऊं लक्ष्मणकडे."

"ते घरच्यासारखे कसे होतील?" रमा उतावीळपणें म्हणाली, "गेल्या खेपेला त्यानें एका कोटाची कशी चाळण करून टाकली होती." तिनें पुन्हां साऱ्या घराची जबाबदारी तळहातावर घेतली.

"मग फक्त घरीं धूत जा." गोपाळराव म्हणाले. त्यांनीं कपडे संपवले व ते खालीं आले. चीड व असहायता यांनीं त्यांचें मन ओरबाडून टाकलें होतें. रमानें जर सरळ आपल्या डोळ्याकडे पाहिलें तर आपला गुन्हा उघडकीला येईल, म्हणून त्यांनीं तिच्याकडे पहायचें टाळलें होतें. दोन दिवसांपूर्वी ते कुणाला न कळत देशपांडयांची मुलगी पाहून आले होते. पण या ओलसर डोळ्यांच्या रमाला कसें झिडकारून टाकावें हें त्यांना समजेना. कुबट वासानें भरलेली माडी, वेड्यावाकड्या घड्यांच्या कपड्यांचा ढिगारा, आंगांतील शर्टावरचे बोटांचे मळकट डाग! त्यांना एकदम फार शरम वाटली. ऑफीसमध्यें त्यांना तोंड वर करायला जागा नव्हती. रमानें आईचा फार जुना पीतांबर साबण लावून बडवून बडवून कसा धुवून काढला होता, हें सगळ्यांना माहीत होतें. राघूला कुत्रीं आवडतात, म्हणून तिनें मुरलीधराच्या देवळाजवळ पडलेलें कुत्र्याचें पिलू उचललें, व तलावावर त्याला धुवून मुलाप्रमाणें कडेवरून घरीं आणलें, ही हकीकतहि कानोकानीं झाली होती. रमा स्वतःच हट्टानें पाण्यासाठीं तलावावर जात असे. तिला पहातांच बायका गुजूगुजू एका बाजूला जात, लगबगीनें नाहींशा होत. पण आतां गोपाळरावांना देखील बाहेर कुचमल्यासारखें होऊं लागलें. कुणी तरी भेटून "काय कसं काय?" म्हणून कुत्सिततेनें विचारतील म्हणून ते त्या गांवच्या गांवांतहि आडवळणानें कचेरींत जात, व तेथें इतरांशीं बोलण्याचें टाळत. तें उकिरड्यासारखें गांव, घाण्याच्या बैलासारखें काम, आणि वेड लागलेलें घर! यांच्या आठवणीनें त्यांच्यांत त्रासिक वैराग्य निर्माण झालें. त्यांना वाटलें, जावें हें सारें सोडून कुठें तरी! नाहीं तर मेल्याखेरीज सुटका नाहीं यामधून.

आपण मेल्याखेरीज—अगर रमा!

त्या बेबंद विचारानें त्यांना उधळल्यासारखें झालें व त्यांनीं तो विचार झटकला. पण देशपांडेकडे पाहिलेल्या मुलीचें चित्र जास्त रेखीव झालें, व गोपाळराव वासनेनें आसुसले. ते गडबडीनें बाहेर पडूं लागले. रमा तेथेंच उभी होती: आयुष्य हातून निसटूं लागतांना डोळ्यांत येणारा भाबडा विसराळूपणा तिच्यांत होता.

"हें बघ, माझ्या कपड्यांचं मी पाहीन उद्यांपासून! तुला झेपत नाहीं काम आतांशा." गोपाळराव म्हणाले, व ती बोलण्याच्या आंत लगबगीनें बाहेर पडून मोकळ्या हवेंत आले.

रमा आंत आली आणि चुलीपुढें गप्प बसली. आई माजघरांत जाऊन चटईवर पसरल्या होत्या. आज त्यांचा उपवास होता. निखाऱ्यावर मंद राख जमत आली होती, आणि मधूनच ओरखड्याप्रमाणें लालसर रेषा दिसे. दूध हळूहळू वर येत होतें, पण रमा गालाला हात लावून गोठल्याप्रमाणें बसली होती. तिच्यांत कांहींतरी उकळल्यासारखें होत होतें, आणि निखाऱ्यांतील लाल रेषा डोळ्यांत जाऊन बसल्याप्रमाणें किंचित् लाल कडांच्या दिसूं लागल्या होत्या. गोपाळराव घरांतून गेल्यानंतर आयुष्याचें एक टेकण गेल्याप्रमाणें ती हादरली होती, व तिला आतां स्वतःच्या घरांत उपरें वाटूं लागलें होतें. आई स्वतंत्र झाल्या: गोपाळरावांनीं देखील स्वतःला सोडवून घेतलें.

ती त्या दिवशीं जेवली नाहीं. डोळ्यांत लालसर रेषा घेऊन ती दुपारभर रडली. स्वयंपाकघरांतच पाटावर ती आडवी होते न होते, तोंच संध्याकाळीं राघू धावत आला. त्यानें फेकलेल्या दप्तराच्या आवाजानें तिची ग्लानि गेली. तिच्या डोक्याला मुंग्या आल्यासारख्या वाटत होत्या, व तिनें दोन्ही बाजूंनीं थापट्या मारून त्या घालवण्याचा प्रयत्न केला. ती राघूपुढें आली, व म्हणाली, "अरे, आंत वाटींत शेंगदाणे गूळ ठेवलाय खाऊन घे."

पण राघूची धांदल उडाली होती. "मला नको खायला" म्हणत त्यानें गडबडीनें सदरा चड्डींतून उपसला, तर खुंटीवरील दुसरा त्यानें आंगांत चढवला. "मुरलीधराच्या देवळांत आज नाटक आहे आमचं. मी जाणार!"

रमाचें आंग नव्या उत्साहानें भरलें, व ती हंसली. "अरे, मग तुझ्या वर्गांतलीं मुलें येणार. कपडे चांगले घालून जा. ती नवी चड्डी शिवली आहे ना ती घाल कीं! आतां काय, तुला वर्षभर पुरतील एवढ्या नव्या चड्ड्या शिवल्या आहेत मी." तिच्या शब्दांनीं राघूच्या कपाळावर आंठी चढली हें तिच्या ध्यानांत आलें








# सौंदर्याच्या लहरी रुळती केशसंभारी




नीट निगराणी केलेल्या केशसंभारांत एक प्रकारचा वेगळाच आणि विलोभनीय आकर्षकपणा असतो. स्वस्तिक पर्फ्यूम्ड कॅस्टर ऑईल नेमानें वापरीत राहून आपल्या केंसांचें सौंदर्य जतन करून ठेवा.

## स्वस्तिक पर्फ्यूम्ड कॅस्टर ऑईल





**स्वस्तिक केशरचना शैली—"शोभा"**

केंसांना स्वस्तिक पर्फ्यूम्ड कॅस्टर ऑईल लावल्यावर ते नीट विंचरून घ्या. केंस रिबीननें बांधून त्यांचे दोन झुपके करा. एका झुपक्याचें चक्करडें घालून तें पिनांनीं घट्ट करा. दुसऱ्या झुपक्याची वेणी घालून ती या चक्करड्यावरून लपेटून घ्या.

## स्वस्तिक ऑईल मिल्स लि. मुंबई

.hilpi S.O.M. 9 Mar

नाहीं. तिनें आपली जुनाट काळसर ट्रंक उघडली. तिच्यांत ती राघूचे कपडे, त्याचे पैसे ठेवण्याचा सिगरेटचा डबा, त्याच्या रंगीत गोट्या ठेवत असे. तिनें हिरवट रंगाची एक चड्डी काढली व झटकन् ती राघूपुढें धरली. "वा, बघ कशी छान आहे! ही चड्डी घाल कीं!" स्वतः कापड निवडून अंदाजाच्या मापानें तिनें ती स्वतः शिवली होती. पण राघू दणादणा पाय आपटूं लागला. त्यानें ती एकदां वापरली होती. त्या वेळीं सगळ्या पोरांनीं 'हिरवा राघू, हिरवा राघू' म्हणून त्याला बेजार केलें होतें. शिवाय बसतांना ती कमरेला ताणत असे.

"शीः! कसला रंग आहे तिचा! ती नको, आहे तीच राहूं दे मला." तो म्हणाला. रमानें चटकन पाठ वळवली, व घडी करून तिनें चड्डी ट्रंकेंत ठेवली. या मुलाला आपला चेहरा दाखवण्याची तिला लाज वाटली. तिनें तो ओढून पुन्हा हंसरा केला "बरं, राहिलं माझं." ती म्हणाली. "तूं दंगदाणे खाणार नसशील तर खिशांत घालून ने. मध्यें खातां येतील. मी येऊं का तुझ्याबरोबर देवळांत?"

"नको, नको. मग मुलें हंसतात. अजून आईला बरोबर घेऊन येतो म्हणून बावळ्या म्हणतात."

"बावळ्या!" एकदम हंसून रमा म्हणाली. "होय रे होय, तूं अजून बावळ्याच आहेस मला." त्याचे केस गमतीनें विसकटतांना कोवळ्या मक्यांतील दूधदाण्याप्रमाणें तिच्या आयुष्याचा कण न् कण आनंदानें भरला. "बरं, मी तुझ्याबरोबर देवळांत येत नाहीं. तेथपर्यंत तुला पोहोचवतें आणि येतें. संध्याकाळीं लांब शिंगाचीं गुरेंढोरें येतात."

परंतु राघूनें कपडे संपवले, व तिचा हात झटकून तो पळाला देखील. "सांभाळून रे–" म्हणत रमा ओरडली, पण तीं त्याला ऐकूं गेलीं की नाहीं कुणास ठाऊक!

राघू तर आपल्या रक्तामांसाचा गोळा. तो गेल्यावर तिला एकदम हलकें हुबलें वाटूं लागून तिच्या आयुष्याचा सारा पीळच तुटला. तिला भयाण वाटूं लागलें. सारें घर टेकडीवरील एकाकी देवळाप्रमाणें अंधारें, उजाड आहे, आणि आपण बोटें लावूं ती आकृति वितळून चालली आहे. तेथें आपण एकट्या हिंडत आहों. एकटी म्हणतांच तिचें अंग थरथरूं लागलें. डोळ्यांतील लालसर रेषा फुंकर टाकल्याप्रमाणें रेखीव झाली. आंगांतील कणकण दुपारपासून वाढत होती व आतां तिचें आंग तापलेल्या तव्याप्रमाणें झळ टाकूं लागलें.

सारें घर आतां शांत होतें. अंगावर शाल घेऊन आई परसांत कापूस निवडीत बसल्या होत्या. त्या शालीला रमानें लावलेलें ठिगळ स्पष्ट दिसत होतें, कारण तिला रात्रीं जोड-कापडाचा रंगच समजला नाहीं. पाण्यानें भरलेलीं भांडीं, दांडीवर वाळत घातलेलें लुगडें, फणेरी पेटी, काळसर ट्रंक, धुरकटलेला लक्ष्मीचा फोटो...या साऱ्या वस्तु परिचित, परंतु प्रत्येकीपासून आतड्याचे वळसे सुटत गेल्या-प्रमाणें ती एकटी पडली होती. सगळ्यांनींच आपणाला टाकून दिलें हेंच खरें. आई, गोपाळराव स्वतंत्र झाले. राघूहि आतां मोठा झाला. त्याचें डोकें आतां कमरेला लागलें. तो कांहीं आतां बावळ्या राहिला नाहीं. बावळ्या शब्द आठवतांच ती खूप हंसूं लागली, व स्वतःचें अंग तिला आवरेना. एका कोपऱ्यांत फेकल्याप्रमाणें ती अव्यवस्थित बसली, आणि समोर कुणीसुद्धा नव्हतें तरी पदर तोंडापुढें धरून अंगाला हिसके देऊन खिदळूं लागली. आईनीं एकदां दचकून मान वर करून पाहिलें पण त्या कांहीं बोलल्या नाहींत.

रमाचें आंग आतां जळल्यासारखें होऊं लागलें, आणि समोरील प्रत्येक वस्तूंत लाल शीर टचटचीत दिसूं लागली. एकदम आठ-वल्याप्रमाणें ती उठली, व स्वयंपाकघरांत आली. सगळीं भांडीं पाण्यानें भरलेलीं तशींच होतीं. तिनें कळशी उचलली, तों तिच्यांत थोडें पाणी अद्याप होतें. तें तिनें बदाबदा न्हाणींत ओतलें. कळशी कमरेवर आदळत ती म्हणाली,

"एक कळशी पाणी घेऊन येतें हं." आणि बाहेर पडली.

"रमा, ए रमा–" म्हणत आईनीं उठण्याचा प्रयत्न केला, पण उठायला त्यांना वेळ लागला. तोंपर्यंत रमा रस्त्यावर गेली होती. "दिवे-लागणीची वेळ होईल आतां, आतां कशाला मरायला गेली पाणी आणायला कुणास ठाऊक!" त्या चिडून पुटपुटल्या, आणि कापूस सरबळींत भरून आंत आल्या.

झपझप पावलें टाकत रमा पाटलांच्या पिंपळाकडून उजवीकडे वळली, त्या वेळीं हातांत एक बोचकें घेऊन निघालेली जेडाची सई तिला भेटली.

"आमच्या जावेला ताप भरलाय." सई म्हणाली, "जाऊन येतेय वाडीला. सांजच्यांच परतणार कीं! आणूं का तुमची कळशी मी झटकन्?"

"नको ग, तूं जा. मैल दोन मैल तुला चालून यायचंय. रात्र होईल तुला." रमा म्हणाली. सईचे डोळे शांतप्रमाणें होते, तिचे केस अंबूसारखे. पण सईभोवती उदबत्तीनें गिरवल्याप्रमाणें लाल रेघोटी होती. "आणि हें बघ सई, तुला माझीं हीं सोनेरी कांकणं फार आवडलीं होतीं, नव्हे? हीं चार कांकणें घेऊन टाक तुला."

ती कांहीं बोलायच्या आंत रमानें कळशी पायाशीं ठेवली, व एकेक कांकण हातांत ठेवून बाकीचीं सईच्या हातांत दिलीं. "हें हो काय?" म्हणत सईनें फार संकोच दाखवला. पण रमानें तिचें कांहीं ऐकलें नाहीं. "तूं जा आतां, नाहीं तर अंधार होईल. माझं काय, मी नागपंचमीला नवीन भरेन कीं!"

ती जायला निघाली तशी सई पहातच राहिली. मग मागून मोठ्यानें म्हणाली, "येतांना पाला आणतें मी मेंदीचा दुरडीभर. जावेकडे रान माजलंय. मग बोटं लाल रंगवून देतें हं तुमचीं कुंकवासारखीं."

जातांना रमा स्वतःशीं हंसली. हाताचीं बोटें लाल कुंकवासारखीं; कपाळावर कुंकू निखाऱ्यासारखें, आणि समोर सगळीकडे निखाऱ्याच्या रेषा; आज सगळीकडे आगपंचमी आहे, आगपंचमी...

पायाखालच्या दगडी चौकोनांचा रस्ता संपला, नंतर मऊ धूळ लागली, ओलसर चिखलानें पाय थंड झाले. रमा तलावाजवळ आली. तलावाच्या मागें टेकडीवर पायऱ्यांच्या उंच चढावावर वाड्याचे सुबक रेखीव खांब असहाय-पणें उभे होते, आणि सूर्य अद्याप त्यांच्यांत अडकला नव्हता. किंचित् थरथरणाऱ्या पाण्यावर सगळ्यांचेंच प्रतिबिंब हुरहुरल्याप्रमाणें वाटत होतें. वारा नव्हताच. पण समोरचें पाणी प्रचंड वेगानें वर चढून त्या देवळांत, वाड्यांत ओतत असल्याप्रमाणें रमाच्या कानांत मोठा घुमारा सुरू झाला होता, आणि देऊळ पेटूं लागल्याप्रमाणें त्याच्या भिंती खांबांतून लाल पालवीप्रमाणें आगीच्या जिभा फुटूं लागल्या होत्या.

तलावावर शेवटची एकेक घागर नेण्यासाठीं जमलेल्या तीनचार बायका होत्या. रमा येतांच एकीनें विचारलें, "काय रमाक्का, आज उशीर झाला!" पण रमा घुम्मी राहून तिच्याकडे एकटक पाहूं लागतांच ती विरमली. रमानें आपली कळशी उचलली, व वरच्या बाजूला अगदी पायऱ्यांच्या कडेला जाऊन उभी राहिली. त्या बायका निघून गेल्या, व तलावावर कुणी राहिलें नाहीं. मळक्या आंगट्यासारखें दिसणारें गुराख्याचें एक पोर दोन गाई व एक शेळी घेऊन वरच्या पाऊलवाटेनें चाललें होतें. त्यानें एक दगड उचलला व पाण्यांत फेकला. तलावानें हळूच आपलें एक तोंड उघडलें, व तो दगड गिळून टाकला. शेळीच्या गळ्यांतील घुंगूर मधून मधून हलले, आणि तेथल्या स्तब्धतेवर किण-किण टिकल्या ठेवून पोरामागें निघून गेले.

रमा दोनचार पायऱ्या उतरून पाण्यांत आली. पाणी गुडघ्यापर्यंत आलें. आणि तेथें लोकांनीं टाकलेलें निर्माल्य थबकून थबकून तिच्या पायावर आपटूं लागलें. तिनें कळशी कठड्यावर ठेवली; व ती त्याला टेकून उभी राहिली. कळशीवर सूर्यप्रकाश पुसल्यासारखा झाला, व तिच्यावर तिला स्वतःचें नांव दिसलें. "कमळीसाठी भेट——दादा." त्या जुन्या नांवानें हांक मारणारा आतां एकटाच दादा राहिला होता. पण तें नांव आतां दूर राहिलें, दारांतल्या प्राजक्तांत अडकून. अंबूजवळ देखील तें असेल —कदाचित्. इथली घागर फार मोठी होते म्हणून दादानें ही कळशी तिला मुद्दाम आणून दिली. मोटर भर दुपारीं रस्त्याला आली. तेथून उन्हांतच हातांत कळशी घेऊन तो चालत आला. पण लगेच संध्याकाळीं निघून गेला. मोटरींत कशाला तरी लागून त्याचें धोतर टरकलं होतें, त्याची चिंधी तो जात असतां वाऱ्यानें हलत होती. दादाच्या आठवणीनें रमाच्या मनांत सळकल्यासारखें झाले. गेला महिनाभर, त्याला एक कार्ड पाठवावें, त्याला इकडे बोलवावें असें तिला फार वाटत होतें. पण त्याला तरी आतां आतडें उरलें असेल का? कीं लग्नानंतर त्यालाहि आपल्याशिवायचा निराळा मार्ग मिळाला असेल? तिला तो विचार नकोसा वाटला. आपण त्या गोष्टीचा तरी निर्णय लावला नाहीं हें बरेंच झालें असें तिला वाटलें. कुणास ठाऊक, फळ पिकलें आहे का हें पहाण्यासाठीं फोडून पहायचें, तर आंत मलतेंच कांहीं दिसायचें! पण नाहींच. त्याचें आतडें कांहीं असें आकसायचें नाहीं. पुस्तकांत ठेवण्यासाठीं कुठून तरी मोरपीस आणून देणारा, केळीच्या पानाची पिपाणी करून देणारा, आई आजारी असतां आपली वेणी घालणारा, लग्नांत धायकुतीनें सगळीकडे धावपळ करणारा, पाहुण्यांना बसण्यासाठीं एक प्रचंड जाजम स्वतःच्या खांद्यावरून आणणारा आणि आपण



अनुक्रमणिका



# चित्रा

वि. म. कुलकर्णी

स्वच्छ चैत्राचें गगन
उभा चेहरा उजळ,
दोहीं डोळियांभीतरीं
एक हास्याचें काजळ !

कानीं डुले कर्णफूल
धन्य गालांचा प्रदेश;
कुण्या अज्ञात लोकींचा
मस्तकांत मिने वास...

व्यस्त चंचलपणाला
घात घातला आवर,
आटोपेना वेडापिसा
असा भर्जरी पदर !

भल्या रामप्रहरांत
फुलें फुलतीं चाफ्याचीं
तींच इतुक्या घाईनें
आहेत का वेंचायची !

पानझडल्या जगांत
चाले कुन्तलगामिनी;
दृष्ट लागेल दृष्टीला
नये पाहूं निरखूनी !

• • •

इकडे येतांना एकदम डोळेभर पाणी काढणारा दादा ! एकाकी, संताशी, परंतु चाफ्याच्या फुला-सारख्या मनाचा हा भाऊ, त्याच्या कलानें घेणारे कुणी तरी त्याच्या सावलीप्रमाणें त्याला कायमचें असावें असें तिला वाटलें व तिनें एक निश्वास सोडला.

ती हळूहळू नकळत आणखी दोनचार पायऱ्या उतरली. पाणी कमरेपर्यंत आलें, आणि त्याचा स्पर्शहि एकदम आग्रही झाला. गुडघ्याभोवतीं हिंद-कळणारें निर्माल्य पदरांत अडकूं लागलें. सारा तलाव आतां सोनेरी पाण्यानें भरला होता, व त्यांत सारें प्रतिबिंब कोरून ठेवल्याप्रमाणें स्थिर होतें. पण आतां वारा वेबंद झाल्याप्रमाणें तिच्या कानांतील आवाज विलक्षण घुमूं लागला. पाणी अदृश्य लाटांनीं तिच्यावर आदळून प्रचंड झोतानें नाहींसें होत असल्याप्रमाणें त्याची गर्जना होऊं लागली. वरचें देऊळ आतांसारख्या सळसळ फिरणाऱ्या, झावळ्यासारख्या जाळाच्या तुकड्यांत पुरे सापडले होते, व त्याचा गोपूर हळूहळू त्या लालभडक भोवऱ्यांत खचत होता. पाण्याची एक चुणी सरकत आली, आणि तिच्यावर आदळली. तिच्या तुषारांनीं तिचे केस, चेहरा भिजून चिंब झाला, कानांतील आवाज एकदम थांबला, व डोळ्यांतील लाल वेदनाहि थांबली. हातानें तोंड पुसून रमा समोर पाहूं लागली. समोरचें देऊळ आतां स्वच्छ झालें होतें, व सूर्य खांबाखांबांत गुरफटून राहिला होता.

प्रतिबिंब विलक्षण रेखीव झालें होतें. वाड्याच्या पायऱ्या अगदीं वरपासून तिच्यापर्यंत पसरल्या होत्या, आणि त्यावरून हसऱ्या चेहऱ्याचा दिवाकर पायऱ्या उतरून तिच्याकडे येत होता. त्यानें खऱ्या पायऱ्या तर ओलां-डल्याच होत्या, पण प्रतिबिंबांतीलहि अर्ध्या पायऱ्या उतरून तो तिच्याकडे येत होता. तेंच हसणें, तेंच मूक आमंत्रण. सूर्य खांबांतून मोकळा होऊन खालीं निसटण्याच्या आधींच तो शेवटच्या पायरीवर येणार हें रमाला माहीत होतें. येथून जरा पुढें गेलें कीं त्या शेवटच्या पायरीजवळ सहज जातां येईल असें तिला वाटलें, व ती आणखी एक पायरी उतरली. आतां पावलें अडखळवणारीं आतड्यांचीं बंधनें नाहींत. तिला एकदम हलकें हलकें वाटूं लागलें, व स्वतःच एक लाट असल्याप्रमाणें ती तरंगूं लागली.

सूर्य निसटून निघून जायला अजून वेळ आहे. पण फारच थोडा. त्यापूर्वींच तो क्षण येणार आहे.

सोन्याचा. सुटकेचा.

सुटकेचाच.

• • •





अनुक्रमणिका

# करिअप्पानंतर मीच

व्यंकटेश माडगूळकर

*वायकांनीं चिवचिवाट केला, चुंबनें वाजलीं, मिठ्या पडल्या. कोणी कोणाच्या कमरेभोंवती चांदण्याचे हात टाकले. संभाषणाची एक जलद गत—एखाद्या वाद्य मेळावर वाजावी तशी—वाजली........मी मात्र 'आम्हांला तेवढं नाहीं ना!' अशा चेहऱ्यानें उभा होतों...........*

दुपारीं साडेचारच्या सुमाराला मी ब्रिशबनच्या विमानतळावर गेलों तेव्हां आभाळ कुंद झालें होतें, झिरिमिरी पाऊस पडत होता.

सिडनीहून उतारू घेऊन विमान आलें, त्याच्या पाठोपाठ लगेच मेलबोर्नहून दुसरें आलें. दोन्हीहि विमानांतून उतारू उतरूं लागले आणि इकडे, आपल्या माणसांना घ्यायला स्त्रीपुरुषांचा रंगीबेरंगी मेळावा कठड्याशीं लागून वाट बघत होता. तो वाऱ्यानें फुलांचा ताटवा हलावा तसा हलूं लागला. गोरे गोरे हात वर झाले, चिमुकले रुमाल फडफडले, लाल चुंबनें हवेत उडवलीं गेलीं. सिडनी मेलबोर्नहून आलेले उतारू, खालीं माना करून कपडे सांवरत पावसांतून येऊं लागले तशी हवाई पऱ्यांची धांदल उडाली. छत्र्या घेऊन त्या उतारूंना आडव्या गेल्या, आपल्या छत्रींत घेऊन विमानतळाकडे येऊं लागल्या.

उतारू आंत येतांच बायकांनी चिवचिवाट केला. मिठ्या पडल्या, चुंबनें वाजलीं. कोणी कोणाचे मऊ हात हातांत घेतले, कोणी कोणाच्या कमरेभोंवतीं चांदण्याचे हात टाकले. संभाषणाची एक जलद गत वाजली, एखाद्या वाद्यमेळावर वाजावी तशी. आणि ब्रिशबेनच्या दिशेनें अनेक मोटारी एका पाठोपाठ निघून गेल्या.

हा सगळा प्रकार पहात मी 'आम्हाला तेवढं नाहीं ना' अशा चेहऱ्यानें उभा होतों, तेवढ्यांत केन्सला जाणाऱ्या उतारूंसाठीं पुकारा झाला. पावसांतून भिजत मी विमानांत चढलों आणि उताऱ्या जागीं जाऊन बसलों. बाहेर पाऊस पडतच होता. गोल खिडकीच्या काचेवर पाण्याचे थेंब चिकटून राहिले होते.

विमानानें वेग घेतल्यावर काचेवरचे थेंब मासे होऊन सुळकन् दुसऱ्या टोकाशीं गेले. काळे ढग मागें टाकून लवकरच विमान स्वच्छ हवेंत आलें. छान कोवळें उन्ह पडलें होतें आणि खाली आलेल्या पांढऱ्याफेक ढगांच्या ढिगाऱ्यावरून आम्ही केन्सच्या दिशेनें चाललों होतों.

हवाई पऱ्यांनीं मद्याचे पेले फिरवले तेव्हां खालीं सागराचें निळेंभोर पाणी होतें. नाना सोंगे घेऊन ढग उभे होते. संध्याकाळ होत होती. काचेला नाक लावून मी मावळतीचे रंग पहात होतों मन कसें फुलून आलें होतें, कसें प्रसन्न वाटत होतें. हा प्रवास कधींच संपू नये आणि हे रंग कधींच नाहींसे होऊ नयेत असें वाटत होतें. पण सुरेख संध्याकाळ फार लवकर नाहींशी झाली.

दिवेलागणीच्या सुमारास विमान टाउन्सविलला थांबलें. मी खालीं उतरतांच, पुण्यांतल्या एप्रिल महिन्याचा वास आला. नाक वर करून मीं तो छातींत भरून घेतला. असा वास मला आतापर्यंत इतरत्र कुठें आल नव्हता.

टाउन्सविलचा निळ्यातांबड्या दिव्यांनीं लखलखणारा विमानतळा सुटला. नऊला दहा मिनिटें कमी असतांना केन्सचा शांत विमानतळ आला.

केन्सच्या रेडिओकेंद्रावरचा रूरल ऑफिसर, लंबाटा बॉब् लोगन लांब टांगा टाकीत आला, आणि आपल्या छोट्या गाडींत घालून मला गांवांत घेऊन आला. चाळीशीं गाठत आलेला बॉब् शेतकऱ्याचा मुलगा होता, आणि अजून मोकळाच राहिला होता (थोडी ओळख झाल्यावर मी कारण विचारलें. तर तो म्हणाला, मला लग्न करावें अशी पोरगीच अजून सांपडली नाहीं.) एक्स्प्लनाड हॉटेलच्या तिसऱ्या मजल्यावर त्याची लहानशी खोली होती. माझा हॉटेलचा खर्च वांचावा आणि त्या पैशांतून कांही पुस्तकें आणि बायकोमुलांना भेटी घेतां याव्यात म्हणून त्यानें हॉटेलवालीशीं रदबदली करून माझ्यासाठीं एक लहानशी खाट आपल्याच खोलींत घालून घेतली. मालकीणबाई इंग्लिश होत्या आणि कधींकाळीं भारतांत राहून आल्या होत्या. गुलाबजाम हा पदार्थ आपण खाल्ल्याचें सांगून त्या म्हणाल्या,

"तुम्हाला म्हणून ही सवलत देत्येय. एरवीं बॉबचं म्हणणं मी मुळींच मानलं नसतं"

माझं जेवण विमानांतच झालें होतें (ऑस्ट्रेलियन लोक, जैनांप्रमाणें सूर्य मावळण्यापूर्वी जेवतात.) थोडा वेळ इकडचें तिकडचें बोलून, भगवाना, म्हणून मी खाटेवर अंग टाकलें.

पहांटे लवकर जागा झालों तेव्हां, पहाटेच्या गार हिरव्या उजेडानें खोली भरून गेली होती. मला अनोळखी अशीं पांखरें बाहेर भूपाळ्या म्हणत होती. आस्ट्रेलियांत आल्यापासून अशी सुरेख जाग मला कधींच आली नव्हती. अशी शांत पहांट आणि अशीं सुरेख गाणारीं पाखरें मला कधीं भेटलींच नव्हतीं. बॉबची झोपमोड होऊं नये अशा बेतानें मी अंथरुणांतून उठलों आणि बाहेरच्या गॅलरींत येऊन उभा राहिलों. खालून आडवा रस्ता गेलेला होता आणि त्यापलीकडे ओळीनें हिरवींगार झाडें उभीं होतीं. त्यापलीकडे समुद्राचें निळें निळें पाणी होतें, आणि त्यापलीकडे दूरवर धुक्यांत गुरफटलेल्या टेकड्या होत्या.

दिशा उजळत होत्या, पांखरें गात होतीं, निळें पाणी लहरा मारीत होतें. प्रवासी लोकांची 'मक्का' समजल्या जाणाऱ्या केन्समधली माझी पहिली सकाळ किती सुंदर होती!



मग बॉब उठला. उठल्याउठल्या त्यानें चहाची किटली उकळली. हा आतां दुधाची काय व्यवस्था करणार म्हणून मी विचार करतों आहें, तोंवर त्यानें एक टूथपेस्टसारखी ट्यूब घेऊन कपांत पिळली आणि चहा तयार झाला.

चहा पितांना माझ्या मनांत विचार आला, आस्ट्रेलियन लोक हुषार खरे. पुढेंमागें ते तयार चहाच्याहि ट्युबा तयार करतील. ट्यूब पिळून त्यांत गरम पाणी ओतलें कीं चहा तयार!

बॉब् म्हणाला,

"आपण न्याहारी करूं आणि कामाला लागूं"

मी आस्ट्रेलियाच्या न्याहारीचा धसका घेतला होता. उठल्या सुटल्या तळलेलीं अंडी, तव्यावर परतलेलें गुरांचें मांस, तळलेले मासे, बटाट्याचे तळलेले काप, ब्रेडलोणी, दूध पोहे, खीर, फळांचा रस, फळें, कॉफी असले पदार्थ किती आणि काय काय म्हणून खावे?

मी चेहरा पाडून म्हणालों,

"बॉब, मला असल्या न्याहारीची मुळीच संवय नाहीं. या बाबतींत मला सूट मिळेल तर बरें!"

"मग तुला न्याहारीच नको?"

"मुळींच नको असं नाही. दुधाचा एक पेला, टोस्टचे दोन तुकडे, लोणी आणि फळाची एखादी फोड पुरे!"

माझी ही मागणी ऐकून मालकीणकाकूंना फारच विस्मय वाटला. त्यांनीं खांदे उडवले, दोन्ही बगलेला दोन्ही हात पसरले आणि ओठ मुरडले.

"मग तुझ्याकडून मी इतके पैसे घेणार नाहीं, फक्त सोळा शिलिंग. पण बॉबला तुझ्यासारखें करून भागणार नाहीं. तो शेतकरी आहे. शेतकऱ्याला भरपूर न्याहरी लागते—

यावर वाईट चेहरा करून मी म्हणालों,

"मादाम, मी शेतकरी नाहीं. शेतकऱ्यांसाठीं रेडिओ कार्यक्रम आंखणारा चाकरमान्या आहें."

मग मालकीणकाकूंनीं माझी न्याहरी पाठवली. दुधाच्या पेल्याचा आकार बेतशीर होता. पण, त्यांनीं पाठविलेला टोस्टचा ढीग संपवतां संपवतां मी बेजार झालों.

ट्रिनिटी उपसागराच्या किनाऱ्यालगत वसलेलें केन्स हें सुरेख गांव ब्रिसबन्पासून हजारएक मैल दूर आहे. दूध, अननस, बीअर यांची लयलूट असलेल्या ह्या गांवांतली मध्यवर्ती वस्ती सोडली तर बाहेर-बाहेरचीं घरें जमिनीवर नव्हतीं, माळ्यावर होती. शेत राखणीचा मळा फार उंच असतो. ही घरें एवढीं उंच नव्हतीं. लाकडांचे प्रचंड ओंडके जमिनींत उभे पुरून, चार पांच फूट उंचीवर केलेल्या लाकडी माळ्यावर ही लाकडी घरें उभी होतीं, वर पत्र्याचीं छपरें होतीं आणि हीं सुंदर आकाराचीं छपरें सुरेख रंगवलीं होतीं. लाल, हिरवीं, पिवळीं, जांभळीं. लाकडी शिडीच्या पायऱ्या चढून वर जायचें, मग उंबरा. रस्त्यांतून जातांना, मान वर करून बघितलें कीं, दाराशीं हवा खात बसलेल्या बायका दिसायच्या.

माळ्याखालीं, मोटरगाड्या, अवजारें ठेवलेलीं दिसायचीं.

केन्सच्या आसपास, उसाचीं हिरवींगार आणि मोठमोठीं रानें होतीं. सुसरी असलेल्या नद्या होत्या, डोंगराच्या रांगा होत्या. त्यापलीकडे पठारावर तांबड्या काळ्या रंगाची पिकाऊ जमीन होती आणि त्यापलीकडे, उंचउंच वृक्षांनीं काळोखी आणलेलें जंगल होतें.

सरता नोव्हेंबर महिना होता आणि गुलमोहरांचीं झाडें फुलोऱ्यानें तांबडीलाल झालीं होतीं. चाफा, घाणेरी, शंकेश्वर ही आपली मंडळी तिकडे केव्हां गेली कोण जाणे, पण ती सगळी सुरेख फुलली होती. मेलबोर्नला दिसणारे, कावळ्याचे भाऊबंद मॅगपाय पक्षी इथें दिसत नव्हते. इथलीं पांखरें सुरेख गात होतीं, इथले पोपट पंचरंगी होते. बरोबर टेपरेकार्डर घेऊन बॉब आणि मी बाहेर पडलों. केन्सच्या ऊस संशोधन केंद्रावर गेलों. तिथें कोणी गिलबर्ट नांवाचा अधिकारी मोठा हुषार होता. त्याची मुलाखत घ्यावी आणि उद्यां सकाळचा रेडिओ-कार्यक्रम भरून काढावा, असा बॉब्चा हेतु होता. जागोजाग दुले भरवून शेतकऱ्यांच्या शेतकी तज्ज्ञांच्या मुलाखती गोळा करून त्या कार्यक्रमांत देणें, हें रुरल ऑफीसरचें महत्त्वाचें काम असतें.

गिली हा माणूस मोठा कठीण आहे. मुलाखतीसाठीं तो बधायचा नाहीं असें बॉबला वाटत होतें. अधिकाऱ्यानें थोडें मोकळें व्हावें आणि बोलावें यासाठीं बीअरचे एक दोन ग्लासेस घ्यावेत, असाहि विचार त्यानें मला बोलून दाखवला.

आम्ही गिलबर्टसाहेबाच्या कचेरीत गेलों तेव्हां आपलें मोठें पोट घेऊन तो खुर्चीत बसला होता. टकल्या, गिड्डा, जाड चाळिशी लावलेला, साठी गाठत आलेला आणि बोलायला मोठा गमत्या. त्याच्या मोठ्या टेबलावर कागदाचा पसारा होता. आणि एक भली मोठी अर्धवट संपलेली रमूची बाटलीहि होती! ती पाहून मी आणि बॉब्नें फक्त एकमेकाकडे पाहिलें.

माझी ओळख वगैरे करून दिल्यावर गिल्बर्ट साहेबानें मला केंद्र फिरून दाखवलें, पण बॉब्ला मुलाखत दिली नाहीं. 'पुन्हा केव्हां तरी' असें म्हणून त्यानें बॉब्ची विनंति अंगाआड टाकली. पण त्या बापड्याला उद्यां सकाळचा कार्यक्रम भरवयाचा होता, तेव्हां नाइलाजानें दुसऱ्या एका दुय्यम साहेबांची मुलाखत त्यानें रेकार्ड केली. हा साहेबहि बोलतांना चांचरत होता, आमच्याकडच्या शेतकी साहेबासारखाच टंगळमंगळ करत होता, हें बघून मला बरें वाटलें.

मग गिलबर्टनी मला विचारलें,

"तुला डॉनसिंगला भेटायचं आहे का? मी घेऊन जाईन त्याच्याकडे. तो तुझ्या देशांतला आहे. चार पैसे बाळगून आहे. चांगला शेतकरी आहे."

मी म्हणालों,

"जाऊं या"

लगेच साहेबानें डॉनसिंगला फोन केला आणि वीस एक मिनिटांनीं आम्ही डॉनसिंगच्या मळ्यावर पोचलों.

हा डॉन् म्हणजे पंजाबी ग्यान होता. आस्ट्रेलियांत मला भेटलेला पहिला हिंदी माणूस. शंभर वर्षांपूर्वी त्याचा बाप इकडे उसाची लागवड करणारा शेतमजूर म्हणून आला, तेव्हां आजची 'व्हाइट ऑस्ट्रेलिया पॉलिसी नव्हती.' काळ्या माणसांना तेव्हां आस्ट्रेलियांत येऊं दिलें जात असे आणि राहूं दिलें जात असे.

डॉननें आमचें छान आगतस्वागत केलें, खाऊंपिऊं घातलें... बोलतांबोलतां मध्येंच तो म्हणाला,

"साब, हिंदुस्थानी आती है?"

मी म्हणालों,



अनुक्रमणिका








उंट छाप सिन्नर बिडी




मु. सिन्नर, (नाशिक)

NM;M-2/59

अनुक्रमणिका








"जरूर, क्यूं नहीं ? यह तो अपनी राष्ट्रभाषा है, ग्यानसिंग !"
डॉनचा चेहरा एकदम उजळला, तो म्हणाला,

"मला तिकडचें कोणी आलें कीं फार आनंद होतो. पण हे साहेब पाहुण्याला अगदीं थोडा वेळ घेऊन येतात. घंटा दोन घंट्यानं भूक भागत नाहीं. चार दिवस माझ्या घरीं राहिलें पाहिजे."

मग त्यानें मला आपली 'गन्नेकी खेती' दाखवली. शंभर एकर रान, अद्यावत् यंत्रसामुग्री, सगळं टापटीप होतें. रानांतलें घर म्हणजे सुरेख बंगला होता. फोन, फ्रीज असल्या सगळ्या सुखसोयी होत्या, गाड्या होत्या.

बंगल्या पुढचे 'इमली'चें झाड त्यानें मला कौतुकानें दाखविलें. पन्नाशीच्यापुढें गेलेल्या डॉननें बहुधा आस्ट्रेलियन बाईशीं लग्न केलें असावें. बाई दिसल्या नाहीं. पण डॉनचा पोरगा होता. तो पुरा आस्ट्रेलियन वाटत होता. ग्यानसिंगचे दोन भाचे कांहीं वर्षांपूर्वी भारतांतून आले होते. आम्हां दोघांना हिंदींतून बोलतांना पाहून त्या पोरांना मजा वाटत होती. कांहीं न बोलतां ते आपले हसऱ्या चेहऱ्यानें नुसते ऐकत होते.

शेवटी डॉन म्हणाला,

"साब, आपण लोक इंग्रजांसाठीं लढाईवर गेलों, त्याच्या शत्रूला आपला शत्रू मानून छातीवर गोळ्या झेलल्या. पण आमच्या ह्या सचाईचा काय फायदा, तर ही व्हाईट आस्ट्रेलिया पॉलिसी ! हमें जहर जैसी लगती है। हे माझे भाचे, शेतकामासाठीं देशाकडनं आणले, इथं, कामाला माणसं मिळत नाहींत म्हणून. आतां ते वयांत आले त्यांचीं लग्नं करावीं म्हटलं तर बायका इकडं आणायला सरकार परवानगी देत नाहीं इथलं."

डॉन मधूनच माझ्याशीं हिंदींतून बोले आणि एरवी मजेशीर हेल असलेल्या फाकड्या इंग्रजींतून बोले. दोन्हीहि साहेब ऐकत होते, पुष्कळ वादविवाद झाला.

गिलख्रर्ट साहेब म्हणाला,

"डॉन, व्हाईट आस्ट्रेलिया पॉलिसीचा अर्थ आम्ही काळ्या लोकांना दूर ठेवूं इच्छितों असा नाहीं बाबा. आम्हांला काळे गोरे हा झगडा या देशांत नको. म्हणून आम्ही आपले संभाळून आहोंत इतकेंच. तूं इतके दिवस इथें आहेस, तुला कोणी कधीं काळा म्हणून कमी मानलें आहे का ? नाहीं ना ? मग ?"

पण ग्यानसिंगला कांहीं पटलें नाहीं. त्याचे भाचे वयांत आलेले असून मोकळे राहिलेत, याचा अर्थ काय ?

मग आम्ही डॉन्‌सिंगचा निरोप घेऊन निघालों. बाहेर पडल्यावर गिलख्रर्ट साहेब म्हणाला,

"डॉन् इंडियन कसला ? तो आतां आस्ट्रेलियनच झाला आहे. त्याला शेतकऱ्यांत, समाजांत फार मान आहे. फार उमदा शेतकरी आहे !"

* * *

केन्सच्या शेतकी अधिकाऱ्याच्या गाडींतून मी आजूबाजूला खूप हिंडलों. डोंगर ओलांडून पठाराकडे जातांना रस्त्याच्या डाव्या उजव्या बाजूंना चमत्कारिक झाडें दिसलीं, हात दोन हात बुटकीं आणि डोक्यावर गवताच्या झिंज्या असलेलीं.

मी विचारलें,

"हीं कसलीं झाडें हो ?"

शेतकी अधिकारी म्हणाला,

"दे आर कॉल्ड ग्रास ट्रीज ऑर ब्लॅक बॉईज्, वन् ऑफ दी स्ट्रेन्जेस्ट मेंबर्स ऑफ लिली फॅमिली."

दी. ७/८



अनुक्रमणिका



## डाव्या डोळ्यानं लुटलं सारं शहर !

राजा बढे

खुले नाजुक न्वतीचा हिरवा बहर
अंगमोडीत उठली फुटती लहर
महिरला देह ग नागिण लपेट
केवडयाच्या बनाची ही लावण्यपेठ
नजरेच्या निळाईत भरलं जहर— ॥ १ ॥

पायीं पैजण घुमवीत आली उषा
किलबिलती कोनीं दाही दिशा—
पहाटेचा झुंजुमुंजु पहिला प्रहर— ॥ २ ॥

खेळीमेळी कशी खुली केलीस वेस
तुझे अजाण सौंदर्य पडे इरेस
हिरव्यासाडीत मिरवी झुलती लहर ॥ ३ ॥

काळजाची पायघडी केलीस ग
मन कुठं ग ठेवलं ओलीस ग
तुझ्या जुलुमानं वाई केला कहर ॥ ४ ॥

करि घायाळ जीवा निसटती नजर
लाजेच्या धिटाईत नाहीं उजर
डाव्या डोळ्यानं लुटलं शहर ॥ ५ ॥

अशा प्रकारच्या सोळा वेगवेगळ्या जाती आस्ट्रेलियांत आहेत. ह्या खुज्या झाडाच्या झिज्यामधून कधीं कधीं दहा बारा फूट उंचीचें कणीस उभें राहिलेलें दिसतें, पानकणसासारखें. पश्चिम आस्ट्रेलियांत असल्या एका जातीचें झाड इतकें सावकाश वाढतें कीं, दहा फूट उंचीचें झाड एक हजार वर्षें वयाचे असते !

आजूबाजूला उभ्या असलेल्या ह्या मंडळीच्या वयाला दोनदोनशें वर्षें तरी झालीं असावींत असा कयास मनाशीं करून मी त्यांच्याकडे आदरानें पहात राहिलों.

रस्त्याच्या दोन्ही बाजूला ही वडील मंडळी उभी होती आणि जागोजाग लालमातीचे मोठे मोठे बुडबुडे जमीनींतून वर आले होते. हीं म्हणे वारुळें ! आस्ट्रेलियांतल्या मुंग्या सुद्धा बांधकामशास्त्रांत फार पुढारलेल्या. त्यांनीं स्तुपाच्या आकाराचीं प्रचंड वारुळें वीस वीस पावलांवर बांधलीं होतीं. झिज्यापकाडू बुटक्या झाडांचें बन आणि हीं फुगीं



वारुळें पाहून आपण अज्ञात प्रदेशांत हिंडणारे धाडशी प्रवासी आहोंत असें मला वाटूं लागलें.

मग सुरेख काळें तांबडें रान लागलें. तंबाखूची लागवड दिसली. तंबाखूचा मालक आपल्या रानावरून विमानानें उडत होता. जगांत मिळणाऱ्या तंबाखूपैकीं बारा टक्के तंबाखू आस्ट्रेलियांत पिकतो. तो सगळा हा एकटाच बहाद्दर पिकवीत असावा असें मला वाटलें !

वाटेंत बॉब नांवाच्या शेतकऱ्याच्या वस्तीवर गेलों. कांदे, बटाटे आणि मका पिकविणारा बॉब तीन हजार एकरांचा धनी होता. आम्ही गेलों तेव्हां आभाळाच्या त्या टोंकाला त्याचें यंत्र तांबडा धुरोळा उडवीत मका पेरतांना दिसलें. बांधावर बराच वेळ उभा राहिल्यावर, बॉब आणि त्याचें यंत्र आवाज करीत, धुरोळा उडवीत आलें. माहुतानें हत्ती थांबवावा, तसें यंत्र थांबवून बॉब खालीं उतरला.

त्याचा मातीने भरलेला हात हातात घेतांच मला वाटलें, हा बॉब कसला, बुटका आणि अंगाने आडवा असा बाबू थोरातच हा.

एका दिवसांत किती पेरून होतें, असें मीं विचारतांच, कागदांत तंबाखू घालून सिगरेट वळीत तो म्हणाला,

"पन्नास एकर !"

मग मी मनाशी म्हणालों, 'हा बाबू थोरात कसला, हा बॉब डेव्हीसच !

अथरटन् टेबललॅंडवरून दिवसभर आम्ही कांहीं बाहीं पहात हिंडलों. आंब्याच्या झाडांना कैऱ्या दिसल्या, एक ठिकाणीं मिरचीचे भलेंउंच एकच झाड दिसलें. मी गुपचुप मूठभर मिरच्या तोडून खिशांत ठेवल्या. तोंडाला फार अळणी आलें होतें. हॉटेलांत जेवायला जातांना मिरच्या घेऊन जावें, आणि जीभ पोळवावी हा हिशेब. (केलेल्या सबंध मुक्कामांत हे तिखट मला पुरलें.)

रात्रीं अथरटन् गांवांतल्या एका सुरेख हॉटेलांत राहिलों. रानांत फिरायला जातांना टायसूटची कटकट कशाला, म्हणून मी अर्धी चड्डी, अर्ध्या बाह्याचा शर्ट घालून आलों होतों. बरोबर टॉवेल आणि टूथब्रशाखेरीज आणखी कांहीं झेंगट घेतलेंहि नव्हतें. पण अथरटनचें हें हॉटेल भलतेंच पॉश होतें. 'जेवणघरांत येतांना सभ्य गृहस्थांनीं कोट आणि टाय घालून यावें' अशी पाटी वाचतांच मी बाहेर सटकलो आणि रस्त्याकडेच्या एका ग्रीन कॅफेंत, खुंटावर बसून जेवून आलों.

मालकीणकाकूंना हा हिंदू माणूस जेवत नाहीं याचें कारण धार्मिक असावें असें वाटलें. त्यांनीं पुन्हा पुन्हा बॉब लोगनला सांगितलें कीं,

"तुझ्या मित्राला काय हवें तें आम्ही मिळवून देऊं. त्यांना शाकाहारी जेवण करून त्यांच्या खोलींत पाठवूं दे का ?"

यावर बॉब् गंभीर चेहऱ्यानें म्हणाला,

"मला वाटतें, त्याचा आज उपवास असावा. थँक्यू मादाम !"

यावर बाईनीं मोठ्या कौतुकानें माझ्याकडे पाहिलें आणि म्हटलें,

"मग कांहीं हरकत नाहीं, हो !"

मी मांसमच्छर खाऊन भरल्या पोटानें काऊंटरपाशीं उभा होतो तो चेहरा वळवून भिंतीवरचीं चित्रें पाहूं लागलों.

सकाळीं मालकीणबाईनीं दिलेलीं दुधफळें घेऊन मी आदल्या रात्रीचा उपास सोडला आणि अथरटनहि सोडलें. अमकी फॅक्टरी, तमका तलाव, असें कांहीं बाहीं बघत, उंच उंच झाडें, किर्र जंगल, वेडेवाकडे घाट, खोल दऱ्या, झुळझुळते झरे मागें टाकत भन्नाट परत आलों.

रात्रीं अंथरुणावर अंग टाकल्यावर कितीतरी वेळ माझ्या डोक्यांत मोटारीचा आवाज भरभरत होता, झाडेंझुडें उलट्या दिशेनें पळत होतीं, अंगाखालीं रस्ता सरसरत होता.

* * *

दुसऱ्या दिवशीं, सिटी आणि शायर कौन्सिलनें सन्मान्य पाहुणा म्हणून माझा पाहुणचार केला. हार्बर बोर्डच्या मालकीच्या 'wongable' नांवाच्या लाँचमधून मला 'ग्रीन आयलंड' ला नेऊन तिथली अंडरवॉटर ऑब्झर्वेटरी दाखवावी असें फर्मान सुटलें.

केन्सपासून मोळा मैल आलेल्या ह्या सुंदर बेटाकडे मी निघालों, तेव्हां उभ्या लाँचमध्यें मी एकटाच प्रवासी होतों. बॉब लोगन् पाठराखणी होता.

माणदेशांत जन्म झाल्यामुळें वयाच्या विसाव्या वर्षापर्यंत मी दर्या पाहिला नव्हता, मग पाण्यांतला प्रवास कुठला? निळ्याभोर दर्यांतून लाँच ग्रीनआयलंडकडे जाऊं लागली तेव्हां चाक मारणारा नाकेला कप्तान माझ्याकडे बघून म्हणाला,

"यू आर द सेकंड इंडियन दॅट आय एम् कॅरिंग इन् धिस् लाँच टु ग्रीनआयलंड!"

मी विचारलें,

"एम् आय्? मे आय् नो प्लीज हू वॉज द फर्स्ट फॉर्च्यूनेट वन्?"

कपितान बोलला,

"जनरल करिआप्पा."

मी सांवरून बसलो.

कपितान् पुढें म्हणाला,

"आय् रेकन्, ही इज् ए मायटी मॅन."

मी भुंवया चढवून आणि मान झुकवून म्हणालों,

"माय् वर्ड—"

"अहो, थोडा वेळ इकडचें तिकडचें बोलल्यावर तुमचे करिआप्पा म्हणाले, मी आतां थोडीशी झोप घेतों आणि (इथें कप्तानानें चाक सोडून टाळी वाजवली) असे झोपी गेले. किती? दहाएक मिनिटं. पुन्हा जागे झाले आणि बोलूं लागले. मी विचारलें, अशी हुकमी झोप कशी घेतां येते? तर म्हणाले, तशी मी तिला शिस्त लावली आहे. धन्य आहे!"

थोड्याच वेळांत बोट डुलूं लागली आणि मला पेंग येऊं लागला. बॉब कपितानाकडून चाक कसें फिरवायचें हें समजून घेत होता, तंगड्या फासकटून उभ्या राहिल्या राहिल्या, डाव्या उजव्या बाजूला कलंडत होता. चाक हाणीत होता. हसत होता. मला बोलवत होता. पण पाळण्यातल्या पोरासारखी मला गुरुगुरु झोपच आली. मागल्या फळीला पाठीचा टेका देऊन मी बसल्या बसल्याच घोरू लागलों.

बऱ्याच वेळानें 'ग्रीन आयलंड' आलें. तीस एक एकराचें हें लहानसें प्रवाळ बेट झाडाझुडुपांनीं हिरवेंगार दिसत होतें. आजूबाजूला निळेंभोर पाणी, उन्हांत चमकणारा सफेत वाळूचा किनारा, रंगीबेरंगी छोटीं छोटीं घरें, आणि इकडून तिकडे धावणारीं, पाण्यांत डुंबणारीं, वाळूंत लोळणारीं गुलहौशी जोडपीं. त्यांची नितळ उघडीं अंगें, आणि स्वच्छ मोकळें हंसणें बोलणें...परीकथेंतील राजपुत्रासारखा मी या पाण्यांतल्या ग्रहावर उतरलों.

मऊ वाळूंत पाय रोवत हिंडलों, गार सांवलींत उभा राहिलों, समुद्रावरचा खारा वारा हुंगला, गर्द झाडींतून भरारणारीं पांखरें पाहिलीं. बॉबला चुकवून झाडींत शिरलों. थंड बुंध्याला विळखा घालून उगीच उभा राहिलों. उत्तम कविता वाचली, चित्रपटांतला उत्तम प्रसंग पाहिला, कुणी लिहिलेला सुंदर प्रसंग वाचला कीं, डोळ्याला पाणी येतें तसें झालें. समोर, क्षितिजापर्यंत पसरलेल्या सागराकडे बघत मी कितीतरी वेळ उभा राहिलों.

* * *

बेटाच्या एका अंगाला पाण्यांतला बराच भाग उघडा पडला होता, पाऊल बुडेल एवढ्या पाण्यांतून हिंडून मी आणि बॉबनें नाजूक प्रवाळ झेले गोळा केले. विविध आकाराचे प्रवाळ सापडत होते, एकापेक्षां दुसरे अधिक सुंदर. शिंपल्या वेचणाऱ्या पोरांसारखी आमची धांदल उडाली.

आम्हाला अजून जेवायचें होतें. तीहि सोय हार्बर बोर्डातर्फे झाली होती. दुपारचे दोन वाजून गेल्यामुळें हॉटेलांत कोणी नव्हतें. बॉबनें तिकिट दाखवतांच बाई म्हणाल्या,

"तुम्हांला थोडा वेळ थांबावें लागेल हं!"

बॉब् आणि मी टाळ्या वाजवीत टेबलाशीं बसून राहिलों.

हॉटलेच्या खिडक्यांतून नाना रंगाचे शिंपले, सुरेख रंग दिलेले प्रवाळ झेले ठेवले होते. पेंढा भरलेल्या सुसरीहि होत्या.

मी विचारलें,

"बॉब्, सुसरींच्या शिकारीचें काय झालें?"

बॉब् वाईट चेहरा करून म्हणाला,

"हो, मला सिडनीहून जे.डी.नीं तसं लिहिलं होतं पण मी नुकताच

इथं बदलून आलोय्. माझे कुठं कान्टॅक्ट्स् नाहीत. प्लीज, जे. डी. ना सांगू नकोस हं, म्हणावं प्रयत्न केला पण जमलं नाहीं."

मी म्हणालों,

"बरं."

ग्रीन आयलंडला भेट हें कांहीं माझ्या कार्यक्रमात नव्हतं. तो योग अचानक जुळून आला होता. सुसरीच्या शिकारीवर पाणी सोडणं भाग होतं.

मीं विचारलें,

"माझं मी शिकारीचं जमवायचं म्हटलं तर फार खर्च येईल का?"

"हो, पुष्कळच येईल. तुला कसं साध्य आहे तें?"

"नाहीं ही गोष्ट खरी!"

झकास जेवून आम्ही बाहेर पडलों आणि पाण्याखालचें जग पहाण्यासाठीं गेलों. बेटापासून ऑब्झर्वेटरीपर्यंत आलेला छोटासा लाकडी पूल पार करून गेल्यावर, पाण्यानें झाकलेली लहानशी लाकडी खोली होती. या खोलींत शिरून आम्ही तीसएक पायऱ्या उतरून, सोळा फूट पाण्याखालीं गेलों. खालीं सत्तर टन वजनाची, पोलादी चेंबर होती आणि तिला दोन्ही अंगाला मिळून बावीस गोल खिडक्या होत्या. खिडकीच्या जाड कांचेला नाक लावून पाहिलें कीं, पाण्यांतलें अद्‌भुत जीवन दिसत होतें. प्रवाळाच्या बागा, नाना रंगाचे, नाना जातीचे मासे, समुद्रमुळे, लहानशा मुलाला आंत बसवून न्हाऊं घालतां येईल एवढ्या प्रचंड शिंपा!

निळ्या पाण्यांत रंगाची उधळण होती. रंगीबेरंगी प्रकाराचे झेले डोलत होते. प्रचंड शिंपल्यांची तोंडें हलत होतीं. सारडीन सारख्या माशांच्या झुंडीच्या झुंडी येत होत्या आणि जात होत्या. अंगावर लाल पट्टे असलेले विदुषक जसे प्रवाळांतून सावकाश हिंडत होते! किती रंगाचे, किती आकाराचे, किती जातीचे प्रवाळ होते.

पुष्कळशा खिडक्यांतून ताऱ्यांच्या आकाराचे CORAL POIYPS दिसत होते. पाण्याच्या झुळुकाबरोबर ते धुगधुगत होते. आपल्या डोळ्यांना न दिसणारे अन्न गोळा करीत होते. या लहान जिवांनींच म्हणे संबंध क्वीन्सलँडच्या सागरकिनाऱ्यावर बाराशें मैल लांबीचा प्रवाळ खडक निर्माण केला. ग्रेट बॅरिअर रीफ.

पाव टन वजनाचे आणि चार सहा फूट लांबीचे शिंपले तोडें उघडत होते, मिटत होते. एवढे महाकाय शिंपले जगांत इतरत्र कुठल्याहि सागरांत सांपडत नाहींत. समुद्र तळाशीं जाणाऱ्या माणसाला हे शिंपले पकडतात, गिळून टाकतात असा प्रवाद आहे. पण तसें प्रत्यक्ष घडल्याचें उदाहरण नाहीं.

तास दीडतास रेंगाळून मी त्या बावीस खिडक्यांतून सागराचें तें वैभव पाहिलें आणि थक्क होऊन वर आलों.

ही पोलादी खोली पाण्यांत बुडवावी आणि शास्त्रज्ञांबरोबरच पोराबाळांनीं सुद्धा निसर्गाचें हें कवतीक बघावें ही कल्पना मुळांत दोघां शिकाऱ्यांची. VINCE VLASOFF आणि LIOYAD GRIGG अशीं त्यांचीं नांवें. एक इंजिनियर होता. दुसरा नुसताच शिकारी होता. पण दोघेहि नादी आणि कल्पक. या दोघांनीं ही कल्पना लोकांपुढें मांडल्यावर त्यांना कोणी खुळ्यांत काढलं नाहीं. बरें, यांनींहि नुसत्याच वावड्या उडवीत काळ काढला नाहीं. ते कामाला लागले, आणि लोकांकडून त्यांना सगळी मदत मिळाली. आपल्याला या कामांत अपयश आलं तर काय होईल, अशी भीति आस्ट्रेलियांत कुणाला वाटत नसावी.

एखाद्यानें प्रयत्न केला आणि त्यांत त्याला अपयश आलं तर तिकडे लोक म्हणतात,

"Well, good on him, he had a go."

पंचवीस फूट लांब, आठ फूट रुंद आणि सात फूट उंच असें हें भांडें समुद्रांत बुडवायचीं ही कल्पना ह्या दोघां बहाद्दरांनीं बारा महिन्यांत अंमलांत आणली. केन्सला बांधलेलें हें धूड, समुद्रांतून सात मैल आंत कसें नेलें आणि कसें बुडवलें हरि जाणे!

तें सुंदर बेट सोडून मी परत लॉंचवर चढलों, आणि केन्सच्या दिशेनें निघालों तेव्हां सागर थोडाफार खवळला होता, प्रचंड लाटा उठत होत्या. खाऱ्या पाण्याचे सपकारे आंत येऊन अंग भिजवीत होते. आमच्यापैकीं कोणीच बोलत नव्हतें. बॉब पाय पसरून गप्प बसला होता, कप्तिान चाक मारीत होता. त्याचा मदतनीसहि गप्प बसला होता. मग मीहि गोगलगाईसारखा हळूच आकसलो आणि आपल्या कवचांत शिरलों.

* * *

चार दिवसांचा मुक्काम संपवून मी केन्सहून लॉंगरीचला जाण्यासाठीं निघालों. तेव्हां बॉबनें आपल्या जवळचा, ओपेलच्या खाणींतला एक सुरेख दगड मला दिला. काळपट, निळसर अशा या जाड दगडावर इंद्रधनुष्यासारखे नाना रंग असलेला ओपेलचा थर होता.

बॉब् म्हणाला,

"केन्समधल्या मुक्कामाची आठवण हा रंगीत खडा तुला देईल!"

माझ्या लिहिण्याच्या टेबलावर हा दगड मी आतां ठेवून दिला आहे.

• • •








गडवडीनें तो झाडाच्या रोखानें जात होता. वीज चमकली. वैल उभे होते. पावसांत भिजत होते. वीज परत चमकली. नजीकच्या झाडाखालीं कुणी तरी उभें होते. परत वीज झाली. रावजीनें विचारलें, "कोण हाय!" पण आवाज आला नाहीं.....

# अभोगी

रणजित देसाई

उन्हाळ्यांचे दिवस. दोन प्रहरची वेळ टळत आली होती. तरी रखरखाट कमी झाला नव्हता. पूर्वेला ढग उठत होते. नुकत्याच झालेल्या वादळांत रावजीकाकाची सारी वाग होलपटून गेली होती. रावजीकाका आपल्या काजूच्या बागेंत फिरून वाळलेल्या काटक्या गोळा करीत होता. रावजीचे केस पिकले होते. चेहऱ्यावर सुरकुत्यांनीं जाळी विणायला सुरुवात केली होती तरी रावजीचें वय पन्नाशीच्या आसपासच होतें. काटक्या गोळा करून त्याचा भारा बांधून रावजीनें तो डोक्यावर घेतला आणि बागेच्यावर, टेकडीच्या कडेला दिसणाऱ्या झोपडीकडे त्यानें पावलें वळवलीं. बागेला दुभंगून गेलेला रस्ता रावजीनें ओलांडला. सकाळपासून झालेल्या वर्दळीनें रस्त्याची तांबडी माती उकलली होती. गाडयांचीं आरगळें पडलीं होतीं. कुणाची तरी चाहूल रावजीच्या कानांवर आली. रावजीकाकाचे पाय जागींच खिळले. त्याने मान वळवली. रस्त्यावरून कृष्णा शिंदे येत होता. रावजीकाकाजवळ येऊन तो थांबला.

"रामराम रावजीकाका!"

"कोण कृष्णा? कुठं गेला होतास?"

"भावकाईच्या जत्रला. आणि काका तुमी न्हाई आला?"

रावजीनें भारा टाकला आणि धोतराच्या सोग्यानं घाम टिपत तो म्हणाला—

"आतां जत्रचं का दिवस न्हाईल्यात?"

"व्हय काका! पन तुमचा मान हाय, सारं गाव म्हनतया"

"म्हन् दे." रावजी उसासा सोडून म्हणाला "गाव न्हाईल न्हाई आनी मान कुठला न्हाईल बाबा. त्यो करतोय नव्ह."

"त्यास्नीतर काय सुक हाय! काय बी म्हना रावजी काका, तुमी गाव सोडून बागत आलासा गावची सोबा गेली. सार गाव म्हनतया. व्हय खोटं कशाला बोला."

"जाऊं दे तें!" रावजी म्हणाला, "जत्रा भरली व्हती नव्ह?"

"तर काय? धा गावचं मानूस आलंया जत्रला!"

"बरं झालं!"

"जातो काका!"

"जत्रा फुटली?"

"घरला काम व्हतं म्हनून सटकलो. अजून जत्रा फुटायला येळ लागल. जातो काका."

"बरं ये."

कृष्णानें भारा उचलला आणि रावजीच्या डोक्यावर दिला. रावजी चालूं लागला.

बागेंतच बांधलेल्या झोपडीवजा घराच्या दारांत त्यानें भारा टाकला. तेथून उतारावर पसरलेली चार-साडेचार एकराची काजूची बाग दिसत होती. बागेच्या मधून गेलेला रस्ता दिसत होता. बागेच्या पूर्वेला दूरवर गाव दिसत होतें. उन्हांनें पिवळीं पडलेलीं पानें वळवाच्या पावसानें हिरवट दिसूं लागलीं होतीं. बाग निरखीत रावजी बराच वेळ उभा राहिला. पूर्वेला चढणारे ढग बघत असतां सरींचा आवाज त्यानें ऐकला. रस्त्यांतून धुरळ्याचा बुकणा उडवीत बैलगाड्या जात होत्या. बैलांच्या पाठीवर झुली होत्या. गाडींत रंगीबेरंगी लुगडीं नेसलेल्या बाया दिसत होत्या. दोनचार फेट्यांचे शेमले उडत होते. अशा दोनतीन गाड्या एका पाठोपाठ बागेंतून उधळत गेल्या. टेकडीच्या गळ्यांतून गेलेल्या रस्त्यावरून दिसेनाशा झाल्या. झोपडी-समोर काजूच्या झाडाला बांधलेल्या बैलांच्याकडे रावजीची नजर वळली. हाडांचे सापळे दाख-वीत उभ्या असलेल्या जोडीपुढे वाळल्या गवताच्या पेंड्या पसरल्या होत्या. अर्धेसुद्धां गवत त्यांनी चघळलें नव्हतें. एक बैल तांबडा होता दुसरा पांढरा होता. उगीच दावेनें हलवीत ती जोडी उभी होती.

रावजी झोपडींत गेला. चुलींतला राखोटा काढून परसांत नेऊन फेकला. रावजीला पहातांच म्हैस ओरडली. रावजीनें पाहिलें. पसरड्या शिंगांची म्हैस त्याच्याकडे पाहून ओरडत होती. रावजी म्हणाला—

"लौकर आलीस? बांधल्याबिगार चैन पडत न्हाई?" रावजीनें म्हशीच्या पायाशीं पडलेली साखळी तिच्या गळ्याला लावली. चुलींत काटक्या खोचटल्या. चिमणी कलती करून थोडें रॉकेल ओतलें आणि काड्याच्या पेटीनें चूल पेटवली. धुमसणाऱ्या चुलीकडे जाळ होईपर्यंत तो बघत राहिला. जसा जाळ पेटला तसा त्यानें चिलमींत तंबाखू भरला. बाहेर सोसाट्याचा वारा सुरू झाला होता. घरावरचें छप्पर उडतें की काय अशी भीति वाटूं लागली आणि रावजी उठला. तो पुढच्या दारांत गेला. जोरानें वारा सुटला होता. रस्त्यावरून वादळ गरगरत येत होतें. त्याचा तांबडा लोट आकाशांत चढत होता. आकाशांत मेघांची फळी उभी रहात होती. रावजीनें बैलांकडे पाहिलें. बैल वादळाची पर्वा न करतां संथपणें रवंथ करीत होते. रावजीनें दरवाजा लावला आणि तो परत चुलीपुढें आला. चूल पेटली होती. डाळ पाण्यांत टाकून त्यानें भांडें चुलीवर चढवलें. विजा कडाडूं लागल्या, थोड्याच वेळांत पावसाची सर छपरावर नाद करूं लागली.

"पाऊस मोठा आला नी!" म्हणत राव-जीनें चुलींत काटक्या ढकलल्या बैलांचा विचार त्याच्या मनांत आला, पण पावसाचा आवाज ऐकून रावजीला उठावेंसें वाटेना. पाऊस बंद व्हायची तो वाट पहात तसाच बसून राहिला. पाऊस कमी होत नव्हता. त्याचा जोर वाढतच होता. अचानक रावजीला बैल बांधलेल्या झाडा-वर तशाच टाकलेल्या सापत्यांची आठवण झाली. सापत्या भिजून खटारल्या तर! चड-फडत रावजी उठला. पोतें डोक्यावर घेतलें आणि त्याने दार उघडलें. बाहेर काळोख पडला होता. विजा कडाडत होत्या. त्यांच्या उजेडानें डोळे दिपत होते. पावसाची सर तर अखंड ओतत होती. अंगावर आलेल्या गार वाऱ्यानें रावजी शहारला आणि त्यानें बाहेर पाऊल टाकलें. गडबडीनें तो झाडाच्या रोखानें जात होता. वीज चमकली. बैल उभे होते. पावसांत भिजत होते. झाडाच्या बेचक्यांत ठेवलेल्या सापत्या रावजीनें चाचपून हातीं घेतल्या आणि तो वळला. वीज परत चमकली. नजीकच्या झाडाखाली कुणी तरी उभा होता. परत वीज झालीं. रावजीची खात्री पटली.

रावजीनें विचारलें, "कोण हाय?"

आवाज आला नाहीं. वीज झाली. ती व्यक्ति तशीच उभी होती. रावजीच्या अंगाला कापरा सुटला. खाली वाकून त्याने चाचपून दगड उचलला आणि करड्या आवाजांत तो म्हणाला,

"आतां बोलतोस का फेकूं दगड?"

रावजीनें अंदाज घेतला आणि हात उचलला.

**कांहीं अवशिष्ट राग**



केसांची झुलपें पहा विखुरली अस्निग्ध भालावरी
अंगीं चित्रविचित्र शर्ट खुलतो ती पॅन्ट तो सांवरी।
रस्त्यानें झुलतो—पुन्हां थबकतो मागेपुढें रोखुनी
रात्रीच्या पहिल्या घटी विलसतो

"छायानट"—

हा कुणी ॥



वीज चमकली आणि रावजीच्या कानांवर शब्द आले,

"मी हाय!"

"कोण मी!"

"यशोदा!"

यशोदा! रावजीला कांहीं अर्थबोध झाला नाहीं. पण त्याची भीति गेली. तो ओरडला,

"मग पावसांत भिजतियास कां? चल की घरांत ये मागनं." म्हणत रावजीने पाऊल उचललें. त्यानें झोपडी गाठली. झोपडींत अंधार होता. आंतल्या बाजूला पेटलेली चूल मंद प्रकाश टाकीत होती. रावजीनें भिजलेलें पोतें टाकलें आणि तो वळला. होणाऱ्या विजांच्या चकमकींत दाराशीं कुणी तरी उभें असलेलें दिसत होतें.

"आंत ये म्हटलं न्हव?" रावजी ओरडला.

ती व्यक्ति आंत आली. बांगड्यांचा आवाज रावजीच्या कानांवर आला. रावजी म्हणाला

"थांब, चिमणी पेटवतां." रावजी गडबडीनें आंत गेला. चुलीवर ठेवलेली चिमणी त्यानें पेटवली आणि चिमणी नेऊन तो बाहेर आला. दारांतून वारा आंत येत होता. चिमणीची वात थरथरत होती. रावजी म्हणाला,

"दार लाव."

त्या व्यक्तीनें दार लावलें. रावजी चिमणी घेऊन पुढें आला. त्यानें चिमणीचा हात वर केला. संपूर्ण भिजलेली, पंधरासोळा वर्षांची मुलगी त्याच्यासमोर उभी होती. रंगानें ती उजळ होती. तिच्या डोळ्यांत भीति तरळत होती. भ्यालेल्या नजरेनें ती रावजीकडे पहात होती. ती नेसलेलें लुगडें तिच्या अंगाला चिकटून बसलें होतें. तिच्या पायाशीं जमीन भिजत होती. रावजीनें तिला निरखून विचारलें,

"काय नांव म्हणालीस?"

"यशोदा!"

"कुंच्या गावची?"

"वाडीची! काका ऽ—"

रावजीच्या कपाळावर आठ्या पडल्या. नजर बारीक करीत तो म्हणाला,

"म्हंजे, तात्या पाटलाची पोर तर नव्हेस तूं?"

"व्हय काका. वळखलं न्हाई तुमी मला?" आपल्या चेहऱ्यावरचें पाणी निपटत यशोदा म्हणाली.

"चांगला वळखतों! कुठं गेली व्हतीस?"

"जत्रला!"

"आणि तुझा बा कुठं गेला?"

"गंपू शिंद्याची गाडी जत्रंत भेटली. बाबा म्हनाला, जा पुढं, येवढ्यांत येतो—म्हनून गंपू गेला त्यो आलाच न्हाई."

"मग?"

"पाऊस दिसायला लागला तवा घरची वाट धरली. बागत आलो आनी पावसान गाठल."

"शाना तुजा बाप! बसला असल दारू हुडकत. तरण्याताठ्या पोरीला एकटी पाठवण्याची आक्कल त्याची आनी तूं बी शानी. घरांत यायचं नाही? पावसांत भिजत राहिलीस ती!"

यशोदा रावजीकडे आश्चर्यचकित होऊन बघत होती. तिला वाटलें होतें आपण कोण हें समजतांच रावजी भडकेल. संतापेल. तिचा बाप आणि रावजी ह्यांतून विस्तव जात नव्हता. जमिनीवरून, घरादारांवरून भांडण वाढतां वाढतां त्याचें पर्यवसान रावजी गाव सोडून बागेंत ऱ्हायला कारणीभूत झाला होता. सारा गाव त्याबद्दल तिच्या बापाला दोष देत होता आणि रावजीबद्दल हळहळत होता हें यशोदेला ठाऊक होतें. तें माहीत असूनहि तिला आज रावजीच्या घरांत यावें लागलें होतें. रावजी गडबडीनें आंत वळला. आंतल्या खणांत जाऊन त्यानें पेटी उघडली. कांहीं वेळ धडपड ऐकूं येत होती. झाकण लावल्याचा आवाज झाला. तो बाहेर आला. येतांना त्याच्या हातांत बोचकं होतं.

चिमणी जमिनीवर ठेवून त्यानें तें बोचकें सोडलें. त्यांत दोनतीन पातळें, चोळ्या दिसत होत्या. त्यांतलें तांबड्या चौकड्यांचें लुगडें उचलून रावजीनें चिमणीजवळ नेऊन निहाळलें आणि बाजूला ठेवलें. एक चोळी उचलली. दोन्ही हातांमध्यें धरून ती पसरली. एक वेळ यशोदेकडे पाहिलें आणि परत ती चोळी बोचक्यांत ठेवली. बोचकें बांधलें. बाहेर ठेवलेलें लुगडें उचलून तें यशोदेसमोर धरून रावजी म्हणाला,

"घे, हें नेस! तिच्या ठेवणींतलं आहे! चोळी दिली असती, पण तुला याची न्हाई!"

"नको काका! जाईन मी."

"अशा रातीच! शानी हाईस तूं! बापाची आकल माज्या घरांत चालवूं नगस. हें घर परकं वाटलं व्हय तुला? पोरी माझा शंकर असता तर ह्याच घरांत सून म्हणून आली असतीस तूं. तुझ्या सासूनं तुझ्या अंगावर सवताच्या हातानं हें लुगडं चढवलं असतं. आंत जा. लुगडं बदल. चोळी पिळून चुलवट्याच्या दांडीवर घाल; तंवर मी बैल बांधून येतों."

रावजी बाहेर पडला. बाहेर पाऊस थांबला होता. यशोदा लुगड्याकडे पहात उभी होती. थंडींत काकडत होती. तिनें लुगडें उचललें आणि ती आंत गेली. चूल पेटत होती. त्यावर ठेवलेल्या भांड्यांतून जळका वास येत होता. यशोदेनें लुगडे बदललें. चोळी पिळून दांडीवर वाळत घातली. लुगडें पिळून तेंहि वाळत टाकलें आणि तिनें गडबडीनें चुलीवरचें भांडें उतरलें. डाळ शिजून करपून गेली होती. पावलें वाजलीं. पदर सावरून यशोदा उभी राहिली.

"लई पाऊस!" म्हणत बाहेरची चिमणी घेऊन रावजी आंत आला. क्षणभर यशोदेकडे पहातच राहिला. यशोदेचे मोकळे केस पाठीवर रुळत होते. चापून चोपून ती लुगडें नेसली होती तरी उजवा उघडा खांदा नजरेंत भरत होता. यशोदेच्या कपाळीं कुंकू नव्हतें. रावजी तिला निरखीत असतां यशोदा गडबडीनें म्हणाली,

"डाळ जळली म्हणून भांडं उतरलं."

भानावर येऊन उसासा सोडीत रावजी म्हणाला,

"जळूं दे! दुसरी टाकीन मी. ती पेटी उघड. त्यांत कुंकवाचा करंडा असल बघ. तूं कुंकू लाव. तंवर मी डाळ टाकतों."

रावजीनें भांडें उचललें. मडक्यांतल्या पाण्यानें धुतलें. डाळ टाकली. चुलींत काटक्या खोचल्या. हें सारें करीत असतां त्याचें लक्ष यशोदेकडे होतें. तिने पेटी उघडलेली पाहिली होती. कुंकवाचा टिळा लावून करंडा ठेवून ती चुलीजवळ आली. रावजीनें फळकूट समोर सारलें व तो म्हणाला,

"बस. शेक जरा. थंडावली असशील."

रावजीनें भाताचें भांडें वायलावर चढवलें. यशोदा तें पहात होती. रावजीनें आमटी केली. भाताचें भांडें उतरून निखाऱ्यावर ठेवलें आणि पिठाचें गाडगें समोर घेऊन तो पीठ काढूं लागला. कांहीं न बोलतां यशोदा उठली. तिनें तवा चुलीवर ठेवला. त्यात पाणी ओतलें आणि रावजीनें पीठ काढलेली थाळी आपल्यासमोर ओढली.

"मी करतों पोरी भाकऱ्या"

"नको काका. मी करतो." यशोदा म्हणाली, "तुमी बसा. येवढ्यात भाकरी टाकतो."

रावजीचे डोळे पाण्याने भरले. त्यानें चिलीम उचलली. त्यांत तंबाकू भरत तो यशोदेकडे पहात होता. यशोदेनें आपलीं

कांकणें मागें सरकवलीं. तव्यांतलें पाणी पिठांत ओतून ती पीठ मळूं लागली रावजी. म्हणाला,

"पोरी, तुझ्या बापानं विस्कोट केला माझा. सोन्यासारख्या संसारांतनं उठवलं मला. गावांतनं उठवून माळावर बसवलं त्यानं."

"जाऊं दे काका. झालं गेलं हून गेलं—" यशोदा म्हणाली.

"न्हाई पोरी. जीव पेटतो माझा. तुला म्हाईत न्हाई. न्हान व्हतीस तूं. पैशानं डोळं फिरलं तुझ्या बाचं. न्हाई करायची व्हती सोयरिक. सांगायचं व्हतं मला. पाच वर्सामागं ह्याच भावकाईच्या जत्रत माझा शंकर गेला—" हात उडवत रावजी म्हणाला, "दंगल झाली म्हनं. सारं ठाऊक हाय मला. पोराचा ध्यास घेऊन ही गेली आनि मी न्हायलो. तुझा बा जनावरं बांधतुया ती माझी जागा. घर व्हतं पोरी तितं. अजून बी रावजीकाकाचं परडं म्हनत्यात त्याला."

रावजीनें मान वर केली. यशोदा पिठांत हात घालून तशीच बसली होती. तिच्या डोळ्यांतून अश्रू ओघळत होते. गडबडीनें डोळे टिपत रावजी म्हणाला,

"रडूं नगस पोरी. शपथ हाय तुला. कधी न्हवं ते घरला आलीस. सुखानं खा, पी आनि आपल्या घरला जा. तुझी चूक न्हाई. तुला काय पोराला!"

मनगटाने यशोदेने अश्रु टिपले आणि ती भाकरी बडवूं लागली. रावजीने चिलीम पेटवली. कांहीं न बोलतां रावजी चिलीम ओढूं लागला.

भाकऱ्या होतांच यशोदेनें थाटली उचलली. चुलीवर ठेवलेला तवा उचलला. कोपऱ्यांतली थाळी घेतली आणि ती बाहेर गेली. थोड्याच वेळांत धुतलेलीं भांडीं घेऊन ती परत आली. रावजीच्या समोर थाटली ठेवली आणि तिने भाकरी, आमटी वाढायला सुरवात केली. रावजी म्हणाला,

"पोरी, तूं बी बस. मिळून खाऊं."

यशोदेनें आपली थाळी घेतली. दोघांचीं जेवणें झालीं. रावजी आता खुशींत होता. तो म्हणाला,

"पोरी! तुझी आई काय म्हनत असल!"

"बाबा घरला गेला नसल तर तिला काळजी वाटायची नाहीं."

"त्यो काय जातोय एव्हड्यात घरला! रातभर दारू पीत पडला असल कुठं तरी अनि पोरी! मोकळ्या गळ्यानं जत्रला गेलीस तूं!"

पदर सरकलेला एकदम यशोदेच्या लक्षांत आला. बोलण्याच्या भरांत अंगांत चोळी नाहीं हेंहि तिच्या ध्यानीं नव्हतें. लाजून तिनें पदर अंगाशीं घेतला. पदर खोऊन तिनें थाटल्या उचलल्या.

"पोरी! तुला दागीनं केलं न्हाईत?"

"न्हाई." म्हणत ती उठली.

रावजी म्हणाला, "ठेव ते पोरी. मस्त केलंस, मी धुतो."

"तुमी बसा काका. मी धुतो." आणि यशोदा बाहेर गेली. जेव्हां यशोदा आली तेव्हां रावजी चिलीम ओढीत होता. ती म्हणाली,

"काका! बाहेर बसा, मी सारं नीट ठेवतों."

रावजी बाहेर गेला. त्याला आंतली खुडखुड ऐकूं येत होती. ती ऐकत तो चिलीम ओढत बसला होता. पदराला हात पुसत यशोदा बाहेर आली. रावजी म्हणाला, "बस."

यशोदा बसली. रावजीनें आपलें घोंगडें अंथरलें. घायळ आणून ठेवली आणि तो म्हणाला,

"लई दमलीस तूं. रात बी झाली. झोप आता."

"आणि काका, तुमी?" यशोदेनें विचारलें.

आपल्या पांढऱ्या खुरट्या दाढीवर हात चोळीत रावजी म्हणाला,

"हाईत पोती. झोपन त्येच्यावर."

"नको काका. तुमी झोपा. मी घीन पोती."

"अरच्च्या! सांगल त्येच्या उलट. सांगल त्येच्या उलट. कसा करशील तूं संसार! झोप म्हटलं नव्हं मग शान्यासारखं झोपावं."

यशोदा लाजली. खुदकन् हसली. रावजी गंभीरपणानें म्हणाला, "आता झोपतीयास का मार पायजे?"

यशोदा मोकळ्यापणानें हंसली. सारी झोपडी त्यानं भरून गेली. रावजीला हंसूं फुटलें. यशोदा अंगावर धाबळ ओढून घेत असतां रावजी म्हणाला—

"पोरी! लई वर्सान घरात हासू फुटल बघ!"

पडल्या पडल्या यशोदा बघत होती. रावजीनें आंतून पोतीं आणलीं. तीं हंतरलीं. चिमणी उशाला ठेवली. दार लावून त्यानें दगड सरकवला. आणि तो पोत्यावर पडला. धाबळीची ऊब अंगावर चढत होती. पहातां पहातां यशोदा झोपी गेली. रावजी मात्र बराच वेळ पडल्या जागेवरून यशोदेचा चेहरा निरखीत होता. बऱ्याच वेळानें त्यानें चिमणी फुंकर मारून विझवली आणि झोपडींत काळोख झाला.



पहांटेला रावजीला जाग आली. जांभई देत त्यानें अंगावरचें पोतें बाजूला केलें. झोपडींत पहांटेचा उजेड फाकला होता. पोत्याकडे लक्ष जातांच त्यानें यशोदेच्या हंतरुणाकडे पाहिलें. तिथें यशोदा नव्हती. रावजी गडबडीनें उठला. त्यानें पुढचें दार उघडलें. बाहेर भगाटलें होतें. कालच्या पावसानें सारी जमीन भिजली होती. हवेंत गारवा होता. लांबवर पसरलेल्या बागेवर नजर टाकून तो माघारी वळला. पाठी-मागचें दार उघडेंच होतें. त्या दारांतून त्यानें बाहेर डोकावलें. तों म्हैशीसाठीं उभ्या केलेल्या छपरांत यशोदा धार काढीत होती. तिनें हसून रावजीकडे पाहिलें. रावजीनें चुलीकडे लक्ष वळवलें. तों चूल पेटलेली होती. सारी भांडीं उजाळलीं होतीं. बालडींतल्या पाण्यानें रावजीनें तोंड धुतलें. दुधाची गिंडी घेऊन यशोदा आंत आली. रावजी म्हणाला—

"पोरी, लई खोड हाय तिला! लाथ मारली असती तर!"

"गरीब हाय काका, काय सुदीक त्रास दिला न्हाई. तवाच पाना सोडला."

"माणसाचा गूण हाय तो! जनावरालाबी कळत. आज साकर घरांत न्हाई. गुळाचा च्या पिशील?"

"ठेवलय च्याला. च्या झाल्यावर उठवणार होते मी."

यशोदेनें चहा केला. रावजी चहा प्याला. चहा पिऊन झाल्यावर यशोदेनें कप धुवून आणला. चहा ओतला आणि ती पिऊं लागली. चहा पिऊन झाल्यावर यशोदा म्हणाली—

"काका, आता जात न्हव?"

"ते का पोरी, मी पोचवतो तुला—"

यशोदा उठली. लुगडें अद्यापि ओलसर होतें. तिनें लुगडें उचललें तसें रावजीनें विचारलें—

"काय करतीस?"

"लुगड बदलते."

"आणि तेच लुगड न्हायल तर काय हुईल? हित काय मी नेसणार हाय ते? गप बस"

रावजी अस्वस्थ झाला होता. तो उठला. बाहेर जाऊन त्यानें बैल सोडले. सापत्या गाडीला लावल्या. गाडी जुंपली तेव्हां सूर्य उगवला होता.

"चल पोरी" म्हणत रावजी आंत आला.

यशोदा तयार होती. तांबड्या चौकड्यांचं लुगडं तिला उठून दिसत होत. रावजीनें दांडी-वरचें यशोदेचें लुगडें उचललें आणि गोळा करून यशोदेच्या हातीं दिलें. यशोदा बाहेर जाण्यासाठीं वळली. अचानक रावजी म्हणाला,

"थांब पोरी."

रावजी गडबडीनें वळला. आंत जाऊन त्यानें पेटी उघडली. पेटीच्या कोपऱ्यांत कपड्यां-खालीं ठेवलेली पुरचुंडी काढली. पुरचुंडी सोडून त्यांतील पुतळ्यांची माळ काढून त्यानें पेटी बंद केली. ती माळ यशोदेच्या हातीं देत रावजी म्हणाला—"घाल."

"नको—काका" यशोदा मागें सरकत म्हणाली.

"घाल म्हनतो न्हव. परत कशाला येशील माझ्या घरात?" बोलता बोलता रावजीचा आवाज बदलला, घोगरट आवाजांत तो म्हणाला,

"तुज लगीन हुईल, तुझा बाप बोलवायचा न्हाई मला. मोकळ्या हातान तुला जाऊ देणार न्हाई मी. ही गळयात घाल. शंकरच्या आईची हाय ही. रावजी काकाची आठवण म्हणून जतन कर. सांग तुझ्या बाला मी दिली म्हणून."

थरथरत्या हाताने यशोदेने माळ गळ्यांत घातली. रावजी ती माळ बघत होता.

"कालपासन मोकळा गळा वाटत हुता. चल"—म्हणत रावजी एकदम बाहेर गेला.

जेव्हां यशोदा बाहेर आली तेव्हां रावजी गाडींत कासरा धरून बसला होता. कांहीं न बोलतां यशोदा गाडींत चढली. गाडी चालू लागली. गांव दिसूं लागलें. गांवानजीक जातांच रावजीनें कासरा ओढला. गाडी थांबली. रावजी म्हणाला—"उतर."

यशोदा आश्चर्यानें बघत राहिली. रावजी वळून म्हणाला,

"अशी बघतियास काय? उतर. तुझ्या बाच तोंड सुदीक बघायच नाहीं मला. तू घाबरू नगस. बान इचारल तर सरळ सांग रावजी काकाकड हुतो म्हनून. जीभ उचलायची न्हाई त्येची. उतर."

यशोदेचे डोळे भरून आले होते. ती उत्तरली. हाती पदर धरून ती वाकून पाया पडली. रावजीकाकाला कांहीं बोलवेना. त्यानें कासरा ओढला. गाडी एकदम वळली. अकारण चाबुक हवेंत फडकवला गेला आणि गाडी बागेच्या दिशेनें उधळली. ती गाडी दिशेनाशी होईपर्यंत यशोदा गाडीकडे पाहात होती. गाला-वरून ओघळणाऱ्या अश्रूंचें भान तिला नव्हतें.

• • •





*हा नुसता आभास आहे असं वेळोवेळीं मंगला स्वतःला बजावीत होती; पण प्रत्येक ठिकाणीं ती संशयानें पाहूं लागली. लोक आपल्या कानाआड कांहीतरी बोलत असतात असें तिला वाटूं लागलें. या भयानें सुरेख बांध्याची मंगला सुकत चालली.........*

श्रीपाद काळे

मंगलेचं लग्न झालं, आणि ती गोखल्यांच्या घरांत आली...एका सामान्य शिक्षकाच्या मोजक्या कुटुंबांत तिचं बालपण गेलं होतं. आज इथें उद्यां दुसरीकडे असं तिच्या वडिलांचं बिऱ्हाड बदलत गेलं होतं. मोजक्या जिन्नसांत कसं भागवावं हें तिच्या अंगवळणीं पडून गेलं होतं. लहानपणापासून अठरा एकोणीस वर्षं होईपर्यंत कशांतच फारसा बदल झाला नव्हता. तीच काटकसर, तीच विवंचना, तोच उद्योग—दिवसा दिवसाला हें सगळं वाढतच गेलं होतं...

मंगला लग्न होऊन गोखल्यांकडे आली, आणि क्षणभर दिपूनच गेली. गोखल्यांचं मोठं घर माणसांनीं गजबजलेलं होतं. चार भाऊ वेगवेगळे उद्योग करून एके ठिकाणीं रहात होते. थोरल्या तीन दिरांचीं कुठलीं कुठलीं मुलं, हें विचारून घ्यावं लागत होतं. तिन्ही जावा बहिणीबहिणीसारख्या रहात होत्या. बाहेर गडी माणसं होती. गोठ्यांत पुष्कळ गुरं होतीं. आणि ज्या दिवसांत तोळ्यावर धान्य मिळत होतं, त्या दिवसांत भाताचे गोण गोखल्यांकडे काळोखाच्या खोलींत रचलेले होते. बाहेर लोकांना दिवस दिवस उभं राहून धान्य मिळत नव्हतं. चहा पुरती साखर मिळत नव्हती...हें बाहेर चाललं आहे, याची गोखल्यांकडे दाद नव्हती. थोरला भाऊ शेती संभाळीत होता. त्याच्या पाठचा कसलीं ना कसलीं कंत्राटं घेत होता. आणि त्या पाठचे दोघे दुकान संभाळीत होते. गोखल्यांकडे रोज पाहुणे येत होते—आदरातिथ्य घेत होते, आणि या कुटुंबाला दुवा चिंतीत जात होते.

—मंगला गोखल्यांकडे आली, आणि भारून गेल्यासारखी झाली. सर्वांत धाकट्या भावाची सुरेख बायको. बाकीच्या जावांपेक्षां थोडी जास्त शिकलेली. घरांतल्या सगळ्या माणसांच्या मायेचा ओघ मंगलेकडेच वळला होता. लहान मुलं सकाळचा भात मंगलेकडून कालवून घेत असत. घरांतली म्हातारी चुलत सासू एकेक रीतिरिवाज समजा-

वून देत होती. हें घर आतांपर्यंत तिनंच संभाळलं होतं. स्वतःचं कोणी नसतांना चारी मुलांचा संभाळ तिनंच केला होता. आणि इथवर आणून सोडले होते. नवऱ्याच्या घरांत शिरणारी ती म्हातारी अजून दुपारची चूल संभाळत होती. चारी भाऊ तिच्या शब्दाबाहेर जात नव्हते. आई, बाप, बहीण—ही सारीं नातीं काकीनं एकटीनं सांभाळलीं होतीं...मंगलेला घरांतली रीत भात समजावून देताना जणू आपल्या मागं मंगलेनं हें सारं संभाळावं असा तिचा स्वर होता...थोरल्या दिराला कपभर चहा हवा असला तर तो मंगलेलाच सांगत होता. सर्वांनीं मंगलेचं कौतुक करायचं मनावर घेतल्यासारखं केलं होतं. मंगलेची पहिली मंगळगौर झाली, ती लग्नाच्या घरांतल्या एखाद्या कार्यप्रस्थासारखी. त्याच वर्षी तांदुळावरचं रेशन उठलं, आणि दुकानांत चांगला फायदा झाला. पाऊस चांगला पडला, आणि भात चांगलं पिकलं. एका पुलाचं कंत्राट मंगलेच्या दिराला मिळालं. मंगलेच्या पायगुणानं हें सारं घडलं असं प्रत्येकालाच वाटूं लागलं.

एखाद्या चांदण्या रात्रीं जेवणंखाणं आटोपलीं, म्हणजे काकी मागच्या दारच्या तुळशीच्या मोकळ्या अंगणांत चारी सुनांना घेऊन बसे. मग त्या वेळीं कोणीहि मोकळं बोलावं, सुखदुःख बोलावं, नव्या जुन्या गोष्टी बोलाव्या. काकी मग एखादं जुनं गाणं म्हणे. गाणीं फार मोठीं असत. एकेक कडवं म्हणतां म्हणतां काकीला दम लागावा. पण काकीला कडवं आठवलं नाहीं, असं होऊं नये. हातांत पत्रावळी लावायचं, भाजीचीं डेखं काढायचं कांहीं तरीं काम असे. काकी अभिमन्यूचं स्वयंवराचं गाणं म्हणूं लागली, कीं हातांतलं काम तसंच राहून जाई. गाण्यांतला प्रसंग समोर दिसे...अभिमन्यूच्या बाणाचं पातं तळपतं आहे...सुभद्रा शोक करते आहे...स्वयंवरांत सीता उत्सुकतेनं मंडपांत फिरते आहे—गोजिरवाणा लहानसा राम—आणि सौंदर्याचीच मूर्तिमंत घडवलेली सीता—काकीच्या आवाजांत गोडवा कमी होता. एखादा शब्द ती पुरा अशुद्ध उच्चारी—पण कठीण शब्द दगड फेकावा, तसा फेकी—करुण आणि भीतीचं वर्णन गाण्यांत आलं कीं काकी तिथेंच थांबे. आणि त्यांतला अर्थ अधिक स्पष्ट करी. केव्हां केव्हां गाणं तसंच राहून जाई, आणि काकीच्या विवरणांत मध्यरात्र होऊन जाई...काकीचे शब्द असे भिनत, कीं रात्रीं अंथरुणावर पडल्यावर डोळ्यापुढं जसेच्या तसे प्रसंग उभे रहात—केव्हां केव्हां स्वप्नं सुद्धां चमत्कारिक पडत...कुठें तरी लढाई सुरू होई...सारे अक्राळविक्राळ महापुरुष रक्तानं माखलेले असत, आणि सारे जण तुटून पडल्यासारखे अंगावर येत. दचकून जागं व्हायला होई, आणि अंगाला दरदरून घाम सुटे—मोठ्यानं ओरडावंसं वाटे, आणि छातींत कांहीं वेळ धाप लागल्यासारखी होई.

—अशा एखाद्या रात्रीं मंगला केव्हां केव्हां काकीला म्हणे, "काकी, आज गाणं नको—गोष्टच सांग—"

काकीच्या साठ्यांत खूप गोष्टी होत्या. न आठवतां न अडखळतां ती सांगे. काकीला कधीं मुलायम सांगणं जमतच नसे. नुसता पाऊस पडत होता, एवढं सांगून ती थांबायची नाहीं. काकीचा पाऊस महिना महिना खळत नसे. घरदार गुरें ढोरें वाहून जात—दुष्काळ सांगायचा झाला तर माणसेंच माणसांना खात, इथपर्यंत काकीचा दुष्काळ असे...

—मंगला गोखल्यांकडे आली, त्याला जवळजवळ वर्ष होत आलें. या सबंध वर्षांत घरांत वाईट असें कांहीं घडलेंच नव्हतें. सध्यांच्या दिवसांत गोखल्यांच्या कुटुंबाला दृष्टच लागली असती...काकीला पंचवीस वर्षांनीं आपलें आयुष्य कमी झाल्यासारखें वाटत होतें...मंगलेचे वडील



## पानझड

•••••••••••••

अम्बादास दिगंबर माडगूळकर

झुलझुल पानझड
ऋतु परनीचा आला...
देठ देखतांना परी
डोळा पाणावून आला!

पडे कुसुंबी झांजड
आली भारावून हवा,
नदे कळांनी पळस
जसा रानांत लवाळा

लुकलुके अंधारांत
दूर डोंगरीचा दिवा
जसा भरड माळास
ओला, घुमावा पारवा.

मुळीं कळेना जीवाला
पडे चांदणं कीं ऊन...
गेला पालवतां शेव
काळ्या मातींत माखून...

...तोच, क्षितिजाशीं दीन
हांक किनारत उठे
रातरंजनीचें झाड
लाल वणव्यानें पेटे...!!!

दोनदां तीनदां येऊन गेले होते. मंगलेचं कौतुक ऐकून त्यांच्या डोळ्यांतून पाणी आलें होतें. त्यांच्या आयुष्यांत हें कांहींतरी अघटित घडत होतें...सामान्य माणूस एवढ्या सुखाची अपेक्षा कधींच करीत नसतो. आहे त्यांत सुख मानावें, ही शिकवण त्याला जन्मापासूनच असते. एका वर्षांत मंगलेंत पुष्कळच बदल झाला होता. किंचित् सावळावर्ण सतेज दिसत होता. ठळक अलंकार तिच्या सतेज रूपांत भर घालीत होते. ती हसली, म्हणजे जुईच्या नाजूक कळ्या एकदम फुलल्यासारख्या वाटत होत्या. तिचा थोडा आडवा बांधा घर भरीत असल्यासारखा वाटत होता. घराच्या परिसरांत जिथें तिथें मंगलेचं अस्तित्व जाणवत होतं.

चैत्राचा महिना होता. गांवांतल्या उत्सवाला घरांतलीं माणसं गेली होतीं. मंगलेच्या पायांत काटा मोडला होता, म्हणून ती घरींच होती. बाहेर मोकळं चांदणं पडलं होतं...लहानशा वाऱ्यानं माडाचे शेंडे हालत होते...अंगणाच्या कडेचा प्राजक्त बहरला होता. सारवलेलं अंगण, आणि पायवाट रेखल्यासारखी दिसत होती. काकी म्हणाली, "झोप येते का मंगले तुला?—"

"नाहीं. पायांत जरा ठणका लागला आहे. मागल्या अंगणांत बसूं या—"

"मी तेंच म्हणणार होतें—"

मग दोघी तुळशीच्या कट्ट्याजवळ आल्या. मंगला म्हणाली, "काकी,

एक गोष्ट सांग." काकीनें आकाश उगाच न्याहाळल्यासारखें केलें... आणि ती म्हणाली, "मंगले, खरं सांग, हें घर तुला आवडलं ना?—"

"इश्श! हें काय विचारतां? मी स्वप्नांत आहे कीं काय असा मला भास होतो. बाबा म्हणतात, किती जन्माचं पुण्य होतं, म्हणून असं घर मिळालं."

"किती दिवस विचारीन विचारीन म्हणत होतें—"

"छेः! काकी, मी फार सुखांत आहें!"

"बरं वाटलं. मंगले, हें वैभव सारं माझ्या पहाण्यातलं आहे. पूर्वीं इथें फक्त केंबळ्याचं घर होतं. पाणी प्यायला धड भांडं नव्हतं. स्वयं-पाकाला तर मातीचीं भांडीं होतीं—"

"खरं?"

"होय. पूर्वीं हें घर सामान्य भिक्षुकाचं. वर्षाचे आठदहा महिने घरांतले पुरुष पै पैसा जमवीत असायचे...घरीं असले, म्हणजे दारि-द्याला कंटाळून बायकांचा छळ करायचे—"

"कुठें तरी माणूस आपला राग काढतो—"

"माझ्या आजेसासूबाई अशानंच मेल्या...त्या वेळीं चांगलीं श्रीमंत कुटुंबं गोरगरिबांच्या बायकांचं बाळंतपण करीत. मुलगा झाला, तर बाळंतिणीला दोन महिने आपल्या घरांत ठेवीत. परततांना माचा, पाळणा, लुगडं देत. मुलाला दागिने करून देत...चांगल्या मिळकतीची गोष्ट होती ती. एका सधन माणसानं माझ्या आजे मामंजींना सांगितलं, तुम्हाला मुलगा झाला, तर आम्ही बाळंतपण करूं. त्यांनीं घरीं येऊन बायकोला सांगितलं. दोघांना खात्री होती, यावेळीं आपल्याला मुलगा होणार...दोन वर्षांतली कमाई एका घरीं एकदम मिळणार...घरांत जिथें तिथें दारिद्र्य पेंगत होतें...बायकोचे दिवस भरत आले—एक दिवस नवऱ्यानं सांगितलं, "लक्षांत ठेव—जर मुलगी झाली, तर तापलेल्या भांड्यावर तुला उभी करीन—"

"इश्श! हें काय कोणाच्या हातांत का असतं?—"

"पण नवऱ्याच्या शब्दावर बोलण्याची कोणा बाईची हिंमत नव्हती. नवऱ्याच्या आवाजानं बायकोनं थरथरत उभं रहावं, आणि मिळेल ती



शिक्षा हूं चूं न करतां भोगावी. बाईचे दिवस भरले—आणि तिला मुलगी झाली."

"मग?—"

"नवऱ्यानं हें ऐकलं...सुवेरांत त्याला जवळ जातां येईना. निखाऱ्या-सारख्या डोळ्यांनीं तो पहात राही, आणि हातांत काय असे तें उगारून दाखवी...त्या बायकोनं असा धाक घेतला, असा घेतला, कीं दहाव्या दिवशीं तिनं आत्महत्त्या केली."

"अरेरे—!"

"पुढें आजेमामंजींनीं संन्यास घेतला—पण गेलेला जीव कांहीं परत आला नाहीं. अशा एकेक जुन्या काळच्या हकीगती आहेत." काकीनें एक दीर्घ श्वास सोडला, आणि गोष्ट पुरी केली. किती वेळ मंगला मोकळ्या आकाशाकडे नुसती पहात होती. एक माड नुसता वाऱ्या-बरोबर हालत होता. काकी मागें म्हणाली होती, तो माड मुळीं धरतच नाहीं...यंदां तो तोडायचा आहे...मंगलेला वाटलें—उद्यांच्या दुःखानें हा नुसता उसासे टाकतो आहे...काकीला आणखी कांहीं तरी बोलायचं होतं. पण रात्र चांगली झाली होती. तेव्हां ती म्हणाली, "मंगले, झोप आतां तूं—"

कांहीं तरी आठवल्यासारखं करून मंगलेनं विचारलं, "अजून ती बाई कोणाच्या स्वप्नाबिप्नांत येते काय हो?"

"नाहीं. तिनें कधींच कोणाला त्रास दिला नाहीं. पण पुरुषांतला गुण मात्र पुरुषांत उतरला आहे—माझा एक चुलत दीर होता, मूल होत नव्हतं. त्यानं दुसरं लग्न केलं, आणि पहिल्या बायकोला रोज दहा घरीं भिक्षा मागायला लावली..."

"जुन्या काळच्या गोष्टी काकी या नाही का?—"

"हो—इतर जातींत बायकांना नांगराला बांधीत."

"माणसं आणि जनावरं यांत फरकच वाटत नसे त्यांना—"

"अशा कितीक गोष्टी. सांगून रात्र पुरायची नाहीं."

आवंढा गिळून मंगला म्हणाली, "आतां माणसें पालटलीं...असं कोणी करायला लागलं तर चालायचं नाहीं—नाहीं का?—"

काकी कांहीं बोलली नाहीं. थोडा वेळ गेला, आणि मंगला पुन्हा म्हणाली, "मी म्हणतें, जुन्या गोष्टी या—नाहीं का?—"

काकीनें जांभई दिली. काकीचे बटबटीत भुरके डोळे स्पष्ट दिसता-हेतसें मंगलेला वाटलें...मंगलेनें पुन्हा विचारलें, "आतां कोणी असें करणार नाहीं—नाहीं का?—अँ?"

"हूऽ झोंप तूं आतां—"

मंगला बळेंबळेंच अंथरुणावर पडली...झोप येईलसें वाटत नव्हतें. डोळे उघडेच ठेवावेसे वाटत होते—कुठं तरी एकटें एकटें असल्या-सारखे वाटत होतें. हें घर, हीं माणसें—हें कौतुक—कुठें तरी मागें मागें रहात होतें—कुठें कांहींच नाहीं, अशी पोकळी झाली होती. सकाळीं धाकट्या पुतण्यानें विचारलें होतें, काकूला बाळ कधीं होणार?—जावेनें हसत हसत मंगलेकडे पाहिलें होतें आणि म्हटलें होतें, "सांगा हो, काय विचारतो पुतण्या त्याचं उत्तर—"

मंगला लाजली होती, आणि पुतण्याचा एक मुका तिनं घेतला होता.

—मंगलेला केव्हां तरी झोप लागली. झोप लागली, आणि धरबंद नसल्यासारखीं स्वप्नं पडूं लागलीं. जाग झालं, कीं एकहि स्वप्न नीटसें लक्षांत रहात नव्हतें...छातींत धाप लागल्यासारखी होई...दिवसभर मग मनाशीं कांहींतरी ती निवडीत बसे. कोणा तरी कोपिष्ट पूर्वजांचा



**दुसरं सर्व कांहीं मला मिळालं**
**पण माझं डोंगरे बालामृत कुठं आहे ?**

खेळणीं, चेंडू, पाटी....सगळं कांहीं इथें आहे,
पण **डोंगरे बालामृता**ची बाटली नाहीं इथं दिसत.
बाबा आज सकाळीं पुण्याहून आले; **डोंगरे बालामृत**
आठवणीनं आणलं आहे असेंही ते म्हणाले पण कुठं
ठेवलंय तें न सांगतांच निघून गेले ऑफिसला.
त्याना माहिती आहे कीं मला **डोंगरे बालामृत**
आवडतं पण सतावल्याशिवाय मला ते कधींच देणार
नाहींत. गेल्या महिन्यांत बाबा जेव्हां मुंबईहून आले
तेव्हां पण असंच... खूप शोधायला लावलं आणि
अखेर त्यांच्या ब्रिफ् केसमध्येंच मिळालं.
**डोंगरे बालामृत** मला हवंच आहे.
मी आईलाच विचारते कशी....





# डोंगरे बालामृत
## व डोंगरे ग्राइपवॉटर

किती छान आहेस आई तूं ! बाबानी
तें एअर बॅगमध्यें ठेवलं होतं तर ? पण हें ग काय ?
ओहोऽऽऽ **डोंगरे ग्राइपवाटर** ! किती चांगले
आहेत ग बाबा. आई मला तें घोटभर देच.
मला खेळायला जायचंय.

**डोंगरे बालामृत** आणि ग्राइपवाटर मुलांना खूप
आनंदी ठेवतं. **डोंगरे बालामृत** व ग्राइपवाटरनें
तुम्ही अधिक खेळकर व आनंदी रहाल.

के. टी. डोंगरे अॅन्ड कं. प्रायव्हेट लिमिटेड.
८२, मेडोज स्ट्रीट, मुंबई नं. १

स्वभाव आपल्या नवऱ्याच्या स्वभावांत उतरला असेल, अशा शंकेनं ती व्याकुळ होई. आणि नवऱ्याला चहा देतांना तिचा हात थरथरूं लागे. कधीं एखादा रागाचा शब्द तो मोठ्यानें बोलला, तर मंगला मनाशीं म्हणे, हां, ही नुसती सुरुवात आहे—सुरुवात आहे—आणि बावचळल्या सारखी तिची स्थिति होऊन जाई.

—काकीच्या गोष्टी चालूच होत्या. गोष्टी ऐकतां ऐकतां मंगलेला जिथल्या तिथें खिळल्यासारखं होऊन जाई. मधली जाऊ म्हणे, "कसली तरी चांगली गोष्ट सांगा हो—"

काकी तें सांगणें मनावर घेत नसे...काकीच्या गोष्टींत कांही तरी भयानक असे. असें भयानक रंगवून सांगितल्याशिवाय काकीला चैनच पडत नसे. मग तिचे भुरकट डोळे ताठ झाल्यासारखे वाटत...आजूबाजूचें चांदणें भेसूर वाटे. वांझोटा माड शेवटचे श्वास टाकतो आहेसा वाटे... दुधासारखें स्वच्छ चांदणें नासल्यासारखें वाटे. काकी स्वतःची हकीगत सुद्धां अशीच सांगे...तिचीं दोन मुलं गेलीं होतीं. वैतागानं नवऱ्यानें तिला टाकलें होतें, आणि मग तो कोरण मागून देवळाच्या धर्मशाळेंत राहिला होता—शेवटीं मेला, तें एक दिवस कोणाला कळलेंच नव्हतें. अंगाला मुंग्या आल्या होत्या...काकी बोले, तें आतां डोळ्यापुढें घडत असल्यासारखे—

—मंगलेचे वडील असेच एकदां आले होते. बोलतां बोलतां काकी म्हणाली, "हिला वास्तविक एवढ्यांत मूल व्हायला हवें होतें...आमच्या घराण्यांत असें कधीं घडलेलें नाहीं"—मंगला पुढ्यांत असतांनाच काकी हें म्हणाली होती, आणि आपल्या भुऱ्या डोळ्यांनीं मंगलेकडे तिनें रोखल्यासारखें पाहिलें होतें. मंगलेला मग चोरल्यासारखें झालें, आणि बापाशीं हसून खेळून बोलायचें ती विसरली...मग तिला वाटूं लागलें, आपल्यावरला कौतुकाचा प्रेमाचा ओघ जेव्हां वैशाखी वाऱ्याच्या झऱ्याचा ओघ आटावा, तसा आटत चालला आहे...कदाचित् एक दिवस हें पाणी सारेंच आटून जाईल, आणि आपल्याला तडफडावला होईल.

कोणी परकें माणूस घरीं आलें तर मंगलेच्या लग्नाला किती वर्षे झालीं, आणि मग अजून मूलबाळ झालें नाहीं याची चौकशी करी. मग हळूच हळहळून जाई. कोणी तरी अजून अवधि आहे, असा आशावाद दाखवी...पण साऱ्यांच्या शब्दांत मंगलेला मूल होणें कठीणच असा सूर निघे. मूल न झालेल्या बायकांच्या गोष्टी मग निघत, आणि काकी त्यांत समरसतेनें भाग घेई...

—पहिल्यापहिल्यानें मंगलेला वाटत असे, मूल होण्याचें वय अजून आपलें गेलें नाहीं. आपल्या वयाच्या मुलींचीं लग्नें सुद्धां व्हायचीं असतात...लग्न झाल्यावर पंधरासोळा वर्षांनीं सुद्धां मुलें होतात...मग असा सगळ्यांनीं एकवटून धाक कां घालावा—सर्वांना हडसून खडसून हें सांगावें—असा निग्रह तिचा टिपेला जाई...आणि मूल नाहींच झालं तर...या शंकेनें ती एकदम व्याकुळ होऊन जाई...तिचं मन हळूहळू विलक्षण साशंक होत जात होतं...एकदां तिनें नवऱ्याला विचारलें,

"मला मूल नाहीं झालं, तर तुम्ही दुसरं लग्न कराल का?—"

"छट्!, असं तुझ्या मनांत तरी कसं येतं?—"












स्वभाव आपल्या नवऱ्याच्या स्वभावांत उतरला असेल, अशा शंकेनं ती व्याकुळ होई. आणि नवऱ्याला चहा देतांना तिचा हात थरथरूं लागे. कधीं एखादा रागाचा शब्द तो मोठ्यानें बोलला, तर मंगला मनाशीं म्हणे, हां, ही नुसती सुरुवात आहे—सुरुवात आहे—आणि बावचळल्या सारखी तिची स्थिति होऊन जाई.

—काकीच्या गोष्टी चालूच होत्या. गोष्टी ऐकतां ऐकतां मंगलेला जिथल्या तिथें खिळल्यासारखं होऊन जाई. मधली जाऊ म्हणे, "कसली तरी चांगली गोष्ट सांगा हो—"

काकी तें सांगणें मनावर घेत नसे...काकीच्या गोष्टींत कांही तरी भयानक असे. असें भयानक रंगवून सांगितल्याशिवाय काकीला चैनच पडत नसे. मग तिचे भुरकट डोळे ताठ झाल्यासारखे वाटत...आजूबाजूचें चांदणें भेसूर वाटे. वांझोटा माड शेवटचे श्वास टाकतो आहेसा वाटे... दुधासारखें स्वच्छ चांदणें नासल्यासारखें वाटे. काकी स्वतःची हकीगत सुद्धां अशीच सांगे...तिचीं दोन मुलं गेलीं होतीं. वैतागानं नवऱ्यानें तिला टाकलें होतें, आणि मग तो कोरण मागून देवळाच्या धर्मशाळेंत राहिला होता—शेवटीं मेला, तें एक दिवस कोणाला कळलेंच नव्हतें. अंगाला मुंग्या आल्या होत्या...काकी बोले, तें आतां डोळ्यापुढें घडत असल्यासारखे—

—मंगलेचे वडील असेच एकदां आले होते. बोलतां बोलतां काकी म्हणाली, "हिला वास्तविक एवढ्यांत मूल व्हायला हवें होतें...आमच्या घराण्यांत असें कधीं घडलेलें नाहीं"—मंगला पुढ्यांत असतांनाच काकी हें म्हणाली होती, आणि आपल्या भुऱ्या डोळ्यांनीं मंगलेकडे तिनें रोखल्यासारखें पाहिलें होतें. मंगलेला मग चोरट्यासारखें झालें, आणि बापाशीं हसून खेळून बोलायचें ती विसरली...मग तिला वाटूं लागलें, आपल्यावरला कौतुकाचा प्रेमाचा ओघ चैत्र वैशाखी पाण्याच्या झऱ्याचा ओघ आटावा, तसा आटत चालला आहे...कदाचित् एक दिवस हें पाणी सारेंच आटून जाईल, आणि आपल्याला तडफडावं होईल.

कोणी परकें माणूस घरीं आलें तर मंगलेच्या लग्नाला किती वर्षें झालीं, आणि मग अजून मूलबाळ झालें नाहीं याची चौकशी करी. मग हळूच हळहळून जाई. कोणी तरी अजून अवधि आहे, असा आशावाद दाखवी...पण साऱ्यांच्या शब्दांत मंगलेला मूल होणें कठीणच असा सूर निघे. मूल न झालेल्या बायकांच्या गोष्टी मग निघत, आणि काकी त्यांत समरसतेनें भाग घेई...

—पहिल्यापहिल्यानें मंगलेला वाटत असे, मूल होण्याचें वय अजून आपलें गेलें नाहीं. आपल्या वयाच्या मुलींचीं लग्नें सुद्धां व्हायचीं असतात...लग्न झाल्यावर पंधरासोळा वर्षांनीं सुद्धां मुलें होतात...मग असा सगळ्यांनीं एकवटून धाक कां घालावा—सर्वांना ह्डसून खडसून हें सांगावें—असा निग्रह तिचा टिपेला जाई...आणि मूल नाहींच झालं तर...या शंकेनें ती एकदम व्याकुळ होऊन जाई...तिचं मन हळूहळू विलक्षण साशंक होत जात होतं...एकदां तिनें नवऱ्याला विचारलें,

"मला मूल नाहीं झालं, तर तुम्ही दुसरं लग्न कराल का?—"

"छट्!, असं तुझ्या मनांत तरी कसं येतं?—"

"लग्न केलंत तरी हरकत नाहीं. तिच्याशीं मी बहिणीसारखी वागेन—"

"वेडी आहेस तूं. नाहीं मूल झालं, तर बाकीचीं आपलींच आहेत. प्रत्येक चांगली गोष्ट माणसाच्या वांट्याला असतेच असं नाहीं—"

"अगदीं खरं हें!—"

"माझ्यावर तुझा विश्वास नाहीं!—"

"विश्वास आहे—"

—पण तिचं अधुरं मन त्याच्यावर विश्वास ठेवायला मुळींच तयार नव्हतं...आज तो असं म्हणतो आहे. उद्यां टोचणी लागली कीं, परंपरेच्या वळणावर गेल्याशिवाय रहाणार नाहीं. भुऱ्या डोळ्याची काकी आताशा नुसते उसासेच टाकी. आल्या गेल्याला ती उगाळून उगाळून हेंच सांगे. स्वतः नेमधर्म करीत होती. मंगलेला वाटलं, काकी आपल्याशीं पूर्वींसारखी बोलत नाहीं. दुपारचें पान वाढून झालें, तरी हाक मारीत नाहीं. रागावल्यासारखी स्वतःच्या पानावर बसून रहातें...थोरली जाऊ नि काकी आपल्या कानाआड हलके हलके कांहीतरी बोलत असतात' आपली झुळुक लागली, कीं गप्प होतात. एकदां दोनदां तर काकी मंगलेच्या नवऱ्याच्या दुसऱ्या लग्नाची भाषा बोलत होती, असें मंगलेला वाटलें. स्पष्ट कांहीं ऐकूं आलें नव्हतें. पण एकेका शब्दाचा धागा मंगला रिकामपणीं जुळवीत होती...आणि तुटकें सूत एकसंघ होतें आहेसें वाटत होतें.

—कांहींही बदल न करतां दिवस जात होते...चांदण्या रात्रीं मागच्या अंगणाच्या तुळशीच्या कट्ट्याजवळ रात्रींचीं कामें आटपून बायका बसत होत्या. काकी गाणीं म्हणत होती, आणि केव्हां केव्हां गोष्टी सांगत होती. काकीचा एकेक शब्द मंगलेचें अंग शहारून सोडत होता...हळूहळू मंगलेला वाटूं लागलें, काकीची एकेक कथा आपलें रक्त शोषून घेते आहे. दिवसा उजेडीसुद्धां मंगलेला भास व्हायचा काकीचा आजेसासरा हातांत असेल तें उगारतो आहे. उंच धिप्पाड पुरुष राक्षसासारखा कराकर दात विचकतो आहे...डोळे निखाऱ्यासारखे आहेत. नुसत्या डोळ्यांनींच हा पुरुष आपल्याला भाजून काढील...मग नांगराला जुंपणाऱ्या बायकोचा नवरा कुठें तरी शेताभातांत दिसल्यासारखा वाटे...पोटांत अन्न नसल्यामुळें त्याच्या बायकोला फिरतां येत नव्हतें, आणि तो पुरुष चाबकाचे फटके ओढत होता...बायको रक्त ओकत होती...

—हा नुसता आभास आहे, हें वेळोवेळीं मंगला स्वतःला बजावीत होती, पण मंगलेनें असा विलक्षण धाक घेतला होता, कीं प्रत्येक ठिकाणीं ती संशयानेंच पहात होती...कोणी मुलाबाळांच्या गोष्टी बोलूं लागलें, कीं तिथून ती उठून जात होती...एक दिवस दुकानच्या जमाखर्चांत कांहीं तरी भानगड झाली होती. मंगलेचा नवरा खोलींत दिव्याजवळ किती वेळ आकडेमोड करीत होता, मंगला अंथरुणावर पडली होती. तिचा डोळा लागला. कांहींतरी नवऱ्याला आज ती विचारणार होती...सकाळीं काकी जावेला बोलतां बोलतां कांहीतरी लागट बोलली होती. बोलल्यावर त्या भुऱ्या डोळ्याच्या काकीनें मंगलेकडे पाहिलें होतें. मग सबंध दिवस माणसें गप्पच होती. थोरल्या जावेनें एका मुलाला मारलें होतें...

मंगलेला अर्धवट जाग आली, तेव्हां तिचा नवरा दिवा मालवून अंथरुणावर पडला होता. मंगलेनें विचारलें, "मग तुम्ही या गोष्टीचा कांहीं विचार केलात का?"

"कसल्या गोष्टी काढल्यास?—"

"तुम्हाला कळत नाहींत?—"

"नाहीं!"

"तुम्ही दुसरें लग्न करणार आहांत?—"

"मी विचारच कांहीं केला नाहीं!"

—पूर्वींसारखी त्यानें समजूत घातली नाहीं...कपाळावर हात ठेऊन तो पडला होता—अस्वस्थतेनें मंगलेनें पुन्हा विचारलें, "खरंच कराल दुसरें लग्न?—"

"यावेळीं मला छळूं नकोस—"

"पण मी विचारतें त्याचं उत्तर द्या ना—"

"एक अक्षर बोलूं नकोस. जरा कपाळाला थारा नाहीं—"

"पण—पण मला एवढंच सांगा—"

"मुस्कटांत मारीन—स्वस्थ पड—"

"असं काय करतां! माझ्या मनाचें दुःख मी अणखी कोणाला विचारावं?—"

"मी सांगितलं ना, यावेळीं माझं कपाळ उठवूं नकोस—"

मंगलेनें गप्प राह्यला हवें होतें. पण तिचें मन आधींच बिघडलें होतें. ती म्हणाली,

"म्हणजे एवढं सुद्धां मी विचारायचं नाहीं का?—"

"एक शब्द विचारशील, तर बाहेर ओढून काढीन—"

त्याचा स्वर वाढला होता. बाहेर कोणीतरी खाकरलें होतें. मंगला मग निश्चेष्ट पडल्यासारखी झाली...किती वेळ ती रडत होती...पहांटे तिचा डोळा लागला आणि त्या झोपेंत तिला काकीच्या गोष्टींत मूल न होणाऱ्या बायकोला टाकलेला नवरा दिसला. त्याची पहिली बायको दारोदार भिक्षा मागत होती...मंगलेनं तिचं रूप न्याहाळलें, तेव्हां तिला स्वतःच्या प्रतिबिंबाची आठवण झाली...

—आणि स्वतःचा नवरा दुसरं लग्न करील असें तिला खरेंच वाटूं लागलें. स्वतःचा छळ स्वतःच्याच डोळ्यांनीं दिसूं लागला. आणि दुसऱ्या दिवसापासून प्रत्येक लहानमोठ्या माणसाचा धाक घेतल्यासारखी वागूं लागली...जणुं उद्यां तिला नवरा टाकणार होता—दारोदार ती भिक्षा मागणार होती, आणि घरांतलें लहानमोठें तिची अवहेलना करणार होतें ...आतां पासून त्यांना भिऊन वागायला हवें होतें...

—आणि दिवसा दिवसाला या धाकानें भरलेल्या अंगाची, सुरेख बांध्याची मंगला सुकत चालली...दिवसभर काम करायची, हवं नको खायची, पण रोग लागलेल्या झाडा सारखी वाळत चालली. काकी म्हणायची, पोर नाहीं टोर नाहीं, मग हिला होतंय तरी काय?"

—मंगला गोखल्यांच्या घरांत आली, त्याला दोन वर्षे होऊन गेलीं. जशी अंगलट भरत गेली, तशीच ती रोडावल्यासारखी झाली. रात्रीं दिवसा तिला काकीच्या गोष्टींतलीं माणसें दिसत...आणि मग ती ओरडत उठे—वेड लागल्यासारखं नवऱ्याला विचारी, मला भिक्षा मागायला लावाल का?—डॉक्टर वैद्य झाले—देवधर्म झाला. पण मंगला सुधारण्याचें कांहींच चिन्ह दिसेना...मंगलेचे आयुष्याचे दिवस ठरून गेल्यासारखे झाले—

आणि काकी रात्रीं अंथरुणावर पडल्यावर नवऱ्याची मूर्ति डोळ्यांसमोर घेई...भावाशीं भांडून तो धर्मशाळेंत राहिला होता...भावाचा सूड तो केव्हांतरी घेणार होता...पण तें तसेंच राहून गेलें होतें...काकीनें तें तसेंच मनांत ठेवलें होतें. मनांत ठेवून चारी पुतण्यांचा संभाळ केला होता...पण चारी भावांनीं घर भरलें—तेव्हांपासूनच तिला वाटत होतें, नवऱ्याची एकहि इछा आपल्याला पुरी करतां आली नाहीं, हें कांहीं रें नव्हे.

• • •







अनुक्रमणिका



# पोत

चित्रकार दत्तात्रय गणेश गोडसे

*‘छंद्दंत जातक’ कथेंतला महासत्व हत्ती शिकाऱ्याला सांगतो—“ मित्रा शिकाऱ्या, माझे हे सुळे मला स्वतःला नको आहेत म्हणून मी तुला देत आहें असें नाहीं. शक्रत्व, मारत्व ब्रह्मत्वादींच्या इच्छेनेंहि मी हे तुला देत नाहीं—परंतु या माझ्या सुळ्यांपेक्षां मला सर्वज्ञता—ज्ञानाचे सुळे लक्षपटीनें प्रिय आहेत. या पुण्यकृत्यानें मला सर्वज्ञता ज्ञान घडो !”*

*गेल्या खेपेच्या लेखांकांत चित्रकार गोडशांनींच लिहिलेल्या लेखमालेंतल्या जातक कथेंतला हा उतारा. सर्वज्ञता ज्ञानाची उपासना करणें म्हणजे संशोधनाच्या सागरांत खोल खोल बुडी मारणें. हें सामान्य माणसाचें काम नाहीं.... गोडशांसारख्या असामान्य वृत्तींनांच तें शक्य आहे. महाराष्ट्रांतल्या चित्रकारांत गोडशांची हेवा करण्यासारखी प्रतिभा सहज दृष्टोत्पत्तीस येत नाहीं; किंबहुना तशी अन्यत्र नाहींच असें म्हटलें तर तें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. गेले दोन लेखांक महाराष्ट्रांतील ज्या ज्या विद्वानांनीं वाचले ते विद्वान गोडशांच्या तिसऱ्या लेखांकाविषयीं आतुर होते. हा तिसरा लेखांक म्हणजे सर्वज्ञता ज्ञानाची उपासना असें जाणते म्हणतीलच.*

## ३ : दृष्ट्वा तु पांडवानीकम्....

कोणत्याही आविष्काराच्या निर्मितीची मूळ प्रेरणा देणारी विशिष्ट जीवननिष्ठा, ही जीवननिष्ठा मूर्तस्वरूपांत प्रतीत करणाऱ्या जाणिवा व ह्या जाणीवांच्या आडव्याउभ्या धाग्यांनीं आविष्काराचें कापड घडवून आणणारी माध्यमाची यंत्रणा–हे आविष्काराच्या पोताचे महत्त्वाचे घटक असतात, याचें विवेचन पहिल्या लेखांकांत झालें. आविष्कार माध्यमाच्या यंत्रणेचें तांत्रिक स्वरूप काय असतें हें पाहून—तिची उत्क्रांति निरनिराळ्या अवस्थांतून कशी होते त्याचेंही स्पष्टीकरण केलें. ह्या उत्क्रांतींतील निरनिराळ्या अवस्था स्थितिसापेक्ष असतात, किंबहुना यंत्रणेच्या ह्या उत्क्रांतिअवस्था व समाजजीवनाच्या तत्कालीन अवस्था यांच्या संवादित्वांतूनच ही यंत्रणा उत्क्रांत होत असते असेंही आपल्या निदर्शनास आलें. कोणत्याही कलात्मक आविष्काराचें पोत तपासून पाहिल्यास, त्यांत प्रतीत होणाऱ्या निष्ठां-जाणिवांवरून व आविष्काराच्या माध्यमयंत्रणेच्या उत्क्रांत स्वरूपावरून आविष्कारकालीन समाजाचें स्थितिसापेक्ष दर्शन घडतें व कलात्मक आविष्कार व त्यांचा काळ यांचे सामाजिक, तात्त्विक व कलात्मक मूल्यमापन अधिक निश्चितपणें करतां येणें शक्य होतें.

उदाहरणादाखल, भगवद्गीतेंतील पहिल्या अध्यायाचे एकोणीस श्लोक व गीतेवरील प्रसिद्ध मराठी टीका ‘भावार्थदीपिका’ हिच्यांतील त्याच भागावरील मराठी भाष्य, ह्या दोन्हीं आविष्कारांचे पोत—आतांपर्यंत केलेल्या विवेचनाच्या दृष्टिकोनांतून—तारतम्यानें तपासावयाचें आहे.

गीतेच्या पहिल्या अध्यायांतील कांहीं भाग व त्यावरील भावार्थ-

दीपिकेचें भाष्य ह्यांची या तौलनिक अभ्यासाकरितां निवड करण्याचें कारण एवढेंच कीं दोन्ही आविष्कारांतील 'वस्तू' एकच असून—त्यांच्या आविष्कारांतील निष्ठा-जाणिवांत मात्र कालपरत्वें कसा व किती फरक पडला आहे हें स्पष्ट व्हावें म्हणून.

भारतकार व्यास व यथार्थदीपिकाकार श्री ज्ञानेश्वर हे दोघेही श्रेष्ठ प्रज्ञेचे कवि होते हें मान्य करूनही दोघांच्या आविष्कारांच्या पोताची जात सर्वस्वी वेगवेगळी असल्याचें, त्याचप्रमाणे दोघांच्याही आविष्कार माध्यमाची तांत्रिक स्थिति भिन्नभिन्न असल्याचें दिसून येतें. उभय आविष्कारांच्या पोतांतील वेगळेपणा कोणता व त्यांच्या माध्यमाच्या तांत्रिक स्थितींतील भेद कसा हेंच आपल्याला यापुढील विवेचनांत बघावयाचें आहे.

गीतेचा पहिला अध्याय हा वस्तुनिष्ठ वर्णनाचा एक उत्कृष्ट नमुना आहे असें आम्हांला वाटतें. या पहिल्या अध्यायांतील वस्तू वर्णनात्मक आणि कथनात्मक असल्यामुळें, गीतेच्या पुढील सतरा अध्यायांत प्रत्यहीं निर्माण होणाऱ्या गीतेच्या खऱ्या अर्थासंबंधीच्या मतामतांच्या गलबल्याला येथें मुळांतच अवसर नाहीं. "समवेता युयुत्सवा" अशा पवित्र्यांत, कुरुक्षेत्रावर व्यूह रचून उभ्या राहिलेल्या कौरवपांडवांच्या सेनासमूहाचें, उभय पक्षांतील रणवाद्यांनीं केलेल्या तुमुल कोलाहलाचें आणि दोन्ही सैन्यांचें निरीक्षण केल्यानंतर अर्जुनाच्यां मनांत निर्माण झालेल्या विषादाच्या शारीरिक व मानसिक प्रतिक्रियांचें या अध्यायांत यथातथ्य वर्णन करण्यांत आलें आहे. एका महान घटनेचें भव्य चित्र, अगदीं मोजक्या शब्दांत व्यासांनीं प्रत्यक्ष समोर उभें केलें आहे. दृश्य व श्राव्य गोष्टींच्या केवळ वस्तुनिष्ठ वर्णनांतून गीतेचा हा पहिला अध्याय कवीनें सहजपणें साकार केला आहे.



परंतु, 'परतत्त्वाच्या स्पर्शापासून' अलिप्त राहिलेला हा ऐहिक अध्याय—या सहजपणामुळेंच वादविवादकांना व तत्त्वज्ञांना साधा सरळ व अति प्राकृत वाटला आहे. साधेपणा म्हणजे सामान्यपणा असाच पुष्कळांचा ग्रह झाल्याचें दिसून येतें. गीतेचे भाष्यकार श्रीमत् शंकराचार्य यांना हा अध्याय एवढा निरर्थक वाटल्याचें दिसतें कीं तो सरळ वगळूनच—दुसऱ्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकांपासून त्यांनीं आपल्या प्रख्यात गीताभाष्याला निःशंकपणें सुरुवात केली आहे. श्री ज्ञानेश्वरांच्या भूमिकेसंबंधीं लिहितांना कांहीं विचारवतांनीं—ज्ञानेश्वरांची काव्यदृष्टि उच्चप्रकारची असल्यानें सामान्य विषयांत ती रमूं शकत नाहीं, म्हणूनच प्रथमाध्यायांतील यापुढील कथाभाग व्यांनी अतिसंक्षेपानें सांगितला आहे."—असें प्रतिपादन केलें आहे. स्वतः व्यासांना हा अध्याय कमी महत्त्वाचा वाटून त्यांत त्यांची काव्यदृष्टि कमी रमली आहे असें मात्र कोठेंच आढळून येत नाहीं. परंतु ज्या कारणामुळें इतरांनीं हा अध्याय दुर्लक्षिला आहे त्याच कारणाकरितां प्रस्तुत विवेचनाच्या दृष्टीनें हा अध्याय महत्त्वाचा ठरतो. विचारांच्या अभिनिवेशी प्रतिपादनापेक्षां कथनांतील अभावित मोकळेपणांतच कोणत्याही आविष्काराचे पोत अधिक स्पष्टपणें नजरेंत भरतें. सहज मोकळेपणानें केलेल्या वर्णनांतच स्थितिसापेक्ष जीवनाचें प्रतिबिंब आरशाच्या प्रामाणिकपणानें पकडलें जातें. आविष्कार कर्त्याचें व्यक्तिमत्त्व जेवढें श्रेष्ठ व सृजनशील असेल त्या प्रमाणांत या प्रतिबिंबांतून जन्म पावणाऱ्या कलात्मक उच्चनीचतेची प्रतवारी ठरत असते. प्रतिबिंबाची कलात्मक प्रतवारी एरव्ही कोणतीही असली तरी, हें सहज पडलेलें अजाण प्रतिबिंब न्याहाळूनच तत्कालीन जीवनाचें रूप ओळखणें सोपें जातें.

एखाद्या चित्रकाराच्या कलाकृतीचें पोत तपासावयाचें झाल्यास, तज्ज्ञ लोक प्रथम तें सबंध चित्र झांकून टाकून त्याचा विशिष्ट भाग तेवढाच उघडा ठेवतात, व फक्त ह्या उघड्या भागाचें सूक्ष्म निरीक्षण करतात. कलाकृतीच्या ह्या उघड्या भागांत आढळणाऱ्या आकार अवकाशांच्या न्यासावरून, रंग व रेषा यांच्या आलेखनावरून व कलम चालविण्याच्या विशिष्ट तंत्रावरून परीक्षकांना कलाकृतीच्या पोताचा अंदाज बांधता येतो. याच पद्धतीनें त्याच कलाकृतीच्या अधिक भागांचें निरीक्षण करून त्यांत प्रतीत होणाऱ्या पोताच्या तौलनिक अभ्यासानें मूळ कलाकृतीच्या एकंदर प्रकृतीची कल्पना करणें शक्य होतें. कलाकृतीचें पोत तपासण्याची ही पद्धत येवढी अचूक आहे कीं, महान चित्रकारांच्या नांवावर खपविण्यांत येणाऱ्या अनेक खोट्या चित्रांची तोतयेगिरी या पद्धतीनें उघडकीस आलेली आहे. आत्माविष्कार हेंच जर कोणत्याही कलेचें मुख्य गमक असेल तर, चित्रकलेंतील आविष्काराच्या बाबतींत उपयुक्त ठरणारी वरील पद्धति, वाङ्मयीन आविष्काराच्या बाबतींतही तेवढीच उपयुक्त ठरावी असा विश्वास वाटतो बाकीचें भारत अथवा भावार्थ दीपिका वरील पद्धतीनें डोळ्यांआड झांकून ठेवून गीतेच्या पहिल्या अध्यायांतील फक्त पहिले एकोणीस श्लोक व त्या श्लोकांवरील मराठीच्या देशीकार लेण्यांतील भाष्य यांची निवड करण्याचें हें आणखी एक कारण आहे.

एकोणीस श्लोकांच्या अडतीस ओळींत व्यासांनीं, "समवेता युयुत्सवा" अशा पवित्र्यांत, कुरुक्षेत्रावर उभ्या राहिलेल्या कौरवपांडवांच्या प्रचंड सेनासमूहाचें, दृश्य, श्राव्य व भावसंवेदनांच्या मोजक्या रेखाछटांनीं एक भव्य पण संभाव्य चित्र, आलेखनाच्या चढत्या श्रेणींत पूर्ण केलें आहे. पहिल्या श्लोकापासूनच सूचित झालेली सैन्यसमूहाची कल्पना

दृश्यश्राव्य व भावसंवेदनांच्या सूचनांनीं दर श्लोकागणिक अधिकाधिक स्पष्ट व विशाल होत जाऊन एकोणिसाव्या श्लोकांत ती पूर्ण झाली आहे. मूळ भारतांत पंचविसाव्या अध्यायापासून गीतेला सुरुवात होते. त्यापूर्वींच्या अध्यायांतून कौरव-पांडवांच्या सैन्याचीं, उभय सैन्यांतील निरनिराळ्या योध्यांचीं, त्यांच्या रथ शस्त्र ध्वज चिन्हांसह अनेक विस्तृत वर्णनें आलेलीं आहेत. भारतीय युद्ध एकाएकीं उपस्थित झालें नव्हतें; युद्धाचा विचार पक्का होऊन दोन्ही बाजूंनी तयारी बरेच दिवस चालली होती. तरी सुद्धां प्रत्यक्ष युद्ध सुरू होणार त्या समर संधीला, व्यासांनीं भीष्मपर्वाच्या पंचविसाव्या म्हणजेच गीतेच्या पहिल्या अध्यायांत दोन्ही सैन्यांचें धावतें समालोचन पुन्हां एकदां दुर्योधन संजय यांच्या तोंडून करवून देऊन, भारतीय युद्धास तोंड लागणार तो महत्त्वाचा मुहूर्तच जणु गीतेच्या वाचकांच्या समोर प्रत्यक्ष उभा केला आहे. या सैन्यवर्णनाचे दृश्य व श्राव्य असे प्रामुख्यानें दोन भाग आहेत. दोन्ही सैन्यांतील व्यूह, योध्दे, सेनापती, त्यांचें वैयक्तिक बळ, युद्धकौशल्य व वीरवृत्ति इत्यादींचें प्रत्यक्ष वस्तुनिष्ठ वर्णन दुर्योधनानें करून त्या विराट सेनासमूहाचें एक धीट दृश्य चित्र रंगविलें आहे. पुढील वर्णनांत कौरव सेनापतीनें केलेला सिंहनाद व शंखनाद आणि त्यालाच प्रतिसाद म्हणून "सहसाएव अभ्यहन्यंत" अशा अनेक रणवाद्यांनीं केलेला कोलाहल, व या कोलाहलाला प्रत्युत्तर म्हणून पांडव सैन्यांतील वीरांनीं आस्फुरलेल्या दिव्य शंखांचा हृदयाचा थरकाप करणारा गगनभेदी घोष इत्यादि श्राव्य संवेदनांनीं संजयाने याच सेनासमूहाचें एक वेगळेंच दर्शन घडविलें आहे. ह्या दृश्य व श्राव्य वर्णनांत सैन्याची एकसंध कल्पना दर श्लोकागणिक अधिकाधिक मूर्त होत जाऊन एकोणीसाव्या श्लोकांत ती दृश्यश्राव्य व भाव या तिन्ही संवेदनांनीं "नभः च पृथ्वीं च एव" एवढी तुमुल झाल्याचें सूचित केलें आहे. या साऱ्या कोलाहलांत सैन्यसमूहाच्या एकसंधी वर्णनाला धक्का बसणार नाहीं अथवा त्याच्या वर्णनांतील रसनिर्मितींत थोडाही विस्कळीतपणा येणार नाही याची काळजी कवीनें अत्यंत दक्षतेनें घेतली असल्याचें दिसतें. अकराव्या श्लोकांत दुर्योधनाचें दृश्यवर्णन संपतें व सेनापति भीष्मांच्या सिंहनादानें व शंखध्वनीनें संजयाच्या श्राव्य वर्णनास सुरुवात होते. तेराव्या श्लोकांत निरनिराळ्या रणवाद्यांनीं केलेल्या फक्त ध्वनींचें वर्णन केल्यानंतर पुढील श्लोकांत येणारें वर्णन चढ्या रसनिर्मितीच्या दृष्टीनें, दृश्य व श्राव्य असेंच असलें पाहिजे हें ओळखून व्यासांनीं पुढच्याच श्लोकांत कृष्णार्जुनांच्या रथाचे "ततः श्वेतैर्हयैर्युक्ते...... महतिस्यंदने स्थितौ..." असें दृश्य व श्राव्य अशा दोन्ही संवेदनांना आवाहन करणारें मनोज्ञ प्रतिमाचित्र रेखाटून—यापुढील सारेंच वर्णन शेवटपर्यंत (१९ श्लोकापर्यंत) दृश्य व श्राव्य या दोन्ही संवेदनांनीं युक्त अशा प्रतिमांनींच पूर्ण केलें आहे.

सैन्यसमूहाचें हें चित्रण प्रभावी आहे तेवढेंच तें प्रत्यक्ष आहे, जेवढें विराट आहे तेवढेंच तें वस्तुनिष्ठ आहे व विविध आहे तेवढेंच एकसंधहि आहे. सैन्यसमूहाचें चित्रण करतांना व्यासांनीं दृष्ट्वा–पश्य–अत्र आदि प्रत्यक्षाची जाणीव करून देणाऱ्या शब्दांचा वापर करून सारें वर्णन एका अर्थानें 'साक्षात्कारी' केलें आहे. या एकोणीस श्लोकापुरतें तर तें एवढें साधें आहे कीं, कोणत्याहि शब्दालंकार अथवा अर्थालंकारापासून सुद्धां तें पूर्णपणें अलिप्त आहे.

या एकोणीस श्लोकांत प्रतीत होणाऱ्या आविष्कार माध्यमाच्या यंत्रणेच्या स्वरूपाचा अंदाज बांधावयाचा झाल्यास, तें बव्हंशीं निसर्गरूप चित्रणावस्थेचें आहे असें दिसून येतें. वर्णनांतील वस्तुनिष्ठता—त्यांतील सहजपणा—प्रत्यक्षपणा व संभाव्यता हे सारे निसर्गरूप चित्रणाचे गुणच या आविष्कारांत प्रतीत होतात. दृश्य श्राव्य व भावसंवेदनांतून सूचित होणाऱ्या साऱ्या प्रतिमा पूर्णतया—सहज प्रत्यक्ष व निसर्गनिष्ठ आहेत. कोणत्याही प्रकारें सांकेतिक नाहींत, कृत्रिम नाहींत व अतिरंजित, अत्युक्त अथवा अतिशयोक्तिपूर्ण तर—मुळीच नाहींत. भारती आविष्काराच्या माध्यम यंत्रणेचें स्वरूप निसर्गरूप चित्रणाचें असेल तर निसर्गरूप चित्रणांत प्रतीत होणाऱ्या जाणिवा व जीवननिष्ठा सदरहू आविष्कारांत कशा प्रतीत झालेल्या आहेत हें आता बघितलें पाहिजे.

निसर्गरूप चित्रणावस्थेंतील स्थितिसापेक्ष जीवनाची मूळ निष्ठा "प्रवृत्त" असते. ऐहिक जीवनाबद्दल आस्था, तें जीवन अधिकाधिक समृद्ध करण्याची आकांक्षा, ह्या समृद्ध जीवनाचा रसिकतेनें भोग घेण्याची इच्छा; तें प्राणपणानें जपण्याची, रक्षण करण्याची ईर्षा इत्यादि या प्रवृत्त जीवननिष्ठेचीं लक्षणें सांगतां येतील. आस्था आकांक्षा इच्छा ईर्षा ह्यांच्या अवखळ खळखळाटांत प्रवृत्त जीवनाचा आवेशी स्रोत धावतांना दिसतो. ऐहिक जीवनाबद्दल वाटणाऱ्या आस्थेंतूनच तें जीवन शक्य तेवढें आनंदी व समृद्ध करण्याची वृत्ति जन्मास येते. ऐहिक सुखाच्या इच्छेलाच सभोंवतालच्या चराचर सृष्टीकडे प्रेमाने बघण्याची दृष्टि येते, प्राथमिक अवस्थेंतील निसर्गाबद्दल वाटणाऱ्या भीतीचा लोप होऊन तिची जागा प्रेमाने घेतल्याचें आढळून येतें. चराचर सृष्टीच्या ह्या जाणीवपूर्ण सहवासानें, तिच्या स्वरूपाच्या सूक्ष्म निरीक्षणानें, तिच्या वस्तुनिष्ट सौंदर्याच्या मुग्ध दर्शनानें मानव व निसर्ग यांत स्वयंनेव, भावनात्मक सुहृत्संवादी नातें निर्माण झाल्याचें दिसून येतें. ऐहिकाशीं जडलेल्या ह्या जिव्हाळ्यांतूनच अस्मितेची जाणीव जागी होऊन प्रवृत्त मानवी जीवनाची धारणा साकार होऊं लागते. या

कांहीं अवशिष्ट राग



सदा कडाडे जशी दामिनी झेंप घेऊनी अचानक
धुव्वा उडवी स्वास्थ्याचा ती रूप दाऊनी भयानक
निषाद कोमल, शुद्ध स्वरांची हिला बंध ना सामयिक
पतिमित्रांची बालगणांची "झिंझोटी"—

ही करालक



अनुक्रमणिका

नव्या निष्ठेनें उजळलेलें मानवी जीवन जीवनौघाच्या गतिमान आवेशी स्रोताची फुंद असलेले, जगण्याच्या निर्भय आनंदानें धुंद झालेलें, ऐहिक सुखदुःखांनीं हेलावणारें, ऐहिक तेवढ्या साऱ्यावर प्रेम करून समर्थपणें जगणारे; कोणताहि निसर्गबाह्य आदर्श संकेत अथवा अभिनिवेश ह्यांपासून अलिप्त असलेलें असे सहज प्रत्यक्ष व नैसर्गिक असतें.

कोणत्याहि आविष्काराचें पोत घडवून आणणाऱ्या माध्यमाच्या यंत्रणेच्या उत्क्रांत स्वरूपावरून त्या आविष्कारामागील स्थितिसापेक्ष जीवननिष्ठांचा बोध होतो हें प्रस्तुत विवेचनानें सिद्ध झालें असेल तर व्यासांनीं "भारतांत" केलेल्या आविष्कारामागील मूळ जीवननिष्ठा "प्रवृत्त" जीवनाची होती असेंच आपल्याला म्हणावें लागतें. व्यासांच्या आविष्काराच्या पोतांतील निरनिराळ्या जाणीवांचें स्वरूप तपासलें तरीसुद्धां प्रवृत्त जीवनाचें मूळ अमूर्ततत्वच ह्या जाणिवांच्या द्वारें विशद होत आहे असें आढळून येतें. व्यासांच्या आविष्कार यंत्रणेचें स्वरूप वस्तुरूप चित्रणाचें आहे. वस्तुरूप चित्रणांतील स्थितिसापेक्ष जीवननिष्ठा प्रवृत्तच असतात; आणि व्यासांच्या आविष्कारामागील मूळ जीवननिष्ठाहि प्रवृत्तच आहेत. ऐहिक जीवनाबद्दल वाटणारी आस्था आकांक्षा इच्छा व ईर्षा आदि सर्व जाणिवा त्यांच्या निरनिराळ्या पिळांसह येथें दिसून येतात. ऐहिक जीवन जगण्याची, तें समृद्ध करण्याची आणि ऐहिक श्रेयावर दृष्टि ठेवून तें प्राणपणानें मिळविण्याची ऐहिक धारणाच येथें स्पष्टपणें आढळून येते. ऐहिक जीवन धारणेंत सदैव जागृत असलेली व्यक्तिगत अस्मिता येथें दृष्टीस पडते. अस्मिता म्हणजे अहंभाव नव्हे, अस्मिता म्हणजे स्वतःच्या जिवंत अस्तित्वाची जाणीव. प्रवृत्त जीवनधारणेच्या समाजांतील प्रत्येक व्यक्तींत ही जाणीव जागृत दिसते; किंबहुना ही जाणीव म्हणजे प्रवृत्त जीवनांतील एक महत्त्वाची निष्ठा—महत्त्वाचें मूल्यच असतें. प्रस्तुत विवेचनाच्या पारिभाषिक शब्दांत बोलावयाचें झाल्यास भारती आविष्काराच्या पोतांतील मूळ जीवननिष्ठा-अस्मिता जागृत असलेल्या प्रवृत्त जीवनाची आहे—त्या पोतांतील निरनिराळ्या जाणिवांचे आडवे उभे धागे, आविष्कारामागील ही मूळ अमूर्त निष्ठाच व्यतीत करतांना दिसतात व हे पोत घडवून आणणारी आविष्काराच्या माध्यमाची यंत्रणा वस्तुरूप दर्शनाच्या पूर्ण उत्क्रांत अवस्थेंत असल्याचें आढळून येतें.

पूर्ण उत्क्रांत अवस्था एवढ्याचकरिता म्हटलें कीं ती पुढील आदर्श चित्रण अवस्थेंतील जाणिवा-निष्ठांची अस्पष्ट चाहूल येथें कांहीं ठिकाणीं ऐकूं येत असली, अथवा माध्यमाची यंत्रणासुद्धां, यंत्रणेंतील गतिमानतेच्या तत्त्वानुसार आदर्श चित्रणावस्थेकडे परिणत होत जात असतांना दिसली तरी प्रामुख्यानें निसर्ग चित्रण अवस्थेच्यां पावलेंच येथें स्पष्ट व खोल उमटलेलीं दिसत आहेत. भारती प्रवृत्त जीवननिष्ठेच्या वाटचालीच्या त्या खुणा आहेत. त्या पावलांच्या ठशांचा मागोवा घेत घेतच गीतेच्या पहिल्या अध्यायांतील एकोणीस श्लोकांत प्रतीत होणाऱ्या निरनिराळ्या निष्ठा आपल्यास तपासावयाच्या आहेत.

एकोणीस श्लोकांच्या छोट्या अवधींत कथनाच्या ओघांत लहानमोठीं अनेक पात्रें सूचित झालीं आहेत. धृतराष्ट्र, संजय, द्रोण, दुर्योधन, भीष्म, भीमार्जुन, कृष्ण व उभय पक्षांकडील अनेक रथीमहारथी व पृथ्वीपती. या उल्लेखांवरून सुद्धां त्यांतील प्रमुख पात्रांचें व्यक्तिमत्व–स्वभावविशेष यांची स्थूलमानानें कल्पना येऊन त्यांचीं परस्परांतील नातीं अथवा संबंध कशा प्रकारचे होते याचा अंदाज बांधतां येतो; पितापुत्र, गुरुशिष्य मित्रमित्र, राजा व त्यांचा सेनापती वगैरे नात्यांचें भारतकालीन स्वरूप कसें असेल हें कल्पनेनें जाणतां येतें.



## गंधखुळी

••••••••••••

निर्मला देशपांडे

मावळतीला दिन ढळलेला
क्षितिजशलाका अंधुकलेली
अशा अवेळीं दूर कुठुनशी
उगाच कां रे तार छेडिली ?

गीत तुझें तें ऐकियलें मी
सूर-सागरीं बुडविलेस तूं
मी बुडलें–अन् बुडलें नाहीं
मनांत माझ्या कांहीं न हेतू...

आकाशांतिल रंगपंचमी
त्या रंगांतच भिजले डोळे
मनांत माझ्या कांहीं नसतां
आज कशाला भरून आले ?

मिटुनि घेऊं कां नेत्रदलें अन्
पुसून टाकूं रंगपंचमी ?
खुळेपणाचें खूळ कसें रे
लपवुनि टेऊं रंगखुळी मी ?

कसा अचानक सुगंध आला,
अंगोपांगीं फुलला मोहर
गंधखुळी मी मनांत माझ्या
बकुळ-फुलांची हळवी थरथर...

त्या गंधानें बावरलें मी,
श्वास रोखुनि घेऊं कुठवर
मनांत माझ्या कांहिंच नाहीं
फक्त अनामिक आहे हुरहुर...

समाजांतील निरनिराळ्या नात्यांची धारणा, तत्कालीन जीवनविषयक निष्ठेचें जें मूळ तत्त्व असेल त्या तत्त्वाच्या अनुषंगानेच आखली जात असते. जीवननिष्ठेचें एकंदर स्वरूप ज्या वृत्तीचें असेल त्या वृत्तीला पोषक अशा स्वरूपांतच समाजांतील पितापुत्र गुरुशिष्य बंधूबंधू अथवा मित्रमित्र आदि नात्यांना एकविशिष्ट घाट मिळत असतो. या नात्यांतील आदर, निष्ठा, प्रेम अथवा द्वेष या जाणिवांचे पीळ समाजधारणेच्या मूळ तत्वानुरूप कमीअधिक घट्ट अथवा सैल बनतात; व तत्कालीन सामाजिक जीवनाच्या व्यवहारदर्पणांत ते कमीअधिक स्पष्टपणानें प्रतिबिंबित होतात.

भारतकालीन समाजाच्या मूळ निष्ठा प्रवृत्त जीवनाच्या होत्या व प्रवृत्त समाजांतील प्रत्येकाची अस्मिता जागृत असते, ह्या दोन्ही गोष्टी लक्षांत घेऊन जर गीतेच्या पहिल्या एकोणीस श्लोकांत उल्लेखिलेल्या प्रमुख पात्रांचे स्वभाव व वागणूक तपासली तर हीं निरनिराळीं पात्रें व संबंधित घटना ह्यांच्या द्वारें भारती जीवनाचा मूळ तत्त्वविचारच व्यासांच्या आविष्कारांत निरनिराळ्या प्रतिमारूपांनीं साकार झाला आहे हें दिसून येतें.

भारतकालीन जीवनांतील ह्या निष्ठा लक्षांत ठेवूनच निरनिराळ्या पात्रांच्या स्वभावाचा, वागणुकीचा व त्यांच्या परस्परांतील नात्यांच्या स्वरूपाचा विचार करणें इष्ट ठरेल. कुरुक्षेत्रावरील बातमी ऐकण्यास उत्सुक झालेला अंधधृतराष्ट्र "मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत" असा प्रश्न संजयला विचारतो. "मामकाः" म्हणजे "माझीं मुलें" असा

ममत्व सूचित करणारा शब्द धृतराष्ट्राच्या प्रश्नांत प्रथम घालून व्यासांनीं धृतराष्ट्राचें स्वतःच्या मुलाबद्दचें नैसर्गिक ममत्व नुसतें वर्णन करून न सांगतां प्रत्यक्ष त्याच्या तोंडूनच वदविलें आहे. यापूर्वीच्या अध्यायांनही धृतराष्ट्रानें आपल्या मुलांची चौकशी ह्याच ममत्वानें व नेमक्या ह्याच शब्दांत केली आहे. (भीष्म. २४-२). पुत्रस्नेहानें मोहित झालेल्या धृतराष्ट्रानें विचारलेल्या प्रश्नात "मामकाः" या शब्दाला प्रथम स्थान देऊन व्यासांनीं केलेले धृतराष्ट्राचें यथार्थ स्वभावदर्शन हे भारती सामाजिक जाणिवांच्या दृष्टीनें स्वाभविक वाटतें. पुढें येणाऱ्या विवेचनाच्या दृष्टीनें ही गोष्ट वाचकांनीं येथें मुद्दाम ध्यानांत ठेवावयाची आहे.

कौरवांच्या सैन्याचा व्यूह प्रथम भीष्मांनीं रचल्यावर पांडवांचे सात अक्षौहिणी सैन्य, वज्र नांवाचा व्यूह रचून उभे राहिले. पांडवांचा सेनापति धृष्टद्युम्न याने व्यूह रचून उभी केलेली पांडव सेना पाहून दुर्योधन द्रोणाचार्यांजवळ जाऊन म्हणाला, "पहा आचार्य, तुमचा बुद्धिमान शिष्य धृष्टद्युम्न यानें जिचा व्यूह रचला आहे, अशी युद्धास तयार झालेली ही पांडवसेना पहा." दुर्योधनाच्या ह्या उद्‌गारांत द्रोणाचार्यांना एक सूक्ष्म टोमणा मारण्यांत आला आहे. द्रोणाचार्य हे कौरव-पांडवांचे धनुर्विद्येचे गुरु. धृष्टद्युम्नाचे ते गुरु होते तसेच दुर्योधनाचेहि होते. गुरूबद्दल आदर व निष्ठा गृहीत धरूनहि तत्कालीन गुरुशिष्यांचे संबंध कसे मोकळेपणाचे होते याची सूचना वरील दुर्योधनाच्या भाषणावरून येते.

गुरु-शिष्यांतील परस्पर संबंधाविषयीं निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या धारणा असल्याचें दिसून येतें. गुरूबद्दल योग्य तो आदर व निष्ठा बाळगूनही गुरु-शिष्यांची वागणूक मित्रत्वाची असणें; अथवा गुरूबद्दल भक्ति ठेवून त्यासमोर अनन्यशरणागति स्वीकारणें अशा दोन प्रकारच्या वृत्ति गुरुशिष्यसंबंधांत प्रामुख्याने दिसून येतात. प्रस्तुत विवेचनांतील भारत-कालीन प्रवृत्त जीवनांतील गुरुशिष्यांचे संबंध पहिल्या प्रकारचे म्हणजे मित्रत्वाचे असावेत असें सूचित होतें. व्यक्तिगत अस्मिता जागृत असलेल्या समाजांतील निरनिराळ्या नात्यांच्या घटकांतील परस्पर संबंध एकमेकांबद्दल प्रेम व आदर बाळगूनही मित्रत्वाधिष्ठित अधिक असतात. केवळ अधिकारपरत्वें एका घटकानें दुसऱ्या घटकाला कमी लेखण्याचें कारण नसतें. त्या घटकाचा जो अधिकार असेल तो मान्य करूनही, व त्याबद्दल योग्य तो आदर बाळगूनही दुसऱ्या घटकाचें पहिल्याशीं असलेलें नातें मित्रत्वाचें राहूं शकतें. पित्याचें वडीलपण मान्य करूनही पिता-पुत्र मित्र असूं शकतात. ज्ञानांतील गुरूचा अधिकार मोठा आहे म्हणून इतर व्यावहारिक वागणुकींतही शिष्यानें गुरूसमोर सदैव नतमस्तकच रहाण्याची गरज नसते. गुरू सुद्धां शिष्याविषयीं, आपण दिलेल्या विद्या-दानानें शिष्याची प्रज्ञा, स्वतंत्रपणें वाढून त्यानें आपल्यावरही मात करावी अशी "शिष्याद् इच्छेत् पराजयम्" ची भावनाच बाळगतांना दिसतात आणि शिष्यहि आपल्या प्रज्ञेचा विकास गुरूच्या मार्ग-दर्शनाखालीं स्वतंत्रपणें करून गुरूच्यापुढें जाण्याची आवेशी ईर्षा बाळगतांना दिसतो. अशा स्वतंत्र धारणेच्या गुरु-शिष्यांतील साहचर्य-आनंदी-मोकळे व अधिक प्रामाणिक न दिसलें तरच नवल. अशा गुरु-शिष्यांच्या वागणुकींत संकोचाला, औपचारिकतेला अथवा अकारण शालीनतेला वावच नसतो. पोकळ पोक्तपणाला, अकालीं प्रौढत्वाला निरर्थक गांभीर्याला अथवा विरागी औदासीन्याला येथें मज्जाव असतो. येथें उद्दाम अहंमन्य औद्धत्य नसतें तसेंच कायम् कणा वाकवलेलें लीनत्वही आढळून येत नाही. उलट गुरु-शिष्यांतील व्यवहार-आदराचे योग्य तें अंतर ठेवूनही खेळीमेळीचे व मनमोकळेपणाचे असूं शकतात. प्रेमादराच्या प्रसन्न कोवळ्या उन्हांत गुरुशिष्यांचा निर्मळ स्नेह एकाद्या निर्झराच्या उत्साहानें सतत खळखळतांना दिसतो. कालांतराने ह्या नात्यांतील नैसर्गिक मित्रभावाचें आदर्शांत परिवर्तन होतें व हें आदर्श नातें पुढें संकेतांत रूपांतरित होतें. ह्या संकेतावस्थेंत नात्याच्या घटकांतील पूर्वीचा मूल भाव नाहीसा होऊन सारे संबंध सांकेतिक उच्चनीचतेच्या मापानें मोजले जातात. दोन्ही घटकांतील मैत्रिकीचें सान्निध्य जाऊन दोघेही दोन टोंकाला जाऊन बसतात. एकाचें माहात्म्य तरतमभावानें चढतें तर दुसऱ्याचें तेवढेंच क्षुद्र असल्याचें आवर्जून सांगण्यांत येतें.

भारती समाजांतील सर्वसाधारण नात्यांचा स्थायिभाव काय असेल, व त्या स्थायिभावाच्या अनुषंगानें निरनिराळ्या नात्यांतील भावसंवेदनांचें स्वरूप काय असेल ह्याचा हा स्थूल मानानें विचार केला आहे. व्यासांच्या भारतांतील आविष्कारांत प्रतीत होणाऱ्या निष्ठा-जाणिवांचें स्वरूप पहातां हा विचार बहुतांशीं बरोबर असावा, असा विश्वास वाटतो. कारण भारती समाजांतील, निरनिराळ्या नात्यांतील व्यक्तींची विशिष्ट वागणूक वरील विवेचनाच्या प्रकाशांतच सुसंगत वाटते.

"गुरूच्या घरीं जाऊन प्रत्येक त्रैवर्णिक मुलानें शिकावें अशी भारत काळीं सक्ती असून त्यासाठी 'उपनयन' हा संस्कार प्रचारांत आला. उपनयनानें वेदाध्ययन करण्याच्या वेळीं केलेला गुरु व तत्वज्ञान सांगणारा गुरु याशिवाय दुसरा गुरु महाभारतात कोणी सांगितला नाही वेदविद्या शिकविणारा गुरूच धनुर्विद्या वगैरे इतर विद्याही शिकवी. तत्त्वज्ञानासाठीं कोणाही ब्रह्मनिष्ठाकडे जावें असें होतें. अमुकच गुरूकडे जावें असें दिसत नाही. तत्त्वज्ञानाचे गुरू हे उपनयनाच्या गुरूहून भिन्न होते. या

## कांहीं अवशिष्ट राग



घनघन गरजत विजली चमकत देह कुडकुडे गृहांतरी
च्यवनप्राश प्राशुनी युग्ध किती खुराक खाउनि पुष्ट करी
पहुडावे परि नेत्र मिटोनी —ऐकुं येतो 'मियाचा मल्हार'
बागेमध्यें कसा गरजतो खर्ज लावुनी दर्दूर.



दोन गुरूंशिवाय अन्यधर्मगुरु महाभारतांत सांगितला नाही. धर्मगुरूची कल्पना निरनिराळे धर्म झाल्यानंतरची आहे. इ. इ. माहिती भारतकालीन गुरुविषयीं तज्ञांनीं दिली आहे.

द्रोणाचार्य हे कौरवपांडवांचे —उपनयनानें विद्या शिकविण्याच्या वेळीं केलेले गुरु होत. द्रोणाचार्यांनीं त्यांना धनुर्विद्याही शिकविली होती. कौरवपांडवाप्रमाणेंच ते धृष्टद्युम्नाचेही धनुर्विद्येतील गुरु होते. परंतु भारतीय युद्धाचा प्रसंगच असा होता कीं प्रत्यक्ष गुरूशीही लढावयास उभें रहाणें पांडवपक्षीयांना भाग होतें. धृष्टद्युम्न द्रोणाचार्यांविरुद्ध व्यूह रचून लढावयास उभा राहिला यांत आपण पाहिलेल्या भारतीनिष्ठांच्या दृष्टीनें गैर कांहींच नव्हतें. किंबहुना धृष्टद्युम्नानें तसें लढावयास उभें रहाणें हें भारती गुरुशिष्यांच्या धारणेला धरूनच होतें; आणि त्याचप्रमाणें, दुर्योधनानेंही द्रोणाचार्यांना बारीकसा टोमणा मारून वरील घटनेची जाणीव करून देणेंही तेवढेंच सुसंगत होतें. स्वतः व्यासांनाही गुरु-शिष्य संबंधाचा हाच प्रकार मान्य होता असें त्यांनीं इतरत्र रंगविलेल्या गुरुशिष्य जोड्यांवरून दिसून येतें.

प्रवृत्त समाजांतील व्यक्ति ह्या स्वभावतःच लढाऊ विजिगीषु वृत्तीच्या असतात. ज्यांना नित्यच युद्धाचा प्रसंग असतो त्यांना प्रतिपक्षाचें बळ कोणत्याहि तऱ्हेनें कमी न लेखण्याची सावधानी वृत्ति बाळगावी लागते. एकोणीस श्लोकातील व्यासांच्या दुर्योधनांत हीच वृत्ति दिसून येते.

द्रोणाचार्यांजवळ कौरवपांडवांच्या सैन्यासंबंधी बोलतांना दुर्योधनाच्या व्यक्तिमत्त्वाचा हा विशेष गुण दिसून येतो. खरें म्हणजे पांडवांचें सैन्य कोरवांच्या सैन्यापेक्षां बरेंच लहान होतें. सात अक्षौहिणी पांडवांच्या, तर अकरा अक्षौहिणी कौरवांच्या. केवळसंख्या बळानें सुद्धां कौरव अधिक बलशाली होते. असें असून सुद्धां दुर्योधनाच्य बोलण्यांत पांडवांच्या सेनेबद्दल अनादर दिसून येत नाहीं. प्रतिपक्षाचें बळ कमिलेखण्य चाहि त्याचा उद्देश दिसत नाही. उलट सावध योध्यानें प्रतिस्पर्ध्यांविषयीं दाखवावा तेवढा आदरच तो पांडव सैन्याविषयीं दाखवतो. त्या सैन्यांतील भीमार्जुनांसम असलेल्या महायुधींबद्दल त्याच्या मनांत दबदबा असल्याचेंच दिसून येतें. पांडवांकडील अठरा रथीमहारथींचीं नांवें त्यानें द्रोणाचार्यांना तीन श्लोकांतून वर्णन करून सांगितलीं आहेत. या उलट स्वतःच्या सैन्यांतील वीराचें वर्णन एका श्लोकांतच अतिसंक्षेपानें संपवून दुसऱ्यांत इतर वीरांच्या युद्धकौशल्याचा व निष्ठेचा ओझरता उल्लेख केला आहे. याचा अर्थ त्याला कौरवांच्या शक्तीबद्दल कमी विश्वास वाटत होता असा नव्हे. कौरवांचें सैन्य मोठें व गुणवान असल्यामुळें त्यालाच जय मिळ-णार याबद्दल त्याला पूर्ण विश्वास होता. परंतु स्वतःच्या सामर्थ्याबद्दल योग्य तो विश्वास बाळगूनही शत्रूच्या बलाबलाबद्दलही तेवढेंच दक्ष असणें हा जो प्रवृत्त समाजांतील योध्याचा गुणविशेष तोच व्यासांच्या दुर्योधनांतहि होता. या एकोणीस श्लोकांतील दुर्योधनाची वागणूक खऱ्या सावध योध्याची वाटते. स्वतःच्या सामर्थ्याबद्दल भलत्याच कल्पना बाळगून ताठरलेला—प्रतिपक्षाला कःपदार्थ समजून तुच्छ लेखणारा, उद्दाम उद्धतमूर्ख योद्धा तर तो सुनगम वाटत नाहीं.

पांडवसेनेच्या गौरवपर वर्णनानें—आपल्या सैन्यांतील सैनिक निरुत्साही होऊं नये म्हणून दूर्योधनानें आपल्या सैनिकांना उद्देशून, "पितामह भीष्मासारख्या प्रतापी सेनापतीच्या आधिपत्याखालीं असलेलें कौरवाचें सैन्य अपरिमित मोठें असून भीमाच्या संरक्षणाखालीं असलेलें पांडव सैन्य धाकटें असल्याचें सांगितले व सर्वांनीं नेमून दिल्याप्रमाणें सैन्याच्या निरनिराळ्या प्रवेशद्वारांत धीटपणें उभें राहून भीष्माचें सर्व बाजूंनीं रक्षण करावें असा उत्साही आदेश दिला. दुर्योधनाच्या या उत्साही धीर देणाऱ्या भाषणानें सैनिक व सेनापति भीष्म याना मनस्वी आनंद झाला व त्या उत्साहाच्या भरांत भीष्मांनीं प्रचंड सिंहनाद करून आपला प्रतापी शंख मोठ्या जोरानें आस्फुरला.

कोणतीहि आनंददायी घटना घडली असतां हर्षभरानें नाचून अथवा मोठ्यानें सिंहगर्जना ठोकून आपला आनंद जाहीर करणें हा भारती वीरांचा एक गुणविशेष असल्याचें दिसून येतें. वस्तुतः भावविवशता हा प्रवृत्त समाजांतील व्यक्तींचाच गुणविशेष असतो. मनांतील प्रांजळ भावनांना निःसंकोचपणें प्रकट करणें—सुखदुःखांच्या प्रतिक्रिया मन मोक-ळून मांडणें—हा त्या समाजांतील व्यक्तींचा आचारधर्मच असतो. सुखाच्या भावनेनें उचंबळून आनंदातिशयानें उंच आरोळ्या ठोकणारे भारती वीर; दुःखानें होरपळल्यावर शोकही तेवढ्याच निःसंकोच व जाहीरपणें कर-तांना दिसतात. उघडपणें अश्रु ढाळणें अथवा प्रत्यक्ष समरभूमीवर घाबर-ल्याची प्रामाणिक कबुली तेथल्या तेथें देणें यांत त्यांना कोणत्याही तऱ्हेचा कमीपणा वाटत नाही. दुर्योधनाच्या दिलासा देणाऱ्या भाष-णानें खूष होऊन सिंहनाद व शंखनाद करणारे पितामह भिष्म व दोन्ही सैन्यांचें निरीक्षण केल्यानंतर ऐन युद्धाच्यावेळीं "सीदंति मम गात्राणि..." अशी प्रांजळ कबुली देणारा धनंजय अर्जुन यांच्या वागणु-कीवरूनही हेंच दिसून येतें. मनांतील भावनांचें असें जाहीर प्रदर्शन करणें म्हणजे मनोदौर्बल्याचा एक प्रकार असें आज समजण्यांत येतें. मनावर ताबा नसल्याचें तें असंस्कृत लक्षण मानण्यांत येतें. उलट प्रवृत्त भारती समाजांतील व्यक्तींच्या दृष्टीनें तसें आचरण म्हणजे त्यांचा प्रांजळ

आचारधर्म होता. मनांत एक व चेहऱ्यावर एक असें त्यांचें वागणें आंतबाहेर नसे. आनंद झाला कीं एकमेकास टाळी देणें, वस्त्रें उडविणें; दुःख झालें तर रडणें, संतापनें शपथा घेणें इत्यादि प्रकारांचीं अनेक वर्णनें भारतांत आढळतात. स्वतंत्र व सुदृढ लोकांनीं आपले मनोभाव निर्भय व निर्भीडपणें व्यक्त केल्याचीं तीं उदाहरणें आहेत.

प्रचंड मोठ्या आवाजांत आरोळी ठोकतां येण्याची शक्ति व आवाज जवळ असणें हा भारतीय योध्याचा खास गुणविशेष समजण्यांत येई. कोणत्याही प्रचंड निनादाचे भारतीय योध्यांना एक आगळें आकर्षण दिसतें. नाद म्हणजे ईर्षा, उत्साह, जिवंतपणाची साक्ष असा त्यांचा भाव दिसतो. उंच आवाजांत ठोकलेली आरोळी म्हणजे मानवी कर्तृत्वाला जागवणारी बांग वाटे. आकाशाचें अफाट_अंतराळ निनादून सोडणारा सिंहनाद अथवा शंखनाद—म्हणजे आक्रमक विजिगीषु ईर्षेनें उंचावलेला उत्तुंग ध्वज वाटे. मेघांच्या गर्जनेशीं पैजा घेणाऱ्या या तुंग नादध्वजेच्या श्राव्य दर्शनानें साऱ्यांनांच ईर्षेचें अवसान चढे. युद्धसमयीं प्रचंड आरोळ्या ठोकून एकमेकांना संबोधणें, सिंहगर्जना करून शत्रूला प्रत्युत्तर देणें, प्रतापी शंख आवेषानें आस्फुरणें; निरनिराळीं रणवाद्यें एकसमयावच्छेदें वाजवून सर्व वातावरण-नादनिनादांनीं दणाणून सोडणें इत्यादि गोष्टींचीं भारतांत प्रत्यहीं येणारीं वर्णनें, योध्यांच्या या आक्रमक ईर्षेचीच साक्ष देतात. याच ईर्षेचें काव्यांत 'रूप' करणाऱ्या व्यासांनाहि नादाचें खास आकर्षण असल्याचें दिसून येतें. कोणात्याहि वस्तुनिष्ठ जाणिवेचें नादांत रूप केल्याखेरीज त्यांना चैन पडत नाहीं. आपल्या अनुयायी राजांसह व्यूह रचून युद्धास उभे राहिलेल्या दुर्योधनास पाहून युद्धोत्सुक पांचालांना झालेला आनंद व्यासांनीं—"दध्मुः प्रीता महाशंखान् भेर्यश्च मधुर रचन" अशा हृद्य नादप्रतिमांनीं वर्णन केला आहे. पहिल्या एकोणीस श्लोकांत व्यासांनीं निरनिराळ्या ध्वनींच्या वर्णनानें भारती ईर्षेचें नादरूपच ध्वनित केलें आहे, कौरव-पांडवांच्या युयुत्सु सेनासागरास वीरश्रीच्या अवसानाचें उधान आणणारें तुमुल नाददर्शन घडविलें आहे.

सैनिकांना युद्धाचें अवसान चढविण्याचें हें नादयंत्र भारती युद्धांतील दोन्हीहि पक्षांकडे कमीअधिक फरकानें सारखेंच प्रभावी असल्याचें व्यासांनीं दाखविलें आहे. त्यावरून आपआपल्या पक्षांतील सैनिकांना धीर देऊन त्यांच्यांत प्रत्यक्ष युद्धास प्रवृत्त करणारें अवसान निर्माण करणें हाच या नादतंत्राचा भारती युद्धशास्त्रांतील मूळ उद्देश दिसतो. या तुमुल कोलाहलाची प्रतिक्रिया उभय पक्षांतील सैनिकांवर होऊन अनेक योध्यांना त्यापासून जशी ईर्षा चढत असेल त्याचप्रमाणें कांहींचीं हृदयें, तो नाद ऐकून कंपायमान सुद्धां होत असतील, अथवा कांही गलितधैर्यही होत असतील. कोणतीही सेना कितीही उच्च श्रेणीची असली तरी तिच्यांतील सारेच सैनिक एकाच धीराचे असतात असें समजणें गैर आहे. अठरा अक्षौहिणीच्या शिपाईगर्दीत कच्च्या धीराचे कांहीं रडत राऊत असतीलहि व रणवाद्यांच्या भयंकर नादानें ते घाबरले असतील याचेंही नवल वाटण्याचें कारण नाहीं.

परंतु या कांहीं भ्याड सैनिकांच्या उदाहरणांवरून रणवाद्यांचा कोलाहल हा शत्रुपक्षांतील सैनिकांना केवळ घाबरविण्याच्या उद्देशानेंच करण्यांत येत होता, असें मानणें मात्र चुकीचें ठरेल. निदान भारती युद्धांत तरी वस्तुस्थिति तशी नव्हती असें स्पष्ट दिसतें. कुरुक्षेत्रावर जमलेल्या योध्यांचें वर्णन कवीनें भारतांतच इतरत्र "युद्धकांक्षिणः, युद्धनंदिनः, युद्धशालिनः" असें प्रत्यहीं केलें आहे. रणवाद्यांच्या तुमुल ध्वनीनें केवळ शत्रुपक्षाला गलितधैर्य करून त्याला युद्धभूमीवरून पळवयास लावणें या अक्षत्रिय, भेंकड कल्पनेपेक्षा स्वतःच्या सैन्यांतील युयुत्सु योध्यांना शत्रुपक्षावर कडाडून तुटून पडण्याचें स्फुरण चढविणें हाच भारती युद्धांत वाद्ययंत्रांनीं निर्माण करण्यांत येणाऱ्या गजरामागील एकमेव हेतु दिसतो. स्वतः कवीला सुद्धां हाच हेतु अभिप्रेत होता यांत संशय दिसत नाही. या एकोणीस श्लोकांत व्यासांनीं चित्रित केलेला वीर रसाचा परिपोष पाहिला कीं या विधानाची सत्यता पटते. योध्यांना लढाईचें अवसान चढून त्यांनीं प्रत्यक्ष युद्धास तोंड फोडावें अशा वीररसाच्या चढत्या श्रेणींतच या एकोणीस श्लोकांतील सारें वर्णन त्यांनीं केलें आहे. पुढें विसाव्या श्लोकांत तर युद्धाच्या ईर्षेचा कैफ चढलेले, प्रतिपक्षावर प्रत्यक्ष आघात करण्यास उतावीळ झालेले सैनिक पाहून अर्जुनानेंही आपलें धनुष्य ईर्षेनें उचललें असें स्पष्ट वर्णन कवीनें केलें आहे. प्रवृत्त समाजांतील कवि हा नेहमींच वार खाणाऱ्या वीरापेक्षा वार करणाऱ्या वीराच्या बाजूचा असतो, त्याच्या ईर्षेचे, त्याच्या सामर्थ्याचे, त्याच्या पराक्रमाचे पोवाडे आत्मीयतेनें गाणें हाच त्याचा ध्यास असतो. विजिगीषु वीराचें आवेशी आक्रमण हाच त्याचा काव्यविषय होतो व प्रभावी आक्रमणाखालीं विरोधी शत्रुत्वाचा होणारा निःपात हाच त्याचा आनंद असतो. व्यासांच्या ह्या ध्वनिवर्णनांतील मूळभाव युद्धास प्रवृत्त करणाऱ्या ईर्षेचा आहे; शत्रूवर कडाडून तुटून पडणाऱ्या योध्याच्या आक्रमक अवसानाचा आहे; रणवाद्यांचा प्रचंड नाद ऐकून गलितधैर्य होणाऱ्या भेकडांचें वर्णन करण्याचा नाहीं हें येथें लक्षांत ठेवायला हवें.

प्रवृत्त भारती जीवनांतील ईर्षेचा येथें पुन्हा प्रत्यय येतो. या प्रवृत्त जीवनाचें शब्दांत 'रूप' करणाऱ्या कवीनेंही आपल्या काव्यकृतींत या ईर्षेबद्दलच अधिक आत्मीयता दाखवावी हें तत्कालीन भारती समाजांतील जाणिवां-निष्ठांना धरूनच आहे.

कौरवपांडवांना युद्धांत मदत करण्यासाठीं अनेक राजे आले होते असें दुर्योधनाच्या व संजयाच्या—या एकोणीस श्लोकांतील वर्णनावरून—दिसतें. त्यापैकीं कांहींचीं नांवेंही देण्यांत आलीं आहेत. कांहींचा पृथ्वीपति म्हणून उल्लेख करण्यांत आला आहे. दुर्योधन व त्याच्या मदतीस आलेले हे राजे यांचे संबंध कोणत्या प्रकारचे होते—सम्राट मांडलिकांच्या नात्यानें-स्वामिसेवकाचे होते कीं बरोबरीच्या राजांप्रमाणें मित्रत्वाचे होते? भारती काळांतील राजांचें स्वरूप कसें होतें याविषयीं तज्ज्ञ काय म्हणतात हें पहाणें इष्ट आहे. भारताचार्य वैद्यांनीं महाभारताच्या उपसंहारांत पुढील माहिती दिली आहे. "भारती काळाच्या प्रारंभी असलेल्या हिंदुस्थानची राजकीय परिस्थिति जर आपण बारकाईनें निरीक्षण केली तर आपल्याला असें दिसून येईल कीं हिंदुस्थानांत ग्रीक देशाप्रमाणें लहान लहान टापूंत वसलेलीं स्वातंत्र्यप्रियू लोकांचीं शेंकडों राज्यें त्यावेळीं नांदत होतीं. या राजांचीं नांवें देशावरून नसत तर त्याच्या लोकांवरून किंवा एखाद्या विशिष्ट राज्यावरून पडलेलीं असत. ...हिंदुस्थानांत राजा, लोक व देश यांचें नांव एकच असे. हीं राज्यें फार लहान लहान असत—हिंदुस्थानांत महाभारतकाळीं सुद्धां देशांच्या यादींत २१२ लोक वर्णिलेले आहेत. हे सर्व लोक एक वंशाचे, व एकाच धर्मांचे व एकच भाषा बोलणारे होते —या निरनिराळ्या राज्यांतील लोकांचा एकमेकांशी विवाहसंबंध होत असे. परंतु राजकीय संबंधांत ते सर्व स्वतंत्र होते. आणि—ग्रीक लोकांप्रमाणेंच त्यांचीं आपआपसांत युद्धें होत असत. पण येथें एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं, त्यानीं एकमेकांचा नायनाट करण्याचा कधींहि प्रयत्न केला नाही. एका लोकांनीं दुसऱ्या लोकांस जिंकलें तरी ते दुसऱ्या लोकांस स्वातंत्र्यापासून कधींच च्युत

करीत नसत. अशा प्रकारची परिस्थिति भारती काळापासून चालली होती. युधिष्ठिरानें किंवा दुर्योधनानें दिग्विजय केले त्यांत कोणतींही राज्यें खालसा केलीं गेलीं नाहींत. फक्त जिंकलेल्या राजांनीं त्यांचें साम्राज्य कबूल केलें व त्यांस यज्ञप्रसंगीं नजराणे दिले. यावरून भारती काळांतील लोक किती स्वातंत्र्यप्रिय होते याची कल्पना करतां येईल. यावरून ब्राह्मण काळापासून महाभारत काळापर्यंत लोकांचीं तींच नावें आढळतात याचें आपणांस आश्चर्य वाटणार नाहीं. काशी, कोसल, विदेह, शूरसेन, कुरु, पांचाळ, मत्स्य, मद्र, केकय, गांधार, वृष्णि, भोजल, मालव, क्षुद्रक, सिंधु, सौवीर, कांबोज, त्रिगर्त, आनर्त वगैरे नांवें ब्राह्मणांत व महाभारतांत आढळतात. अर्थात् शेंकडो वर्षांच्या घडामोडींत हीं राज्यें जशींच्या तशींच कायम होतीं व त्या लोकांनीं आपलें स्वातंत्र्य कायम ठेवलें होतें." श्रीमहाभारत उपसंहार—राजकीय परिस्थिति.

एकोणीस श्लोकांच्या थोड्या अवधींत दुर्योधनानें केलेले राजांचे उल्लेख ओझरते आहेत. त्यामुळे त्यांच्या एकंदर स्वरूपांविषयीं बांधलेल्या अंदाजाच्या खरेखोटेपणाकरितां भारताच्या इतर भागांचें निरीक्षण करणें आवश्यक ठरतें. परंतु हें निरीक्षण केल्यानंतर मात्र या थोडक्या भागांत आलेल्या अस्पष्ट उल्लेखावरून तत्कालीन राजे लोकांच्या भूमिकेविषयीं बांधलेला अंदाज बहुतांशीं बरोबर असल्याचा पडताळा येतो. कौरवांच्या मदतीस आलेले राजे हे दुर्योधनाच्या मानानें लहान असले तरी स्वतंत्र होते—त्याचे मांडलिक नव्हते. दुर्योधनाचें सम्राटपद त्यांनी कबूल केलें असलें—अथवा त्यास यज्ञप्रसंगीं योग्य ते नजराणे दिले असले तरी त्यांचें स्वातंत्र्य नष्ट झालें नव्हतें—दुर्योधनाचे व त्यांचे संबंध सार्वभौम सम्राट व लाचार मांडलिक असे नव्हते तर स्वतंत्र राजांच्या मैत्रिकीचे होते. नाना तऱ्हेचीं शस्त्रें पेलण्यांत पारंगत व नाना तऱ्हेच्या युद्धांत विशारद असलेले हे राजे वृत्तीनें व सत्तेनें स्वतंत्र होते. दुर्योधनाशीं ते कोणत्याहि करारानें बांधले अथवा राजकीय दडपणानें मिंधे झाले नव्हते. दुर्योधनाचे व त्यांचे संबंध राजकीय असण्यापेक्षां मैत्रिकीचे अधिक होते. दुर्योधनासाठीं मोठ्या आनंदानें ब्रह्मलोकाची दिक्षा घेतलेले, दुर्योधनाला सर्वस्वी अनुकूल असे ते होते. मित्र म्हणून दुर्योधनाच्या बाजूनें ते लढावयास आले होते; व मैत्रिकीच्या भावनेसाठीं आपलें शौर्य, आपलें कौशल्य प्राणासकट पणास लावून ते लढाईस सिद्ध झाले होते. दुर्योधनाची बाजू अधर्माची आहे हें माहीत असूनहि केवळ मित्राच्या जिद्दीकरितां, त्याला युद्धांत यश यावें म्हणून जिद्दीनेंच लढणार होते. या बाबतींत शल्याचें उदाहरण विशेष लक्षांत घेण्यासारखें आहे. शल्य हा माद्रीचा भाऊ, म्हणजे पांडवांचा मामा. परंतु कौरवांचीच बाजू त्याला न्याय वाटल्यामुळें तो पांडवांच्या बाजूनें न लढतां दुर्योधनाच्या बाजूनें पांडवांविरुद्ध लढत होता. दुर्योधनाच्या वतीनें लढणाऱ्या राजांच्या या स्वतंत्र वृत्तीचा प्रत्यय भारतांत इतरत्रहि मिळतो. ही त्यांची स्वतंत्र वृत्ति लक्षांत घेतली तरच त्यांच्या वागणुकीचा उलगडा होऊं शकतो. दुर्योधनाचें व त्याचें नातें स्वामिसेवकाचें नव्हे तर मित्रत्वाचें होतें, स्वामीसाठीं बलीदान करणाऱ्या स्वामिभक्त सेवाधर्माचें नव्हतें तर जिवाला जीव देणाऱ्या मैत्रिकीच्या जिव्हाळ्याचें होतें. या एकोणीस श्लोकांत या राजांचें वर्णन दुर्योधन—"मदर्थे त्यक्तजीविताः" अशा शब्दांत करतो, आणि या ओझरत्या उल्लेखांतही दुर्योधनाला आपल्या मित्राबद्दल वाटत असलेला जिव्हाळा व अभिमान यांचें प्रतिबिंब पडलें असल्याचें जाणवतें. गीतेवरील मराठी भाष्य "भावार्थदीपिका" यांतील विवेचनाच्या दृष्टीनें ही गोष्ट ध्यानांत ठेवणें महत्त्वाचें आहे म्हणूनच या

अनुक्रमणिका

ओझरत्या उल्लेखाबद्दलहि थोड्याशा विस्तारानें लिहावें लागलें.

इतक्या अनेकविध गोष्टी सूचित करूनहि सैन्यसमूहाच्या वर्णनांतील एकसूत्रीपणाला कोठेहि बाध आलेला नाही असें आपणांस आढळून येतें. पहिल्या श्लोकापासून तों एकोणीस श्लोकांपर्यंत कथनाचा, प्रमाणबद्ध सुसंगत, औत्सुक्यवर्धक व एकजिनसी आलेख, दर श्लोकागणिक सहज चढत जातांना दिसतो. यांतच कवीच्या प्रभावी प्रज्ञेचें कर्तृत्व प्रत्ययास येतें. भारतकार व्यास हे श्रेष्ठ कवि आहेत आणि महान् तत्वज्ञही आहेत, परंतु ते एक श्रेष्ठ कथाकारही कसे आहेत याचें प्रत्यंतर या पहिल्या अध्यायाच्या पहिल्या एकोणीस श्लोकांतही येतें.

गीतेच्या पहिल्या अध्यायांतील पहिल्या एकोणीस श्लोकांच्या आविष्काराचें पोत तपासून त्यांत प्रतीत होणारें भारती जीवनाचें प्रतिबिंब पाहिलें. ह्या आविष्काराच्या माध्यमाच्या यंत्रणेचें उत्क्रांत स्वरूप निसर्गरूप चित्रणावस्थेचें आहे; व निसर्गरूप चित्रणावस्थेशीं समकालीन असलेल्या समाजांतील जीवनविषयक जाणिवा व निष्ठांप्रमाणेंच भारतकालीन समाजाच्या जाणिवा निष्ठाही कशा 'प्रवृत्तच' आहेत हेंही त्यावरून कळून आलें. आतां त्या भागावरील मराठींतील प्रसिद्ध गीताभाष्याचें पोत तपासून मराठीच्या या प्रसिद्ध आविष्कारांत प्रतिबिंबित झालेल्या झालेल्या यादव कालीन जीवननिष्ठेचे मराठी 'रूप' पाहून त्याची ओळख करून घ्यावयाची आहे.

मराठी आविष्काराचें पोत तपासण्यापूर्वीं त्याच्या माध्यमाचें यादवकालीन रूप नुसतें दुरून पाहिलें तरी त्याच्या प्रगल्भ तांत्रिक विकासाची, त्याच्या आविष्कारक्षमतेच्या वैविध्याची व विस्ताराची कल्पना येते. एखाद्या मत्त मोराच्या पसरलेल्या ऐटदार पिसाऱ्याची आठवण व्हावी एवढें या माध्यमाचें रूप सर्व दृष्टींनीं देखणें, चित्रविचित्र, व नजरबंद दिसतें. माध्यम यंत्रणेच्या उत्क्रांतीच्या दृष्टीनें विचार केल्यास यादवकालीन आविष्कारांची माध्यम यंत्रणा उत्क्रांतीच्या पूर्ण सांकेतिक अवस्थेंत आहे असें दिसून येईल. संकेतावस्थेंतील सारीं यंत्रणेचीं लक्षणें यादवकालीन आविष्कार यंत्रणेंतही स्पष्टपणें आढळून येतात. तीं शोधण्यापूर्वी प्रथम लेखांत वर्णन केलेल्या यंत्रणेच्या सांकेतिक अवस्थेंतील लक्षणांचा पुन्हा आढावा घेणें आवश्यक आहे.

आदर्श चित्रण करणारी यंत्रणा स्वतःच्या तांत्रिक प्रक्रियेनेंच संकेत निर्माण करते व त्यांची परिणति सर्व चित्रणच संकेतमय करण्यांत होऊन; आविष्कार यंत्रणेला संकेतावस्थेचें स्वरूप प्राप्त होतें. या अवस्थेपर्यंत आविष्कार यंत्रणेचीं सारीं अंगें तंत्रदृष्ट्या प्रगत व प्रगल्भ झालेलीं असतात. रेषा, रंग व आकार–अवकाशांनीं सूचित होणाऱ्या प्रतिमांचें स्वरूप व कार्य निश्चित व तंत्रबद्ध झालेलें असतें. आविष्काराच्या तांत्रिक प्रगतीची परिणती यंत्रणेच्या प्रत्येक अंगाचें विशिष्ट तंत्र बनविण्यांत झालेली असते. यंत्रणेचें एकंदर स्वरूपच 'केवळ तांत्रिक' बनलेलें आढळतें. कोणत्याही यंत्रणेचें स्वरूप हें स्थितिसापेक्ष असते व तिची प्रगतीहि सामाजिक जाणिवांच्या संवादित्वांतूनच होत असते, हें आपण पूर्वींच पडताळून पाहिलें आहे. या न्यायानें सांकेतिक अवस्थेशी सापेक्ष असलेल्या काळांतील सामाजिक जाणिवांचें स्वरूपहि सांकेतिकच बनलेले असावे हें क्रमप्राप्तच आहे.

जीवनांतील निसर्गनिष्ठ मूळ प्रेरणांचा व कलात्मक जाणिवांचा गेल्या (आदर्श आलेखन अवस्था) अवस्थेंत सुटूं लागलेला संबंध संकेतावस्थेंत पूर्ण सुटल्याचें दिसून येतें. जीवननिष्ठ जाणिवांची जागा कल्पित आदर्शाच्या जाणिवांनीं घेतली होती, त्या कल्पित आदर्शाच्या जाणिवाही

### काहीं अवशिष्ट राग



आज पहाटे अवचित कोणि जो आला अमुच्या वरीं
वाडबिस्तरा घेउनि तांड्या कुटुंब पोरें चारी
आमंत्रण ना जरुर तयाला वार्षिक त्याची फेरी
जाइल कधिं तो नको उपद्रव ! प्रभुची इच्छा खरी
ब्लेडवस्तरा साबणपंचा लेंगाशर्टहि माझा
तेलफणी आंकडे पोलकें पातळ – सर्वहि साजा
निश्शंकपणें वापरती तीं – पोरें करिती वाजा
येई राग – '**खट**'
नको नको हा – अनाहुतांचा राजा !



या संकेतावस्थेंत नाहीशा होऊन त्यांची जागा—मूळ निसर्गनिष्ठ जाणिवांपासून वेगळ्या—येवढेंच नव्हे तर निसर्गनिष्ठ जाणिवांहून नेमक्या विरुद्ध अशा संकेतनिष्ठ जाणिवांनीं घेतली असल्याचें आढळून येतें. या संकेतनिष्ठ जाणिवांपासूनच प्रेरणा मिळाली असल्यामुळें या अवस्थेंतील कलात्मक आविष्काराचें रूपही केवळ तांत्रिक, संकेतमय होणें क्रमप्राप्तच होतें. किंबहुना या सांकेतिक निष्ठांचा तंतोतंत सांकेतिक तंत्रनिष्ठ आविष्कार करण्यास अविष्कार यंत्रणेचें तंत्रहि तेवढेंच तंत्रसिद्ध, केवळ तांत्रिक बनलेले आढळून येते.

कलात्मक जाणिवांचें स्वरूप पूर्वीच्या अवस्थांतून जेवढें निसर्गनिष्ठ अथवा निसर्गाजवळ आढळून येतें तेवढें तें या संकेतावस्थेंत असल्याचें दिसत नाहीं; येवढेंच नव्हे तर निसर्गापासून तें वेगळें व निराळें असल्याचें दिसून येतें. गेल्या अवस्थेंत कल्पित आदर्शाची जाणीव प्रथम निर्माण झाली तेव्हांच मूळ निसर्गनिष्ठेचे आविष्काराशीं असलेले संबंध सैल झाले होते. हळूहळू सुटूं लागले होते. संकेतावस्थेपर्यंत ते संपूर्ण सुटलेले दिसून येतात आणि यापुढें ते एवढे सुटतात कीं, निसर्गापासून वेगळ्या असलेल्या या अवस्थेंतील कलात्मक जाणिवा निसर्गापासून नेमक्या विरुद्ध दिशेनें जात आहेत असें दिसून येते.

आविष्कार यंत्रणेच्या प्रथमावस्थेपासून संकेतावस्थेपर्यंत मूळ जाणिवांच्या स्वरूपाचा विचार केल्यास, त्याचें आविष्कारांतील महत्व उतरत्या भाजणीने कमी होत आहे असें दिसून येते; आणि यंत्रणेच्या प्रगतीच्या दृष्टीनें विचार केल्यास तिचें महत्व चढत्या श्रेणीनें वाढत आहे असें आढळून येतें. संकेतावस्थेंत तर तंत्राचें हें स्वरूप वाढत वाढत एवढें विराट रूप धारण केलें कीं, त्याच्या अवजड तांत्रिक भाराखालीं कलात्मक

आविष्काराची मूळ जाणीव पार चिरडून गेल्याचें आढळून येतें. किंबहुना या अवस्थेंत खऱ्या जीवननिष्ठ व कलात्मक जाणिवांचें स्वरूप आविष्कार-यंत्रणेच्या तांत्रिक जाणिवांच्या स्वरूपाच्या मानानें एवढें क्षुद्र मानण्यांत आल्याचें दिसून येतें कीं या अवस्थेंतील आविष्काराची प्रेरणा, जीवन-निष्ठ कलात्मक जाणिवापासून मिळण्याऐवजीं तंत्रनिष्ठ कसबी जाणिवाकडूनच मिळते. उत्क्रांतीच्या प्रक्रियेनें जन्मास घातलेला हा तंत्राचा भस्मासूर पुढें पुढें एवढें अजस्त्ररूप धारण करतो कीं जीवननिष्ठ जाणिवांच्या आज्ञेंत वागून त्यांना साकार करण्यापेक्षां त्यांच्या डोक्यावर हात ठेवून त्यांना भस्म करण्याचाच त्याचा प्रयत्न दिसून येतो.

प्रस्तुत विवेचनाकरितां निवडलेल्या मराठी भाष्यांत व त्याच अनुषंगानें यादवकालीन साहित्यांतही हें सारे गुण सर्वसाधारणपणें कसे दिसून येतात हें आतां पाहावयाचें आहे.

गीतेच्या पहिल्या अध्यायावर, भावार्थदीपिकेच्या पहिल्या अध्यायांत दोनशे चौऱ्याहत्तर ओव्यांचें भाष्य आहे. पैकी प्रस्तुत एकोणीस श्लोकांवरील भाष्य पंच्यैशीव्या ओवीपासून सुरू होऊन एकशें वासष्टाव्या ओवीवर संपतें. म्हणजे कौरवपांडवांच्या सेनासमूहाचें वर्णन एकोणऐंशी ओव्यांत पूर्ण झालें आहे.

ह्या एकोणऐंशी ओव्यांच्या पहिल्या वाचनांतच सदरहू भाष्याच्या आविष्कारयंत्रणेच्या सांकेतिक स्वरूपाची वाचकांना पूर्ण कल्पना येते. यादवकालीन चित्रशिल्पाहि इतर कलांच्या माध्यम यंत्रणेप्रमाणेंच, साहित्याची अविष्कारयंत्रणाही उत्तर यादवकाळीं तंत्र दृष्ट्या पूर्ण विकसित झाली होती. इतर कलांप्रमाणेच, तत्कालीन भाषेचें माध्यमही, विदग्ध, विस्तारी, शब्दस्पर्शरूपरसगंध ह्या पंचविध आभासांच्या नानाविध सूक्ष्म छटा आविष्कारित करणारे, चोखंदळ पंचेंद्रियांना—तृप्त करण्यास समर्थ एवढें—विशेषत्वानें तंत्रसिद्ध—झालेलें दिसतें. शब्दसंपत्तीनें तें कुबेरा-एवढें संपन्न आहे. आदि कवि मुकुंदरायाचे रोकडे आरुष बोल येथें नाहींत, अथवा महाकवि मुक्तेश्वरासारखी "एकेका शब्दाची भीक" ही कवीला कोणाजवळ मागावी लागत नाहीं. शब्दांचा निधि सागराप्रमाणें अथांग व अपार आहे. श्रवणाच्या अंगणांत अक्षरांच्या अक्षौहिणी उभ्या आहेत. अमृताला फिके पाडणारे, वीणेच्या स्वराहून गोड, वसंताचें माजिरें पिऊन मत्त झालेले, किंबहुना, प्रत्यक्ष ब्रह्मरसाचा स्वादु देणारे, अशा नानाविध अक्षरांचे रसाळ घोसे, कवितालतेच्या मंडपाला लोंबकळतांना दिसत आहेत. शब्दसृष्टीप्रमाणें प्रतिमासृष्टीही तेवढीच विस्तृत विविध, व समृद्ध दिसते. मूर्त-अमूर्त उपमाउत्प्रेक्षांची जडणघडण असलेले, शब्दार्थांचे नानाविध थाटघाटांचे अलंकार, काव्ययुवती शारदेचे 'कनकसोलिव' अंगप्रत्यंग भूषविण्या-करितां, सिद्ध आहेत. रसव्यवस्थाहि तेवढीच जय्यत तयारीची आहे. साहित्यपरागांनी उटलेल्या 'कथा-प्रबंधांच्या' काव्ययुवतींना विविध रसांनीं सुस्नात करण्याकरितां, "कमळ कळियांचे सेजारू, की मकरंदाचे माहेरू" अशा अनेक पुष्करिणी नवरसांनीं तुडुंब भरून ओसंडत आहेत. रसिकांच्या केवळ "दिठीवेयाचेनि वोले" काव्य उन्मेषांचे प्रसन्न मळे बहरून यावे येवढें कविमन विदग्ध आहे. "जयास जैशी भावना: तया तैसाचि भावो आणीत मना" अशा विश्वासानें अथवा "जो जें वांच्छील तो तें लाहो" असें इच्छिणाऱ्या औदार्यानें, "लळेयांचे लळे सरणारीं" अथवा "मनोरथांचे मनोरथ पूर्ण करणारीं" विदग्ध कवी व रसराजहंस श्रोते यांचीं यादवकालीन मराठी-माहेरें श्रीमंत आहेत.

यादवकालीन आविष्कार यंत्रणेचें, विविध अंगोपांगांनीं सिद्ध झालेलें हें—"आपुलेनि प्रसन्नपणें : दृष्टीसि मांडिती धरणें" असें मायावी रूप पाहूनच तत्कालीन कवि विचारतो, "कविता वशीकरण : कवणासि नव्हे ?". "मुग्धावयसा, महुरैली, मोटकी" अशी ही "वेल्हाळ, देशी" काव्यसुंदरी पाहून कोणता नागर सुहृद् तिच्याकडे आकर्षिला जाणार नाहीं ? ती वेधवंती सहज बोलूं लागली तरी—'ऐका' म्हणून "श्रोतेया विनति : सुआवी (करावी) न लगे." श्री ज्ञानदेव, केशव-राजसूरी आदि तत्कालीन ज्ञानी व निवृत्त कवीहि या रूपानें जेथें आकृष्ट होतात व "जाणिवेचेनि रसे सुरंगे : शृंगारु शांति क्षमेचि योगे। जळकेळी खेळवीन ज्ञानगंगे : मनें महंतांचीं ॥" अथवा "चातुर्याचेनि सौरसें : छेदिन महामूर्खांचें पिसें। कवितालते लावीन घोसे :^ सारस्वत फळांचे।" किंवा, "दाउ वेल्हाळ देशी नवी : जें साहित्यातें वोजावी। अमृतातें चुकी ठेवी : गोडसपणें॥"—अशा आवेशांत बोलूं लागतात; तेथें रसरंगांचे पहाळ उघडणारे भास्करभट्ट नरींद्रादि रसिक कवी—या मोहिनी रूपाची मदिरा पिऊन, काव्यवाटिकेंत धुंद धुमाडी करतांना दिसल्यास नवल नाहीं. कवि नरींद्रच सांगतो—"कुमारी, तापसा, दिक्षिणी : वेधें भुललिया चक्रपाणी। तेथ पाठीं धावती गौळणी : हें काय बोलो ?" आविष्कारांतील जीवनविषयक जाणिवेपेक्षां अविष्कारयंत्रणेच्या तांत्रिक जाणिवांचें आकर्षण किती प्रभावी होतें हेंच वरील उद्‍गारांवरून दिसून येतें. यादवकालीन आविष्काराची यंत्रणा पाहून एखाद्या मत्त मोराच्या पिसाऱ्याची आठवण होते ती यामुळेंच.

पंखापेक्षां पिसाऱ्याचा प्रभाव वाढणें, जाणिवेपेक्षां तंत्राची मातब्बरी वरचढ ठरणें हीं, यादवकालीन आविष्कारयंत्रणेच्या प्रगत सांकेतिक स्थितीची लक्षणें आहेत. जीवनांतील निसर्गनिष्ठ प्रेरणांचा व कलात्मक जाणिवांचा जिव्हाळ्याचा संबंध संकेतावस्थेंत पूर्णपणें सुटल्यामुळे निसर्ग निष्ठ जाणिवांचीं जागा संकेतनिष्ठ जाणिवांनीं घेतली जाते. तंत्रानें निर्माण केलेल्या संकेतनिष्ठ जाणिवा, निसर्गनिष्ठ जाणिवांपासून नुसत्या वेगळयाच नव्हे तर, अधिकाधिक नेमक्या विरुद्ध प्रकृतीच्या होत असल्याचें दिसून येतें. उत्तर यादवकालीन संकेतावस्थेंत खऱ्या जीवननिष्ठ जाणिवांचे स्वरूप एवढें क्षुद्र झालेलें आढळतें कीं, या अवस्थेंतील आविष्कारांची मूळ प्रेरणा, जीवननिष्ठ कलात्मक जाणिवांपासून मिळण्या ऐवजीं तंत्रनिष्ठ कसबी जाणिवांकडूनच मिळत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. आणि म्हणूनच या काळीं "साऱ्या अक्षरांची गोसाविण" जी शारदा ती संकेताच्या मोहिनीरूपाचा साजशृंगार चढवून, तंत्राच्या मोरावर स्वार झालेली दिसते; आणि तिचें वाहन झालेला मोर, कलहंसाच्या झेंपीनें अंतराळांत उड्डाण करावयाचें विसरलेला हा नाममात्र पक्षी—पंखाच्या सामर्थ्याऐवजी पिसाऱ्याची ऐट मिरवीतच नाचतांना दिसतो.

प्रस्तुत मराठी गीताभाष्याच्या ह्या थोड्या भागांत सुद्धां संकेतांचा वर्षाव पडला आहे "महाप्रळय, कृतांतमुख, काल्कूट, वडवानल, प्रलयवात, रिपुगजपंचानन, त्रैलोक्य, मेरुमांदार, कैलास आदि अनेक संकेत ह्या थोड्या भागांतही आलेले आहेत. तत्कालीन वाङ्मयांत इतरत्रही, चंद्रसूर्य नक्षत्रें अमृत वसंत-कोकिळादीपपतंग–पुष्प भ्रमर आकाश आदि अनेक संकेतांचा सडा पडलेला दिसतो. हे सारे संकेत प्राचीन संस्कृत संकेत आहेत; व उत्तर यादवकालीन मराठी वाङ्मयांत यांची गर्दी फार मोठी आहे. यादवकालीन साऱ्याच कवींनीं हे सारे संकेत—पुन्हांपुन्हां—अगदीं वीट येईपर्यंत त्याच त्या स्वरूपांत वापरले आहेत. वास्तविक पहातां यादव काळापूर्वींच—दहाव्या-अकराव्या शतकांत—हे संस्कृत संकेत निःसत्व झाले होते.






## घाव

**मधुकर केचे**

योगायोगानेंच फक्त
रडलो मी संतांसवें
अशीं चुलत आसवें वरपांगी.

खऱ्या आगीनें मेरिला
कण्हण्याचें समाधान
येथें भरूनहि मन रितें माझें.

ओल्या डोळ्यांस साजेसा
घाल एकतरी घाव
वाहो माझाहि गौरव फुटतांना.

प्रस्तुत विवेचनाच्या पारिभाषिक शब्दांत सांगावयाचें झाल्यास, हे संकेत संस्कृत भाषेच्या आविष्कारयंत्रणेच्या सांकेतिक अवस्थेंतील 'अवशेष' होत. पुढें विलगीकरणावस्थेंत त्यांचा सांकेतिक विशेषहि नाहींसा होऊन निःसत्व निर्जीव सांवल्या म्हणूनच ते संस्कृत वाङ्मयांत शिल्लक राहिले. उत्तर यादवकालीन साहित्याच्या सांकेतिक आविष्कारांत—ह्या निःसत्व निर्जीव सावल्यांचीं भुतेंच प्राचीन संकेतांच्या नांवाखालीं पुन्हा मोठ्या प्रमाणावर जागवण्यांत येऊन; या सावल्यांच्या चेष्टितांनींच आविष्कारांतील अद्‌भुताचा परिपोष करण्यांत आल्याचें दिसून येतें. या सनातन संस्कृत संकेतांचा सडा बाजूला सारला तरी उत्तर यादवकाळीं मराठींतील अनेक 'देशी' जिनसांनाही सांकेतिक स्वरूप देण्यांत आल्याचें आढळतें. उदाहरणादाखल, उत्तर यादवकालीन साहित्यांत प्रत्यहीं आढळून येणाऱ्या तत्कालीन कवींच्या मराठी भाषेवरील प्रेमाची व कवित्व शक्तीची साक्ष काढूं.

बोलावयाचें खूप पण करावयाचें नाही तें—राजकरण; आणि करावयाचें खूप पण अवाक्षरानेही बोलावयाचें नाही तें प्रेम,—अशा अर्थाची एक चिनी म्हण वाचल्याचें आठवतें. खरें प्रेम हृदयांत मुग्धतेनें रहातें, ओठावर येऊन बडबड करीत नाही. या न्यायाने विचार केल्यास यादव कालीन कवींचें 'मराठी' प्रेम व काव्य कर्तृत्व' आज वाचाळ वाटते. उत्तर यादवकालीन कवीपूर्वी शंभर वर्षें, मराठींतील आदिकवि मुकुंदराय यांनीही मराठींतच मोठ्या आत्मविश्वासानें ग्रंथरचना केली आहे. आपले मराठी बोल आरुष आहेत, परंतु रोकडें ब्रह्मज्ञान सांगणारे आहेत असें ते स्पष्ट सांगतात. वेदशास्त्राचा मथितार्थ मराठी भाषेच्या द्वारां प्राप्त झाला हें सांगण्यांत त्यांचा कोणताहि अभिनिवेश दिसून येत नाही. आद्य ग्रंथकार या नात्यानें त्यांनीं तसा अभिनिवेश दाखविला असता तर तो मान्यहि झाला असता. परंतु मुकुंदरायांनंतर शंभर वर्षांच्या कालखंडांत मराठी भाषा सर्व दृष्टींनीं समृद्ध व समर्थ झाल्यानंतरहि उत्तर यादवकालीन कवींनीं केलेल्या मराठी ग्रंथकर्तृत्वाच्या गर्जना मात्र अकारण आवेशी वाटतात. वास्तविक पहाता उत्तर यादवकालीन कवींनीं रचलेल्या मराठी ग्रंथांची गोडी येवढी संशयातीत होती—त्यांनीं मराठी भाषेला दिलेलीं लेणीं एवढीं लोकप्रिय होतीं—कीं त्यांवरून मराठीच्या व त्यांच्या कर्तृत्वाबद्दल कोणालाहि शंका घेण्याचें धाडस होणार नाहीं. परंतु वस्तुस्थिति मात्र उलट आहे. मुकुंदराय याची रचना उत्तरयादवकालीन कवींच्या मानानें प्राचीन व साहित्यगुणांत साधी असूनही—स्वतःच्या मराठीपणाबद्दल अथवा कर्तृत्वाबद्दल अबोल आहे; या उलट उत्तर यादवकालीन रचना साहित्यगुणांनीं पुरेपूर नटलेली प्रौढ प्रगल्भ दिसत असूनही—स्वतःच्या मराठी जातकुळीबद्दल व स्वतःच्या देखणेपणाबद्दल वाचाळ आहे; वल्गनेचा वास यावा एवढी वाचाळ आहे.

> "पुन वाचा रसाळा : गर्वे सांडीन कोकिळा
> कलहंसा आवकळा : करीन मी—"

अथवा

> "जिये भाषेचिये रसवृत्ती : साभाषांचे कुपे कीजेति निगुती
> ते मऱ्हाटी कवण जाणे निरुती : जे रसांचें जीवन"

इत्यादि महानुभावी कवींचे प्रसिद्ध उद्‌गार मुकुंदरायांच्या बोलाशीं ताडून पाहिल्यास वरील विधानाची प्रचीति यावी. सौजन्याचा साक्षात् "अमृतसिंधू" असलेले तत्कालीन श्रेष्ठ कवि श्री. ज्ञानदेवही ह्या दोषापासून कसें मुक्त नव्हतें हें त्यांचे "माझा मऱ्हाटाचि बोल कौतुकें : परी अमृतातेंही पैजा जिंके। ऐसी अक्षरें रसिकें : मेळवीन ॥" इ. अति प्रसिद्ध उद्‌गार वरील दृष्टिकोनांतून तपासल्यास कळून येईल.

आदिकवि मुकुंदराय व उत्तर यादवकालीन कवि यांच्या उक्तींत जो भेद दिसून येतो त्याचें कारण मुकुंदराय ते उत्तरयादव कालीन कवि यामधील शंभर वर्षांच्या कालखंडांत मराठीच्या आविष्कार माध्यमाच्या यंत्रणेच्या स्वरूपांत पडलेला फरक हें होय. कलात्मक आविष्काराच्या दृष्टीनें विचार केल्यास "मराठींत रचना करणें" अथवा "अमृताशीं पैजा जिंकणारीं अक्षरें मिळविण्याची काव्यशक्ति अंगीं असणें" ह्या दोन्ही गोष्टी 'तांत्रिक' आहेत. उत्तर यादवकालीन कवींनीं कितीहि गर्जून सांगितलें तरी ह्या गोष्टींची गणना आविष्कार यंत्रणेच्या तंत्रांतच केली पाहिजे. आविष्काराच्या माध्यमाला सांकेतिक अवस्था आली कीं आविष्काराच्या मूळ जाणिवांना दुय्यम स्थान मिळून, आविष्कार करणाऱ्या यंत्रणेच्या तांत्रिक कार्यक्षमतेला अधिक महत्त्व येतें हें आपण पहिल्या लेखांतच पाहिलें आहे. उत्तर यादवकालीन मराठीच्या माध्यमाचें उत्क्रांत स्वरूप असेंच सांकेतिक झाल्यामुळें आविष्काराच्या मूळ जाणिवेपेक्षां तो आविष्कार करणाऱ्या यंत्रणेच्या तांत्रिक कार्यक्षमतेचें महत्त्व वाढून—म्हणजेच मराठीचें महत्व वाढून—तत्कालीन सान्याच कवींनी मोठ्या आवेशानें तिचा बडेजाव मिरवावा हें अपरिहार्यच नव्हे तर स्वाभाविक होतें. संकेतावस्थेंतील या बडेजावाला आज वाचाळ वल्गनेचा वास येतो तें यामुळेंच.

आत्मप्रशंसा व बडेजाव हीं यादवकालीन जीवनांतील लोकांची एक आवडती संवय होती. तत्कालीन ताम्रपटांतून अथवा शिलालेखांतून










अनुक्रमणिका

आढळणारीं यादव सम्राटांचीं बिरुदें, व त्यांना लावण्यांत आलेलीं विशेषणेंच याची साक्ष देतात. यादव सम्राट् रामचंद्र देव यांचीं, "श्रीमत्-प्रौढ - प्रताप चक्रवर्ति महाराजाधिराजसोमवंशोद्भवयदुकुलकलिका विलास—द्वारावतिपुरवराधीश"—"गुर्जर कुंजर दानकंठीरवःतैलिंग तुंगतरुन्मूलनमत्त दन्तवाल – मालवप्रदीप शमन मलयानिल—"इत्यादि बिरुदें व विशेषणें एका दमांत वाचण्याचा वाचकांनीं प्रयत्न करून पहावा. तुंबलांत्र व अगडबंब बिरुदांच्या मिरवणुकींतून हिंडणारे हे "बिरुदांचे दादुले" सोडले तरी सर्वसाधारण लोकांतही आत्मश्लाघेच्या वल्गना करीत मिरविण्याची वृत्ति सरसकट दिसून येते.

उत्तर यादव कालीन मराठी आविष्कारांतील अनेक पात्रें, निःशंकपणें आत्मप्रशंसा करतांना दिसतात. भास्करभट्टाच्या शिशुपाळवधांतील शैल्य दरडावून सांगतो—"दिवसा दवळ्या मी तिन्ही लोकांत मशाल लावून फिरतों—माझ्याशीं युद्ध करणारा कोण आहे?" (शि. ८९७) अर्जुन बजावून सांगतो—"जो एकटा महाकाळ शंकराशीं युद्ध करूं शकतो त्या मला अर्जुनालाच बढाईच्या गोष्टी शोभतात." (शि. ९१५) भीम जात्याच दांडगा—त्याच्या यादवकालीन वल्गनाही तेवढ्याचदां डग्या व आडदांड आहेत; प्रत्यक्ष ब्रह्मगोळकाला मिठी देण्याची तयारी करून तो घटिंगण बजावतो—"मग असाल कोणी मायेचा पोटीं : तें पाहीन आतां ॥": बांधलेल्या चोराप्रमाणें वल्गना करणारा शिशुपाळ, नांगराच्या फाळानें सातहि पाताळें नांगरण्याचा धाक घालणारा हलधर, पांडवांच्या सैन्यास, "जैसें न गणिजे पंचाननें : गजघटातें।।" अशा उद्दाम तुच्छतेनें पहाणारा दुर्योधन (ज्ञा.) इत्यादि सारीं पात्रें उत्तर यादवकालीन "बडिवारू" बोलणारांचींच उदाहरणें आहेत. तत्कालीन कवींचे मराठी भाषेविषयीचे व मराठींतील काव्यकर्तृत्वाविषयींचे वर उल्लेखिलेले बोलही ह्या "बडिवारू" वृत्तीचेच आहेत.

अशा रीतीनें तंत्राचा बडेजाव वाढला कीं त्याचें 'प्रदर्शन' करणें ओघानेंच येतें. 'मिरवणें' हा तंत्राचा स्थायीभाव असतो. तंत्राधिष्ठित असलेल्या सांकेतिक अवस्थेचें तें एक महत्त्वाचें मूल्य असतें. या तंत्राच्या समकालीन असलेल्या सामाजिक जीवनांतही "मिरवणें" ही एक जीवननिष्ठा असते. उत्तर यादवकालीन जीवनांतही 'मिरविणें' ही एक महत्त्वाची निष्ठा होती आणि याच अर्थानें "मिरविणें" हा सान्याच उत्तर यादवकालीन कवींचा एक आवडता शब्द असल्याचें दिसून येतें.

"पाळांचा मेरू जैसा : रहवरू मिरवतसे तैसा ॥
"तैसे देशियेंच्या सुखासनीं : मिरविले रस ॥
"स्त्रीयांवरि ताराण मिरविजे; हें कोण राणेपण ॥
"ते बोगळे तुझे चरण; तूं मिरविसी राणेपण ॥
"इंद्रनीलांची दिष्टी : नीलोत्पलांची कांति
"एकवटली तैसी सांवली श्रीमूर्तिः मिरवतुसे ॥
"मुखचंद्र ते मदन संजीवनी : शुक्रमागों आला उसनी
तैसे मोती मिरवे वदनीं : रुक्मिणियेचा ॥
भानुवेनि तेजें ढवळलें । तैसे त्रैलोक्य दिसे उजळलें
तैसे व्यासमति कवळले—सकळ मिरवे ॥
जेथ वर्णवपु निर्दोष । मिरवित असे ॥
परोपकारू न बोले । न मिरवी अभ्यासले
चरणौनि मुकुट वेल्हीं–देवतु विश्वरूपाची थोरी
जें नाना रत्न अलंकारी । मिरवितसे ॥
एर वेदादिक मती : मिरविती प्रज्ञावाया ॥

मिरविणें म्हणजें दिमाखानें फिरणें; तोऱ्यानें, वैभवानें दाखविणें; असेल त्यापेक्षां अधिक फुगवून सांगण्याचा प्रयत्न करणें, प्रत्येक गोष्टीचें प्रभावी प्रदर्शन करणें. सांकेतिक स्थितीचा स्थायीभाव असलेल्या ह्या मिरविण्याच्या वृत्तीचें—मिरवणुकीचें तंत्रही तेवढेंच "नुमाइशी" अथवा प्रदर्शनी असतें. कोणत्याही साध्या, सरळ गोष्टीला येथें महत्त्वच नसतें. जीवनांतील प्रत्येक गोष्टीला सांकेतिक स्वरूप देऊन सारें जीवन दर्शन कृत्रिम, अवास्तव व अतिरंजित रंगविण्याचें तंत्र सिद्ध झाल्यामुळें साध्या सरळ स्वभावोक्तीला येथें अस्तित्वच नसतें. प्रत्येक गोष्ट कोणत्या तरी वैशिष्ट्यानें मिरवत असेल तरच ती इतरांचें लक्ष वेधून घेणार; आणि वैशिष्ट्यानें मिरवायचें म्हणजे–संकेतांच्या घोड्यावर स्वार होऊन तंत्राची आतषबाजी केलीच पाहिजे. साध्या सरळ स्वभावोक्ति-पेक्षां—अतिशयोक्ति अत्युक्ति–विस्तार–चमत्कृति-असंभाव्यता इत्यादि अतिरेकी गोष्टींची आतषबाजी व वाजंत्री असतील तरच सान्या मिरवणुकीचा थाट उठून दिसायचा. उसन्या अभिनिवेशाच्या ह्या उत्सवांत—अवास्तव वल्गनांच्या वाजंत्री घोषांत, अफाट कल्पनांच्या आतषबाजीचें दारुकाम उडून, रेषा, रंग, आकार, शब्द व अलंकार यांच्या नेत्रदीपी चमत्कृतींनीं प्रेक्षकांना स्तिमित करणें, धुंद करणें, अथवा बेहोष करणें हेंच ह्या मिरवणुकीचें ध्येय असतें; आणि अशा रीतीनें स्तिमित होणें, धुंद होणें, अथवा बेहोष होणें हीच समकालीन प्रेक्षकांची अपेक्षाहि असते. उत्तर यादवकालीन चित्रशिल्प वास्तु आदि सान्या कलात्मक आविष्कारांत मिरवणुकीचें अथवा प्रदर्शनाचें हें तंत्र प्रभावीपणें वापरलेलें दिसतें. उत्तर यादवकालीन साहित्यांतहि "विदग्ध" कवि व "रसराजहंस" श्रोते या दोघांनाहि आविष्काराच्या असल्या वराती काढण्या पहाण्याची ननत्ती हौस असल्याचें दिसून येतें. उत्तर यादवकालीन जीवनांतील 'मिरवण्याच्या' सांकेतिक वृत्तीचा तो प्रभाव आहे.

सांकेतिक अवस्थेंतील ह्या तंत्राच्या झगझगाटांत, साध्या सिधाच्या स्वभावोक्तीकडे कोणाचें लक्ष जाणार? भास्कर भट्ट व नरेंद्र यांच्यासारख्या 'शृंगारिया' कवींची तर गोष्टच सोडा, परंतु श्री ज्ञानदेवासारख्या सात्त्विक कवीलाही तिच्याकडे लक्ष देणें सोयीचें वाटत नव्हतें. आपलें म्हणणें लोकांनीं लक्ष देऊन एकावें म्हणून त्यांच्यासारख्या निवृत्तालाही आपल्या आविष्काराची 'पालखी' चंद्र ज्योति वाजंत्र्यांच्या कल्लोळांत, एखाद्या वरातीच्या थाटानेंच वाजत गाजत नेणें भाग पडलें.

उत्तर यादवकालीन सान्याच आविष्कारांत माध्यम यंत्रणेच्या तंत्राची सत्ता केवढी मातब्बर होती याचा हा सबळ पुरावा आहे.

सांकेतिक अवस्थेंतील अतिशयोक्तीच्या तंत्रानें करण्यांत आलेलें कोणतेंही वर्णन साहजिकच निसर्गनिष्ठ वर्णनापेक्षां वेगळें असतें. तें नुसतेंच वेगळें असत नाहीं तर वस्तुनिष्ठतेच्या विरुद्ध जाण्याची त्याची प्रवृत्ति दिसते. सांकेतिक अवस्थेंत वास्तवाचा संबंध अशारीतीनें दुरावल्यामुळें व प्रत्येक जाणीव सांकेतिक स्वरूपांतच करण्याची वृत्ति झाल्यामुळें कोणतीहि गोष्ट अत्युक्तीनेच वर्णन केली जाणें अपरिहार्य होतें. या अपरिहार्यतेचें प्रत्यक्ष फळ म्हणजेच प्रत्येक गोष्टीचें चित्रण वा वर्णन "तरतम" च्या पराकाष्ठेच्या विशेषणांनीं करणाऱ्या अतिशयोक्तीचें तंत्र प्रचारांत येणें हें होय. उत्तरयादव कालीन वाङ्मयीन आविष्कारांतील अतिशयोक्तीच्या वृत्तीमागील भूमिका तीच आहे. दहापांच अतिरिक्त विशेषणांची गर्दी बरोबर घेतल्याशिवाय कोणतेंही नाम जागचें हालत नाहीं. अथवा क्रियाविशेषणांच्या अवास्तव वल्गना ऐकल्याशिवाय कोणतेंही क्रियापद कार्यक्षम होत नाहीं. कारण अशा रीतीनें गर्दी करून गर्जना करीत हिंडल्याशिवाय मिरवण्याची हौस पुरी होत नाहीं—प्रदर्शनाची इच्छा सफल होत नाहीं. उत्तर यादवकालीन आविष्कारांत 'तरतम' चीं पराकाष्ठेचीं विशेषणें प्रत्यहीं कां येतात—असंभाव्य अतिरिक्त, अतिशयोक्तीचीं वर्णनें कां रंगविली जातात, अथवा प्राचीन संस्कृत संकेतांच्या सावल्यांच्या वेष्टितांनीं अद्‌भुताचा आविष्कार कां करण्यांत येतो, इत्यादि गोष्टींची संगति वरील कारणपरंपरेच्या प्रकाशझोतांतच लागणें शक्य होतें.

प्रस्तुत विवेचनाकरितां निवडलेल्या मराठी गीताभाष्यांत श्रीज्ञानदेवांनीं केलेलें, कौरवपांडवांच्या सेनासमूहाचें वर्णन आलें आहे. उत्तर यादवकालीन वाङ्मयांत युद्धप्रसंगांचीं कथानकें एकंदरींत कमीच आहेत; आणि जीं आहेत त्यांतही प्रत्यक्ष युद्धाची वर्णनें फारच कमी असून इतर गोष्टींचा पसाराच त्यांत अधिक आहे. महानुभाव पंडित कवि भास्कर भट्ट याच्या प्रसिद्ध "शिशुपाळवध" या काव्यांतही प्रत्यक्ष युद्धवर्णनापेक्षां श्रीकृष्णाची गोपींसमवेत जलक्रीडा, रुक्मिणीची विरहावस्था, विरहावस्थेवरील उपचार आदि अवांतर गोष्टींचीं वर्णनेंच अधिक आलेलीं आहेत. श्री ज्ञानदेवांचें गीताभाष्यांतील कौरवपांडवांच्या सेनासमूहाचें व भास्करभट्टाच्या शिशुपालवधांतील द्वारकाधीश कृष्णाच्या यादव सैन्यांचें वर्णन वाचतांना या दोन्ही कवींच्या दृष्टीसमोर देवगिरी येथील उत्तर यादवकालीन सम्राटांच्या सेना उभ्या असाव्यात असें स्पष्ट जाणवतें. उत्तर यादवकालीन ऐतिहासिक पुराव्यावरून ह्या विधानाची सत्यता पडताळून पहातां येते. शिशुपाळवधांतील सैन्याचा तपशील अधिक विस्तृत आहे. त्यावरून देवगिरीच्या यादव सैन्याची व त्याच्या एकंदर अवडंबराची कल्पना करणें अधिक सोपें जातें.

कवि भास्कर भट्ट यादव सैन्याचें वर्णन करतो—

> यादवांचीं सैन्यें सांघो केतुली : उभी न माती भूतळीं
> गगनाचिए पोकळीं : दुसें समाती ना ॥
> सवे चतुरंग चाले नीट : जैसी यमाची राजवाट
> कीं घनचक्र उठावलें अलोट : काळरात्रिचें ॥

यमाची जणुं राजवाट भासणाऱ्या या सैन्यांतील सैनिक पाहून कवीला वाटतें—

> उठावले असिवार : जैसे काळकुटाचे धुधुकार
> तैसे पायाचे मोगर : निगताती ॥

या सैन्यांच्या घोडदळांतील—

> वारेयापासुनि वेगाडे : पर्वतापासुन दळवाडे
> ते वारू उंचवडे ॥

अशा घोड्यांचें वर्णन काय करावें ? गजदळ पहावें तों—

> चालते चमकते : काळकुटाचे डोंगर दिसते
> तरि ते हस्ति उपमिजते : तेणें पाडे ॥

या चतुरंग सेनेंतील रथ कसे ? तर—

> "ना ते प्रळय भैरवाचे पांजरे : किं कृतांताचे चाकवरे
> कीं चालतीं चमकतीं धवळारे : काळरात्रीचीं ॥

या सैन्यांतील वीरहि तेवढेच पराक्रमी व प्रतापी असायचे. वीरपुरुषांचा समुदाय हेंच अरण्य व त्या अरण्यांतले सिंह असे "वीराटविएचे पंचाननु" येथील सेनापति आहेत. प्रत्यक्ष यमाला ज्यांचा भेदारा म्हणजे भीति वाटते असे राऊत ह्या सैन्यांत आहेत—आणि ह्याच सैन्यांत रथारूढ वीर पाहिले कीं वाटतें प्रत्यक्ष "वांटिवेचे (पराक्रमाचे) आदित्य उदैले" आहेत.

उत्तर यादवकालीन आविष्कार पद्धतीला धरूनच हें सारें वर्णन सांकेतिक आहे. मराठी गीताभाष्यांतील ज्ञानदेवांचें सैन्यवर्णनही सर्वस्वी सांकेतिक पद्धतीनेंच करण्यांत आल्याचें दिसून येईल. श्री ज्ञानदेवांचा संजय पांडवांच्या सैन्याचें वर्णन करतांना सांगतो—

"हें पांडवसैन्य महाप्रळयाच्या वेळीं पसरलेल्या कृतांत मुखाप्रमाणें, धनदाट एकवाट उठलेल्या कालकूटाप्रमाणें; सागर शोषून घेऊन आकाशापर्यंत उसळणाऱ्या, प्रळयवातानें फुलविलेल्या वडवानलाप्रमाणें दुर्दम्य व नाना व्यूहांनीं परिकर असें अति भयासूर दिसत आहे."

महाप्रलय, कालकूट, वडवानल, कृतांतमुख हे सारेच संकेत यादव-कालीन ठराविक सांच्यांतले आहेत. भास्कर भट्टादि इतर कवींनीं ते सारे युद्धवर्णनांतच व इतरत्रही वापरले आहेत. सैन्याच्या वाटचाली-मुळें आकाशांत उठणाऱ्या धुळीच्या प्रचंड डोंबाचें सांकेतिक वर्णन करणें ही ठराविक सांच्याची कल्पना इतर यादव कवींनीही वापरली आहे. युद्धवर्णनांचाच तुलनेनें विचार करावयाचा झाल्यास भास्कर भट्टांचीं युद्धवर्णनें—संकेतांचा वापर करूनही अधिक कल्पनारम्य व परिणाम-कारक वाटतात; श्री ज्ञानदेवांसारखीं तीं केवळ सांकेतिक वाटत नाहींत.

श्री ज्ञानदेवांचें सैन्यवर्णन व गीताकार व्यासांचें सैन्यवर्णन यांत सुतराम साम्य आढळून येत नाहीं. व्यासांनीं वर्णन केलेल्या मूळ पांडवसेनासमूहाच्या वर्णनावरील श्रीज्ञानदेवप्रणीत मराठी भाष्य अगदीं वेगळ्याच स्वरूपाचें झालें आहे. या भाष्यांत श्री ज्ञानदेवांनीं वर्णन केलेला सेनासमूह विस्तारानें वृत्तीनें व निष्ठेनें व्यासांच्या भारती सेनासमूहापासून केवळ वेगळाच नव्हे तर विरुद्ध प्रकृतीचा आहे. व्यासांनीं केलेलें भारती सेनेचें सारेंच वर्णन वस्तुनिष्ठ आहे, तर ज्ञानेश्वरांचें वर्णन सांकेतिकपणामुळें भारती वस्तुनिष्ठते-पासून दूर—पूर्णतया विरुद्ध प्रकृतीचें—अद्‌भुत झालें आहे. व्यासांच्या भारती युद्धवर्णनांत कौरव-पांडवांच्या दोन्ही सेना आपआपल्या परीनें समर्थ होत्या असें वर्णन आहे. दोन्ही सेनांना विरोधी सेनेच्या सामर्थ्याबद्दल आदर व वचक होता. पांडवांची सेना विशेषत्वानें भयासूर होती अशी शिफारस व्यासांनीं कोठेही केल्याचें आढळून येत नाहीं. उलट शक्तीनें पांडवांचें सैन्य कौरवांच्या सेनेपेक्षां चार अक्षौहिणींनीं कमीच होतें. कमी सैनिक शक्तीच्या सैन्यानें अधिक सैन्यशक्तीच्या शत्रूला समर्थपणें तोंड देण्यासाठीं 'वज्र' नांवाचा एक व्यूह रचावा अशी भारतीय युद्धतंत्राची माहिती धर्मानें अर्जुनाला दिली असल्याचें भीष्म-पर्वाच्या एकोणिसाव्या अध्यायांत सांगितली आहे. त्याचप्रमाणें भारती युद्धकाळीं सारें सैन्य रोज एकाच व्यूहाच्या रचनेनें उभें केलें जाई. ज्ञान-देवांनीं वर्णन केल्याप्रमाणें अनेक व्यूहांचा यादवकालीन गोंधळ त्या सैन्यांत नसे.

व्यासांनीं भारतांत केलेल्या मूळ वर्णनाशीं ताडून पहातां श्री ज्ञानदेवांचें पांडव सैन्यवर्णन भारती वस्तुस्थितीला सोडूनच नव्हे, तर तिच्यापासून सर्वस्वी वेगळ्या अशा निराळ्याच स्थितींतील सैन्याचें आहे असें दिसतें. विजिगीषु वृत्तीच्या लढाऊ व्यवस्थित भारती सेनेपेक्षां अवाढव्य, अवजड व अवडंबरी यादव सेनेचें तें वर्णन दिसतें. आणि ऐतिहासिक पुराव्यांची साक्ष पहातां तेंच खरें आहे. गीतेवरील भाष्य करतेवेळीं ज्ञानदेवांसमोर कौरव-पांडवांच्या भारती सेना नव्हत्या—तर यादव सत्तेचा शेवटचा सम्राट "यदुवंशविलासु, सकळ कळानिवासु" असा जो रामदेवराय यादव त्याच्या प्रचंड अफाट सेना होत्या.

श्री ज्ञानदेव व भास्कर भट्ट यांनीं केलेल्या सैन्यवर्णनावरून यादव-कालीन सैन्याच्या निरनिराळ्या अंगांची व त्यांतील योध्यांच्या तथाकथित पराक्रमाची कल्पना करतां येते. कोणत्याही राजसत्तेच्या उतरत्या वैभवाच्या काळांत—सत्ता व सैन्य यांची वृत्ति पराक्रमापेक्षां सत्तेचा व सामर्थ्याचा पोकळ डौल मिरविण्याची होते. यादवांचा शेवटचा सम्राट रामदेवराय याच्या काळीं यादव सैन्याचें स्वरूप कसें अफाट, अगडबंब व ऐषआरामी झालें होतें याची कल्पना श्री ज्ञानदेव-भास्करभट्टांच्या वर्णनाच्या तपशीलावरूनही करतां येते. यादव सैन्य एवढें अफाट असे कीं, "चालतेया दळाचेनि भारे"—पृथ्वी कुबडी होऊन—तिला सावरणाऱ्या शेषाची दांतखिळी बसलीशी वाटे. सैन्यांतील चतुरंग दलाच्या











वाटचालीनें धुळीचा प्रचंड डोंब उंच अंतराळांत उडालेला पाहिला कीं वाटावें···पृथ्वी सत्यलोकीं ब्रह्मदेवाकडे गाऱ्हाणें करावयास निघाली आहे. या सैन्याचा तळही तसाच विस्तृत व सुखसोयींनीं सज्ज व सुशोभित असे. सुंदर कमांतीनीं परिवेष्टित असे रंगीबेरंगी—विविध प्रकारचे—विस्तृत दलबादल डेरे आणि पटगृहें त्यांत असत; राजगिरी मंडप्या, सुरंगा कापडचौकिया आणि कापूरकेळीचीं शानदार पटगृहें तेथें असत, उष्माशांतीसाठीं धारागृहेंही असत. आकाशांत उंच लफलफणारे महाध्वज—वाऱ्यानें फणफणारीं निशाणें व रंगीबेरंगी पताकांच्या फडफडणाऱ्या फऱ्यांनीं सुशोभित झालेले ते रंगीत विस्तृत डेरे व शोभिवंत शानदार पटगृहें, दुरून इंद्रनील पर्वताप्रमाणें दिसत.

महाप्रळयीं पसरलेलें कृतांतमुख काळकूट अथवा प्रलयानळ इत्यादि श्रीज्ञानदेवांनीं दिलेल्या सांकेतिक उपमांनीं यादवकालीन सैन्याच्या अफाट विस्ताराची व अव्यवस्थित स्वरूपाचीच कल्पना अधिक येते. कृतान्तमुख काळकूटादि गोष्टीशीं या सैन्याचें वर्णन करण्यांत आलेलें साम्य केवळ आकार-विस्तारापुरतेंच आहे. कृतान्तमुख काळकूटाप्रमाणें भयंकर दिसणाऱ्या ह्या सेना प्रत्यक्ष संहारशक्तीच्या बाबतींत किती पोकळ होत्या ह्याची साक्ष इतिहासच देतो.

गर्दी व बेशिस्त वाटचाल हा यादवकालीन सैन्याचा विशेष दिसतो. "घोडेया राउतांची वेणी पडणें" निरनिराळ्या ध्वज पताकांचे फरारे एकमेकांत अडकणें, सैनिकांची दाटादाटी होणें, गजसैन्याच्या दबावानें रथावर रथ चढणें, घोड्यांच्या टापांखालीं माणसें तुडविलीं जाणें इत्यादि वर्णनावरून तत्कालीन सैन्यांतील शिस्तीची कल्पना करतां येते. सैन्याबरोबर असलेल्या "थापटे मळवटे, वाहनधर, दिवटे" आदि नाना तऱ्हेच्या नोकरांत स्त्रियांचाही भरणा मोठा असावासें वाटतें. सैनिकांना विडे देणाऱ्या तरुण 'हडपिणी' सैन्यांत इतस्ततः हुंदडतांना आढळतात. सैन्याच्या दाटादाटींत भ्यालेल्या एका तरुण हडपिणीचें वेधक शब्दचित्र भास्कर भट्टानें सैन्याच्या त्या भाऊगर्दीतही रंगविलें आहे. दाटींत चेंगरण्याच्या भीतीमुळें हाताचीं कोपरें उंचावून ती तरुण हडपिणी जेव्हां "वरुती पार्खी उचललीं: चोळियांची"—अशी उभी राहिली, तेव्हां तिचीं चापेगोरटीं अंगांगें उघडीं पडलीं.—त्या मदनयक्षिणी मातावळीला—तशी पाहून कवीला वाटलें—जणूं "शृगारें जांभई दिन्हली; ना तरी मदनें मुंथि फेडिली।"—आणि तिच्या उघड्या विशाल कुचपर्वतांचे घाट चढतां-उतरतांना बिचाऱ्या सैनिकांची दृष्टि मात्र अगदी थकून गेली. ते भान विसरले आणि चालावयाचे थांबले.

यादव सैन्यांतील ऐषआरामाची पूर्ण कल्पना यावी म्हणून ह्या "शृंगाराच्या जांभईची" येवढी—कदाचित्—कंटाळवाणी दखल घेणें भाग पडलें. यात्र सेनांच्या तथाकथित सामर्थ्याचे व पराक्रमाचे अनेक दाखले इतिहासांतून काढून दाखवितां येतील. अल्लाउद्दीन खिलजीसारख्या सुभेदारानें यादव सम्राटांच्या प्रत्यक्ष राजधानीवर धाड घालून अफाट संपत्ति लुटून नेण्याचें धाडस करावें ह्या घटनेंतच यादव सैन्याच्या पराक्रमी कर्तृत्वाची ग्वाही मिळण्यासारखी आहे. अल्लाउद्दीनाच्या पहिल्याच धडकीनें महाराष्ट्राची कशी तारांबळ उडाली याचें प्रत्यक्ष वर्णन महानुभाव ग्रंथ-स्मृतिस्थळ-यांत दिलेलें आहे. तें काव्य नसून घडलेला वृत्तांत जशाचा तसा कथन करणारा इतिहास आहे. महानुभाव ग्रंथाखेरीज फारशी कागदपत्रें व इतर ग्रंथांतूनहि अल्लाउद्दीनाच्या या धाडीची हकीकत कळते. हे सारे पुरावे एकच गोष्ट सांगतात—ती ही की, केवळ धाक दाखवून अल्लाउद्दीनानें यादव सम्राटांची समृद्ध देवगिरी लुटून सहाशें मण सोनें, सात मण मोती, दोन मण रत्नें, एक हजार मण रुपें व चार हजार रेशमी वस्त्रें एवढी अफाट संपत्ति नेली. महानुभाव पंडित नागदेवाचार्य यांचें या घटनेवरील भाष्य फारच विदारक आहे. आचार्य सांगतात—"अल्लाउद्दीनाचा हा पहिला हल्ला म्हणजे "हे हातवणी, जेवण ते पुढां उरलेचि असे."

अजगराप्रमाणें अस्ताव्यस्त, सुस्त व अजगराइतकीच कार्यक्षम असलेली ही यादव सेनाच मराठी गीताभाष्यकार श्री ज्ञानदेव यांच्या डोळ्यांसमोर होती. मुळांतच अवाढव्य, अवजड, अवडंबरी असलेल्या ह्या सेनेला यादवकालीन आविष्कारयंत्रणेच्या शिरस्त्याला धरून श्रीज्ञानदेवांनीं आपल्या भाष्यांत असंभाव्य व विराट बनविलें आहे. संस्कृत संकेतांच्या भीतिदायक काळ्या सावल्या टाकून अद्भुत बनविलें आहे. भावार्थ दीपिकेच्या पहिल्या अध्यायांतील कौरवपांडवांच्या सेनासमूहाचें तपशीलवार वर्णन वाचीत असतांना श्री ज्ञानदेवांसारख्या विचारवंतालाही आविष्कारांतील अतिशयोक्तीचा, अद्भुताच्या तंत्राचा मोह टाळणें कसें शक्य झालें नाही याची सारखी जाणीव होत असते.

व्यासाच्या भारतांत कोणतीहि सेना कितीहि लहान मोठी असली तरी तिच्या निरनिराळ्या अंगोपागांची व घटकांची मोजदाद होत असे. पांडवांच्या सात अक्षौहिणी व कौरवांच्या अकरा अक्षौहिणी हें ह्या मोजदादीनेंच ठरविलें होतें. परंतु श्रीज्ञानदेवांनीं वर्णिलेलें यादवकालीन सैन्य; अद्भुत असल्यामुळेंच कीं काय 'अपार' आहे—गगनेच्या पलीकडचें आहे. त्यांतील वीरांची गणती नाहीं. पांडवांकडील वीरांचें वर्णन द्रोणाचार्यांजवळ करीत असतांना श्रीज्ञानदेवांचा दुर्योधन

### कांहीं अवशिष्ट राग



ही गुणवंती जणु लजवंती कुठें चालली रसवंती
बागेश्रीची पहा खुलावट केशकलापी मधुवंती
हंसकिंकिणी—कशी दागिनी नेत्रशरें करी मूढ किती
पहा कौतुकें दूर राहुनी—भासे जणु

"जयजयवंती"—



सांगतो "मिति नेणिजे अपारू" असें पांडवांचें सैन्य आहे. ज्या सैन्यांतील वीरांची गणनाच झालेली नाहीं तें सैन्य अद्‌भुतांतच जमा होणें रास्त आहे. नंतर कौरवांकडील वीरांचें वर्णन करतांना तर दुर्योधनानें स्पष्टच कबुली दिली आहे कीं--"आतां काय गणूं ययातें: अपार हें." पांडवांचें लहान सैन्य ज्याला अपार वाटलें त्यानें कौरवांच्या मोठ्या सेनेंतील वीरांचीं नांवें घेण्याचा धसका घेऊन अखेर "आतां किती गणना करावयाची? हें सैन्यही अपारच आहे!" असें सांगून मोकळें व्हावें हें स्वाभाविकच आहे. अपार असणें हा यादवकालीन सैन्याचा आणखी एक विशेष दिसतो. शिशुपाल वधांतील यादव सैन्यहि असेंच अपार असतें. आणि रामचंद्र देवाचें ऐतिहासिक सैन्यहि असेंच 'अपार' होतें. सैन्याच्या या अपारपणामुळेंच बिचाऱ्या रामदेवरावाला आपली खरी शक्ति किती आहे याचा उमज शेवटपर्यंत झाला नाहीं. आणि आश्चर्य हें कीं, यादव सैन्याला शत्रूचें थोडे सैन्यहि (श्री ज्ञानदेवांच्या दूर्योधना प्रमाणेंच) "अपार वाटे." सैन्याच्या दौडीमुळें आकाशांत उठणाऱ्या धुळीच्या डोंबाचें यादवकालीन कवींनीं आपल्या काव्यांत सांकेतिक अर्थानें नेहमींच वर्णन केलें आहे. ती कविकल्पना नव्हती तर अभावितपणें पडलेलें तें वस्तुस्थितीचें प्रतिबिंब होतें. कविकल्पनेनें वर्णन केलेला हा धुळीचा ब्रह्मराक्षस अखेर यादवकालीन भित्र्यांच्याच पाठीस कसा लागला ह्या सुरस आणि चमत्कारिक घटनेची हकीकत ऐतिहासिक अलाउद्दीनचा (खिलजी) इतिहासच सांगतो. खिलजीच्या केवळ हजार घोडेस्वारांच्या दौडीनें आकाशांत उडालेला धुळीचा लोट पाहून—देवगिरीच्या शंकरदेव यादवाच्या 'अफाट' सैन्यांत, दिल्लीचें 'अपार' सैन्य आल्याची आवई उठली व भीतीनें सारे यादव सैनिक सैरावैरा पळून गेले. उत्तर यादवकालीन देवगिरीच्या जीवनांत किती कल्पनातीत धूळ माजली होती याचें हें प्रत्यंतर आहे.

सैन्य असें संख्येनें अपार असल्यानंतर त्या सैन्यांतील वीरशिरोमणीहि पराक्रमानें अफाट असावेत हें क्रमप्राप्तच आहे. मराठी गीता भाष्यानुसार, कौरवांच्या सैन्यांतील अश्वत्थामा एवढा पराक्रमी होता कीं, प्रत्यक्ष यमाला सुद्धां त्याचा मोठा धाक वाटे—"ज्याचा अडदरू सदा वाहे कृतांत मनीं ॥" श्रीज्ञानदेवांचा दुर्योधन पुन्हा सांगतो—"कौरव सेनेंत येवढे बलाढ्य व पराक्रमी वीर आहेत, कीं—"जयांचिया बळाची मिति धाता नेणे ॥" ह्या तथाकथित बलाढ्य वीरांच्या पराक्रमाबद्दल योग्य तो आदर बाळगूनहि यादवकालीन बिचाऱ्या 'धात्या'ची स्थिती मात्र अधिक केविलवाणी वाटते.

श्री ज्ञानदेव व भास्कर भट्ट या दोघांनींही केलेलीं सैन्यवर्णनें वस्तुस्थितीपासून दूरच नव्हे तर वस्तुस्थितीच्या नेमकीं विरुद्ध होतीं असा इतिहासाचा पुरावा आहे. महाप्रलयीं पसरणाऱ्या कृतांतमुखासारखीं विराटविस्ताराचीं हीं भयानक सैन्यें—परकी यवनी सत्तेच्या शेलक्या सेनेसमोर अल्पकाळहि टिकाव न धरतां घाबरून सैरावैरा पळत होती. केवळ मनोव्यापारानें विश्वाचा संहार करण्याची शक्ति असलेले "प्रळय भैरव, गंडगर्व, जगमल्ल" वीर ज्या सैन्यांत होते; वीरश्रेष्ठांच्या मेळाव्यांत नरसिंह ठरणारे व रथावर आरूढ होतांच प्रतापाचें प्रत्यक्ष सूर्य भासणारे, "विराट वीयेचे पंचाननु" व "वांटिवेचे (पराक्रमाचे) आदित्य" ज्या सैन्यांत रथी महारथी होते; अथवा प्रत्यक्ष कृतांताला धाक घालणारे, कालकुटाचे काळे भयानक धुधुकार असे "प्रळय वेताळ, रणडोहाळ, रणनोवरे, तोडरमल्ल" ज्या सेनांचे अधिपति होते त्या प्रचंड पराक्रमी सेनांची मूठभर यवनांच्या धाडीमुळें मात्र अल्पावधींतच दाणादाण झाली...अशी इतिहासाची क्रूर साक्ष आहे, आणि याचें कारण म्हणजे—या तथाकथित पराक्रमी सेना खऱ्या अर्थानें सेना नव्हत्या तर मिरवणुकीच्या सैनिकांची गर्दी बनल्या होत्या. मुळांत नसलेला पराक्रम, नसलेलें सामर्थ्य त्या मिरवीत होत्या; यादवकालीन सांकेतिक तंत्राच्या अव्यावत् झगमगाटांत—मिरविण्याचें माजिरें पिऊन धुंदपणें मिरवीत होत्या.

सैन्याच्या नांवाखालीं मिरविणाऱ्या ह्या शिपाई गर्दीची तत्कालीन कलावंतांनीं रंगविलेलीं वर्णनें अवास्तव ठरतात तीं यामुळेंच. आविष्कार यंत्रणेच्या सांकेतिक तंत्रांना भुलून करण्यांत आलेले तें अतिशयोक्त आलेखन होतें, निःसत्त्व झालेल्या जीवननिष्ठा दडपल्या गेल्यामुळें केवळ तंत्राच्या मयासुरानें उभी केलेली ती मयनगरी होती. गर्जनेच्या तंत्रानें जिवंत सिंहाचा आभास निर्माण करणारी परंतु ओल्या हाताच्या एकाच फटकाऱ्यानें समूळ पुसलीं जाणारीं, ती "चित्रीचीं सिंहाडें" होतीं. एरव्हीं गर्वानें गरजणारे गंडगोपाळ, शत्रूची प्रत्यक्ष धाडी आली असतांना दिङ्मूढ, "टकली ठेलीं" होणारीं तीं "चित्रीचीं माणुसें" होतीं. तीं वस्तुनिष्ठ नव्हतीं किंबहुना वस्तुनिष्ठ नसणें हीच त्यांची वृत्ति होती. वस्तुनिष्ठतेपासून दूर जाणें, तीविरुद्ध जाणें हीच त्यांच्या गतिमानतेची ईर्षा होती. यादवकालीन सांकेतिक अवस्थेंतून पुढील विलगीकरण अवस्थेंत प्रगत होणें हीच त्यांच्या प्रवासाची एकमेव दिशा होती.

आविष्कारांतील सांकेतिकपणामुळें व यंत्रणेच्या प्रगतितत्त्वाला धरून ज्ञानेश्वरांचें सैन्यवर्णन व्यासकालीन वस्तुनिष्ठतेहून किती विरुद्ध झालें आहे हें दोन्हीहि वर्णनांचा तपशील तपासल्यास दिसून येणारें आहे. निसर्गरूप चित्रण अवस्थेपासून प्रगत होत होत संकेतावस्थेंत उत्क्रांत झालेल्या आविष्कार यंत्रणेचें स्वरूप निसर्गरूप चित्रण अवस्थेंतील स्वरूपापेक्षां किती भिन्न—किंबहुना किती विरुद्ध रूप-प्रवृत्तीचें असतें याची प्रचीतीहि याच तपशीलाच्या निरिक्षणानें येणार आहे.

व्यासांचा धृतराष्ट्र कुरुक्षेत्रावरील बातमी विचारतांना प्रथम "मामकाः" म्हणजे माझ्या मुलांनीं काय केलें असा प्रश्न करतो. या 'मामकाः' शब्दांत व्यासांनीं सूचित केलेले, धृतराष्ट्राचें, स्वतःच्या मुलाबद्दलचें स्वाभाविक प्रेम व आत्मीयता कशीं वस्तुनिष्ठ आहेत, एवढेंच नव्हे तर प्रवृत्त समाजांतील जीवनविषयक धारणेला अनुसरूनच कसें आहे, याचें स्पष्टीकरण यापूर्वीच करण्यांत आलें आहे. ज्ञानेश्वरांचा संकेतावस्थेंतील धृतराष्ट्र नेमकें ह्या विरुद्ध करतांना दिसतो. श्री ज्ञानदेव, धृतराष्ट्राचें "पुत्रस्नेहें मोहितु" असें वर्णन करतात खरे परंतु त्यांचा धृतराष्ट्र संजयास प्रत्यक्ष प्रश्न विचारतांना मात्र "पांडव आणि माझे" अशा सुरुवातीनें प्रश्न विचारतो. आपल्या प्रश्नांत अशा रीतीनें पांडवांचें नांव प्रथम घेण्यांत व्यासांच्या धृतराष्ट्राच्या "मामकाः"तील स्वाभाविक आत्मीयतेचा मराठी भाष्यांत—सपशेल लोप झाल्याचें आढळून येतें. भावित वा अभावितपणामुळें अगदीं लहान तपशीलांतून सुद्धां सांकेतिक अवस्थेंत अशा तऱ्हेचे अनेक विरुद्ध प्रकृतीचे फरक कसें घडून येतात याचें हें एक उदाहरण आहे. अशीं उदाहरणें भाष्याच्या या थोडक्या भागांतहि अनेक असून त्यांचा यथावकाश निर्देश करण्यांत येईल.

गीतेच्या एकोणीस श्लोकांवरील भाष्यांत, दुर्योधनादि ज्या निरनिराळ्या अनेक व्यक्तींचे उल्लेख आले आहेत त्यांचें व्यक्तिमत्व, त्यांची वागणूक व त्यांचे परस्परांतील संबंध यांच्या वर्णनावरून—या साऱ्यांचें यादवकालीन स्वरूप, मूळ गीतेंत सूचित झालेल्या त्यांच्या स्वरूपाहून कसें भिन्न व विरुद्ध प्रकृतीचें झालें होतें याची कल्पना येते.






व्यासांचा दुर्योधन हा धीरोदात्त असून प्रवृत्त समाजांतील लढाऊ, विजिगीषु आणि सावध वृत्तीचा तो कसा आहे हें आपण पाहिलें स्वतःच्या सैन्यशक्तीबद्दल त्याला आत्मविश्वास आहे—त्याच्या वतीनें लढावयास आलेल्या मित्रराजांबद्दल त्याला प्रेम व जिव्हाळा वाटत असून त्यांचे परस्परसंबंध मैत्रीचे आहेत. पांडवांच्या सैन्याबद्दल व त्यांतील पराक्रमी वीरांबद्दलहि त्याला आदर आहे कोणत्याहि जातिवंत योद्ध्याला शत्रूबद्दल वाटावा तेवढा रास्त आदर आहे; आणि स्वतःच्या सामर्थ्याबद्दल फाजील आत्मविश्वास असलेला, गर्वानें ताठरलेला, उद्धतमूर्ख योद्धा तर तो खासच नाहीं.

या उलट, मराठी गीता भाष्यांतील ज्ञानदेवांचा दुर्योधन या सर्व दुर्गुणांनीं संपन्न असल्याचें आढळून येतें. सूक्ष्मपणें न्याहाळल्यास ज्ञानदेवांच्या दुर्योधनांत यादवकालीन व्यक्तिमत्वाच्या अनेक छटा प्रतिबिंबित झाल्याचें दिसून येईल. स्वतःच्या कर्तृत्वाबद्दल त्याला अफाट विश्वास आहे; तो सत्तेचा दिमाख मिरविणारा आहे. मिरविण्याच्या यादवकालीन तंत्रांत पूर्ण तरबेज आहे. सांकेतिक निष्ठांनीं निर्माण केलेल्या यादवकालीन नागर व्यक्तिमत्वाचा तो प्रातिनिधिक नमुना आहे. त्यामुळेंच महाप्रलयीं पसरणाऱ्या कृतांतमुखासारखें पसरलेलें पांडव सैन्य पाहून ज्ञानदेवांच्या दुर्योधनानें त्या सैन्याला—जैसें न गणिजे पंचाननें: गजघटातें ॥ अशा तुच्छतेनें अव्हेरिलेलें आहे. स्वतःच्या सामर्थ्याबद्दलच्या फाजील आत्मविश्वासानें तो ताठरलेला व उद्धत झाला आहे व त्याचें हें औद्धत्य विशद करण्याकरितां ज्ञानदेवांनीं "रिपुगज पंचानन" या प्राचीन संस्कृत संकेताचा वापर केला आहे.

रिपुगजपंचानन हा प्राचीन संस्कृत संकेत आहे. आविष्काराच्या संकेतावस्थेंतील केवळ तांत्रिक संकेत आहे. वस्तुस्थितीपासून दूरच नव्हे तर वस्तुस्थितीच्या विरुद्ध आहे. हत्ती या महाप्राण्याच्या जिवाशीं खेळणारी ती एक क्रूर कविकल्पना आहे. हत्तीचें स्वरूप, सामर्थ्य व व्यक्तिमत्व यांचा दुसऱ्या लेखांकांत आपण सविस्तर विचार केला आहे. शिकारी आदिमानवानें हातांतील आयुधांच्या जोरावर साऱ्या पृथ्वीवर आपलें अधिराज्य स्थापन करीपर्यंत पृथ्वीवरील सर्व चराचर सृष्टींत आकारानें, शक्तीनें व पराक्रमानें हत्ती हा एकमेव सामर्थ्यवान सर्वश्रेष्ठ प्राणी होता. एकट्या हत्तीच्या वज्रप्राय कराल सुळ्यांच्या प्रत्यक्ष समोरा समोर तर सोडाच, परंतु जवळपास सुद्धां फिरकण्याची हिंस्र वाघ सिंहांच्या काळजांची छाती नव्हती; मग गजघटाच्या कचाट्यांत सापडलेल्या "सावायेवीग उद्भट" अशा एकाद्या स्वयमेव मृगेंद्राची काय त्रेधा तिरपिट उडत असेल याची कल्पनाच केलेली बरी. आजहि उत्क्रांतीच्या उतरत्या भाजणीच्या जवळ जवळ शेवटच्या पायरीवर असलेल्या हत्तीला व्याघ्रसिंहादि "स्वयंभ जीवे लाठ" अशा हिंस्रश्वापदांपासून भय नाही. गजघटांच्या तर सोडाच परंतु एकट्या दुकट्या हत्तीसमोर आव्हान देऊन उभे रहाण्याची आज, कोणत्याहि पंचाननाची छाती नाहीं असाच सर्व शिकाऱ्यांचा अनुभव आहे.

पूर्वसंस्कृत वाङ्मयांत हत्तीच्या ह्या पराक्रमी व्यक्तित्वाची आठवण ठेवण्यांत आली आहे. निसर्गनिष्ठ आविष्कारांतील सारेंच भव्य व शक्तिमान हत्तीच्या मापानें मोजण्यांत आलें आहे. धैर्यांत व पराक्रमांत हत्तीचाच आदर्श समोर ठेवण्यांत आला आहे. वस्तुनिष्ठ आविष्कारांतील धीरोदत्त हत्तीचें सर्वोत्कृष्ट नैसर्गिक चित्रण संस्कृत कवि भासाच्या रचनेंत पहावयास सांपडतें. पुढें माणसाळण्याचें सौजन्य दाखविल्यामुळें या महान प्राण्याची सोयरीक मानवाच्या नागर संस्कृतीशीं झाली व निसर्गनिष्ठ आविष्कारांत अप्रतिहत विजिगीषु आक्रमक शक्तीचा आदर्श असलेला गजराज—आदर्श चित्रणावस्थेच्या नागरी आविष्कारांत सौजन्याचा अचल मेरु मांदार ठरला. "विनये ऋषिभिः तुल्या"—विनयांत त्याची ऋषींशीं तुलना होऊं लागली. हत्तीच्या ह्या सौजन्याचाच फायदा घेऊन पुढें सांकेतिक अवस्थेंत, संकेतांची सर्कस करणाऱ्या नागरीकवींनीं—पोकळ गर्जनांनीं गरजणाऱ्या कल्पित पंचाननांकडून त्याची शिकार करवून—त्यांना त्याच्या गंडस्थळांतील मौक्तिकांचा तथाकथित चारा खाऊं घातला आहे. हत्तीच्या ह्या सौजन्याची भरपाई म्हणूनच कीं काय, पुढें त्याला "सुखकर्ता दुखहर्ता" असा गणराज गजानन करण्यांत येऊन देवत्व देण्यांत आलें.

रिपुगजपंचानन हा मूळचा संस्कृत संकेत यादवकालीन इतर कवींनीं सांकेतिक खोट्या अर्थानेंच अतिशयोक्त वर्णनाचें तंत्र म्हणून वापरला आहे. सांकेतिक आविष्काराच्या अतिशयोक्तीच्या. तंत्रानें श्रीज्ञानदेवांनीं त्याला अधिक अतिशयोक्त केला आहे. संस्कृत पंचानन एका हत्तीच्याच गंडस्थळांतील मोत्यांचा चारा खात असेल परंतु ज्ञानदेवांचा पंचानन मात्र गजघटांना नुसतें तुच्छ मानूनच स्वस्थ बसत नाहीं तर त्यांच्यांत शिरून लीलेनें त्यांना फाडून खाण्याचा खोटा बडेजाव मिरवतो—त्या अर्थाचें 'बडिवार' बोलतो.

ज्ञानदेवांचा दुर्योधन हा बडिवार बोलणारा यादवकालीन सांकेतिक पंचानन आहे. व्यासांच्या दुर्योधनाहून तो वेगळाच नव्हे तर सर्वस्वीं विरुद्ध आहे. व्यासांचा दुर्योधन स्वतःच्या सैन्यांतील वीरांचें वर्णन विस्तारानें करीत नाहीं व अतिशयोक्त स्तुति तर सुतराम् करीत नाहीं. या उलट श्रीज्ञानदेवांच्या दुर्योधनाचे वागणें आहे. पांडवसैन्यांतील रथीमहारथींचा

नाममात्र उल्लेख करून त्यानें स्वतःच्या सैन्यांतील वीरांची मात्र अतिरिक्त विशेषणांनीं अफाट स्तुति केली आहे. द्रोणाचार्यांना तो सांगतो...

"प्रतापानें केवळ सूर्यच असा हा गंगेचा पुत्र भीष्म आहे; आणि शत्रुरूपी हत्तीला सिंहासारखा असणारा हा वीरकर्ण आहे. या एकेकट्याच्या केवळ संकल्पानें या जगाची उत्पत्ति किंवा संहार होऊं शकतात. हा एकटा कृपाचार्यच त्यांना पुरे आहे. त्या अश्वत्थ्यामाची धास्ती प्रत्यक्ष यमहि नेहमीं मनांत बाळगतो. असे आणखीहि पुष्कळ वीर आहेत कीं, ज्यांच्या सामर्थ्याची मर्यादा प्रत्यक्ष ब्रह्मदेवालाहि समजत नाहीं. हे सारेच वीर शस्त्रविद्येंत तरबेज आहेत. अस्त्रांच्या मंत्रविद्येचे मूर्तिमंत अवतार आहेत. जेवढीं म्हणून अस्त्रें आहेत तेवढीं सर्व यांच्यापासूनच प्रचारांत आलीं आहेत. हे ह्या जगांत अद्वितीय योद्धे आहेत. एवढे असूनहि हे सर्व वीर अगदीं जीवावर उदार होऊन माझ्या बाजूला मिळाले आहेत. त्यांना मीच काय तें. सर्वस्व आहे, माझ्या कार्यापुढें ज्यांना जीवित अगदीं तुच्छ वाटतें असे हे निःसीम स्वामिभक्त आहेत. हे युद्धकला कुशल असून युद्धकौशल्यानें कीर्ति जिंकणारे आहेत. क्षात्रधर्म मूळ यांच्यापासूनच निर्माण झाला आहे. ह्या प्रमाणें सर्व अंगानें पूर्ण वीर असे आमच्या सैन्यांत आहेत. आतां त्यांची गणती काय करूं. हे अपार आहेत."

प्रतिपक्षाचें सामर्थ्य कःपदार्थ समजून स्वतःचें सामर्थ्य फुगवून सांगणाऱ्या यादवकालीन बढिवारू वृत्तीचे हें उदाहरण आहे. मुळांत नसलेल्या सामर्थ्याचा पोकळ डौल मिरविण्याच्या, यादवकालीन मिरवणुकीचें तें प्रदर्शनी तंत्र आहे.




व्यासांच्या दुर्योधनांत भारती राजाचें चित्र प्रतिबिंबित झालेलें दिसतें तर ज्ञानदेवांचा दुर्योधन हा उत्तर यादवकालीन सम्राटांचें प्रतिचित्र आहे. त्याचा अहंपणा सदैव जागृत आहे. युद्धांत भीष्माचें रक्षण करण्यास सांगतेवेळीं तो द्रोणाचार्यांना बजावून सांगतो "मी तैसा हा रक्षावा." भारतीय युद्धांत दुर्योधनाच्या वतीनें लढावयास आलेल्या राजांचे व दुर्योधनाचे संबंध मैत्रिकीचे अधिक होते. ज्ञानदेवांच्या वेळीं ह्या संबंधाला सम्राट व मांडलिक असें स्वामिसेवकाचें स्वरूप प्राप्त झालेलें दिसतें. ज्ञानदेवांचा दुर्योधन सांगतो—"पराक्रमानें प्रतापी, अप्रतिमल्ल असे जरी हे राजे असले तरी माझ्याकरितां ते आपलें सर्वस्व अर्पण करण्यास तयार आहेत. पतिव्रतेच्या नेकीनें ते माझ्याशीं एकनिष्ठ आहेत. माझ्या-कार्यापुढें त्यांना आपलें जीवित सुद्धां कःपदार्थ वाटावें एवढी त्यांची माझ्यावरील निष्ठा व भक्ति चोख आहेत."

सांकेतिक तंत्रांत अतिशयोक्तीची किती परिसीमा गाठण्यांत येते हें पहावयाचें झाल्यास श्री ज्ञानदेवांनीं केलेल्या रणवाद्यांच्या ध्वनिवर्णनाकडे वळावें लागेल. व्यासांप्रमाणें ज्ञानदेववर्णित रणवाद्यांचा ध्वनि फक्त आकाश व पृथ्वी यांच्या पोकळींत निनादून समाधान मानीत नाहीं तर तो त्रैलोक्य "बधिर" करण्याचा आवेश बाळगतो. गीतेच्या मूळ श्लोकांत रणवाद्यांच्या प्रचंड ध्वनीचा परिणाम फक्त कौरवपांडवांच्या भूतलावरील सेनासमूहावर काय झाला याचें वर्णन आहे. परंतु मराठी भाष्यांत भूतलावरील कौरवपांडवांच्या सेनासमूहाबरोबरच पाताळ व स्वर्ग ह्या लोकींहि रण वाद्यांच्या निनादानें काय धमाल उडवून दिली याचेंहि वर्णन करण्यांत आलें आहे. आळीपाळीनें भूभार पेलणारे पाताळींचे कूर्म शेष यांचा येथें उल्लेख आहे, त्याचप्रमाणें स्वर्गांत बसून भूतलावरची गंमत पहाणारे स्वर्गींचे ब्रह्मदेवादि देवहि येथें आहेत. व्यासांच्या युद्धनंदिनः, युद्धकांक्षिणः अशा भारती सैनिकांना रणवाद्यांच्या निनादानें ईर्षेचें अवसान चढून, शत्रूवर तुटून पडण्याकरितां "प्रवृत्ते शस्त्रसंपाते" अशा पवित्र्यांत ते उभे रहातात. या उलट उदंड वाजणाऱ्या सैंघानें, आणि भयानक खाखातानें—ज्ञानदेवांच्या उत्तर यादवकालीन सैनिकांची भीतीनें बोबडी वळते. "भेरी निशाण मांदळ," अथवा "शंख काहळा भोंगळ" यांच्या कल्लोळांत ओरडणाऱ्या सुभटांच्या रणकोल्हाळांनीं—एका उभयांचे सुभटांचा प्राण जातात, चांगांचे दांत बसतात, आणि रणडोहाळ रणराक्षस रणमल्ल अशीं अगडबंब विशेषणें लावून मिरविणारे "बिरुदांचे दादुले" अंगांत भीतीचें हीव भरल्यागत कांपूं लागतात.

आवेशे भुजा बाहाटिती। विसणैले हांका देती
जेथ महाभद्र जाती। आवरतीना ॥

एवढ्या एकाच ओवींत आवेश अथवा ईर्ष्या यांचें वर्णन करण्यांत आलेलें आहे. बाकी सारें वर्णन धडधाकटांनाहि महाप्रळय झाला असें वाटल्याचें अथवा भीतीनें कस्पटाप्रमाणें उडविल्या जाणाऱ्या भ्याडांचेंच अधिक आहे. कौरवांकडील रणवाद्यांच्या त्या भयंकर निनादानें—यादवकालीन रणनोबरे घाबरले यांत नवल नाहीं—घाबरणें हें मर्त्यलोकींचें एक लक्षणच आहे. परंतु भूमंडळावरील युद्धाचा खेळ पहाण्यास स्वर्गींच्या गॅलरींत बसलेल्या—ब्रह्मदेवादि अमर सुरवरांनींहि तो नाद ऐकून भीतीनें व्याकूळ व्हावें—व 'प्रलयकाळ ओढवला—अणि प्रलयकाळ ओढवला" असा आक्रोशी टाहो फोडावा याचें मात्र नवल वाटतें. स्वर्गींच्या देवांची ही स्थिति फक्त कौरव सेनेनें वाजविलेल्या रणवाद्यांचा कोलाहल ऐकूनच झालेली; पांडव सैन्यांतील दिव्यशंखांचा तीव्रतम ध्वनि तर अजून "पुढांचि असे."

सांकेतिक अवस्थेंतील आविष्कार वस्तुनिष्ठतेपासून दुरावतो असें म्हटलें याचें प्रत्यंतर येथें येतें. युद्धाच्या ईर्षेनें समारासमोर उभे राहिलेल्या सेनासमूहाचा वीरश्रीयुक्त आक्रमक आवेशच वर्ण्य विषय होणें हें उचित अधिक असतें. प्रवृत्त जीवननिष्ठेचा कवि त्याचेंच वर्णन अधिक आत्मीयतेनें करतो हें व्यासांच्या उदाहरणावरूनच दिसून येतें. परंतु सांकेतिक आविष्कारांत मात्र ह्या वीरश्रीऐवजीं भीतियुक्त वातावरणाचें व युद्धास घाबरणाऱ्या भेकडांचें वर्णनच अधिक आवर्जून करण्यांत येत असल्याचें आढळून येतें. आक्रमक युद्धाची किंबहुना युद्धाचीच मूळ जाणीव येथें एवढी दुबळी झालेली दिसते कीं, वार करणाऱ्या वीराचा आवेश व आनंद वर्णन करण्यापेक्षां वार खाणाऱ्या वीराच्या यातनांचे करुण पवाडे गाण्यांतच कवि समरस होतांना दिसतो. उत्तर यादवकालीन इतर युद्ध वर्णनांतहि हीच वृत्ति दिसून येते. सदरहू मराठी भाष्यांतील ध्वनिवर्णनांत सुद्धां सांकेतिक वर्णनाच्या भयानक सावल्यांनीं युद्धाची मूळ जाणीवच पार झांकळून गेली आहे. सांकेतिक वर्णनाच्या तंत्रानें पुढें ती एवढी दडपली जाते कीं, पांडव सैन्यांतील दिव्य तीव्रतम शंखध्वनीनें सर्व ब्रह्मांडाचें शतकूट करणाऱ्या कोलाहलाच्या अद्‌भुत प्रचंड आविष्कारांत युद्धाच्या मूळ जाणीवेचें अस्तित्वहि नामशेष झाल्याचें आढळून येतें. पांडव सैन्यांतील वीरांनीं आस्फुरलेल्या दिव्य शंखांच्या ध्वनीचें, श्री ज्ञानदेव वर्णन करतात...

"श्रीकृष्णानें पांचजन्य नांवाचा आपला दिव्य शंख आस्फुरला तेव्हां त्याचा तो भयंकर आवाज गंभीरपणें घुमत राहिला. ज्याप्रमाणें उगवलेला सूर्य नक्षत्रांना लोपवून टाकतो त्याप्रमाणें कौरवांच्या सैन्यांत जे रणवाद्यांचे कल्लोळ दुमदुमत होते ते पांचजन्याच्या आवाजांत कोठें लपून गेले याचा पत्ता लागेना. श्रीकृष्णाप्रमाणेंच अर्जुनानें आपला देवदत्त शंख वाजविला. ते दोन्ही भयंकर शंखनाद एकत्र मिळाले तेव्हां हें सर्व ब्रह्मांड शतचूर्ण होत आहे कीं काय असें वाटलें. इतक्यांत महामृत्यु खवळावा त्याप्रमाणें भीमसेन उसळला व त्यानें आपला पौण्ड्र नांवाचा मोठा शंख आस्फुरला. महाप्रलयाचा मेघ गंभीरपणें गर्जावा त्याप्रमाणें त्याचा नाद वाटला. कुंतिपुत्र युधिष्ठिरानें अनंत विजय आणि नकुल सहदेवांनीं सुघोष आणि मणिपुष्पक असे शंख वाजविले. त्या नादांनीं तर प्रत्यक्ष यमहि गडबडून गेला. महाधनुर्धर काशिराज, महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट व सात्यकी याप्रमाणेंच, द्रुपद व द्रौपदीचे पांच पुत्र, सुभद्रेचा पुत्र 'अभिमन्यु या सर्वांनीं आपआपले निरनिराळे शंख एकदम वाजविले. त्यांच्या मोठ्या आवाजाच्या आघातानें शेष व कूर्म घाबरून जाऊन आपण धरलेलें पृथ्वीचें ओझें टाकूं लागले. स्वर्गादि तिन्ही भुवनें डळमळूं लागलीं, मेरू व मांदार हेलकावे खाऊं लागले, व समुद्राचें पाणी कैलासापर्यंत उसळलें. पृथ्वी पालथी होऊं पहात होती, आकाश हादरत होतें व नक्षत्रांचा तर सडाच पडतो कीं काय असें वाटूं लागलें. ही भयानक स्थिति पाहून "सृष्टी गेली रे गेली, देवांना निराधार स्थिति आली" अशी ब्रह्मलोकांत एकच हांकाटी उठली. दिवसाच सूर्य गुप्त झाला, व ज्याप्रमाणें प्रळयकाळ सुरू व्हावा त्याप्रमाणें या तिन्ही लोकांत एकच हाहाःकार उडाला. त्यावेळीं आदिपुरुष जो श्रीकृष्ण तो आश्चर्यचकित झाला आणि मनांत म्हणाला, "न जाणों, विश्वाचा नाश होईल."—असें म्हणून तो विलक्षण प्रक्षोभ त्यानें

शांत केला. त्यामुळें जग नाशापासून वांचलें, नाहींतर कृष्णादिकांनीं मोठमोठाले शंख वाजविले तेव्हांच युगान्त झाला असता. भगवंतांनीं तो नाद तर शांत केला, परंतु त्याचा प्रतिध्वनि मागें शिल्लक होता त्यानें कौरवांच्या सर्व सैन्याची दाणादाण केली. ज्याप्रमाणें सिंह हत्तीच्या कळपांत शिरून प्रत्येकाला लीलेनें फाडतो त्याप्रमाणें तो प्रतिध्वनि कौरवांचीं अंतःकरणें भेदीत राहिला."

अतिशयोक्तीच्या गतिमान तंत्राचे वेलगाम घोडे उधळले म्हणजे कसे बेभान उधळतात, तंत्राचा भस्मासुर स्वतंत्र झाला कीं, केवढें विराटरूप धारण करतो व स्वतंत्र झालेल्या तंत्रानें निर्माण केलेल्या ह्या अद्‌भुत, असंभाव्य, अवास्तव आविष्कारांत आधींच दुर्बल झालेल्या जीवननिष्ठा कशा समूळ हरपल्या जातात याचें हें भयानक चित्र आहे. ध्वनिवर्णनाच्या या अतिशयोक्त व अगडबंब तंत्रांत युद्धाची मूळ जाणीव कोठें दडपली गेली याचा पत्ता लागत नाहीं. भीष्मांनीं केलेल्या सिंहगर्जनेच्या वर्णनापासून ताणली गेलेली अतिशयोक्तीची तार वास्तवापासून दुरावत जाऊन असंभाव्यतेच्या आवळत्या पिळांनीं दर ओवीगणिक अधिकाधिक ताणली जात जात, अखेर पांडवांच्या शंखध्वनिवर्णनापर्यंत अफाट अद्‌भुताच्या अति तार सप्तकांत अक्षरशः तुटते.

ज्यांच्या केवळ निनादानें जगड्व्याळ उलथापालथ करतां येणें शक्य होतें असे प्रतापी शंख जवळ बाळगणाऱ्या योद्ध्यांना खड्ग धनुष्यादि तोकडीं शस्त्रें हातांत धरून लढाईच्या पवित्र्यांत समोरासमोर उभे राहून युद्धाचा उपद्व्याप करण्याची तरी काय जरुरी आहे, असा प्रश्न वरील वर्णन वाचून पडतो.

युद्धाची घटना ही व्यासांच्या वस्तुनिष्ठ अविष्कारांतील मूळ जाणीव आहे; आणि व्यासांच्या आविष्काराच्या तंत्राचे घोडे या मूळ जाणिवेच्या पूर्ण कह्यांत आहेत. परंतु यादवकालीन आविष्काराच्या तंत्रानें ही मूळ जाणीवच दडपली गेल्यामुळें तिच्या अस्तित्वाबद्दल उभा रहाणारा हा प्रश्नच तेथें अप्रस्तुत ठरतो मूळ जाणिवेपेक्षांहि सांकेतिक आविष्कारांतील कसबी तंत्राच्या रूपाची भूलच अखेर एवढी प्रभावी ठरते कीं, श्रीज्ञानदेवांच्या योगेश्वरी वाणीलाहि आपलीं पावलें संकेतबद्ध पदन्यासाच्या तालावरच टाकून त्रैलोक्यालाहि हादरा बसेल असें तांडव नृत्य करणें भाग पडलें.

उत्तर यादव कालीन वाङ्मयीन आविष्कारांत युद्धाचे प्रसंग मुळांतच कमी आहेत; आणि जे आहेत त्यांतहि युद्धांतील ईर्षेपेक्षां युद्धांतील भयानकाचा परिपोषच तत्कालीन कवींनीं अधिक आत्मीयतेनें केल्याचें दिसून येतें. श्रीज्ञानदेवांनीं सुद्धां आपल्या मराठी भाष्यांतील युद्धवर्णन– प्राचीन संस्कृत संकेतांच्या भयानक सावल्यांच्या चेष्टितांनीं अद्‌भुत भयानक केलें आहे. उत्तर यादवकालीन साऱ्याच आविष्कारांत भयानकाचा मुद्दाम परिपोष करण्यांत येऊन भ्याडपणाचे दाखलेच अधिक आवर्जून वर्णन करण्यांत येतात, असें दिसून येतें. पृथ्वीवरचे मर्त्य लोक तर सोडाच परंतु पाताळ–स्वर्गींचे 'अमर' रहिवासीहि ह्या वर्णनांतून भीतीनें भेदरलेले आढळतात. येथें ब्रह्मदेव व्याकुळ होतो, देव सृष्टि बुडाल्याचा आक्रोश करतात, कृतांताला कोणाचा तरी धाक वाटतो, अथवा भीतीनें तो गडबडतो व महांकाळ शंकर भिऊन कैलासावर लपून बसतो. ही झाली देवाधिदेवांची स्थिति, सामान्य देवांची कथा तर अत्यंत केविलवाणी आहे. दैत्य-दानवांच्या दांडगाईमुळें बिचाऱ्यांना पळतां भुई थोडी झालेली असते. वायु-वरुणांचीं गांवें उध्वस्त झालेलीं दिसतात, इंद्राच्या अमरातीवर धाडी येतात, व यमाची यमपुरी खांडा-खापरासकट नागविली जाते. दैत्य-दानवांतील कांहीं दांडगे गरीब बिचाऱ्या देवांकडून "खांडेधूआवना'सारखे करहि जबरदस्तीनें वसूल करतांना दिसतात. एवढेंच नव्हे तर दैत्य-दानवांचीं वात्रट पोरें-सुद्धां यादवकालीन देवांच्या डोक्यावर टपल्या मारतांना दिसतात. "जें दैत्यांच्या कुमरीं । मारिजती थाप बेन्हीं ।." वास्तविक पहातां पृथ्वीवरील प्राणिमात्राच्या रक्षणाची जबाबदारी देवांवर असावयाची; परंतु उत्तर यादवकालीं स्वर्गींच्या देवांना पृथ्वीवरील मानवांचाच मोठा आधार वाटे. भूतलावर होणाऱ्या यज्ञांत मिळणाऱ्या पुरोडाशाची ते अधीरपणें वाट पाहतांना दिसतात, सारवलेल्या घराच्या उंबरठ्याशीं चार शितें मिळतील या बुभुक्षित आशेनें ते ताटकळत बसतात.

हेमाद्रीचा प्रसिद्ध ग्रंथ "चतुर्वर्गचिंतामणि" हा यादवकालीनच नव्हे तर तेराव्या शतकांतील एक महान् ग्रंथ समजण्यांत येतो. या ग्रंथांत दर तिथीला व दर दिवसाला दहा दहा पांच पांच व्रतें सांगितलीं आहेत; व त्या त्या व्रताला कोणत्या देवास कोणतें पक्वान्न करून व किती ब्राह्मण घालून प्रसन्न करावें हें सांगितलें आहे. समर्थनार्थ स्मृति, श्रुति व पुराणें यांचे आधार दिले आहेत. हेमाद्रीच्या ह्या व्रतखंडावरून वर्षाला एकंदर दोन हजार व्रतें होतात. एवढीं दोन हजार व्रतें व त्यांची सांगता सांगणारा ग्रंथ महाराष्ट्रांतच काय परंतु पृथ्वीवरील इतर कोणत्याहि धर्मांत निर्माण झाला नाहीं असें तज्ञांचें मत आहे. या दोन हजार व्रतांच्या सांगतेकरितां देण्यांत आलेल्या पक्वान्नांच्या यादीवरून नजर फिरवली तरी तात्कालीन देवा-ब्राह्मणांच्या खादाडपणाची कल्पना येते. असले खादाड देव पाहूनच भास्कर भट्ट विचारतो–ते काय दैन्य फेडितीः मागतेयाचे ।। उत्तर यादवकालीन देवांची ही लाचार स्थिति पाहिली कीं ज्ञानदेवांनीं वर्णन केल्याप्रमाणें पांडवांच्या शंखनादांनीं सृष्टि डळमळूं लागली असतां स्वर्गींच्या देवांनीं "सृष्टि बुडाली आम्ही निराश्रित झालों" असाएकच हंबरडा फोडला असल्यास नवल वाटण्याचें कारण नाही.

भीतीचा हा ब्रह्मराक्षस उत्तरयादव कालीन देवांप्रमाणें मानवांनाहि भेडसावतांना दिसतो. सैन्याच्या वाटचालीनें उडणाऱ्या धुळीचा लोट पाहूनच मोठमोठ्या सैन्यांची दाणादाण उडते व रणवाद्यांच्या भयानक आवाजांनीं बिरुदांच्या दादुल्यांची दांतखिळी बसते. धाडीची (हल्ल्याची) व लुटीची जबरदस्त दहशत तर प्रत्येकालाच बसलेली दिसते. किल्ला अथवा दुर्ग म्हणजे झुंजार वृत्तीचें प्रतीक समजण्यांत येतें, परंतु उत्तरा-

यादव कालीं—दुर्गावर धाडी आली असतां किल्ला संभाळणाऱ्या "नायक-वडी" लढण्याऐवजीं पळ कशा काढतात याचेंच सुरस वर्णन करण्यांत येतें.

अविद्या दुर्गीं अवघडीं : अवचिती मोक्षाची धाडी
म्हणौनि विषयाचिया नायकवडी : पळत दिसती. ॥

इंद्रप्रस्थास श्रीकृष्ण गेले असतां तेथील लोकांना ते कसे दिसले तर

चैतन्याची लुसी (लूट) : घेत आला हपी केशी
तेव्हळीं मानुसें चित्रीचीं जैशीं : तेवीं टकलीं ठेली ॥

उत्तर यादवकालीन साऱ्याच आविष्कारांत भीति हा भाव विशेषत्वानें प्रतिबिंबित झालेला दिसतो. उत्तर यादवकालीन स्थितिसापेक्ष जीवनहि भीतीनेंच झांकळलें असल्याचा तत्कालीन इतिहासाचा पुरावा आहे. उत्तर यादवकालीन आविष्कारांत व इतिहासांत प्रामुख्यानें आढळून येणाऱ्या या भीतीचें कारण तत्कालीन सामाजिक असुरक्षिततेंत सांपडतें.

अल्लाउद्दीन खिल्जीच्या धाडीनें महाराष्ट्राची कशी तारांबळ उडाली याचें सविस्तर वर्णन महानुभाव ग्रंथांतून मिळतें. त्याबाबतच ऐतिहासिक पुरावाहि भरपूर उपलब्ध आहे. या साऱ्या पुराव्यांवरून प्रौढप्रताप चक्रवर्ती जे उत्तरकालीन यादव सम्राट यांच्या राजकीय सामर्थ्याविषयीं कल्पना करतां येते. अल्लाउद्दीनची परकीय आणि राजकीय धाड सोडली तरी खुद्द यादवराज्यांत पुंड अधिकारी अथवा चोरदरवडेखोरांच्याहि धाडी प्रत्यहीं पडत असल्याचे हवे तेवढे पुरावे तत्कालीन इतिहासांतून काढून देतां येतात. उत्तरकालीन यादव सम्राटांची राज्यशासनयंत्रणा किती दुबळी झाली होती–व राज्यशासनयंत्रणेच्या दुबळेपणामुळें, असुरक्षिततेची व सामाजिक अस्थैर्याची सर्वसाधारण भावना सामाजिक जीवनांत बळावून यादवकालीन जीवन कोणत्यातरी जबरदस्त व अनिवार्य दहशतीच्या सावटानें कसें झांकळलें गेलें होतें तें ह्या प्रमाणांवरून स्पष्ट होतें. उत्तर यादव कालीन आविष्कारांत भीतीचे अक्राळविक्राळ बागुल निरनिराळ्या आकारप्रतिमांच्या भयावह चेष्टितांनीं भेडसावतांना दिसतात याचें कारण तत्कालीन सामाजिक मनांत दडून बसलेला दहशतीचा धाक व असुरक्षिततेची भयाण भावना हेंच होय.

वाटमारी, दरोडेखोरी व धाडी यांची दहशत यादवकालीन समाजाच्या मनावर केवढी जबरदस्त होती याचे दाखले लीळाचरित्र व गोविंदप्रभूचें चरित्र या महानुभावी ग्रंथांतून मिळतात. कोठें खुट्ट वाजलें कीं, धाडी आली असें समजून सारें गांवच्या गांव भीतीनें गडबडून जावें एवढें त्यावेळचे समाजमन घाबरट बनलें होतें. तत्त्वज्ञानांतील विचार सांगतांना सुद्धां धाडीलुटीचे दाखले तत्कालीन विचारवंत देत असत याचीं उदाहरणें वर दिलीं आहेत. रात्रीं जरा उशीरा ढोर आळींत जाऊन दुधासाठीं कोणी मोठ्यानें हांक मारली तर सारा गांव भीतीनें खडबडून जागा होतो. "भिल्लांच्या पाडींत" तर दिवसासुद्धां जाण्याची कोणाची छाती होत नसे. दरोड्याच्या भीतीनें लोक जवळचें सोनें नाणें नारळांत घालून तो कोठें तरी पुरून ठेवतात. दोन गांवांतील भांडणांत आपलें वित्त नाहींसें होईल ह्या भीतीनें लोक आपली चीजवस्तु पेवांत दडवून ठेवतात. देवगिरीचा राजा आमणदेव याचे डोळे काढून रामदेवराव गादीवर बसतो त्यावेळीं उडालेल्या राजकीय धमालींत "टेकीच्या रायाची" सारी राजधानी गडबडून जाते; लोकांची पळापळ होते व नगरांत एकच दंगल माजते. दंगलीत पडलेल्या जखमी लोकांनीं भरलेले गाडेच्या गाडे गांवांतून नेण्यांत येतात आणि हें सारें दृश्य, घराच्या माळवदावर बसून लोक भयभीत मनानें पाहतात. लोकांच्या भित्रेपणाची पूर्ण कल्पना येण्यासाठीं श्री चक्रधरांची "सुने भुंकीची" हकीकत अवश्य वाचण्यासारखी आहे. श्रीचक्रधर स्वामी नेवाशाहून घोगरगांवास येत असतांना रात्रीच्या वेळीं, केवळ गम्मत म्हणून कुत्र्याच्या भुंकण्याची नक्कल त्यांनीं आपल्या शिष्यांकडून करविली. ती ऐकून गांवांतील महारवाड्यांतील सारीं कुत्रीं एकदम भुंकूं लागलीं; आणि भुंकण्याच्या त्या कल्लोळानुळें "पाईक आले" अशी गांवांत आवई उठून साऱ्या गांवाची भीतीनें बोबडी वळली. शासनसत्तेच्या दुबळेपणा बरोबरच लोकांची प्रतिकारशक्तीहि कमी झाल्यामुळें धटिंगणांच्या धाक दपट शाहीची राजवट सुरू झालेली दिसते. दोनचार धटिंगणांनीं गांवांतील कोणत्याहि प्रतिष्ठित नागरिकांना बळजबरीनें धरून नेऊन परप्रांतीं गुलाम म्हणून विकावे अशींहि उदाहरणें मिळतात. 'काटकीचें' धरणें केव्हां येईल याचा नेम नसल्यानें गदोनायकासारखे-चहुंराय चे भाडारी भीतिग्रस्त व साशंक मनानें वावरतांना दिसतात आणि वाटमारींत लखुमिया मारला जातो. दरोडेखोरांतहि जातीचा विधिनिषेध दिसत नाहीं. प्रतिष्ठित जातींतील लोकहि दरवडेखोरांत आढळून येतात. विठ्ठल ब्राह्मण, नेमदेव कोळी व म्हाया गुरव हे तिघे दरोडेखोर राजरोस वाटमारीचा धंदा करतांना आढळतात. चोर वाटमाऱ्यांचा त्रास तत्कालीन व्यापारी व प्रवासी यांना किती होत असे याचे दाखले श्रीज्ञानदेवांनींच इतरत्र वर्णन केले आहेत. मोठ्या बंदोबस्तांत एका ठिकाणाहून दुसरीकडे नेण्यांत येणाऱ्या सरकारी खजीन्यावर सुद्धां तत्कालीन दरोडेखोर धाड घालून तो लुटून नेण्यास भीत नसत, तेथें इतरांची काय कथा ?

पारलौकिक व ऐहिक असुरक्षिततेच्या जाणीवेनें भांबावलेल्या यादवकालीन समाजाला अधिक भीति घालणाऱ्या आणखी कांहीं सांवल्या होत्या; आणि त्या म्हणजे मंत्रतंत्रावरील अंधश्रद्धेनें जागविलेल्या ब्रह्मसमंधांच्या. श्रीज्ञानदेवांनीं वर्णन केल्याप्रमाणेंच जनांमध्यें असुन जनांना गोचर न होणाऱ्या या खेचरांची (भूतांची) फार मोठी गर्दी यादवकालीन

## कांहीं अवशिष्ट राग



पहाटेच्या रामप्रहरी
खांद्यावरि तोल धरि
कसा चाले गिरिधारी
दुग्धडेरे घेउनियां

नको वाटे ह्याचे येणे
त्याचे तुलसीचे गाणे
परंतु त्याविण जीवन उणे
पहाटेचा 'भैरव' हा













अनुक्रमणिका

समाजांत धिंगाणा घालतांना दिसते : समंध, पिशाच, चित्रसी, खेचरी, पंचाक्षरी मंत्रतंत्र इत्यादींचे तत्कालीन सान्याच वाङ्मयांत प्रत्यहीं आढळून येणारे दाखले पाहिले कीं, यादवकालीन समाजमन या ब्रह्मसमंधांनीं कसें झपाटलें गेलें होतें याची कल्पना येते. भिक्षांच्याच पाठीस लागणाऱ्या ह्या ब्रह्मराक्षसांना उत्तर यादवकालीन भिक्षांएवढे भित्रे इतिहासांतहि क्वचितच मिळाले असतील.

व्यासांच्या मूळ एकोणीस श्लोकांत अस्त्रांचा उल्लेख नाहीं. व्यासांच्या भारतांत अस्त्रांचें हें मंत्रशास्त्र होतें किंवा नाहीं...कीं ह्या गोष्टी भारताचें महाभारत होण्याच्या प्रक्रियेंत महाभारतांत नंतर घालण्यांत आल्या याबद्दल विद्वानांत वाद आहेत. दैविक मंत्रशक्तीचीं अस्त्रें नंतर महाभारतांत जरी आलीं असलीं तरी लढाईच्या अखेरच्या परिणामांत त्यांचा फारसा उपयोग झालेला दिसत नाहीं असें तज्ज्ञांचें मत आहे. लढाईतील जयविजय दिव्य अस्त्रांपेक्षांहि हातांतील शस्त्रांच्या बळावरच ठरविला जाई. श्रीज्ञानेश्वरांच्या गीताभाष्यांत मात्र त्यांचा उल्लेख आहे. कौरवांच्या सैन्यांतील वीरांचें वर्णन करतांना दुर्योधन सांगतो, "जे शस्त्रविद्या पारंगत। मंत्रावतार मूर्त। हो कां जे अस्त्रजात। एथुनी रूढ॥" यादवकालीन मंत्र 'तंत्राचा' हा अप्रत्यक्ष परिणाम आहे.

अत्युक्ति, अतिशयोक्ति यांच्या तंत्रामुळें आविष्कारांत विस्तार व विस्कळितपणा हे दुर्गुण शिरले असल्यास नवल वाटण्याचें कारण नाहीं. सांकेतिक स्थितींतील इतर माध्यमांतील आविष्कारहि असेच विस्तारी व विस्कळित झालेले आढळून येतात. आविष्कारांतील मूळ जीवननिष्ठ जाणिवा दुबळ्या झाल्यामुळें तंत्रावरील त्यांची पकड सैल होते व ह्या संधीचा फायदा घेऊन स्वतंत्र होऊं पाहणारीं तंत्राचीं निरनिराळीं अंगें आपआपल्या लहरीनें वागून पुढें पुढें येताल होण्याइतकीं अक्षरशः स्वतंत्र होतात. स्वातंत्र्याचें वारें प्यालेल्या ह्या अंगांना आविष्काराच्या मूळ जाणिवांच्या शिस्तीच्या चवकटींत ठेवणें कसें मानवणार? सांकेतिक आविष्कारांतील सान्याच कथनांत वस्तुनिष्ठ चित्रणावस्थेंतील एकसंधपणा आढळून येत नाहीं तें यामुळेंच.

व्यासांचीं व श्रीज्ञानदेवांचीं सैन्यवर्णनें ह्या दृष्टीनें तपासल्यास हाच फरक आपल्याला आढळून येतो. पहिल्या श्लोकापासून तों एकोणीसाव्या श्लोकापर्यंत व्यासांचें सैन्यसमूहाचें एकसंध चित्र चढत्या श्रेणीनें आलेखित होत जाऊन एकाद्या फुलाप्रमाणें विकसित होतें. दृश्य, श्राव्य अथवा भाव संवेदनांच्या वर्णनांत मूळ कथावस्तूची जाणीव कधींच डोळ्याआड होत नाहीं, अथवा कथावस्तूच्या मूळ जाणिवेशीं संबंधित नसलेल्या, अवांतर, आगंतुक गोष्टीहि मध्यें आणल्या जात नाहींत. या उलट मराठी भाष्यांतील कथन झालेलें दिसतें. वर्णनांतील अतिशयोक्तीमुळें कथानक कोठें थांबलें आहे, कोठें वाढवलें आहे तर कोठें अजिबात लुप्त झालें आहे. कथनाचा धागा शेवटपर्यंत एकसंध राहिला नाहीं; तसा तो राहणें तंत्राच्या वैशिष्ट्यामुळें अशक्य होतें. "ऐसे बोलुनिया मांतु। सांडिली तेणें" असें सांगून लगेच पुढच्या ओवींत "मग पुनरपि काय बोले" इत्यादि ओव्यांतून, कथानकांत पडलेला खंड जोडण्याचा करण्यांत आलेला प्रयत्न खटकतो तो यामुळेंच. उत्तर यादवकालीन इतर आविष्कारांतूनहि हीच गोष्ट जाणवते; आणि याच दृष्टीनें सांकेतिक आविष्कार करणारे कवि हे उत्तम कथाकार ठरत नाहींत. आविष्कारांतील अखंडैकात्मकता, प्रमाणबद्धता, सुसंगति व औत्सुक्यवर्धकता हे गुण तर सांकेतिक आविष्कारांत अभावानेंच जाणवतात; येवढेंच नव्हें तर या गुणांच्या नेमके विरुद्ध असलेले गुणच सांकेतिक आविष्कारांत आढळून येतात. उत्तर यादवकालीन श्रेष्ठ कवि भास्करभट्ट, नरेंद्र व श्री ज्ञानदेव यांचीं कथानकें ह्याच गोष्टींची प्रचीति आणून देतात. सांकेतिक आविष्कारांत हे तीनहि कवि आपआपल्या परीनें कितीहि श्रेष्ठ ठरत असले तरी यांपैकीं कोणाचीहि "श्रेष्ठ कथाकार" म्हणून निवड करणें कठीण आहे. गीताभाष्याच्या पहिल्या अध्यायांतील कथनांत दिसून येणारा कथानकाचा विस्कळितपणा हीच गोष्ट सूचित करतो.

गीताभाष्यांतील कांहीं भागाच्या अनुषंगानें उत्तर यादवकालीन आविष्कारांच्या सर्वसाधारण पोताचें स्वरूप काय होतें हें अभ्यासण्याचा आतांपर्यंत प्रयत्न केला. पोताच्या ह्या अभ्यासावरून उत्तर यादवकालीन वाङ्मयीन आविष्कारांचे पोत (इतर माध्यमांतील आविष्कारांप्रमाणेंच) तें घडवून आणणाऱ्या माध्यम यंत्रणेच्या संकेतावस्थेंतील आहे असें स्पष्टपणें दिसून येतें. सांकेतिक स्थितींतील आविष्कार यंत्रणेच्या समकालीन समाजाच्या उत्तर यादवकालीन जाणिवा निष्ठांमुळें कशा सांकेतिकच झाल्या होत्या याचाही खुलासा होतो. उत्तर यादवकालीन आविष्कारांचें स्वरूप असें निश्चित केल्यानंतर त्या आविष्कारांच्या एकंदर मूल्यमापनाच्या दृष्टीनें कांहीं प्रश्न आपल्यासमोर उभे राहतात.

—उत्तर यादवकालीं मराठी आविष्काराच्या माध्यमाची यंत्रणा जर संकेतावस्थेंत परिणत झाली होती तर त्यापूर्वींच्या तिच्या, वस्तुरूप चित्रणावस्था व आदर्श चित्रणावस्था ह्या अवस्थांतील आविष्कार कोठें लुप्त झाले आहेत कीं काय?

—जर सांकेतिक स्थितींतील जाणिवा, निष्ठा नव्या अथवा निराळ्या नसतात तर सांकेतिक आविष्कार करणारे उत्तर यादवकालीन कलावंत हे कोणत्याहि अर्थानें क्रांतिकारक असण्याची शक्यता आहे काय?

—उत्तर यादवकालीन सान्याच आविष्कारांतील जाणिवानिष्ठांवरून व माध्यमाच्या सांकेतिक स्वरूपावरून उत्तर यादवकालीन मराठी ग्रंथ हे, आज समजले जातात त्याप्रमाणें—मराठी संस्कृतीचे आद्यग्रंथ आहेत कीं यादवाच्या राजवटींत पूर्णविकासित होऊन गळून पडणाऱ्या महाराष्ट्री संस्कृतीचे शेवटचे ग्रंथ आहेत?

आतांपर्यंत करण्यांत आलेल्या पोताच्या विवेचनाच्या दृष्टीनें वरील प्रश्नांचा तपशीलवार विचार होणें आवश्यक आहे. • • •



अनुक्रमणिका

....आणि मग सपाट्यासरशीं पाय फरफटावीत बाबूनें सगळें सामान गोळा केलें. वळकटी बांधली. भांडीं खोक्यांत भरलीं. कपडे पेटींत ठेवले. प्रवासी तांब्याचें झांकण फिरवलें व हात वर नेत तो स्वतःशींच बडबडूं लागला....



सौ. वसुंधरा पटवर्धन



बाबूनें धुण्याची बादली धापदिशी वहिनींपुढें आपटली आणि तिच्यापुढें लहान मुलासारखी बसकण मारून तो म्हणाला, "आम्ही नाहीं धुणार आजपासून धुणं."

वहिनीनें एका अक्षरानें उत्तर दिलें नाहीं. ती आपली तशीच पोळ्या लाटत राहिली. पण बाबूला उत्तर हवें होतें. तो पुन्हा म्हणाला, "आजपासून मी धुण्याला हात म्हणून लावणार नाहीं. धुवा तुम्हांला हवं असलं तर. माझंसुद्धां तुम्हीच धुवा."

तरी वहिनीला यांतलें अक्षर ऐकूं गेलें नाहीं. ती म्हणाली, "गोदे, पानं घे. मीठ चटणी वाढ."

आठ वर्षांची गोदी दोन्ही खांद्यांवरून सोडलेल्या लांबसडक वेण्या पहात पहात स्वयंपाकघरांत आली आणि पाट मांडूं लागली. तिनेंसुद्धां बाबूकडे पाहिलें नाहीं तेव्हां बाबूचें पित्त खवळलें. आपल्याकडे लक्ष न द्यायला वहिनीनेंच तिला शिकवलें असलें पाहिजे असें त्याच्या मनांत आलें आणि तो एकदम उठून तावातावानें हातवारे करीत ओरडून वहिनीला म्हणाला "आम्हाला सगळ्या गोष्टी समजतात. कोण कोणाला शिकवतंय तें सगळं आम्हांला समजतं. पण आम्ही साफ सांगतों, आजपासून आम्ही धुण्याला हात लावणार नाहीं" कीं एक कपडा झटकून दांडीला लावणार नाहीं. असें म्हणून बाबूनें ती धुण्याची बादली पुन्हा एकदां आपटलीं.

त्यासरशीं गोदीचें लक्ष बाबूकाकाकडे गेलें. ती एकदम धावत त्याच्याकडे गेली आणि त्याच्या कमरेला विळखा घालून म्हणाली, "हां हां बाबूकाका, लागेल ना तुला. बादली आपटूं नकोस."

यावर बाबू गोदीला टोचून म्हणाला "आम्हांला लागलं तरी चालेल आम्ही मरून जाऊं आणि मग सुटूं एकदांचे."

परंतु बाबूच्या या मरून जाऊन सुटण्याच्या गोष्टीकडे वहिनीनें यत्किंचितहि लक्ष दिलें नाहीं. ती गोदीला पुन्हा एकदां एवढेंच म्हणाली, "वामनला जेवायला बोलाव."

"तो अभ्यास करतो आहे."

"त्याला म्हणावं अभ्यास. पुरे. जेवायला चला. बाबू, तूंहि बैस पानावर."

बाबूनें उत्तर दिलें, "आम्हांला जेवायचं नाहीं."

"बरं! तर मग तूं तुझ्या भावाबरोबर जेव."

"आम्ही आज मुळीं जेवणारच नाहीं."

"कां?"

"आमची मर्जी!"

आमच्या मर्जीवरहि वहिनीनें उत्तर दिलें नाहीं.

तेव्हां बाबूच आपणहून म्हणाला. "वहिनी, तूं मला बाबूभाऊजी म्हण." वहिनी नुसती हसली.

"हसतेस काय? आणि दोन्ही हात कमरेवर घेऊन रखमाईसारखी उभी काय राहिली आहेस? तुझ्याहून सात वर्षांनीं आम्ही मोठे आहोंत. आम्हांला चाळीसावं वर्ष चालूं आहे, समजलीस? लग्नाच्या वेळीं आम्ही पाहायला आलो होतो तुला. आम्हाला पसंत पडलीस म्हणून भाऊनीं लग्न केलं तुझ्याशीं पण तूं तर काना मागून आलीस आणि तिखट झालीस. आम्हाला बाबू भाऊजी म्हण."

"नाहीं म्हणणार." वहिनीनें हंसत हंसत सांगितलें.

"कां?"

"मला मुळीं तूं भाऊजीसारखा वाटतच नाहींस"

"कां म्हणून?" तिचें पुरतें ऐकून न घेतांच बाबू म्हणाला, "आम्ही हातापायांनीं अधू आहोंत, आम्हांला लहानपणीं फिट्स् येत होत्या, आम्ही शिकलों नाहीं, आम्ही विद्वान् नाहीं, भावाच्या जिवावर आम्ही जगतों म्हणून आम्हांला तूं बाबूभाऊजी म्हणत नाहींस काय?"

"तसं नाहीं बाबू."

"आधीं भाऊजी म्हण, अहो जाहो म्हण. निदान बाबूराव तरी म्हण. हीं पोरं आम्हांला ए बाबूकाका म्हणतात. अरे, जारे, करतात. आम्ही ओ नाहीं देणार."

"काय रे वामन्या, काय ग गोदे, काकाला अरे जारे करतां? आजपासून "अहो बाबूकाका" म्हणत जा."

बाबू किंचित् खुलून या पायावरचा भार त्या पायावर घालून म्हणाला, "आणि तूं सुद्धां आम्हांला आहो जाहो म्हणत जा. लोक हसतात. उपहास करतात. दिराची कांहीं किंमत नाहीं म्हणतात.

"असं म्हणणाराची शेती पिकायची नाहीं बाबू. तुझ्यासारख्या माणसाचा उपहास करायचा म्हणजे काय? माझं ऐक तूं, तूं कांहीं कोणाच्या नादीं लागूं नकोस. कोण काय म्हणतंय तें ऐकूं नकोस. घरांत तुला कोणी कांहीं म्हणत नाहीं. तुझ्या भावाचं तुझ्यावर प्रेम आहे. तूं बसून खातोस असं कांहीं त्यांना वाटत नाहीं."

"म्हणून काय झालं?" झटक्यानें तो अधू हात वर नेत बाबूकाका अजूनहि तिरमिरतच म्हणाला, "तुम्हांला नसेल वाटत पण आम्हांला वाटतं. आम्हांला वाटतं कीं, आम्ही नुसतं गिळतों आणि नुसत्या माश्या मारतों."

"माश्या मारूंच नव्हेत." वहिनी मुलांच्या पानावर भात वाढत म्हणाली, "होईल तें काम करावं माणसानं."

"काम रगड केलं, पण त्याचं चीज काय झालं? तर आम्ही नुसते बाबू! भाऊ मोठा, कर्ता, मिळवता, घराचा आधारस्तंभ म्हणून तो आम्हांला नुसतं बाबू म्हणणार. तूं वहिनी असून भाऊजी नाहीं म्हणणार—"

"अरे बाबा, पण मुलाला कोणी राव पंत म्हणतांना ऐकलं नाहीं अजून. राजेरजवाडे लोक मुलाला साहेब-सरकार म्हणतात. आईबाप मुलाला अहोजाहो म्हणायला लागले नाहींत, समजलास? बैस मुकाट्यानें पानावर. हात धुऊन ये. आणि जेवायला लाग. चार घास पोटांत गेले कीं शांत होशील."

बाबू मुकाट्यानें हात धुवायला गेला. पानावर येऊन बसला. एकामागोमाग घास घेऊं लागला. जेवतां जेवतां बाबू विचार करीत होता. त्याला वहिनीचें हळू हळू पटत होतें. मनांतल्या मनांत सगळेंच पटत होतें. वहिनीनें आपल्याला मुलाप्रमाणें मानावें हें आवडतहि होतें. परंतु काय होत होतें कोण जाणे! मोठ्यानें कबूल करायला त्याचें मन आढेवेढे घेत होतें. चार लोकांचें जीवन बाबू पहात होता आणि कष्टी होत होता. आपण अधू असल्यामुळें, अशक्त असल्यामुळें चार लोकांसारखें आपल्याला जगतां येत नाहीं याचें त्याला मनस्वी दुःख होई. लोकांना आपला उपयोग नाहीं, लोकांना आपल्या बुद्धीची किंमत नाहीं, लोक आपल्याला आपल्या वयाकडे पाहून अहोजाहो म्हणायलासुद्धां तयार नाहींत. यानें त्याचा तडफडाट होई. कां म्हणून पण एवढें परावलंबन? आम्ही काय कोणीच

नाहीं कीं काय ! कां म्हणून भावाच्या पैशावर जगायचें आणि भावजयीकडून भरवून घ्यायचे ? आईबाप कशाला हवेत या वयांत ? या वयांत मीच चार मुलांचा बाप असायचा. तिथें ही वहिनी म्हणते, तूं माझा मुलगा आहेस, छे !

बाबूनें मान झटकली. त्या झटकण्यांत आवेश होता. पण अवसान नव्हतें. बाबूची मान झटकण्याच्या आवेशांत लटलट हलली. त्यामुळें कारुण्य दिसलें आणि आवेश लपला गेला. वहिनीला वाटलें, बाबूला दुःख झालें आहे. पण बाबूला राग आला होता. आपला ! आपल्या नशिबाचा.

त्या रागाच्या भरांत पाय फरफटत फरफटत बाबू पानावरून उठला. त्यानें चुळा भरून टाकल्या. आणि तशाच पद्धतीनें पुन्हा परत येऊन तो बाहेरच्या खोलींत सतरंजीवर बसला. त्याचें मन रडत होतें आणि एकीकडे भांडत होतें. त्यानें पाय दुडमडून घेतले. मग पुन्हा सैल सोडले. मग पुन्हा त्या पायांची दुहेरी अढी घातली. आणि एकाएकी आपल्या बेसूर, भसाड्या परंतु आक्रांत करणाऱ्या आवाजात तो कविता म्हणूं लागला, "नकोत मजला पांगुळ-गाडे ! नको जिणें हें लाजिरवाणें मीच आई अन् मीच बाप परी। म्हणती मजला पोर पोरका ॥"

याच ओळी आळवून आळवून बाबू एक-सारखा म्हणत राहिला. हातवारे करीत राहिला. इतक्या जोरानें कीं त्याला सीमा राहिली नाहीं. त्या म्हणण्यांत तडफड होती आणि भांडणहि होतें. तें असह्य होऊन वहिनी आली; आणि कमरेवर हात ठेवून त्याच्यासमोर नुसती उभी राहिली. थोडा वेळ वहिनी आली आहे हें बाबूला समजलेंच नाहीं. जेव्हां समजलें तेव्हां त्याच्या स्वरांतला जोर कमी झाला. तिचे डोळे एखाद्या महिषासुरमर्दिनीसारखे वटारलेले दिसूं लागले तेव्हा बाबूच्या स्वरांतला जीवच लटका पडला. आपल्या मनांत पुष्कळ असलें तरी वहिनीपुढें आपलें चालत नाहीं, आपलें कुणा-पुढेंच चालत नाहीं याचा त्याला अत्यंत विषाद वाटला. आणि एक प्रकारची दुबळी चीड मनांत उत्पन्न झाली. त्यामुळें आपलें गाणें त्याला सोडवेना. म्हणून तोंडाला फेस आला होता, तो सदऱ्याच्या बाहीला लहान मुलासारखा पुसून रडव्या चेहऱ्यानें बाबू रें-रें करीत हट्टानें गाणें म्हणतच राहिला.

वहिनीनें दृष्टि सौम्य केली. कमरेवरचे हात खालीं आणले. आणि स्वरांतला करडेपणा कायम ठेवून ती म्हणाली, "हें शोभत नाहीं तुला."

"क्यॅय शोभत नाहीं ?" तिच्या अंगावर डाफरून जात बाबूनें विचारलें.

"तें आपल्या मनाला विचारून पहा."

"आमच्या मनाला आम्ही पुष्कळ विचारतों. पण लोक कुठें आमच्या मनाला विचारतात ?"

"तुझ्या मनाला काय विचारायचं रे येतां-जातां ? खायला प्यायला देतें ना ? हंतरा-पांघरायला देतें ना ? अंगाखांद्यावर कपडा असतो ना तुझ्या ? खुशाल खावं-प्यावं आणि झोपून रहावं. आरडाओरडा करून घर कशाला डोक्यावर घेतोस ?"

"तुला वाटतो आरडा ओरडा. पण आम्ही कविता करतो वहिनी. ती मनापासून असते म्हणून मन ओरडायला लागतं."

"कविता रे कशाला करतोस वेड्या ?"

"मग काय मी जनावरासारखा जगूं ?" एकाएकी अवसान येऊन धडपडत उभा होत बाबू म्हणाला, "मी मनुष्य आहें ना ? काय ग आम्ही मनुष्य आहोंत ना ? आम्हांला नुसतं खायला मिळालं कीं झालं का ? लाज राखा-यला कपडा मिळाला कीं झालं का ? मग आम्हांला गोठ्यांत कां नाहीं बांधून ठेवत ? पण आमच्या डोक्यांत विचार येतात वहिनी. विचारांचं काहूर माजतं. भावनांचा कल्लोळ होतो. वाटतं कीं डोकं फुटून जाईल आणि हृदय फाटून जाईल."

कल्पना नसतांना बाबू एकाएकी ओक्सा-बोक्शी रडूं लागला. पाण्याचा लोंढा यावा तसा दुःखाचा पूर त्याच्या अंतःकरणांत उसळून आला. दसादसा रडून त्यानें जमिनीवर डोकें आपटून घेतलें. तोंडांतून फेस आणि डोळ्यांतून पाणी गळत असतांनाच बाबूनें स्वतःच्या गालफडांत मारून घेतल्या. त्याच्या नाकांतलें पाणी एखाद्या लहान मुलासारखें वहात होतें.

वहिनी पुढें झाली. बाबू आपला दीर आहे हें ती विसरली. त्याला चाळिसावें वर्ष आहे हें ती विसरून गेली. बाबू मोठा थोरला पुरुष माणूस आहे हेंहि ती विसरली. आणि पुढें होऊन तिनें त्याच्या पाठीवर थोपटलें. डोक्या-वरून थोपटलें. सांत्वनादाखल तिनें फक्त गाई-वासराला चुचकारावें तसे शब्द तोंडानें काढले. तिची ती भावना, तिचा तो स्पर्श बाबूच्या ओळखीचा होता. बाबूच्या मनाला या चुचकार-ण्यानें आजपर्यंत पुष्कळ सावरलें होतें. पण आज बाबू अनावर झाला होता. त्यानें तिचा हात झिडकारला आणि तो तसाच फराफरा चालत स्वयंपाकघरांत गेला. पाण्यानें भरलेलीं वहिनीचीं सगळीं भांडीं त्यानें भडाभड मोरींत ओतून दिलीं. प्रत्येक भांडें त्यानें रिकामें केलें. अगदीं शेवटलें छोटेंसें भांडेंहि त्यानें मोरींत ओतून दिलें. तोंपर्यंत वहिनी नुसता तमाशा बघत उभी राहिली.

मग कमरेवर हात देऊन ती बाबूपुढें येऊन उभी राहिली. डोळे कडक लक्ष्मीसारखे केले.

म्हणाली, "ही बालदी घे. आणि पुन्हा सगळं पाणी होतं तसं भरुन ठेव."

"ठेवणार नाहीं." बाबू भीत भीत उत्तरला. त्याचा उमाळा कमी झाला होता. तिरमिर शांत झाली होती. आणि नेहमींसारखाच तो घाबरला होता. तरीसुद्धां दुःखाच्या पिळानें तो नकारार्थी मान हलवीत राहिला—

पण मानेनें नाहीं नाहीं म्हणत बाबूनें हातानें कळशी उचलली. नळाखालीं नेऊन ठेवली. आपण काय केलें हें त्याच्या आतां ध्यानांत आलें होतें. वहिनी दिवसभर काम करते. तिला मदत करण्याऐवजी आपण तिचें काम वाढवून ठेवलें याची थोडीशी खंत त्याच्या मनांत उद्भवली होती. म्हणून जास्त न बोलतां तो पाणी भरण्याच्या कामाला लागला होता. अधू पायानें शरीर ओढत, निकामी हात तसाच लोंब-कळता ठेवून धड हातानें बाबू पाणी भरण्याचें काम करत होता. असें पाणी भरायचें तरी किती ? अंगांत त्राण तरी आहे का आपल्या ? कां देवानें आपल्याला असें लुळेंपांगळें करून ठेवलें ? कां म्हणून डोक्यांत मेंदू भरला आणि हाता पायांतला जीव काढून घेतला ? त्यापेक्षां निर्बुद्ध पण घडधाकट असतों तर किती बरें झालें असतें ? असे कांहीं विचार बाबूरावांचे सुरू झाले. आणि पाणी भरण्याचें काम थांबून गेलें. बाबू विचार करीत उभा राहिला.

वहिनी आपल्या खोलींतून म्हणाली, "पुरे झालं पाणी भरून. आतां जरा स्वस्थ बैस. चहा देतें तो घे. आणि कुठें जाऊन यायचं असलं तर जाऊन ये."

"म्हणजे आमचा उपयोग नको व्हायला. ह्या बाबूचा कांहीं उपयोग नाहीं असं म्हणायला बरं झालं. पण आम्ही कुठेंहि जाणार नाहीं. बसूनहि रहाणार नाहीं. तुझं जितकं पाणी सांडलं आहे त्याच्या दुप्पट भरून देईन. तुला वाटत असेल कीं बाबूच्या अंगांत जोर नाहीं; मनाला धमक नाहीं. पण तूं पहाच आतां." असें म्हणून बाबूनें कळशी नळाखालीं धरली. त्याचें मन पुन्हां कविता जुळवूं लागलें. वेळीं-अवेळीं आपल्याला कविता कां सुचतात ते त्याला कळेना. कविता आणि पाणी भरणें यांत कसलें साम्य आहे आणि कसला विरोध आहे तें क्षणभर त्याला कळेना. पण दुसऱ्या क्षणीं पाण्यानें जड झालेली आपल्या मारावलेल्या हातांतली कळशी, ओठाशीं जन्म घेणारा कवितेचा नवा चरण यांतला विरोध जणुं त्याच्या ध्यानांत आला आणि पहातां पहातां बाबूनें हातांतली कळशी खेळणें फेकावें तशी भिरकावून दिली. आणि ती नेमकी दारांत उभ्या असलेल्या त्याच्या भावाच्या पायाशीं पडली. थोडक्यांत चुकलें, नाहीं तर भावाचा पायच जायचा. पण कळ-शींतलें पाणी भळाभळा सांडलें आणि सगळ्या खोलीभर पसरलें. तें पाहून दादाचें पित्त भडकलें. तो कामावरून दुपारचा जेवायला घरीं आला होता. त्रासला होता. त्यानें पन्नाशी उलटली होती. आणि लहानपणापासून कष्ट करून, घराचा भार वाहून, आपल्या पांच बहिणींचीं लग्नें करून देऊन आणि या पांगळ्या भावाला संभाळून संभाळून तो आतां दमला होता. त्याला आतां कांहीं सहन होईनासें झालें होतें. बहिणींची लग्नें व्हावींत म्हणून त्यानें स्वतःचें लग्न पुष्कळ उशीरा केलें होतें त्यामुळें त्याचीं मुलें लहान होतीं. त्यांचें अजून सगळें व्हायचें होतें. बायको तरुण होती. तिची त्याला काळजी वाटत होती. दिवस थोडे होते आणि जबाबदाऱ्या फार होत्या. त्यामुळें त्याला पूर्वींचा धीर राहिला नव्हता. थोडें निमित्त मिळालें तरी तो संतापत असे. आज तर काय बाबूनें कळशी भिरकावून पायावर अभिषेक केला होता. तीच कळशी लाथेनें उडवीत तो बायकोला म्हणाला—बायको घरांत आल्यापासून तो आतां बायकोलाच फैलावर घेत असे. आत्तांहि त्यानें तसेंच केलें. "जेवायच्या वेळीं ही मारामारी कसली चालली आहे ? मी या वेळीं रोज घरीं येत असतों हें माहीत आहे ना तुला ? चार घास खायला मिळतील आणि अर्धा घंटा स्वस्थ मनानं पडतां येईल म्हणून आशेनं घरीं यावं तर तुमच्या मारामाऱ्या अन् लठ्ठालठ्ठी. हें पहा, मला हें झेपत नाहीं आतां. तुमचं जर हें असंच चालणार असेल तर तुम्ही वेगळे रहा आणि मी वेगळा राहीन. काय चार पैसे लागतील ते देत जाईन दरमहा. पण हा छळवाद मला नको आहे."

दादांच्या बायकोनें एका शब्दानें उत्तर दिलें नाहीं. तिनें त्यांच्या वहाणा उचलून ठेवल्या. कोट खुंटीला लावला. मोरींत पाय धुवायला तांब्या भरून ठेवला. खुंटीला हात पुसायला रुमाल ठेवला. आणि खालच्या मानेनें मुकाट्यानें ती सांडलेलें पाणी पुसूं लागली.

दादाला पहातांच बाबू दुसऱ्या खोलींत पळून गेला होता. पण दुसऱ्या खोलींतून दादाचें सगळें भाषण त्यानें ऐकलें होतें. त्याचाहि तें ऐकून जळफळाट झाला. लेकी बोले सुने लागे ! बायकोवर जोडा उगारला की भावाच्या टाळ-क्यांत बरोबर बसतो हें काय मला समजत नाहीं ? वेगळें व्हायच्या गोष्टी माझ्याबाबत आहेत. भावाभावांनीं वेगळें व्हायचें असतें. नवरा-बायको कांहीं वेगळीं होत नाहींत. सग-ळ्यांचें करून करून तूं दमलास. आणि सगळ्यांच्या लाथा खाऊन खाऊन मीसुद्धां नाहीं का दमलों ? पांगळा असल्यामुळें मी तुमच्यापेक्षां आणखी दमलों आहें. पण मला







विचारतो कोण? मला विचारायला काय मला बायको आहे कीं माझ्या नांवावर एखादें घरदार आहे? दादा जेवून उठून घराबाहेर जाईपर्यंत बाबू स्वतःशींच बोलला होता. दादाला तो भीत होता. पण दादाचें पाऊल घराबाहेर पडायचाच अवकाश, कीं बाबू फराफरा पाय ओढत वहिनीपुढें येऊन उभा राहिला. वहिनी जेवायेला बसली होती. तिचें जेवण पूर्ण होण्याच्या आंतच बाबूनें तिरसटपणानें हांक मारली, "वहिनी—"

वहिनीनें लक्षच दिलें नाहीं.

"वहिनी!" मोठ्यानें हांक आली.

"मला ऐकूं येतंय."

"मग ओ कां नाहीं देत?"

"जरा वेळानं ये बाबू." तोंडांत घास घालत वहिनी उत्तरली.

"जरा वेळानं काय आहे?" हात वर नेऊन बाबूनें विचारलें.

"जरा वेळानं मी रिकामी आहें."

"मग आत्ता तरी काय काम आहे तुला?"

"मी जेवतें आहें बाबू. जेवतांना मला तंटेबखेडे नको असतात. जेवण झाल्यावर ये."

बाबू क्षणमात्र घुटमळला. पण त्याला बोलल्याशिवाय रहावत नव्हतें. तो जायला निघाला होता तरी मागें वळून म्हणाला, "तंटेबखेडे तुला नको असले तरी आम्हांला हवे असतात. तू जेवायला बसलीस कीं या गोष्टी आम्हांला जास्ती गोड लागतात. वेगळं घर करायला सांगितलं ना दादांनीं?"

वहिनी "आ" करून पहातच राहिली. तिला परमावधीचें आश्चर्य वाटत असलेलें दिसत होतें. तिच्या मनांत लक्षावधि विचार आल्याचें तिच्या चर्येवरून स्पष्ट दिसत होतें. पण ते सगळे विचार मनांतच ठेवून ती म्हणाली, "तें माझं आणि त्यांचं बोलणं होतं. तुला कशाला हवी ही उठाठेव?"

"कशाला हवी म्हणजे?" वहिनीपुढें दोन्ही पाय पसरून लहान मुलासारखा पहात बाबू म्हणला, "आमच्या वरुनच तर सगळा बेत चालला होता."

"तुझं नांव तरी घेतलं होतं त्यांनी?"

"आमचं नांव न घेतांच तुझ्या नांवानं तो मला बोलतो."

"बरं बोलले." वहिनी भांड्यांतलें पाणी खरकट्या ताटांत ओतत म्हणाली, "तरी तुझ्या अंगाला भोकं नाहीं ना पडलीं?"

"आमच्या अंगाला नाहीं, पण मनाला पडलीं. समजलीस?"

"कांहीं नको समजावून सांगायला. वेडे-वाकडे विचार करून करून डोक्यांत किडे पडायला लागलेत तुझ्या. जा जरा बाहेर जाऊन ये. मला छळूं नकोस",

"छळतां तुम्ही दोघं. आणि आमचं नांव घेतेस! आम्हांला सगळ्या कारवाया समजतात. आम्हांला नुसता अन्नाचारी राबवून घेतां घरांत. कवडीची किंमत नाहीं आम्हांला. आमच्या बापानं घर ठेवलंय आम्हांला. माहीत आहे?"

"आहे माहीत." प्रश्नाचा रोख न कळून वहिनीनें उत्तर दिलें.

"पण तें घर आहे तुझ्या नवऱ्याच्या नांवावर आमच्या नाहीं. आमच्या नांवानं एक खोलीसुद्धां ठेवली नाहीं वडिलांनीं आमच्या. आम्ही हे असे पंगू. आम्हांला लहानपणीं फिटा यायच्या. आम्हांला नाहीं विद्या. नाहीं चाकरी. नुसत्या कविता करून आम्ही काय दिवे लावणार? म्हणून आमच्या वाटणीचं जें होतं तें सगळं दादाच्या नांवावर करून दिलं. दागदागिना नाहीं. कपडालत्ता नाहीं. घरदार नाहीं. पैसाअडका नाहीं. सारं टाकलं दादाच्या झोळींत. आणि त्या झोळींत मलाहि टाकला."

"मग तुला संभाळत नाहींत का ते बाबू?"

"मोठे उपकार केले आमच्यावर." चांगला हात वर न्यायचा प्रयत्न करीत आणि चेहरे वेडेवाकडे होत बाबू तावातावानें उत्तरला, "तो नाहीं त्याचा बाप संभाळील. आम्हांला संभाळून त्याचं काय नुकसान झालं आहे? सगळा इथून तिथून फायदाच फायदा! आम्ही जर धडधाकट असतों, आम्ही जर बी. ए. झालो असतों, आमचं जर लग्न झालं असतं तर दादाला यांतला अर्धाच वाटा मिळाला असता."

"खरं आहे बाबू, खरं आहे." वहिनी कळवळून म्हणाली. "तुला वाटतं तें अगदीं बरोबर आहे."

"उगाच तोंडदेखलं बोलूं नकोस. तुम्ही दोघंहि खोटीं माणसं आहांत वहिनी."

"तें तूं त्यांना सांग. मला सांगूं नकोस." हें चऱ्हाट आतां वाढत जाणार म्हणून वहिनी आवरतें घेण्यासाठीं म्हणाली.

"तुलाच सांगणार आम्ही. दादा आमचं ऐकायला कुठें येणार आहे? माझ्याशीं एक शब्द तरी बोलतो का तो? नुसता संभाळतो. पण बोलत नाहीं. तुम्ही जर दोघं खरीं असतांत तर हें घर—हें घर वहिनी तुम्ही घेतलं नसतंत."

"मग?"

"तें तुम्ही मला दिलं असतंत. जगांत पांगळ्याचं रक्षण करायचं असतं ना? त्याची सोय जास्ती नको का पहायला? दादा मिळवतोच आहे. पण हें घर, हे दागिने, हीं भांडींकुंडीं जर आमच्या एकट्याच्या नावानं बाबांनीं करून दिलीं असतीं, तर मी माझ्याच जिवावर नसतों का जगलों? तुमचे उपकार घ्यायची वेळ आली असती का? मला संभाळावं लागलं असतं का मग तुम्हांला?"

"अरे पण तुला हें घर संभाळतां आलं असतं का? तें आलं नसतं म्हणून तर—"

"आलं नसतं तर काय झालं असतं?" प्रश्नाचा सूर वर नेऊन प्रश्नासारखाच उभा होत बाबू म्हणाला, "घर गहाण टाकलं असतं. मी बुडालों असतों. आमचं वाटोळं झालं असतं. पण आम्ही स्वतंत्र तर राहिलों असतों वहिनी? तुमच्या घरीं तुकडे मोडा, पाणी भरा—"

"आजपासून तूं पाणी भरूं नकोस बाबू."

"पाणी नाहीं भरत—आणि कांहीं नाहीं करत. मी हें घर सोडून आतां वेगळाच रहाणार आहें."

"बरं!" त्याचें अवसान बघून हसत हसत वहिनी एवढेंच उद्गारली आणि दुसऱ्या खोलींत जाऊन दार लावून झोपून गेली.

बाबू त्याच पावलीं पाय ओढत घराबाहेर पडला. आणि जागेच्या शोधार्थ फिरूं लागला. ह्याच्याकडे जा. त्याच्याकडे जा. मी वेगळें बिऱ्हाड करणार आहें असें सांग. आपलें घरांत पटत नाहीं. आपण काय राजा माणूस. वेगळी खोली. वेगळा संसार. हातानं दोन चपात्या भाजल्या, तामल्यांत मूठभर तांदुळाचा भात शिजवला, कीं झालं. लहान मुलासारखा तर आहार आहे आमचा. हवी कशाला ती गुंतागुंत? मी वेगळा राहीन. मला बापड्याला एक अर्ध्या खणाची खोली द्या.

असें ज्याला त्याला सांगून बाबूनें शोधाशोध चालवली. आणि त्याच्या नशिबानें त्याला अर्ध्या खणाची खोली भाड्यानें मिळाली.

दिवेलागणीला बाबू घरीं आला. त्याला वाटत होतें, वहिनीनें विचारावें, "मिळाली का खोली?"

पण तिच्या तें गांवींच नव्हतें. बाबूला राग आला. आपल्याला ही अर्धवट समजते याचा त्याला संताप आला. थोडा वेळ इकडे तिकडे करून त्यानें गोदूला आणि वामनला जवळ बोलावलें आणि सांगितलें, "मला एक खोली मिळाली आहे."

"कशाला?" वामननें विचालें.

"तें मग सांगीन. सध्या एवढंच लक्षांत ठेव, कीं तुझ्या बाबूकाकाला जागा मिळाली आहे. तुम्ही समजतां तसा तो लेचापेचा नाहीं. धमक आहे अंगांत. जरा आहो-जाहो म्हणत जा."

"बरं!" गोदू अभावितपणें म्हणाली.

"नुसती बरं काय म्हणतेस? जा तुझ्या आईला आणि बापाला जाऊन सांग; म्हणावं बाबूकाका आतां वेगळा रहाणार आहे."

"मी नाहीं सांगणार. आई मारील मला." गोदू घाबरून म्हणाली.

"मी सांगेन रे बाबूकाका." वामन जोरांत म्हणाला. वेगळें बिऱ्हाड म्हणजे काय तें त्याला समजलेंच नव्हतें. तो धांवत निघाला तसा त्याला धरून बाबू म्हणाला, "मीच सांगेन वहिनीला. तूं बैस इथेंच" आणि मग बाबूनें खिशांतून चेंडू काढला. तो वामनला दिला. रिबिनी काढल्या. त्या गोदूला दिल्या. "जा आतां झोपा. सकाळीं माझं सामान आवरायला या."

"बरं." आपापल्या वस्तू पहात दोन्ही मुलें निघून गेलीं. बाबू मुकाट्यानें जेवला आणि मुकाट्यानें हंतरुणावर पडला. त्याला किती तरी वेळ झोप येत नव्हती. एवढें मोठें वडिलार्जित घर सोडून अर्ध्या खणाच्या बोळकांडींत रहायला जायचें म्हणजे त्याला कसेंसेंच होत होतें. पण त्याला कांहीं इलाज नव्हता.

दादा-वहिनी कांहीं विचारतात कीं काय याचा कानोसा तो घेत होता. पण कोणी कांहीं त्याला विचारलें नाहीं. नेहमींप्रमाणें जेवणेंखाणें होऊन माणसें झोपीं गेलीं.

नेहमीं प्रमाणेंच दादा-वहिनी लौकर उठलीं. आणि चहापाणी होऊन दादा कामाला गेला. तावडतोड बाबू वहिनीसमोर येऊन हजर झाला. त्याच्या एका हातांत वळकटी होती. शेजारीं कपड्यांची छोटी पेटी होती. भांड्यांचा खोका होता. फिरकीचा तांब्या होता. दुसरीकडेच पहात बाबू म्हणाला, "वहिनी, मी माझ्या जागेंत जातों."

वहिनी मुखस्तंभ होऊन पहात राहिली. 'कधीं आणि कुठें?' तिनें विचारलेंच नाहीं. थोड्या वेळानें तिला हसूं आलें.

पण बाबूचा कंठ रुद्ध झाला होता. तो भरल्या गळ्यानें म्हणाला, "हसूं नकोस वहिनी. माणूस जवळ असतं तेव्हां त्याची किंमत नसते. मी गेल्यावर कळेल तुला. मग बोलावूं नकोस परत. आणि प्राण गेला तरी मी परत यायचा नाहीं. दादांचाच भाऊ आहें पंगू झालों तरी! पण एवढं लक्षांत ठेव, कीं या विद्या नसलेल्या दिराचं तुझ्यावर अपरंपार प्रेम आहे. आकाशांतील चंद्र, सूर्य, तारे जरी निखळून खालीं आले तरी माझं प्रेम रतिभरसुद्धां कमी होणार नाहीं. गोदू, वामन कुठें आहेत?"

गोदू व वामन, रडत रडत काकाच्या समोर आले. बाबूनें त्यांना खूण केली. आणि त्यांनी सामानाचा कांहीं भाग शक्तीप्रमाणें उचलला. हातांत वळकटी घेतलेला बाबू, आणि पाठीमागें तांब्या आणि भांडीं घेतलेली तीं दोन रडत रडत जाणारीं मुलें मागें न पहातां घराबाहेर पडलीं. वहिनी मूढ होऊन पहात राहिली. दोन तीन खेपा करून बाबूनें आपलें सामान नेलें. "आतां कधीं म्हणून या घरांत पाऊल टाकणार नाहीं. आम्हांला ज्यांना भेटावंसं वाटत असेल त्यानं आमच्या घरीं यावं." असें सांगून, वहिनीला उभ्या उभ्याच नमस्कार करून बाबू घर सोडून गेला.

वहिनीनें एक दिवस नवऱ्याला सांगितलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं सांगितलें. त्यानें एकदां नुसतें "हूं" केलें. मग म्हणाला, "मला त्याचं कांहीं सांगत जाऊं नकोस."

पोरें आपलीं सकाळ-संध्याकाळ बाबूकडे चक्कर टाकून येत. आज काय बाबूकाकाची भाकरी करपली. उद्यां काय बाबूकाकाचा भात कच्चाच राहिला. परवा बाबूचे सगळें दूध उताला गेलें, त्याला धड चहासुद्धां करतां येत नाहीं. अशा हकीकती मुलें आपल्या आईला जाऊन सांगत.

बाबूलासुद्धां चारसहा दिवसांतच वैताग येऊं लागला. चूल पेटवणें त्याला जमेना. आंघोळीला सार्वजनिक नळावर नंबर लावावा लागतो याचा संताप येऊं लागला. घराचें आढें डोक्याला लागतें, अर्ध्या खणांत सामान मावत नाहीं, खिडकींतून वारा येत नाहीं, खोलीला मोरीसुद्धां नाहीं, अशा अनेक अडचणी त्याला दिसूं लागल्या. एक दिवस बाबू गोदूला म्हणाला, "गोदे, तुझ्या आईला सांग, म्हणावं, बाबूकाकाला विरजण लावतां येत नाहीं."

दुसऱ्या दिवशीं गोदी दह्याचा सट घेऊन आली.

दोन दिवस तसेच कसे तरी गेले. मुलें रोज काकाला भेटायला यायचीं. तिसऱ्या दिवशीं बाबूनें वामनजवळ कणीक दिली. "तुझ्या आईला म्हणावं, बाबूकाकाला पोळ्या करतां येत नाहींत."

वामन दुसऱ्या दिवसापासून वरून पोळ्या घेऊन येऊं लागला.

मग एक दिवस गोदीजवळ तुरीची डाळ देऊन बाबूनें वहिनीकडून आमटी करवून आणली. रोज मग कोणी तरी बाबूला वरण

आणि पोळ्या आणून पोचवूं लागलें.

एक दिवस बाबू स्वतःच पाय ओढत ओढत घराच्या दारापर्यंत गेला. बाहेर उभे राहून त्यानें गोदीला हाका मारल्या. वहिनी खिडकीच्या फटींतून पहात होती आणि स्वतःशींच हसत होती. ती पुढें आली नाहीं. गोदी दारांत आली तशी तिच्याजवळ लहान लहान वांगीं देऊन बाबू म्हणाला, "तुझ्या आईला म्हणावं, मला भरलीं वांगीं करून हवीं आहेत."

"अरे पण तू आंत ये ना बाबूकाका."

"शूऽऽ! मुकाट्यानें आंत जा."

गोदी आंत गेली. बाबू परत आला. विचार करीत बसला. त्याला या खोपटांत चैन पडेना.

दुसऱ्या दिवशीं बाबू गाजरें घेऊन गेला. आज त्यानें वहिनीलाच हाक मारली. कांहीं झालेंच नसल्याप्रमाणें ती दारांत उभी राहिली. बाबूच्या हातांतील गाजरें घेऊन तिनें विचारलें, "याचं काय करायचं?"

बाबू जरा गडबडला. पण म्हणाला, "गाजराचा हलवा करून दे. मात्र वेलची आणि जायफळ घाल हां भरपूर. नाहीं तर उग्र वास येतो."

वहिनी "बरं" म्हणाली आणि गेली.

ती अधिक बोलली नाहीं. तिनें त्याला आंत बोलाविलेंहि नाहीं. बाबूला चुटपुट लागली. हळहळल्या मनानें तो घरीं आला.

दुसऱ्या दिवशीं वामन हातांत गाजराचा हलवा घेऊन तयार!

"काय रे वामन? वहिनी काय म्हणाली?"

"कांहीं नाहीं."

"कांहीं नाहीं?"

"अंऽहं!'

"एक अक्षरसुद्धां नाहीं?"

काय करावें तें बाबूला सुचेना. सारखी वहिनीची आणि दादाची आठवण येऊं लागली. वहिनी किती चांगली आहे आणि दादा सोशीक आहे तें सारखें त्याला आठवूं लागलें. आपलें घर दादाच्या नांवावर आहे तेंच बरोबर आहे असें त्याचें त्यालाच वाटूं लागलें. आपण त्या घराचा बट्ट्याबोळ केला असता त्याची त्याला खात्री वाटूं लागली. त्या घरांत कसें शांत वाटतें. प्रसन्न वाटतें. इथें काय सगळा दरिद्री कारभार! वहिनीच्या हाताला किती चव आहे! बाबू वामनला म्हणाला, "उद्यांपासून तुम्ही नका आणूं डबा, मीच घेऊन येईन."

आणि दुसऱ्या दिवसापासून बाबू स्वतःच डबा घेऊन घराच्या दारांत उभा राहूं लागला. वहिनी डबा भरून दारांत आणून द्यायची. बोलायची नाहीं. बघायची नाहीं. जशी कांहीं वर्षांनुवर्षें ती असेंच करत आली होती. बाबू डबा स्वतःच्या खोपटांत आणून खायचा. शेजारीं गोदू नाहीं. वामन नाहीं. रात्रीं सोबतीला कोणी नाहीं. बाबूच्या डोळ्यांत पाणी डबडबूं लागले.

एक दिवस गेला. दोन दिवस गेले. एकंदर किती दिवस झाले याची मोजदाद झाली. आणि मग सपाट्यासरशीं पाय फरफरावीत बाबूनें सगळें सामान गोळा केलें. वळकटी बांधली. भांडीं खोक्यांत भरलीं. कपडे पेटींत ठेवले. प्रवासी तांब्याचें झाकण फिरवलें. हात वर नेत तो स्वतःशींच बडबडूं लागला. आणि मग एका हमालाच्या डोक्यावर सामान देऊन खोपटाचा दरवाजा तसाच उघडा टाकून बाबू वहिनीच्या दारांत येऊन उभा राहिला. क्षणभर उभा राहिला, आणि मग त्यानें सामान आंत नेलें. आपण आंत गेला. आणि वहिनी स्वयंपाकघरांत पोळ्या लाटत बसली होती तिच्यापुढें पाय पसरून बसला म्हणाला, "मला जेवायला वाढ."

वहिनी मुकाट्यानें उठली. बाबूसाठीं तिनें ताट मांडलें. आणि पोळीशीं साखर वाढून लोणकढ्या तुपाची धार धरली. • • •










## रा. रं. बोराडे

शहाजी सांगत होता व आबाराव कान देऊन ऐकत होते. वाक्या-वाक्याला हुंकार करीत होते. गोष्ट आतांशी रंगांत येत होती. क्षणाक्षणाला उत्कंठा वाढवीत होती. गोष्ट फारच मजेदार होती...



आबाराव पाटील बैठकींत बसले होते. खाकी रंगाची गोटदार चंची उघडून पान खात होते. एवढ्यांत त्यांचं शेंडेफळ धावत आलं. त्यांच्या मांडीवर बसत म्हणालं,

"नाना, दाजी आलेत आपले."

आबारावांनीं आश्चर्यानं विचारलं—

"कोन दाजी रं?"

"आपले पळसपचे दाजी—"

"पारबतीचा नवरा?"

"व्हय."

"कवा आलाय?"

"आताच आलेत."

"कुठं बसलाय?"

"पारावर हायीत. दादा आन् ते बोलत बसलेत."

आबारावांचा चेहरा उतरला. हातांतलं पान त्यांनीं तसंच खालीं ठेवलं व ते लगबगीनं स्वयंपाक घरांत आले. पत्नीला म्हणाले,

"बगितलाव का आपल्या जावयाची करतुक?"

आनसाबाईंना त्यांच्या बोलण्याचा कसलाच उलगडा झाला नाहीं. त्यांनीं विचारलं,

"काय झालं?"

"सवारी आली की."

"कसली सवारी?"

"पारबतीचा नवरा आलाय्."

"आन् आठ दिवस बी झाले नव्हते की यिऊन?"

"दम निघाला न्हाई; आला पळत. लोकांच्या बायका चार चार म्हयने म्हायेरी र्‍हात्यात, पर ते चुकून तोंड दावीत न्हाईत. आन्

त्याला म्हयनाभर दम निघंना. म्हयन्यांत तीन चकरा झाल्या. सारं गांव नांव ठिवाया लागलया मला. अमक्या अमक्याचा जावाई किती बाईलयेडा हाय, आसं म्हनाया लागलंया."

"मग न्हीऊन घालावं हिला."

"कसं न्हीऊन घालावं! म्हयनाभर वी झालं न्हाई की आनून."

"मग कसं करताव?"

आबारावांनीं थोडा वेळ विचार केला व चुटकी वाजवीत ते म्हणाले,

"काल तुमाला सांगिनलं तसं करतों. पुना म्हनून त्यानं हिकडं यायचं नांव घिऊनी लागंल."

एवढा वेळ पारबती पायाच्या बोटाचीं नखं साफ करीत होती. बापाचं बोलगं कान देऊन ऐकत होती. आबारावांच्या बोलण्यानं ती हलली व घाबरलेल्या आवाजांत बापाला म्हणाली,

"आबा, आसं काय करू नका. लई रागीट सोभाव हाय त्येंचा."

आबाराव तिच्याकडं अर्थपूर्ण दृष्टीनं पाहत म्हणाले,

"म्हंजी दोघांचं वी अगोदरच संगनमत झालेलं दिसतंय."

आबारावांच्या या बोलण्यानं पारबती एवढी लाजली की ती तिथं थांबलीच नाहीं. "हे काय हो नाना आसलं" म्हणत ती बाहेर पळून गेली.

थोड्या वेळानं आबारावांचा जावई आला. आबारावांनीं हसतमुखानं त्याला राम राम घातला. सुपारी कातरून पान खायला दिलं. इकडच्या तिकडच्या गप्पा मारल्या. जेवण्यासाठीं त्यांनीं मुद्दामच चांगला बेत केला. शहाजी जेवून तृप्त झाला. कधीं नव्हे इतका जेवला. आबारावानीं नंतर त्याला चारमिनारचीं दोन पाकिटं दिलीं. काड्याची एक पेटी दिली व त्याला झोपण्याची खोली दाखविली.

शीळ घालीत शहाजी खोलींत आला. कांखेतला पटका काढून खुंटीवर फेकला. पाकिटांतून एक सिगारेट काढली. तमाशांतला खटाळण्या पेटवितो तशी पेटविली. मस्तपैकी एक झुरका मारला व एक रंगदार लावणी गुणगुणत तो बाजेवर पडला. अधूनमधून धुराचीं वलयें सोडीत राहिला.

मध्येंच तो उठला. खोलीच्या दारापर्यंत आला. मोठ्या आशेनं त्यानं स्वयंपाक घराकडं पाहिलं. स्वयंपाकघरांत आणखी दिवा तेवत होता. त्याच्या प्रकाशाची चौकट अंगणांत पसरली होती. आंतल्या हालचाली पटापट टिपीत होती. शहाजी अस्वस्थ झाला. हातांतली जळती सिगारेट त्यानं टाचेखालीं रगडली व तो परत येऊन बाजेवर पडला. दुसरी सिगारेट पेटवून भसाभसा ओढूं लागला.

पुन्हा तो उठला. खोलीच्या दारापर्यंत आला. प्रकाशाची चौकट आणखी कायमच होती. तिच्यावरच्या काळसर आकृत्या आतां कमी झाल्या होत्या. अधूनमधून केव्हां तरी उमटत होत्या. तो खोलींत आला व अस्वस्थपणें येरझाऱ्या घालीत राहिला.

मध्येंच त्यानं येरझाऱ्या थांबविल्या. दारांत येऊन पाहिलं. स्वयंपाकघरांतल्या हालचाली आतां थांबल्या होत्या. प्रकाशाच्या चौकटीवरच्या काळसर आकृत्या आतां बंद झाल्या होत्या. शहाजीचा चेहरा उजळला. तो बराच वेळ दारांत थांबला. स्वयंपाकघराकडं नजर लावून उभा राहिला. अर्धा तास झाला. तासदेखील संपला. उभं राहून तो अवघडला. पायाला गोळे आले. तरी आणखी पारबतीचा पत्ता नव्हता. ती येण्याचीं कांहींच चिन्हं दिसत नव्हतीं! तो कांहींसा चिडला. संतापला देखील. "आयला ही बायकु हाय का हाडळ हाय? कामं सरलीं तरी मंदी काय करतीय! नवरा हिकडं वाट बगत आसल एवढंबी कळुनी का तिला?" शेवटची सिगारेटहि त्यानं पायाखालीं रगडली व तो परत येऊन बाजेवर पडला. अस्वस्थपणें हातरुणावर लोळत राहिला.

असाच थोडा वेळ गेला आणि एवढ्यांत दारांत पावलं वाजलीं. तो झपझप उठून बसला. मोठ्या आशेनं त्यानं दाराकडं पाहिलं. दारांतून वाकून आबाराव आंत आले व चेहऱ्यावर हसूं खेळवीत म्हणाले,

"झोप न्हावी का झाली अजून?"

वरचं माळवद अंगावर कोसळत असल्यासारखं त्याला वाटलं. अगोदर पारबतीला यायला दिरंग लागला होता आन् हा थेरडा मध्येंच तडफडला होता. वळवाच्या पावसागत आला होता. आतां तो दहापांच मिनिटं बोलत बसणार होता. कुणाच्या तरी उकाळ्या पाकाळ्या काढणार होता. वस्तुतः हे म्हातारे याच वाटेनें आलेले असतात. याच अनुभवांतून गेलेले असतात. इतरांपेक्षां त्यांनाच या गोष्टीची जास्त समज हवी असते. तारुण्यतील ओळखण्याची शक्ति हवी असते पण काय असेल तें असो, त्यांची बुद्धि इथंच गाळ खाते. त्यांची अक्कल इथंच दुळी पडते. नको तेव्हां ते येऊन थडकतात व दोन तरुण मनाच्या वाटेवरची धोंड बनतात. त्यांची तगमग वाढवायला कारणीभूत होतात. बरं, त्यांना फटकन कांहीं बोलतांहि येत नसतं. मर्यादा म्हणून कांहीं गोष्टी पाळाव्या लागतात. वडीलकीचं नातं असल्यामुळं कांहीं गोष्टी सांभाळाव्या लागतात. शहाजीनं हा सारा विचार केला व चेहऱ्यावर उसनं हसूं आणीत म्हणाला,

"या."

आबाराव आंत आले खांद्यावरचं घोंगडं त्यांनीं झटकून हंतरलं. वर ऐसपैस बैठक मारली. खिशांतून चंची काढली व सुपारी कातरून त्याच्या हातांत देत त्यांनीं विचारलं,

"हं. कसं काय चाललंया ?"

"कस्याचं ?"

"शेतांतल्या धंद्याचं"

"बरं चाललंया."

"एकेरी येढा आला का ?"

"व्हय."

"बरं झालं. शेतांतलं कामं जेवढं झटपट होईल तेवढं चांगलं आन् त्या ह्येच कसं हो ?"

"कस्याचं ?"

"तुमचा तो कोसा बईल इकला का ?"

"न्हाई."

"कां ?"

शहाजीला यावर खूप बोलतां आलं असतं. वडिलांनीं बैल विकायला कसा काढला, आपण त्याला विरोध कसा केला, दोघाचे झगडे कसे झाले, त्यांत आपण आपलं म्हणणं खरं कसं केलं, हें त्याला सविस्तर सांगतां आलं असतं; पण त्याला एवढं बोलायचं नव्हतं. त्याला शक्य तितक्या लवकर ही पीडा घालवायची होती व बायकोला येण्यासाठी रस्ता खुला करायचा होता. म्हणून तो मोजकंच बोलला—

"उगंच इकला न्हाई !"

आबाराव पुढें सरसावले व एखाद्याला समजावून द्यावें तशा आवाजांत म्हणाले—

"तुमी इकायला फायजी व्हता. घडीभर टिकूनी तसल्याला. मोप चांगला माल हाय. दिमायला बी देखना हाय. कामाला बहाद्दर हाय. पर उद्या गेला कुनाच्या अंगावर धावून आन् खुपसलं कुनाच्या पोटांत शिंग म्हंजी ! आली का नसती खटखट ?"

आबाराव बोलत होते व शहाजी बसल्या जागींच चुळबुळत होता. हे चऱ्हाट थांबलं तर फार बहार होईल असं त्याला वाटत होतं. आबारावांच्या हें सारं लक्षांत येत होतं आणि त्याची ही अवस्था जसजशी वाढत जाईल तसतसा त्यांना आनंद होत होता.

"आन् त्या ह्याचं कसं हो ?" आबारावांनीं पुन्हा विचारलं—

आतां मात्र शहाजी संतापला. धारदार आवाजांत म्हणाला,

"सगळ्याच चांगलं हाय. कुनाची सुद्धा फिकीर करूं नका."

आबारावांनीं हसत विचारलं,—

"तुमाला थोडा राग आलेला दिसतोय जावईबापू. पर बरं नव्हं असलं. मानूस बोलायला आलं तर कराव्या त्येच्यासंग चार गोस्टी. येवढ्या लांबून तुमी येताव ते पावन्यासंग चार गोस्टी कराव्या म्हणूनच येत असताल." आणि थोडं थांबून त्यांनीं विचारलं, "का दुसऱ्या कस्यासाठीं येतांव ?"

सासऱ्याचा शेवटचा प्रश्न ऐकून शहाजी लटकन हलला. धांदरटागत म्हणाला, "दुसरं कस्यासाटी न्हाई. तुमच्या संग चार गोस्टी बोलाव्या म्हनूनच येतो."

"मंग आसं कां बरं ?"

"चुकलं माजं."

आबारावांनीं गालांत हसत विचारलं,

"बरं, त्या ह्येचं कसं केलाव ?"

जिवावर आल्यागत शहाजीनं विचारलं.

"कस्याचं ?"

"हीर फोडायचं"

"गुत्ती दिऊन टाकलीया..."

आबाराव पाटील मग असंच कांहीं तरी विचारीत राहिले व शहाजी त्यांच्या विचारलेल्या प्रश्नांचीं उतरं देत राहिला. गाव सामसूम होईपर्यंत हा प्रकार होत राहिला.

मग मात्र शहाजी हक्कला. सासरा आतां लवकर उठत नाहीं हें त्यानें ओळखिलं. कांहीं तरी करून सासऱ्याला घालवायला हवं हें त्याला तीव्रतेनं जाणवलं. त्यानं थोडा वेळ विचार केला व स्वतःचा खांदा दाबीत म्हणाला,

"मगापसून अंगच लई दुकाया लागलंया हो."

"आसं एकाएकींचं काय झालं ?"

"कुनाला ठाव."

"आसं व्हतं का कंवा ?"

"तर हो. इमेशाच व्हतं आसं."

"मंग कसं करताव ?"

"आमच्या 'मानसा'कडून अंग दाबून घेत असतो. मंग सटक्याला न्हातं बगा."

आरे चोरा ! असा बेत आहे काय तुझा ! आबाराव पाटील गालांत हसत म्हणाले, "जरा कळ काढा. आतां व्येवस्था करतो."

नंतर ते दारांत गेले व तिथून त्यांनीं हांक मारली—

"येसब्योऽऽऽ"

स्वयंपाकघरांतून आवाज आला—

"ओऽऽ"

"हिकडं ये जरा."

"आबा, म्या तालमींत निघालोय"

"तालमींत पुना जा. अगुदर हिकडं ये."

सासरा आपल्या पोराला कां बोलावीत आहे हें शहाजीच्या लक्षांत येईना. प्रश्नांकित चेहऱ्यानं तो त्यांच्या तोंडाकडं पाहात राहिला.

येसबाला घेऊन आबाराव आंत आले. शहाजीला म्हणाले,

"हं, आटपा लवकर. व्हा आडवं."

"कां ?"

"अंग दुकाया लागलं म्हनलात की."

सासऱ्याचाबेत शहाजीनं ओळखिलं. समोरच्या धिप्पाड आकृतींकडं पाहिल व तो घाबरून म्हणाला—

"न्हाई, एवढं काय दुकाया न्हाई. उलीसक दुकतंय. न्हाईल आता."

"जावाईबापू, तुमी लाजाया लागलाय दिसतंय, पर दुकन्याच्या कंदी लाजुनी लागतं. हं, आटपा, पडा पालथं."

शहाजी घायकुतीला आला. गयावया करीत म्हणाला,

"देवाच्यान् की हो न्हायलंय आता. म्या खोटं न्हाई सांगत. माजं आयका तुमी."



"जावाईबापू, तुमी लाजायलाच लागलाव. आम्ही तवाच वळकिलंया."

शहाजीनं ओळखलं कीं, आतां कितीहि जीव तोडून सांगितलं तरी आपलं म्हणणं ह्यांना खरं वाटणार नाहीं. आपली पाठ तुडविल्याशिवाय ते आपणाला सोडणार नाहीत. त्यानं येसबाला एकवार पायापासून डोळ्यापर्यंत न्याहाळलं व एक घुटका गिळीत तो म्हणाला,

"बरं, घ्या जरा पाय."

शहाजी पालथं झोपला आबारावांनीं येसबाला इशारा केला. येसबानं खोंचा खोवला. मेहुण्याच्या पाठीला नमस्कार केला व तो खुंटीला धरून त्याच्या पाठीवर चढला. त्याबरोबर शहाजी दबक्या आवाजांत ओरडला,

"आग बाबोऽऽ"

गालांत हसत आबारावानीं परत येसबाला इशारा केला आन् त्याबरोबर येसबा वाटंल तसा त्याच्या पाठीवर नाचूं लागला. भोद तुडवल्यासारखी त्याची पाठ तुडवूं लागला. शहाजीचं हाडन् हाड रिकामं झालं. चेहरा ताठरून निघाला. दम देखील मावेना. घायकुतीला येऊन तो म्हणाला,

"हं, उतरा आता."

आबाराव हसत म्हणाले.

"एवढ्यानंच काय झालंय. चांगलं रगडून निघालं फायजी. पुना म्हनून त्येनं कंदी दुकुनी लागलं."

रडकुंडीला येऊन शहाजी म्हणाला—

"न्हाई दुकत हो. आता पुना न्हाई दुकत. देवाशप्पत आतां पुरं करा."

"बरं, अजून थोडी कळ काढा. येसबा, आटप बाबा लवकर."

आबारावांनीं पुन्हा त्याला इशारा केला आणि मग तर येसबा अंगांत आल्यासारखं करूं लागला. मनमानेल तसं त्याच्या पाठीवर नाचूं लागला. चिखल तुडवल्यागत त्याची पाठ तुडवूं लागला. मध्येंच तो थाबला.

मेहुण्याला त्यानं विचारलं,

"आता पुरं का दाजी ?"

रडक्या आवाजांत शहाजी म्हणाला,

"पुरं हो. देवाच्यान् पुरं करा. आता न्हाई दुकत."

मेहुणा असं फारच घाईला आला तेव्हां येसबा खालीं उतरला. हसत मेहुण्याला म्हणाला,

"आता न्हायलं का दाजी ?"

शहाजी कण्हत म्हणाला.

"न्हायलं बाबा. आता न्हाई कंवा दुकायाचं."

"का थोडं ?"

शहाजी तटकन् उठून बसला. घाबरून म्हणाला,

"नगं नगं. आता निब्बळ नगं."

शहाजीला समजणार नाहीं अशा बेतानं आबाराव हसले. घोंगडं झटकून पाठीवर टाकीत म्हणाले,

"बरं, आमी येतो आतां."

शहाजीनं नुसतीच मान हलविली.

दोघंहि बापलेक दारांतून वाकून बाहेर गेले. शहाजी कण्हत बाजेवर पडला. त्याच्या साऱ्या अंगांतून कळा येत होत्या. थोडी देखील हालचाल करवत नव्हती. शहाजी पालथं झोपला व बारीक आवाजांत कण्हूं लागला.

थोडा वेळ असाच गेला आणि एवढ्यांत बाहेर पावलांचा आवाज उमटला. बांगड्यांचा आवाज देखील उठला. शहाजी सारं दुःख विसरला व बाजेवर उठून बसला. मोठ्या आशेनं त्यानं दाराकडं नजर टाकली. आणि त्याला एकदम धसकाच बसला. सासरेबुवा गेले होते व आतां सासूबाई आल्या होत्या! शहाजीनं मनांतल्या मनांत एक ठेवणींतली शिवी हासडली.

आनसाबाई आंत आल्या. भिंतीचा आधार घेऊन ऐसपैस बसल्या कमरेची तपकिरीची डबी काढून हातांत घेतली. तिच्यावर टिचकी मारून उघडली व तपकिरीचा फुरका मारतां मारतां त्यांनीं विचारलं,

"काय म्हनत्यात आमच्या इनबाई!"

शहाजी अगोदरच चिडला होता. काय करूं, आणि कसं करूं असं त्याला झालं होतं. सासूच्या या फालतू प्रश्नानं तर तो जास्तच चिडला. म्हणाला—"रातरी जरा लवकर झोपत जा म्हनत्यात. उगं बिनकामाचं जागत जाऊं नका असं सांगितलंया त्यांनीं तुमाला."

शहाजीला कळणार नाहीं अशा बेतानं हसत आनसाबाई म्हणाल्या. "ऑऽऽ बरीच बाजिंदी दिसतीया की आमची इनबाई! तिला म्हनावं, आगं झोपा काय हमेशाच चालल्यात. पर कुनी मानूस बोलायला आलं तर करावं थोडं जागरण. बोलाव्या त्याच्यासंगं चार गोष्टी."

आनसाबाईच्या अशा बोलण्यानं शहाजीनं कपाळावर हात मारून घेतला. ही म्हातारी देखील नवऱ्याइतकीच खवीस आहे व आपण तिला घालवायचा प्रयत्न केला तरी ती सहजासहजी जाणार नाहीं—कांहीं तरी नामी युक्ति योजून तिला घालवायला हवं. हे त्याला जाणवलं. शहाजीनं थोडा वेळ विचार केला व स्वतःचं डोकं दाबीत तो म्हणाला,

"सासूबाई—"

"कां हो?"

"मगापसून डोस्कंच दुकाया लागलं हो. दाबतां का जरा?"

शहाजीच्या या बोलण्यानं आनसाबाई चपापल्या. जमिनीला हाताचा रेटा देऊन उठतां उठतां म्हणाल्या,

"धाडून देते पारबतीला: पडा जरा."

आनी त्या दुडुंदुडुं अंग हालवीत बाहेर धावल्या.

घडलेल्या प्रकारानं शहाजीला एवढं हासूं फुटलं की त्याला सरळ बसून हासतांच आलं नाहीं. तो हंतरुणावर पालथं पडला व डोळ्यांत पाणी येई-पर्यंत हसत राहिला. एवढ्यात दारांत पावलाचा आवाज उमटला. पाठोपाठ बांगड्यांचा आवाजहि आला. तो झटपट हंतरुणावर उठून बसला. हंतरूण साफसूफ केलं. उश्या व्यवस्थित तिथं ठेवल्या. पारबती लगबगीनं आंत आली. दाराला आंतून कडी घातली व ती लाजत मुरकत त्याच्याजवळ आली. खालीं मान घालून उभी राहिली. तिचा हात लालबुंद कंटांत आपल्या हातांत घेऊन दाबीत त्यानं विचारलं,

"एवढा कां उशीर ग?"

पारबती कांहीं बोलणार एवढ्यांत दार खटखटलं व पाठोपाठ आवाज आला, "पारबती, आग पारबती, दार उघड बरं."

पारबतीची नजर बावरली घाबरलेल्या आवाजांत ती म्हणाली,

"आबांचा आवाज दिसतोय."

शहाजीच्या चेहऱ्यावर राग उसळला. डोळे लालबुंद झाले. तो निश्चयी पण धारदार आवाजांत तिला म्हणाला,

"जा. दार उघड."

नवऱ्याचा रागीट चेहरा पाहून तर ती जास्तच घाबरली. दबक्या आवाजांत म्हणाली, "कस्याला उघडायचंय दार—हाका मारून आपल्याच जातेल म्हागारी."

"तसं कस्यापाई आपुन काय चोरी केलीया का कुनाची?"

पारवतीचं पाऊल उचलेना. रागाच्या भरांत नवरा वडिलांना कांही तरी बोलेल व थट्टेचं रूपांतर भांडणांत होईल म्हणून ती भिऊं लागली. पण नवऱ्याची आज्ञा पाळणंहि तिला भाग होतं. जड पावलं उचलीत ती दाराजवळ गेली व तिनं दाराची कडी काढली.

आबाराव धावत आंत आले. डोळ्यावर आडवा हात ठेवून पडलेल्या जावयाला त्यांनीं विचारलं,

"न्हायलं का डोकं?"

डोळ्यावरचा हात न काढतांच शहाजी म्हणाला,

"न्हाई न्हायलं!"

"बरंच लबाड दिसतंया की डोस्कं! बरं हरकत न्हाओ"

त्यांनीं खिशांतून एक बाटली काढली व ती लेकीच्या हातांत देत ते म्हणाले,

"पारवती, हे बग डोक्याचं आवशिद सापडलंय. जावईबापूच्या डोस्क्याला चोळून लाव."

बापाकडं एक रागाचा कटाक्ष टाकीत तिनं औषधाची बाटली घेतली. नवऱ्याच्या उशाला बसली व हलक्या हातानं त्याच्या डोक्याला औषध चोळूं लागली. आबारावांनीं खिशांतून चंची काढली व ते ऐसपैस बसून पान खाऊं लागले.

शहाजी स्वस्थ पडला खरं, पण तो मनांतून स्वस्थ नव्हता. सासऱ्याचा सारा बेत, उशीरां का होईना त्याच्या लक्षांत आला होता. व तोहि ठोशाला ठोसा देण्याच्या विचारांत होता. त्यांच्यावर ताण करण्याचा बेत आखीत होता. तो बराच वेळ स्वस्थ पडला. मग बायकोचा हात झटकून टाकीत उठला. एकवार खिडकींत जाऊन थुंकला व परत येतां येतां त्यानं विचारलं,

"मामासाब, तुमाला एका जावायाची गोष्ट ठाव हाय का?"

"कुन्या जावायाची?"

"एका आरमुट्या जावायाची."

"न्हाई बरं का, आमाला ठावं न्हाई."

"मग आयकायची का?"

आबारावांना गोष्टी ऐकण्याचा फार नाद होता. गोष्ट म्हटली की ते उल्हसित होत व हातांतलं काम टाकून ते गोष्ट ऐकत बसत. कुणी हुंकार भरायला नसलं तर स्वतःच हुंकार भरीत. गोष्ट जसजशी रंगांत येई, तसे तसे ते गोष्ट ऐकण्यांत रंगून जात. भान विसरून गोष्ट ऐकत बसत.

आतांहि शहाजीनं गोष्ट ऐकायची का म्हणून विचारतांच ते उल्हसित झाले. पुढं सरकून म्हणाले,

"हो, आयकू की."

शहाजी परत एकदां खांकरून थुंकला. त्यांच्याजवळ आला व एक पाय बाजेच्या गातावर ठेवून म्हणाला,

"एक जावाई व्हता. दिसायला एवढा एवढासा, पर लई आरमुट्या टाळक्याचा. एकदा तो बायकुला भेटायला सासरवाडीला गेला. लई दिसांनी आला म्हनून बायकुला बी आनंद झाला. पर त्येचा सासरा व्हता नकल्या. त्येनं ठरविलं की, सारी रातर जागायचं; पर दोगांनाच एकान्त म्हणून मिळू द्यायचा न्हाई. आंसं ठरविलं त्येनं आन् बसला की दोगांच्या मंदी येऊन."

शहाजी सांगत होता व आबाराव कान देऊन ऐकत होते. वाक्यावाक्याला हुंकार भरीत होते. गोष्ट आतांशी रंगांत येत होती. क्षणाक्षणाला उत्कंठा वाढवीत होती. गोष्ट फारच मजेदार होती!

शहाजी परत एकदां खांकरून थुंकला. परत सांगू लागला,

"जावयानं सासरा आतां उटंल म्हनून वाट फायली. मग उटंल म्हनून वाट फायली. पर सासरा व्हता गोंदनावानी चिकट. तो काई केल्या उठतां उटंना. मंग जावयानं दम खाल्ला. सासऱ्याचा मान ठिवायचा तंवर ठिवला. आन् मंग त्यानं सासऱ्याची परवा केली नाही. बरं–वाईट बगितलं न्हाई."

"काय केलं?" आबारावांनीं उत्कंठित होऊन विचारलं.

शहाजी कावेबाज हासला. बायकोच्या जवळ गेला. व प्रात्यक्षिकासह सांगू लागला,

"तो असा बायकूजवळ गेला. एक हात असा तिच्या मानेखालीं घातला. दुसरा हात असा मेचकाडांत घातला."

आबारावांची उत्कंठा कळसाला पोहोंचली. जमिनीवर टेकलेलं बूड वीतभर वर उचलीत त्यांनीं विचारलं—

"आन मंग?"

शहाजी परत हसला. बायकोला उचलीत म्हणाला—

"आन् आसं त्यानं तिला उचललं. आसं बाजेवर ठेवलं."

"आन् मंग?"

"आन् मंग तो असा पुढं सरसावला—"

शहाजीनं एक पाय बाजेवर ठेवण्याचा अवकाश, आबाराव एकदम दचकले. खरा प्रकार त्यांच्या आता लक्षांत आला आणि त्याबरोबर त्यांची धांदल उडाली. तोंडावाटे विशिष्ट चीत्कार काढीत ते उठले व दाराकडे धावले. गडबडींत धतराच्या घोळांत त्यांचा पाय अडकला व ते टपकन् तोंडावर पडले. तिथून कसंबसं सावरून उठले. बुटक्या दारांतून धावायला गेले. पण दाराचा वरचा भाग खटकन् त्यांच्या डोक्याला लागला व ते दारापासून चार हात अंतरावर जाऊन पडले.

या साऱ्या प्रकाराचं शहाजीला एवढं हसू आलं की, बाजेवर ठेवलेला पाय खालीं घेऊन तो जमिनीवर बसला व पोटाला आडवा हात लावून हसू लागला. हसून हसून त्याच्या डोळ्यांत पाणी जमा झालं. पोट दुखूं लागलं तरी त्याला हसू आवरंना. तो सारखं हसतच राहिला. हसला खूप हसला अन् कळ फिरवावी तसं तो गप्प बसला. आबाराव पाटील दारांतून वाकून आंत आले. त्यांच्या येण्याचं कारण शहाजीच्या लक्षांत येईना. तो टकाटका त्यांच्या तोंडाकडं पाहात राहिला. आबाराव पाटील सावकाश आंत आले. एकवार खिडकींत जाऊन थुकले व गालांत हसत त्यांनीं शहाजीला विचारलं,

"आन् मंग आसा दळण्यावानी हसत बसला व्हय?"

• • •












अनुक्रमणिका



*तानाजी महाराजांच्या*
*घोड्याचा हा नाल.*
*त्यांच्याबरोबर*
*सिंहगडाच्या लढाईंत*
*आमचे कुणीतरी*
*पूर्वज होते त्यांनी*
*हा नाल जपून*
*आणून आपल्या*
*घरांत ठेवला....*

अनंत काणेकर

सिंहगड पहायला पुष्कळ जातात, महाराष्ट्र राज्य झाल्यापासून तर श्रीशिवप्रभूच्या पदस्पर्शानें पुनीत झालेलीं सिंहगड, रायगड प्रतापगड यांच्यासारखीं महाराष्ट्रांतलीं ऐतिहासिक स्थळें पहायला जाणारांची बारा महिने गर्दी असते. तुम्हीहि सिंहगड पहायला जाल, पण मधु जाधवला सिंहगड जिंकणाऱ्या नरवीर तानाजी मालुसऱ्याच्या घोड्याचा नाल मिळाला तसाच तुम्हांला मिळवायचा असेल तर नुसता सिंहगड चढून जाऊन चालणार नाहीं—तुम्हाला गडाच्या पायथ्याकडे वर जाणाऱ्या रस्त्याच्या कडेला एक छोटेंसें 'सिंहगड चहाचें दुकान' नांवाचें दुकान आहे तिथें चहा घेतला पाहिजे. हें सांगायचें कांहीं कारण नाहीं म्हणा, एवढा मोठा गड चढून जाण्याच्या आधीं किंवा उतरून आल्यानंतर तुम्हांला गरमगरम चहाचा एक कप घ्यावासा वाटणारच. असं वाटतंय् न वाटतंय तोंच 'साहेब, फम्क्लास चहा पाहिजे तर सिंहगड दुकानांत चला!' असा आग्रह करीत एक पोरगा तुम्हाला त्या दुकानांत घेऊन जाणारच. दुकान झाडीच्या आडोशाला असलेल्या एका जुनाट घराच्या ओटीवर आहे. घरांत राहणारा भिकाजी कदम, त्याची बायको आणि मुलं हें दुकान चालवतात. पन्नाशी उलटलेला भिकाजी अगदींच खेडवळ वाटत नाहीं. मुंबई-पुण्यांत नोकरी करून निवृत्त झाल्यावर त्यानं हें दुकान उघडलं असावं.

मधु जाधवला महाराष्ट्राच्या इतिहासाचा लहानपणापासून अतिशय जाज्वल्य अभिमान. त्यांत आणखो ऐतिहासिक स्थळं पहाण्याचा षोक; आणि त्यांत आणखीं भरपूर पगाराची नोकरी मिळून नुकतंच लग्न झालेलं. लग्नासाठीं त्यानं एक महिन्याची रजा घेतली होती. पण इतर सामान्य लोकांप्रमाणें मधुचंद्रासाठीं तो बायकोला घेऊन माथेरान, महाबळेश्वर किंवा काश्मीर-दार्जिलिंगला जाणार नव्हता. बायकोला बरोबर घेऊन महिनाभर ऐतिहासिक स्थळं पहात भटकायचं त्यान ठरवलं होतं. त्याच्या बायकोला—लिलीला तें तितकंसं पसंत नव्हतं, पण त्याच्या उत्साहामुळं तिला शेवटीं नमतं घ्यावं लागलं. पुण्याहून पहांटेच्या एस. टी. नें निघून मधु आणि लिली सिंहगडाच्या पायथ्याकडल्या रस्त्यावर येऊन थडकलीं. थंडीचे दिवस असल्यामुळें सिगारेटचे झुरके घेत मधु इकडेतिकडे पहात होता. इतक्यांत त्याचा एकंदर रुबाब वरपासून खालपर्यंत न्याहाळीत एक पंधरासोळा वर्षांचा खेडवळ पोरगा त्याच्याजवळ आला.

"गडावर जानार व्हय?" त्या मुलानं नम्रपणें मधुला विचारलं.

"हो, कां?" मधु त्याच्याकडे पहात म्हणला.

"न्हाई—" तो पोरगा उद्गारला, "साहेब, तुम्हाला फम्क्लास चहा पाहिजे असल् तर आमच्या सिंहगड चहाच्या दुकानांत चला!"

"सिंहगड चहाचं दुकान? तें कुठं आहे?" मधुनं विचारलं.

"हे इथं त्या झाडींतल्या घरात हाये कीं," तो पोरगा म्हणाला, "ताजा बनवून मिळल चा बघा. असा चा तुमाला पुनं-मुंबईत बी मिळनार नाय!"

"अस्सं!" मधु जायच्या तयारींत म्हणाला.

"त्याचं काय ऐकतां तुम्ही!" लिली म्हणाली. तिला गांवढळ दुकानांतला खेडवळ चहा नको होता.

"चा अगदीं फस्क्लास मिळल्, बाईसाहेब!" तो पोरगा विनवणीच्या स्वरांत म्हणाला.

"चल, चल. जाऊं या ग लिली," मधु म्हणाला, "नाहीं तरी इथं आतां चहा कुठं मिळणार आहे दुसरीकडे?"

त्या मुलाबरोबर मधु आणि लिली त्या झाडींतल्या दुकानांत गेलीं. झाडीच्या एका कोपऱ्यांत 'सिंहगड चहाचें दुकान' अशी पाटी एका झाडाला खिळे मारून लटकवलेली होती.

दुकानाच्या दारांत भिकाजी कदम उभे होते. दुकान लहानसंच, पण व्यवस्थित ठेवलेलं दिसत होतं. लहानशा काचेच्या कपाटांत बिस्किट, चिवडा, लाडू वगैरे दिसत होते. दोन स्वच्छ टेबलं आणि टेबलांभोवती नीटनेटक्या ठेवलेल्या खुर्च्या होत्या. भिकाजींचं धोतर आणि सदराहि चांगलाच स्वच्छ दिसत होता.

"या साहेब," मधूचं आणि लिलीचं स्वागत करीत भिकाजी म्हणाला.

"साहेबांना फस्क्लास् चा पाहिजे, बाबा," तो पोरगा चुटकी वाजवीत म्हणाला, "एकदम जलदी पाहिजे!"

"बसा बसा," खुर्च्या सरकवीत भिकाजी म्हणाला, "पळ, बिठ्या. तुझ्या आईला चहा करून आणायला सांग तावडतोब."

लिली आणि मधु इकडे तिकडे पहात खुर्च्यांवर बसलीं. लिलीलाहि दुकानांतली व्यवस्था ठीक वाटली. नाक मुरडीत ती आंत आली होती, पण आंत आल्यावर तिचा चेहेरा साफ झाला. मधु खूष होता.

"तुम्ही याच गावांतले वाटतं?" मधूनें, भिकाजीला विचारलं.

"कित्येक पिढ्या आम्ही इथं आहोंत, साहेब," भिकाजी आपली उंच मान आणखीं उंच करून मिशीवर हात फिरवीत म्हणाला, "तानाजी महाराजांच्या अगदीं जवळच्या नात्यांतलं आमचं घराणं, तानाजी महाराजांनीं सिंहगड घेतल्यापासून आम्ही या गावांत आहोंत, साहेब!"

"अस्सं?" मधूचे डोळे आश्चर्यानें आणि आदरानें विस्फारले होते. तो विस्फारलेल्या डोळ्यांनी इकडे तिकडे पहात होता तोंच त्याचं लक्ष समोरच्या भिंतीकडे गेलं. त्या भिंतीवर एका बाजूला 'तानाजी महाराजांच्या घोड्याचा नाल' अशीं ठळक अक्षरं तांबड्या खडूनें खरडलेलीं होतीं; आणि त्या अक्षरांखालीं एका खिळ्यावर एक अतिशय जुनाट घोड्याचा नाल बसवलेला होता.

"हें काय?" एकदम उठून तो नाल पहाण्याकरितां भिंतीजवळ जात मधु उद्गारला.

"कांहीं नाहीं, साहेब," भिकाजी हसत म्हणाला, 'हा नाल पिढ्यान् पिढ्या आमच्याकडे पडलाय्. आमचे आजोबा म्हणत कीं तानाजी महाराजांच्या घोड्याचा हा नाल. त्यांच्याबरोबर सिंहगडाच्या लढाईत आमचे कुणीतरी पूर्वज होते त्यांनीं हा नाल जपून आणून आपल्या घरांत ठेवला. किती तरी वर्षं तो अडगळींत पडून राहिला होता. अलिकडे आमच्या पोरांनीं इथं भिंतीवर लावून वर तीं अक्षरं खरडलीं खडूनं!"

"मग तुम्ही करणार काय या नालाचं?" मधूनं कातर स्वरांत भिकाजीला विचारलं. त्याच्या डोक्यांत विचारचक्र चालू झालं होतं.

"करायचं काय? राहील पडून तिथं." भिकाजी आळसट स्वरांत म्हणाला, "तुमच्यासारखे एक साहेब परवां इथं चहा प्यायला आले होते, ते म्हणाले, पांच रुपये देतों—मला द्या तो नाल! मीं म्हटलं, कशाला उडवतां उगाच पांच रुपये साहेब—करणार काय तुम्ही त्या नालाचं?"

इतक्यांत भिकाजीची गलेलठ्ठ बायको दोन स्वच्छ कपांत गरमागरम चहा घेऊन बाहेर आली. भिकाजीचे कांहीं शब्द तिनें ऐकले असावे.

चहाचे कप टेबलावर ठेवतां ठेवतां ती एकदम म्हणाली, "तुम्हांला कांहीं समजत नाहीं हो—आपले भाऊबंद गावांत आहेत ना, त्यांच्या अडगळींत पडलेला किल्ल्याच्या दरवाजाचा एक जुना कोयंढा परवां पुण्याहून आलेल्या उपरणंफेटेवाल्या एका म्हाताऱ्यानं दहा रुपयांना विकत घेतला!"

"काय, म्हंतेस काय?" भिकाजी अगदीं निरागस चेहेरा करून उद्गारला.

"म्हणजे" बायको कडाडली, "मी तिथं होतें तेव्हां!"

मधूच्यानं आतां रहावेना. तो एकदम म्हणाला, "हें बघा मी पंचवीस रुपये देतों. तो नाल मला द्या!"

"काय करणार तुम्ही त्याचं हो?" भिकाजी भाबडा चेहरा करून म्हणाला.

"मी कांहीं करीन," मधु म्हणाला, "तीस रुपये घ्या. मला देऊन टाका बघूं!"

"घ्या बापडा! नाहीं तरी काय इथं पडून गंजून जाणार," भिकाजी म्हणाला, "मात्र मला वाटतं उगाच तुम्ही तीस रुपये उडवतां आहां, साहेब!"

"जाऊं दे माझे गेले तर!" असं म्हणत लिलीच्या आंठ्या पडलेल्या कपाळाकडे किंवा मुरडलेल्या नाकाकडे ढुंकूनहि न पहातां मधूनें तावडतोब दहा दहा रुपयांच्या तीन नोटा पाकिटांतून काढून भिकाजीच्या हातावर ठेवल्या.

दुकानाच्या बाहेर पडून रस्त्यावर आल्याबरोबर लिली एकदां फणफणली, "वेड्यासारखं कांहीं तरी काय करतां हो?—तीस रुपयांना तो गंजलेला नाल कशाला घेतलात?"

"तुला काय कल्पना आहे त्या नालाच्या किंमतीची?" मधु शांतपणें म्हणाला, "तीन हजार रुपयांनासुद्धां तो महाग नाहीं. या खेडवळांना काय कळतंय? कुठं तरी हरवून बसले असते एखादे दिवशीं!" "तीन हजार रुपये!" लिली उद्गारली. 'हो, हो, तीन हजार रुपयेसुद्धां कमीच!" मधु म्हणाला, "अग, ही अमोल चीज आहे, लिली! मी हा नरवीर तानाजीच्या घोड्याचा नाल कधींच विकणार नाहीं—पण जर कधीं विकायला काढला तर सरकारी पुराणवस्तुसंग्रहालय त्याचे पांच हजार रुपयेसुद्धां देईल!"

"तुम्ही काय बोलतां तें मला कांहीं समजत नाहीं, बाई!" हतबुद्ध होऊन लिली म्हणाली.

तिकडे 'सिंहगड चहाच्या दुकानां'त भिकाजीची बायको आपल्या पोराच्या—बिठ्याच्या अंगावर खेकसत होती, "कार्ट्या! लवकर अडगळीच्या खोलींत जा, नि गंजलेल्या नालांच्या टोपलींतला एक नाल आणून त्या भिंतीवर लाव. जा पळ. पुन्हा नाक्यावर जाऊन उभं राहायला पाहिजे. ही गिऱ्हाइकं गडावर जाण्यायेण्याची वेळ आहे!"

भिकाजी खुशींत मिशीवर हात फिरवीत बायकोला म्हणत होता, 'हें कूळ पंचवीस तिसाच्या खालीं जाणार नाहीं, हें मी त्याला पाहिल्याबरोबर ओळखलं!" (आधारित)

• • •



*म्हणतात ना की, खिडक्या उघड्या ठेवल्या तर लोक बघतात आणि बंद केल्या तर जीव कोंडतो; पिकांसाठीं आला तर तो पाऊस एरवीं सांडपाणीच ! दिवस भिववीत नाहीं, रात्र भिववीत नाहीं आणि....आणि ही निलाजरे पणाची लाज स्वस्थहि बसूं देत नाहीं !........*

# हाताशी घातली रेखा

वा म न  चो र घ डे

नर्मदा नेहमींच हें असें साधें, सरळ बोलून जाते; बोलतां बोलतां हंसून देते आणि बोलून संपल्यावरहि हंसत राहाते.

पण जो ऐकतो तो कधीं भांबावून जातो, कधीं हाय खातो !

आपलें दुःख सांगतांना रडणारांची जगांत वाण नाही. पण मनाचा सल आनंदांत घोळून, सहज रीतीनें बाण सोडावा तसा व्यक्त करून पुनः हंसत राहाणारी एकटी नर्मदाच !

तिचें नांव तिच्या आईबापांनीं नर्मदाच कां ठेविलें कुणास ठाऊक ! तें ठेवतांना त्यांना ही कल्पना मात्र नसेल की या मुलीच्या जीवन-प्रवाहाची खळखळ, हसित विलसित सतत गतिमान, हृद्य, निर्मल राहील ! दुःखाचा उद्वेग तिच्या मुखावर कधीं उमटला नाही; हर्षाची नशा कधी चढली नाही; काटा बोचला तरी ती हंसणार आणि दुसऱ्याला बोचला तरी ती त्याला हंसविणार !

नर्मदा दिसते कशी याचें वर्णन करण्याचें प्रयोजन नाहीं. तिचें दिसणें तिच्या जीवनांत कधीं आडहि आलें नाहीं; आणि कधीं समोर येऊन मिरविलेंहि नाहीं. तिच्या स्थितिगतीचें वर्णन केलें तर तें वर्णनच दिठावून जाईल. तिच्या जीवनांत घात नाहीं, अपघात नाहीं ! आहे ती अखंड खळखळ, अविरत गति !

नर्मदा असेंच साधेसुधें बोलून जाते. नंऊ वर्षांपूर्वी ती कसलाहि आडदड न ठेवितां मला बोलून गेली कीं, माझ्याशीं तिचें लग्न व्हावें असें तिला वाटतें, मी लग्न करायला राजी झालों तर ती फार सुखी होईल !

मीं तिच्याशीं लग्न केलें नाहीं. तिच्या सतत सहवासांत राहून माझ्या त्या अवखल वयांतहि मला इतर कांहीं कळलें नाहीं तरी एवढें कळून चुकलें की, नर्मदा आपल्याला झेपायची नाहीं! तिची अर्पणाची शक्ति इतकी जबर आहे की, आपण त्या ओझ्याखालीं दबून गुदमरुन जाऊं! तिला उत्तर देण्याच्या मिषानें मी त्यावेळीं म्हणालों होतों—

"असं नव नमु..."

"आतां नवण्यासारखं कांहीं नाहीं. तुझ्या पहिल्या शब्दाचा अर्थ, 'न', दुसऱ्याचा 'का' आणि तिसऱ्याचा 'र' असा आहे. जाऊं दे झालं; वाटलं तें बोलून टाकलं! एखादं फूल हवंसं वाटलं अन् तें मिळालं नाहीं तर उगाच रागलोभानं त्या फुलाचा अपमान कशाला करायचा!"

नर्मदा चांगली शिकली आहे पण तिचें सारें शिक्षण या असल्या बोलण्यांतच खर्च होतें. नऊ वर्षांपूर्वी तिला अठरावें वर्ष लागलें होतें. पुढे चार वर्षांनीं तिला बाविसावें लागलें. या दरम्यान तिचें लग्न झालें. तें जुळवून देण्यांत मींच पुढाकार घेतला. माझ्या एका कर्तबगार मित्राचा संसार मीं सुखाचा करून दिला. हा मुलगा फार चांगला आहे एवढ्या माझ्या एका वाक्यावर नर्मदेनें आनंदानें लग्नाला संमति दिली होती. लग्नानंतर एकदोन वर्षांत ती माता झाली आणि अशीच मुलाला पदराखालीं घेऊन ती जागेपणींचीं स्वप्नें निरखीत असतांना तिच्या मनांतली खळबळ काढून टाकण्याच्या हेतूनें मीं म्हटलें होतें—

"नर्मदा, तूं माझ्याबरोबर जन्म घालवायला तयार होतीस; पण तसं झालं असतं तर खात्रीनं सांगतों, तूं आजच्यासारखी सुखांत राहिली नसतीस. आता कसं सगळं जाणून देखून सुरळीत झालं! तुझ्या सुखाला मी साक्षी आहें. लग्न करणाऱ्यानं स्वतः निवड करूं नये, खरं ना?"

विवाहित स्त्रीनें नवऱ्याच्या परोक्ष हें असलें बोलणें ऐकून गंभीर व्हायला हवें पण गंभीर झाली तर ती नर्मदा कसली? माझें बोलून झाल्यावर तिनें मुलाला पदराखालून काढलें आणि त्याला हातावर खेळवीत सहजगत्या ती म्हणाली—

"तुझं म्हणणं खरंहि असेल कदाचित्; मी तुझ्याशीं लग्न करायला तयार झालें त्या अर्थी मी तुला श्रेष्ठच मानलें होतें. पण विचारलं म्हणूनच सांगतें हो, कीं, मला आपलं वाटतं, कीं, माझं लग्न त्यावेळीं आणि तुझ्याशीं जमायचं नव्हतं; अशाच एका दुसऱ्या वेळीं तुझ्या मित्राशीं जमायचं होतं; तें जमलं. तुझ्यावर प्रेम केलं त्याबद्दल मला विषाद नाही, आणि आता मी संजू, नली, राधूच्या वडिलांवर प्रेम करतें त्याला सीमा नाही."

"तुझी प्रेमाची कल्पना अजब दिसते खरी—"

"अंहं! असं नाहीं बोलायचं; कधीं कुणाच्या कसल्याहि प्रेमाची थट्टा नाहीं करायची. कॉलेजांत असतांना मीं कुठंसं वाचलं होतं. प्रेमाचं मोठं हळुवार वर्णन होतं तें! प्रेम कधीं, कुठं, कुणावर कसं जडतं हें कळत नाहीं, हीं प्रेमाचीं गोजीरवाणीं पाखरं आपल्या पाचूच्या चोचींत अमृतबिन्दु घेऊन उडतात. त्या स्निग्ध मधुर बिंदूंचा अवसेक ज्या कुणावर होईल त्यांचं प्रेम जमतं. त्यावेळीं तीं पाखरं मजकडे आलीं होतीं पण तुला दिसलीं नाहींत. आतां तीं आम्हां उभयतांना दिसलीं!"

तिचें सारें ज्ञान या असल्या बोलण्यांतच खर्च होऊन जातें, आणि एरवींच्या जीवनांत ती अजाण, निर्बोध अशी वागते. पहिलें मूल झालें तेव्हां तिला फार आनंद झाला; दुसरी मुलगी पाठोपाठ झाली तेव्हां ती तिला हवीच होती; तिसरें मूल झालें तेव्हांहि ती हरखली आणि ही श्रावणझड बंद करायला नवरा उपाय करायला गेला तेव्हांहि तिनें हवें-नकोची उत्साहानें सांगता केली. हें सारें असें नसतें तर तिच्या त्या समृद्ध संसारांत तिचे कष्ट उपसणें, घरासाठीं, दारासाठीं, नवऱ्यासाठीं जीवाचा आटापिटा करणें याला कांही अर्थच उरला नसता. ती आपल्या संसारांत इतकी रमली आहे कीं, आपण संसार करतों हेंच ती विसरली!

परवाचेंच बघा! सकाळीं सर्व घर साखरझोपेंत असतांना ती उठली आणि घर आळस देऊं लागलें तेव्हा ती अंगणांत सडा घालीत होती. पदर खोचून सड्याच्या शिंतोड्यांनीं पोटऱ्या रंगवीत तिचें संमार्जन चालू होतें. पहाटेच्या नीरव वेळीं ती गुणगुणत होती—घिरी घिरी आई बदरिया! सड्याच्या शिंतोड्यांनीं भरलेल्या तिच्या उघड्या पोटऱ्या उघड्या सोनरंगी पिकल्या केळ्याप्रमाणें—

पण ही कल्पना आकाराला यायच्या अगोदरच तिची कशासाठीं तरी लगभग सुरू झाली. सड्याचें मडकें तसेंच अंगणांत ठेवून ती आंत आली, पुनः बाहेर आली; राहवेना म्हणून हात धुवून आपल्या दोन्ही मुलांना बाहेर घेऊन आली आणि 'बघा तें काय आहे' असें म्हणून आकाशांत गिरगिरणाऱ्या विमानाकडे बोट दाखवूं लागली. साधें रोज उडणारें विमान! त्या विमानाचा तिच्याशीं अर्थाअर्थी संबंध नव्हता. तें कोठून आलें, कुठें जाणार, अन् जायचें तिथें पोंचेल किंवा नाहीं यापैकीं तिला कांहीहि ठाऊक नव्हतें. तिला ठाऊक होतें तें म्हणजे एक अजस्र पांखरूं आकाशीं उडतें आहे, त्याच्या पंखांचा भरारा आवाज आपल्या

पर्यंत येतो आहे, तो दुसऱ्यालाहि ऐकविला पाहिजे आणि पहिला हक्क ज्यांच्यांत तिचा जीव सामावला आहे त्यांचा !

शिवू भिवूमारखीं वर्षांच्या अंतरातील तीं दोन मुलें आईच्याच उत्साहानें आपले इवले इवले डोळे मोठे करीत विमानाकडे बघूं लागलीं, टाळ्या वाजवीत नाचूं लागलीं. आई वयानें मोठी म्हणून ती अधिक मोठ्यानें टाळ्या वाजवूं लागली, त्यांच्याहून उंच उड्या मारूं लागली. त्यावेळीं त्या तिघांच्या जीवनांतलें श्रेय प्रेय म्हणजे वर उडन उडत दिठी आड होणारें तें अजस्र सतेज पांखरूं ! तें डोळ्याआड होतांच नर्मदा भानावर आली.

"अरेरे ! छोट्याला दाखविलंच नाहीं. पण तो उठणारहि नव्हता."

येवढ्या एका वाक्यानें तिनें झालेल्या चुकीचें परिमार्जन केलें व ती आंत पळाली. पळभरानें स्टोव पेटविल्याचा आवाज, कपबश्यांची किण-किण आणि 'चूळ भरून झाली ना ?" अशी काळजांत भिजकिलेली अधिकारी साद ! चहाचें आधण हातावर सांडलें तर ती म्हणणार-'पाणी माझ्या हातावर सांडलें, माझें काय केलें त्यानें ?'

असलें हें तिचें वेड्यागत बोलणें शहाण्यांना बुचकळ्यांत पाडतें आणि वेड्यांना !

त्या दिवशीं तिच्या घरीं पांच वेडे आणि मी एक शहाणा होतों. वेड्यांना हंसायला प्रयोजन नको, मुहूर्त नको. काट्यांतून फुलून वर आलेला गुलाब डोलतो तो वारियाच्या निमित्ते ! या घरांतला वाराहि वेडा आणि गुलाब पण वेडे ! त्यामुळें शहाण्यांची कुचंबणा !

तिच्या इतका जवळ येऊनहि मी कांहीं शिकूं शकलों नाहीं. पावसाची सतत धार पडते पण ओंजळ उलटी असेल तर तिला ओलहि चिकटत नाहीं. मी नर्मदेपेक्षां श्रेष्ठ. ती माझी व्हायला तयार झाली होती याचाच मला अहंकार ! ती नाकबूल करीत नसूनहि अभिमान ! हेंच तें किड्या-मुंगळ्याचें मन ! हेंच मन चिथावतें कीं, एरवीं कांहीं नाहीं तरी तिच्या सुखदुःखाची निदान फुकट वास्तपुस्त करून आपला मोठेपणा गाजवून घे; आपल्या अहंकाराचा दिवा आपल्याच भोवतीं ओवाळून घे !

म्हणूनच त्या दिवशीं त्या वेड्यांच्या घरांत, मोठा वेडा कमाईवर गेला असतांना, तीन छोटे वेडे झोपले असतांना आणि उरलेलें एक वेडें शहाण्यासमोर खुर्चीवर बसून लोकरींत सुई अन् सुईत लोकर करीत असतांना, शहाण्यानें विचारलें—

"नर्मदा, तूं खरंच सुखांत आहेस ना ?"

असल्या प्रश्नाचें उत्तर हुंदक्यांनीं मिळावें अशी शहाण्यांची अपेक्षा असते. म्हणूनच ते शहाणे ! याच अपेक्षेने ते विचारतात—"नर्मदा, तूं खरोखरच सुखांत आहेस ना ?"

"मला काय धाड झाली आहे. दुःख मला कुणीं दाखविलंच नाहीं, तेव्हां आहे त्याला काय म्हणतात तें मी कसं सांगूं ?"

असल्या उत्तराचा उंट जेव्हां शहाण्यासमोर येऊन उभा राहतो तेव्हां मडकें फोडण्या अगोदर वासराची मान कापण्याचा सल्ला त्याला द्यावासा वाटतो.

"तुझं घर खरोखरच नंदनवन आहे. हीं तुझीं गोजीरवाणीं मुलं..."

"गोजीरवाणीं ! दिवसरात्र उरापोटावर थयथय नाचत असतात नुसतीं ! आई सोडून कोणीहि त्यांना गोजीरवाणीं म्हणावं; माझी ना नाहीं."

"पण आता विश्रांति घ्यायला हवी. अगदींच एकाखालीं एक..."

जवाहिऱ्याला सल्ला दिल्यानंतर भाजीवालीला गोवाऱ्याच्या शेंगावर पाणी शिंपडण्याचा सल्ला देणें शहाण्यांना भाग पडतें तें अशा वेळीं!

"अग! छोट्याच्या पाठीवर आतां पांच वर्षे तरी कुणी नको,"

"असं होय! मला वाटलं तूं कांहींतरी गंभीर बोलणार आहेस, अन् सांगणार आहेस कीं संसाराचे कष्ट उपसून मी दमकलें आहें..."

"जें सांगायचं तेंच सांगतों आहें."

"मग सरळ सांग कीं! म्हणजे मी सांगेन कीं आतां छोट्याच्या पाठीवर कुणीच यायचं नाहीं. असा बघतोस काय? एवढं जर त्यांना कळलं नसतं तर तूं त्यांची निवड तरी कशी केली असतीस? तेव्हां आतां अगदीं आराम आहे."

"बरं झालं."

"बरं झालं हें खरं पण त्यांतलं दुसरंहि एक खरं सांगून टाकतें."

"एक खरं बरं असल्यानंतर आतां हें दुसरं खरं..."

"तुला सांगायला संकोच नाहीं पण कळेल कीं नाहीं हें तुझं तूं बघ! म्हणतात ना कीं, खिडक्या उघड्या ठेवल्या तर लोक बघतात आणि बंद केल्या तर जीव कोंडतो; पिकांसाठीं आला तर तो पाऊस एरवीं सांडपाणीच! आतां आराम आहे, भीति कसलीच नाहीं, खिडक्या उघड्या ठेवूनहि कुणी डोकावणार नाहीं पण आतां गम्मतहि नाहीं. पूर्वी दिवसरात्र कशी धास्ती, म्हणून अधिक ध्यास! नको असलं तर अधिक हवंसं वाटतं, नाहीं का? वेळीं अवेळीं एकमेकांकडे बघायचं अन् दोघांनींहि आपल्या नजरा जमिनीवर टेकवायच्या! ते इशारे, ती आस तृप्तीच्या अगोदर भीति—तृप्तीनंतर पुनः भय! पुनः असोस, पुनः हाव, पुनः मन आवरणं आणि आवर साधतां साधतां सावरून वळी पडणं—! खोलींत कोंडून घातलेलीं मुलं शिक्षकाच्या आवाजाला भितात पण एकमेकांकडे पाहून हंसतात, खुणा करतात, 'तुझा साथी मी, माझा साथी तूं' ती सरूपता, ती सायुज्यता...

"या छोट्याच्या वेळींच बघ ना! तो पाटांत यायच्या अगोदर अन् तो आल्यानंतर...त्यांना काळजी लागायची माझं मन जपायची आणि माझी तडफड त्यांचं मन जपायची...दोघांच्या मध्यें ठेवलेलं तरवारीचं पातं...बोटाला लागून रक्त निघालं तर तें ओठांनीं पुसायचं...हें सगळं मनोमन, परस्परांच्या साक्षीनं! हुरहुर, धपाप, अन् दिवसभर याच घरांत साद उठायचा...एकदां 'तूं माझा आहेस' अन् एकदां 'तूं माझी आहेस'...

"आतां ती तरवार गेली, बोट कापण्याची भीति गेली, ओठांचं कामहि उरलं नाहीं! आता सगळं कसं...रोजचं...

"तेंच भाजी खुडणं...कणीक मळणं...धुणं बडवणं; भाजीला चव नाही म्हणून हिंगजिऱ्याचं प्रमाण वाढवा, कणीक मळतांना भरपूर मोहन घाला...तरी पचत नाहीं, उतून येतं...तसंच हें...

"दिवस भिववीत नाहीं, रात्र भिववीत नाहीं आणि...

"आणि ही निलाजरेपणाची लाज स्वस्थहि बसूं देत नाहीं!..."

नर्मदा बोलत राहिली आणि शहाणा बसला होता तो उंट पळून गेला!!

• • •

*...आजच्या रात्रीं ती उद्यानाला अत्यंत*
*प्रिय झालेली आहे. आणि*
*दगडालाहि माणिक-मोत्यांचं*
*रूप प्राप्त झालं आहे.—गर्विष्ठ*
*झालेल्या ताऱ्यांना सांगा, कीं*
*तुम्हीं तेथेंच थांबून रहा—*
*आणि आजची रात्र इकडे बघूं नका.*

मधुसूदन वैराळे




**" फिर मेरी आंख हो गई नमनाक ।**
**फिर किसीने मिजाज पूछा है ॥ "**

ह्या दोन ओळी वाचल्या आणि मी मजाज ह्या कवीवर 'फिदा' झालों ! वरून अगदीं साध्या दिसणाऱ्या ह्या ओळींतून मजाजनें त्याच्या-भोंवती पडलेल्या दुःखाच्या दुष्टचक्राचें, मनाच्या तळाशी जाऊन भिडणारें वर्णन केलें आहे. ह्या ओळींचा अर्थ असा—"पुन्हा माझे नेत्र अश्रूंनी भरून आले (कारण) पुन्हा कोणीतरी 'कसं काय ठीक चाल्लंय ना' असा प्रश्न केला!" मनोभाव एवढ्या सूक्ष्मतेनं प्रगट करण्याचं 'मजाज'चं सामर्थ्य उर्दू काव्याच्या बहुतेक टीकाकारांनी मान्य केलं आहे. तरी पण मजाजच्या काव्याच्या मूल्यमापनाच्या बाबींवर अनेक टीकाकारांनी परस्परविरोधी अशीं मतें व्यक्त केली आहेत. कांहीनी त्याला उर्दू काव्याचा 'कीट्स' म्हटलं तर कांहींनी त्याची मद्यपी म्हणून कुचेष्टा केली. पण एका गोष्टीबद्दल मात्र शंका नाही. आणि ती म्हणजे उर्दू काव्याच्या आधुनिक इतिहासांत मजाजचें नांव अमर राहील !

कल्पनेच्या अतिशय उंच भराऱ्या, वर्णनांतील कमालीची सूक्ष्मता आणि दमदार भाषाशैलीमुळें अधिकच सखोल वाटणाऱ्या मुलायम मनोभावांचें अत्यंत उत्कट प्रगटीकरण ही उर्दू काव्याची, इतर भाषांतील काव्याच्या सर्वसामान्य तुलनेमध्यें जास्त लवकर डोळ्यांत भरणारी वैशिष्ट्यें आहेत. ह्या सर्व वैशिष्ट्यांनी मजाजचें काव्य विनटलेले असल्यामुळें त्यानें उर्दू काव्याच्या आधुनिक कालांत आपलें स्वतःचें असें वेगळें स्थान निर्माण केलें. मजाजचें नांव असरार-उल-हक ! त्याचा जन्म सन १९०९ मध्ये उत्तर प्रदेशांत सुखवस्तु घराण्यांत झाला. लखनौ येथे हायस्कूलचें व पुढें आग्रा येथे बी. ए. पर्यंतचें शिक्षण झालें. आग्रा येथे उर्दूचें प्रसिद्ध कवि 'फ़ानी' व 'जज्बी' यांच्या सहवासाची त्याला संधी लाभली. आणि प्रारंभापासूनच 'अख्तर शिरानी' ह्या कवीच्या Romanitic काव्याचा त्याच्यावर प्रभाव पडला. अन् केवळदहा वर्षांचें कालावधींत 'मजाज' अत्यंत लोकप्रिय कवी म्हणून उर्दू-साहित्य दरबारांत वावरू लागला. त्याच्या लोकप्रियतेची जणूं कांही एक प्रचंड लाटच आली. उर्दूच्या प्रसिद्ध लेखिका लोकप्रियतेचें वर्णन करतांना म्हणतात कीं—एक काळ असा होता कीं मजाज कोणाच्या वांट्याला येतो हें अजमाविण्यासाठीं, गर्ल्स कॉलेज अलिगढमध्यें, त्याच्या नांवाच्या चिठ्यांची लॉटरी टाकण्यांत येत होती, त्याच्या काव्य-संग्रहांना अश्रुस्नान घालून उशाखाली सांभाळून ठेवण्यांत येत होतें, आपल्या भावी पुत्राचें नांव 'मजाज' ठेवूं म्हणून निश्चय जाहीर होत होते आणि हास्याच्या मधुर फवाऱ्यांत, नाजुक कंकणांच्या किणकिणाटांत व वाऱ्यावर स्वैर उडणाऱ्या दुपट्ट्यांच्या लहरीवर 'मजाज'चे शेर गुणगुणले जात होते !"

जीवन म्हणजे एक शोकान्त काव्यच होतें. त्यानें केवळ कविता केल्या नाहींत तर तो काव्यातच जगला असें म्हणणें अतिशयोक्तिचें होणार नाहीं. मजाज हा सर्व अर्थांनीं प्रेमाचा शाहीर होता. त्यानें इतर विषयांवर काव्य केलेलें असलें तरी त्यांत प्रेमाला दुय्यम स्थानहि कधीं आलेलें नाहीं. या प्रेमाच्या पायींच त्याला मदिरेचें व्यसन लागलें. प्रेम आणि मद्य या दोन गोष्टींनींच त्याचें सारें जीवन व्यापलें. अर्थात् त्या मागोमाग दारिद्र्य आलेंच. पण त्याच्या जीवनांत प्रेमाची आणि मदिरेची नशा एवढी जबरदस्त होती कीं, त्याला पश्चात्ताप करावासा वाटला नाहीं किंवा त्याला तेवढी सवडहि मिळाली नाहीं. प्रेमवैफल्यानें ग्रासल्यामुळें त्याच्या दोन्ही व्यसनांची सीमा सारखी वाढत गेली. त्यामुळेंच कीं काय हा प्रेमाचा उत्कट शायर स्वतःचा विवाहहि करूं शकला नाहीं. त्याच्यावर आणि त्याच्या काव्यावर प्रेम असणाऱ्यांपैकीं कुणीहि त्याच्याशीं लग्न करून त्याचें जीवन सांवरण्याची हिंमत केली नाहीं. महिलावर्गात एकेकाळीं इतकी लोकप्रियता संपादन करणाऱ्या या कवीचा अंत जवळजवळ वेडाच्या अवस्थेंत एका इस्पितळांत १९५५ सालीं झाला ! हें

भवितव्य 'मजाज'ला दिसत नव्हतें असें नाहीं. पण तो स्वतःच्या बरबादीबद्दल दुःखी झाला नाहीं. त्याच्या ह्या अवस्थेवर दया दाखविणाऱ्या मित्रांना उद्देशून तो एवढेंच म्हणाला—

"मेरी बर्बादियोंका हमनशीनो ।
तुम्हे क्या, मुझे खुदभी गम नही हैं ॥"

[माझ्या साथीदारांनों; माझ्या बरबादीबद्दल तुम्हालाचं काय पण मला देखील दुःख झालेलें नाही.] आयुष्याची शोकांतिका त्याला स्पष्ट दिसत होती. म्हणूनच कीं कांय त्यानें एका कवितेंत लिहिलें—

"रोये न अभी अहले–नजर हाल पे मेरे ।
होना है अभी मुझको खराब जियादा ॥
आवारा ओ मजनू ही पे मौकूफ नही कुछ ।
मिलने है अभी मुझको खिताब और जियादा ॥
उठेंगे अभी और भी तूफां मेरे दिलसे ।
देखूँगा अभी इश्कके ख्वाब और जियादा ॥
टपकेगा लहू और दिदाए तर से ।
धड़केगा दिले खानाखराब और जियादा ॥

[सर्व नेत्रांनीं इतक्यांतच माझे हाल पाहून रडण्याचं कारण नाहीं. मला तर अजून याहि-पेक्षां जास्त वाईट स्थिति यायची आहे. मला जगानें आवारा व मजनू म्हटल्यामुळें कांहीं सर्व संपलेलं नाहीं–आणखीहि पुष्कळ अशा पदव्या मला मिळायच्या आहेत. अजून देखील माझ्या मनांत भयंकर तुफानं उठायचीं आहेत व अजून कितीतरी प्रीतीचीं स्वप्नं बघायचीं आहेत. ह्या घायाळ हृदयांतून अजून रक्ताचे थेंब गळावयाचे आहेत व उध्वस्त मनाचीं अजून कितीतरी स्पन्दनें व्हावयाचीं आहेत !] पूर्णपणें उध्वस्त झालेल्या स्वतःच्या जीवनाची फिकीर मजाजनें त्याचा हॉस्पिटलमध्यें मृत्यु होईपर्यंत कधीहि केली नाहीं. त्याच्या प्रेम कल्पनांची सखोलता मोठी जबरदस्त होती. त्यानें स्वतःला प्रेमाचा कवि म्हणूनच संबोधिलें. स्वतःची ओळख करून देतांना तो म्हणतो—

खूब पहचान लो असरार हूं मैं ।
जिन्से-उल्फत का बतलगार हूं मैं ॥

[माझी चांगली ओळख करून घ्या! मी असरार ह्याचें नांव आहें आणि मी प्रेमनामक वस्तूच्या प्राप्तीसाठीं धडपडणारा आहें !] मजाजनें ह्या ओळींतून करून दिलेली ओळख अगदीं अचूक आहे. त्याच्या सर्व काव्यावर नजर टाकली तर त्यानें त्याच्या संवेदनांशीं आणि अनुभूतींशीं राखलेला प्रामाणिकपणा ठायीं ठायीं दिसून आल्याखेरीज रहात नाहीं. मजाज वैफल्यानें ग्रासलेला होता, समाजावर चिडलेला होता. पण त्याचवेळीं तो सौंदर्याचा आणि प्रीतीचा निस्सीम भक्त आणि भोक्ताहि होता. त्याच्या काव्याचा सर्वच भाग प्रीति-देवतेच्या यशोगानांनीं फुललेला आहे. अगदीं प्रारंभीं म्हणजे १९३३ सालीं मजाजनें लिहि-लेल्या 'आजची रात्र' ह्या शीर्षकाखालील कवितेकडे पाहिलें म्हणजे सुरवाती पासूनच ही वैशिष्ट्यें त्याच्या कवितेंत कशीं दिसून आलीं हें सहज लक्षांत येईल. आजच्या रात्रीचं वर्णन करतांना तो म्हणतो :—

"प्रीतीच्या आकर्षणाचा प्रभाव किती प्रगाढ असतो हें आजच्या रात्रीं बघा! आजच्या रात्रीं माझ्या प्रेयसीनं माझ्या हृदयावर टेकून विसावा घेतला आहे! माझ्या घायाळ हृदया, तुला आणखी काय हवं आहे—आज तिनं विशिष्ट तऱ्हेनं तुझ्याकडे दृष्टिक्षेप केला आहे! ते कांटे असोत—कीं फुलें असोत—आजच्या रात्रीं तीं

उद्यानाला अत्यंत प्रिय झालीं आहेत आणि दगडांना देखील माणिक-मोत्यांचं रूप प्राप्त झालं आहे! आज तिच्या मुखकमलाचं मी काय वर्णन करूं? तें पाहून तर चंद्रानं त्याच्या प्रवासाची सारी सामुग्री अस्ताव्यस्त फेकून दिली आहे! आणि हाय रे देवा, तिकडे त्या तारका देखील तिच्या स्फटिकमय भालप्रदेशाचं तेज पाहून थिजून पडल्या आहेत. माझ्या द्वाड दृष्टीमुळें ते नाजूक पण उष्ण कपोल संध्येच्या लालिमेसारखे भासताहेत व माझ्या गीतामुळें तिच्या नर्गिसी नजरेवर हल्कासा खुमार चढतो आहे! आपल्या उच्च स्थानामुळें गर्विष्ठ झालेल्या ताऱ्यांना सांगा कीं तुम्ही तेथेच थांबून रहा—आणि आजची रात्र इकडे वधूं नका!"—पण हें कवीचं सुख कल्पनेंतीलच असावं. तसं नसलं तरी तें क्षणभंगुर असतं. तें टिकत नाहीं. कांहीं क्षण कवीचा कल्पनेच्या कैफांत चटकन् अदृश्य होतं आणि मग कविमन विरहभावनेनं घायाळ होतं. त्याला प्रदीर्घ निःश्वास देखील मोकळेपणानं टाकण्याचं स्वातंत्र्य समाजानं ठेवललं नसतं. तो व्याकुळ होतो. त्याच्या व्याकुळतेची साक्ष पटविणाऱ्या ह्या ओळी पहा:—

मैं आहें कर नही सकता,
कि नग्मे गा नही सकता।
सुकूं लेकिन मेरे दिलको
मुयस्सर आ नही सकता॥
कोई नग्मे तो क्या, अब मुझसे
मेरा साजभी ले लें।
जो गाना चाहता हूं, आह, वो मैं
गा नही सकता॥
हदें वो खैंच रखीं हैं हरम के
पास वालोंने।
कि बिन मुजरिम बने पैगाम
भी पहुँचा नही सकता॥

बंधनांनीं बांधलेल्या आणि मर्यादांनीं जखडलेल्या ह्या कवीला शेवटीं हवं आहे तरी काय? बरेचदां त्याचं त्यालाहि तें कळत नाहीं पण त्याला कोणती तरी एक काळजी सारखी ग्रासते आहे. तिचं वर्णन त्यानं 'फिक्र' ह्या कवितेंत केलं आहे. कोणत्या तरी अदृश्य आणि अप्राप्य स्वर्गाच्या शोधांत तो नाही. परंतु पराकोटीस पाहोंचणाऱ्या आनंदमय वातावरणाचा स्वर्ग मात्र मात्र त्याला जमिनीवर हवा आहे. सर्वस्व गमावून, स्वतःच्या जगाचा स्वतःच विध्वंस करूनहि आपलं नुकसान झालं आहे याची जाणीव स्वतःला कां होत नाहीं असाहि तो प्रश्न विचारतो. कोण्यातरी नव्या निर्माणोन्मादाचा आदेश त्या कल्पक मनावर स्वार झालेला असल्यामुळं बहुधा असं झालं असावं अशी त्याला शंका आहे. एवढं ताजं-तवानं वाटत असतांना देखील कोण्यातरी सौंदर्यवतीनं आपल्या कपाळावर निश्चिन्ततेचा हळुवार हात फिरवावा किंवा तारकांचं तेज असलेल्या रमणीच्या मांडीवर डोकं ठेवून निःस्तब्ध पडावं ही प्रेमाच्या पराकाष्ठेची कल्पना त्याच्या शोकाकुल हृदयाच्या आर्तनादांतून बाहेर पडते.

कवीला एकान्त प्रिय असतो म्हणतात. त्याच्या काव्यसृजनाची आणि कल्पनाकाननांत मनसोक्त विहार करण्याची तिच एकमेव पर्वणी असते. हें एकान्ताचं सुख कांहीं और असतं. मजाजनें ह्या एकान्ताच्या सुखावर एक काव्य केलं. तो एकान्तांत म्हणतो— "ह्या प्रीतीच्या मदिरालयातील मी एक फार पूर्वीपासूनचा मद्यपी आहें, ह्या सौंदर्याचे संमेलनाचा मी उत्कट असा मृदुभाषी गायक आहें आणि चंद्राचे जे तुकडे जमिनीवर आले त्यांनीं तर मला कधींपासूनच शिकार केलं आहे! माझ्या मनोमंदिरांत स्थानापन्न झालेल्या ह्या सौंदर्य-मूर्ती किती आकर्षक आहेत म्हणून सांगूं! गिरजाघरांतील हरिणांची घायाळ करणारी दृष्टि आणि काबाच्या धर्मक्षेत्रांत अंतःपुरांत जतन झालेलं सौंदर्य यांचा त्यांत मिलाप आहे. मी ह्या एकान्तात प्रीतीचं स्वरूप धारण करतों आणि त्या रूप घेतात कृपामूर्तीचं! आणि म्हणून मी सौंदर्यसंमेलनाच्या कृपेचं केंद्र आहें! माझ्या पेल्यांत सुखरूपी मद्य तरंगित होत आहे, त्यांत दुःखाचा लवलेशहि नाहीं. आणि माझ्या कल्पना-कथांमध्यें सफलतेनें आपले पंख पसरून ठेवले आहेत आणि म्हणून मी निराशेची व्यर्थ धडपड पाहून हंसतों आहें! माझ्या रचनेमध्यें चंद्राचं रूप आहे, कुजबुजण्यामध्यें प्रभातीचं पवित्र्य आहे, शब्दांमध्यें पुष्पाचा सुगंध आहे! मी ह्या उद्यानाचा आत्मा आहें—प्राण आहें! आत्मशृंगाराची संवय आणि एकाकीपणा ह्यामुळं मी असहाय असलों तरी माझ्या दृष्टीसमोर कोणती तरी ज्योत सारखी तेवते आहे आणि म्हणून मी मानवी वेदनांचा मर्मज्ञ-आहें! आतां अभिलाषा एवढीच आहे कीं, प्रत्येकाच्या हातांत एक प्याला असावा, निराशा—असहायता ह्या विगत कथा झालेल्या असाव्यात व सर्वांनाच हें प्रीतीचं मदिरालय सर्वस्वी खुलं असावं! आतां आकांक्षा इतकीच कीं, जगाचं वळण बदलावं व ऐश्वर्य आणि सुखाच्या तेजानं प्रत्येकाचे नेत्र तेजाळून यावेत! आतां हा प्रश्न वेगळा कीं, मी स्वतःच एक भग्नहृदयाचा दरिद्री आहे!" पण ह्या साऱ्या कल्पना मजाजच्या जीवनकाळांत तरी केवळ कल्पनाच राहिल्या! कांहीं दिवस मजाजनें रेडिओच्या संपादन विभागांत काम करण्यासाठीं दिल्लींत घालविले; आणि ह्याच काळांत त्याला आयुष्यांतला सर्वांत मोठा हादरा



अनुक्रमणिका

बसला. त्याच्या हृदयावरची त्याची सत्ता दिल्लीच्या सौंदर्यवतीनं काबीज केली आणि मग भग्न मनानं त्यानं दिल्ली सोडली. दिल्ली सोडतांना त्यानं—

'रूख्सत दिल्ली, तेरी महफील से अब जातां हूं मैं'

—ह्या शीर्षकाची केलेली कविता मनाला पीळ फाडणारी आहे.

दिल्ली सोडतांना मजाजच्या अश्रुधारा अखंड वाहिल्या आणि ह्या काव्यांत शब्दबद्ध झाल्या!

दिल्लीमध्यें पुन्हा 'बहरलेल्या बगिच्यांत अग्निवर्षाव' करण्यासाठीं येण्याची त्याची अभिलाषा सिद्धीस गेली नाहीं. स्वतःच्या जीवनासंबंधीं त्यानें निष्कर्ष काढला कीं—

संग को गौहरे–नायाबो–गिरां जाना था
दश्ते–पुरखार को फिर्दौसे–जवां जाना था
रेग को सिलसिल ए'आबे,खां जाना था
आह यह राज अभी मैंने कहां जाना था?
मेरी हर फतहमे हैं एक हजीमत पिनहा।
हर मुसर्रत मे है राजे-गमो-हसरत पिनहा

(मी दगडांना अलभ्य अन् अमुल्य मोती समजलों, कांटेरी अरण्यांना तारुण्यमय उद्यानें समजलो, वाळवंटांना निर्झर समजलों—पण हें रहस्य मला उमजलें नाहीं कीं माझ्या प्रत्येक विजयाच्या आड एक पराजयहि दडलेला आहे.) पण दुःखांतहि मजाजची कल्पकता आणि संवेदनक्षमता बोथट झाली नाहीं. त्यानें प्रीति व सौंदर्याबद्दल दोनच पण मार्मिक कविता केल्या. तो म्हणतो—

मुझसे मत पुछ "मेरे हुस्न मे क्या रक्खा है?
आंखसे पर्दाये–जुल्मात उठा रक्खा है,
मेरी दुनिया कि मेरे गमसे जहन्नुम बरदोश
तूने दुनिया कोंभी फिर्दौस बना रक्खा है!
मुझसे मत पुछ "तेरे इश्क में क्या रक्खा है?
सोज को साज के पर्दे मे छुपा रक्खा हैं।
जगमगा उठती है दुनिया-ए-तखैयुल जिससे
दिलमे वो शोअला–ए–जां सोज रक्खा है!

सौंदर्याला प्रेम म्हणतें कीं 'माझ्या ह्या सौंदर्यांत काय ठेवलेलं आहे' असं तूं मला विचारूं नकोस! ह्या दृष्टीवरील गडद अंधःकाराचा पडदा तूं बाजूला सारून ठेवला आहेस. माझ्या मनोविश्वाच्या दोन्ही खांद्यांवर दुःखमय नरकाचें ओझें होतें पण तुझ्यामुळें तर तूं ह्या पृथ्वीलाहि साक्षात् स्वर्ग करून ठेवलें आहेस. आणि पुढें पुन्हा प्रेम म्हणते कीं–माझ्या ह्या प्रीतीमध्यें काय ठेवलं आहे असं, हें सौंदर्या, तू मला विचारूं नकोस! कारण ह्यामुळेंच मी दुःखाला एका सुखाच्या पडद्या आड दडवून ठेवलं आहे. माझं मनोविश्व ज्या देदिप्यमान प्रकाशामुळें उजळून जातं असा एक प्रदीप्त अग्नि ह्या मनांत (प्रेमामुळं) दडून बसला आहे! अशाच आगखी असंख्य कल्पनांचा संसार मजाजनें निर्माण केला. कल्पनेच्या कैफांत चढल्यावर मजाजच्या तोंडून अत्यंत सुंदर काव्य बाहेर पडलं.

मेरे हर लफ्ज मे बेताब मेरा सोज दरूं।
मेरी हर सांस मुहब्बत का धुआं हैं साकी॥
एके ठिकाणीं तो म्हणतो.
इश्क का जौके–नजारा मुफ्तमें बदनाम हैं।
हुस्त खुद बेनाब है जलवे दिखाने के लिए॥

म्हणजे प्रीतीच्या पोटीं असलेली सौंदर्याबद्दलची दर्शनाभिलाषा विनाकारणच बदनाम झालेली आहे. वास्तविक स्वतः सौंदर्यच आपलं रूपदर्शन देण्यासाठीं अधीर झालेलं आहे! दुसऱ्या दोन पंक्तींमध्यें देखील मजाज जास्तच रंगल्यासारखा वाटतो. तो म्हणतो कीं, आम्हाला बालपण गेल्यानंतर जेव्हां कळायची स्थिति आली तेव्हांच आम्ही कुणावर तरी जीव दिला म्हणजे बालपणानंतर तारुण्यावस्था ती आलीच नाहीं–आलं तें मरणच!

मजाजच्या काव्याचें मूल्यमापन करतांना, पूर्वी उल्लेखिल्याप्रमाणं टीकाकारांत पुष्कळ मतभेद आहेत. प्रीतीचं काव्यहि पुरोगामीच असलं पाहिजे असा अट्टाहास करणारे उर्दू क्षेत्रांत देखील आहेतच. मजाजचे बाबतींत कम्युनिस्टी–वळणाचे तथाकथित पुरोगामी आणि 'कलेसाठीं–कला' म्हणणारे साहित्यप्रेमी ह्या दोघांनींहि तो 'आमचा' होता असा दावा केला आहे. माझ्या मतें त्यानं या दोहोंपैकीं कोणतेंच शिक्का-मोर्तब करून घेतलें नाहीं हेंच त्याचें वैशिष्ट्य होय! त्याच्या काव्याचा स्रोत व्यक्तिगत विफलतेंतून व प्रसंगीं वैफल्यांतूनहि प्रवाहित झाला असला तरी त्याची सामाजिक पृष्ठभूमि कधींच नष्ट झालीं नाहीं. त्यानें अविर्भावपूर्ण घोषणामय क्रान्तिगीतें (एखादा अपवाद सोडला तर) लिहिलीं नाहींत. पण मजाजच्या गीतांमधून क्रांतीचे उद्घोष नसले तरी मानवत्वाची निस्सीम प्रीति खास आहेच! अमानवी अथवा अतिमानवीपणाचा त्याचा तिरस्कारा एका रचनेंत स्पष्ट दिसतो. तो म्हणतो.

"मला मंदिर आणि काबा यांचें आकर्षण नाहीं. त्यांचे उंबरठे म्हणजे माझ्या मर्यादा असं कांहीं तूं करूं नकोस! माझ्या आत्म्यामध्यें तूं अमरता देऊन तूं त्याला ब्रह्मज्ञानी लोकांच्या सभेची शोभा बनवूं नकोस! ह्या अज्ञानाच्या अंधःकारांत मला भटकूं दे; त्याला तूं आकाशगंगा करूं नकोस! माझं अज्ञानाचं सुख हिरावून–मला दोन्ही जगांचं ज्ञान असणारा बनवूं नकोस! ज्या उद्यानांत वीजांशीं खेळण्याची संधि नाहीं अशा ठिकाणीं माझं घरटं बनवूं नकोस! कृपा करून ह्या धरतीला धरतीच राहूं दे. तिला तूं आकाश बनवूं नकोस!" ही रचना जरी विरक्तीच्या भावनेंतून निघाली असली तरी कवी स्वतःची संघर्षप्रियता लपवूं शकलेला नाहीं. दुसऱ्या एका कवितेंत तो म्हणतो—"क्षितिजावर युद्धाचा रक्तबंबाळ तारा आग ओकतो आहे, वायूची प्रत्येक लहर मृत्यूची सूचना देत आहे आणि आकाशांतील गर्जनांनीं जगाचं हृदय कंपित झालेलं आहे! पण अशाहि स्थितींत मी माझ्या ध्येयपूर्तीसाठीं पुढेंच पाऊल टाकीत आहें!" दुसऱ्या एका कवितेंत तो चिडून म्हणतो—

ये मुसलसल आफतें, ये युरिशें, ये कत्ले आम।
आदमी कब तक रहे ओहामे-बातिल का गुलाम॥

दुसऱ्या एका कवितेंत तो म्हणतो—

तुझ्या डोक्यावरील पदर फार शोभून दिसतो ह्यांत शंकाच नाहीं–पण जर त्याची तूं एक विजयपताका बनवून उभारली असती तर जास्त चांगलें झालें असतें. त्याच्या काव्यांत व्यक्तिनिष्ठ अनुभूतींची तीव्र जाणीव सर्वत्र विखुरलेली असली तरी सामाजिक जीवनाचा प्रभाव व प्रकृति ह्यापासून त्याचें काव्य अलिप्त नव्हतें. पण हा वाद कवीच्या काव्याच्या मुल्यमापनांत फार महत्वाचा आहे असें मला वाटत नाहीं. मजाज स्वतःच्या कल्पनाविश्वांत मनसोक्त वावरला म्हणूनच हृदयाला चटका लावणारा कवी झाला असें मला वाटतें. मजाजच्या सर्व काव्याची वैशिष्ट्यें एकत्र चमकून दिसतील अशी त्याची सर्वांत प्रसिद्ध कविता म्हणजे 'आवारा' ही होय! माणसाच्या मनाच्या भग्न उद्विग्नतेचें एवढें विद्रोही व मनाला हलविणारें दुसरें काव्यमय चित्र उर्दूच्या काव्यविश्वांत क्वचितच सांपडेल. ती कविता स्वतः समजून तादात्म्यानें वाचल्याशिवाय तिच्यांतील धगधगती तडफड कळणार नाहीं. म्हणून तिच्या वाटेला न जाणेंच जास्त चांगलें!

• • •

अनुक्रमणिका

*गुरुवार उजाडला. मधूनें स्वच्छ आंघोळ करून दत्ताला हार घातला आणि मला एक पेढा दिला. जणूं आय. ए. एस् च्या परीक्षेला बसायचं अशा रीतीनें मध्याची छाती धडधडत होती.......?*




बाळ सामंत

रात्रीं सिनेमाला गेल्यामुळें जागरण झालं होतं. तशांत रविवार, त्यामुळें आमचं वसतिगृह अद्यापि झोपेंतच होतं. सकाळचे नऊ वाजले तरी आरडाओरडा आणि बाथरूममधील सिनेमासंगीत सुरूं झालं नव्हतं. कॉटवर पडल्या पडल्या मी आरोळी दिली—" पांडू—एक कप चहा वर पाठव. " माझ्या या आरोळीला पांडूचं प्रत्युत्तर यायच्या आंतच—" पांडू—आणखी एक कप चहा वर पाठव" अशी



आणखी एक आरोळी आली आणि माझा जिगरदोस्त मध्या आंत प्रवेश करता झाला. आंत येतांक्षणींच माझं बकूट धरून मला कॉटवर बसता केला आणि म्हणाला—" बाळ्या, नऊ वाजले तरी अजून तूं उठला नाहींस! काय ही तुम्हा विद्यार्थ्यांची अधोगति! सकाळीं उठून व्यायाम करायचा–गीता वाचायची––"

"वा रे वा! तुझ्यासारख्या नतद्रष्ट माणसाच्या तोंडीं व्यायाम, गीता यासारखे पवित्र शब्द! सूर्य पश्चिमेला उगवल्यासारखा कांहीं चमत्कार घडला कीं काय? " मीं विचारलें.

" येस, बाळ्या–तुझं म्हणणं यथार्थ आहे. गीतेवर माझं खरंच प्रेम जडलंय."

" ही कोण बुवा गीता काढलीस? "

" बाळ्या, तुम्हा लोकांना जिथंतिथं पोरीच दिसतात काय रे? ही गीता म्हणजे आम्हा हिंदुधर्मीयांचा पवित्र धर्मग्रंथ भगवद्गीता— "

" एकूण सांप्रत हिंदुधर्माला बरे दिवस आलेले दिसतात. पण काय रे नतद्रष्टा, भगवद्गीतेसारख्या पुण्यवान् ग्रंथावर तुझ्यासारख्या पाप्याची नजर कां? "

" मित्रा—मला असा हिणवूं नकोस. त्या पवित्र धर्मग्रंथाबाबत मला तुझ्याकडून बरीचशी माहिती हवीय–आजपासून मी नियमानें गीता वाचणार." मध्या म्हणाला.

" मध्या, यांत कांहींतरी पठाणी गोम दिसतेय. या भगवद्गीताप्रेमाच्या मागें एखादं नाजूक प्रकरण असावं असा दाट संशय येतोय—"

बोल, खरा प्रकार काय तो सत्वर सांग—"

" बाळ्या, तुझं डोकं महातलख आहे यांत शंकाच नाहीं. बाळ्या, यांत खरोखरच एक नाजूक प्रेमाची भानगड आहे."

" कॉंग्रॅच्युलेशन्स! कोण ही भाग्यवान सुकन्या?"

" मित्रा, असा अधीर होऊं नकोस—ही शिकार वाटते तितकी सोपी नाहीं...अक्षरशः वाघाची शिकार आहे."

" प्रेमाची नाजूक भानगड आणि वाघाची शिकार—हें काय गौडबंगाल आहे?"

" बाळ्या—मी टायगरच्या प्रेमांत सांपडलोंय—आपली ज्यूनियर बीएतली कमल वाघ."

" अस्सं! म्हणजे कमल वाघ तुझ्या जाळ्यांत सापडलीय."

" मित्रा–तसं नाहीं रे, ती माझ्या जाळ्यांत सांपडली नसून मी तिच्या पंजांत सांपडलोंय."

" मग तिच्या मागें असणारे, जगताप—कसबेकर—दबडघे या कंपनीचं काय?"









अनुक्रमणिका

"त्या तीन मूर्ख शिलेदारांचा मी आतां जवळजवळ बोऱ्याच वाजवलाय—पण या शिकारींत मला तुझी आणि आपल्या भ्रमिष्ट कविराजाची मदत पाहिजे." मध्या म्हणाला.

"मित्राला मदत करणं आमचं परमपवित्र कर्तव्य आहे—पण या प्रकरणाचे अगोदर सर्व डीटेल्स सांग."

"सांगतों सारं कांहीं सांगतों. पण अगोदर त्या भ्रमिष्ट कवीला उठव—" मध्या म्हणाला.

कविराज म्हणजे आमच्या टोळक्यांतला नवकवि कुंदा घाटपांडे. त्याचं खरं नांव मुकुंदा घाटपांडे. पण नवकवींच्या स्टाईलप्रमाणं त्यानं कुंदा घाटपांडे हें नांव धारण केलं होतं. मी कुंदाला बोलावण्यासाठीं तेवढ्यांतच चहा घेऊन आलेल्या पांडूला पिटाळलं. केस पिंजारलेले, दाढी वाढलेली, चेहेरा कवितेंतला, अशा थाटांत कुंदाची स्वारी आंत येतांच मी त्याला मध्याच्या टायगरप्रेमाची कहाणी सांगितली, आणि मध्याला पुढची हकीकत सुरू करायची विनंति केली.

"मित्रांनो, टायगरवर माझा बरेच दिवस डोळा होता हें तुम्हाला ठाऊकच आहे. पण तिची ओळख कशी होणार हा मोठाच प्रश्न. कारण एखाद्या पोरीशीं दोन शब्द बोलायचे म्हटले कीं मला हिंवताप भरतो हें तुम्हांला माहीत आहेच."

"मग हें कसं काय जमलं?...कुंदानें विचारलं.

"त्याचं असं झालं कीं, गेल्या आठवड्यांत टायगर माझ्या ताब्यांत आल्यासारखीच आहे.

"मग वांधा कुठं आला?"

"म्हणजे अजून तिची न् माझी ओळख नाहीं झाली. पण गेल्या आठवड्यांत तिचे वडील डॉ. वाघ यांच्याशीं छान दोस्ती जमली.

"म्हणजे प्रथम तूं सासऱ्यालाच पकडलंस?" मी म्हणालों.

"करेक्ट!—पण सासऱ्याला भगवद्गीतेचा भयंकर नाद आहे. तो गीतेशिवाय कोणत्या विषयावर बोलायलाच तयार नाहीं—आणि त्याच्याच तोंडून कळलं कीं टायगरला नवकाव्याचा नाद आहे."

"पण आतां पुढें काय?"

"आतां माझा प्लान असा कीं, तुझ्या मार्फत भगवद्गीता आणि या नवकवीच्या मार्फत नवकाव्य या दोन्ही भानगडींची माहिती करून घ्यायची आणि या डबल बॅरलनें टायगरची शिकार करायची!"

"मध्या, तूं काळजी करूं नकोस, मी तुझ्या नांवावर भगवद्गीतेवर एखादा लेख छापवून आणतों—पण तें नवकाव्याचं लफडं मुकुंदानें सांभाळलं पाहिजे."

"मध्या—भगवद्गीता सोपी आहे रे, पण नवकाव्य हें इतकं सोपं काम नाहीं—यंत्रबद्ध मानवाचं तें आक्रंदन आहे—त्याला स्फूर्ति पाहिजे—धगधगती आंच पाहिजे—जीवनाचा अर्थ लावतां आला पाहिजे—मूर्तिभंजन—

"मेलों—कुंदा ठार मेलों—आणि याच पद्धतीनें जर तूं मला नवकाव्याची ट्यूशन देणार असशील तर मला वेड लागेल."

"मध्या, नवकाव्याची अशी चेष्टा करूं नकोस. त्याच्या अर्थशून्यतेंतच त्याची महान्ता आहे. अशाश्वताच्या समशेरीवर शाश्वताची ढाल तुटते तेव्हां—पण तुला नाहींच तें समजायचं!"

"माफ कर. मला नाहीं समजलं तर कांहीं दुःख नाहीं."

अरे, पण हें नवकाव्य समजलं नाहीं तर तूं टायगरची शिकार कशी करणार?" मीं विचारलं.

"अरे, तें समजावून न घेतांहि या कविराजानें को-ऑपरेशन दिलं तर सारं कांहीं जमेल." मध्या म्हणाला.

"मध्या, तूं नवकाव्याची कितीहि टिंगल केलीस तरी तुला मदत करणं हें माझं पवित्र कर्तव्य आहे." कुंदानें आश्वासन दिलें.

"मग प्रश्नच मिटला-तूं मला रोज एक फक्कड-जिचा अर्थहि कुणाच्या बापाला लागणार नाहीं अशी-नवकविता मला लिहून द्यायची."

"हरकत नाहीं. एक काय, रोज एक डझन लिहून देईन."

"एक डझन नको-तूर्त एक पुरे. ती मी रोज माझ्या हस्ताक्षरांत लिहून काढीन."

"अवश्य लिहून काढ."

"आणि जणूं ती मीच लिहिली असं शाबित व्हावं म्हणून त्याखालीं माझी सही ठोकीन."

"आमची कांहीं हरकत नाहीं. वाटल्यास दोनतीन सह्या कर."

"आणि ही कविता बाळ्यानें टायगरच्या हातीं पडेल अशी व्यवस्था करायची" मध्या म्हणाला.

"अरे बाप रे! मला ह्या वाघाच्या तोंडीं देतोस?"

"बाळ्या, भाव खाऊं नकोस. कविता पोंचवण्याची युक्ति सांगतों. आपला लायब्रेरियन देवीदास तुझा दोस्त आहे. टायगर लायब्ररीचीं पुस्तकं परत करायला आली कीं नवं पुस्तक देतांना त्यांत माझी म्हणजे कुंदानें लिहून दिलेली कविता आंत ठेवून तें पुस्तक तिला द्यायचं."

"पण कांहीं घोटाळा होणार नाहीं ना?" मीं म्हटलें.

"कांहीं घोटाळा होणार नाहीं-पण मुकुंदा-त्या कविता लिहितांना "पिपांत ओल्या उंदीर" असल्या घाणेरड्या कविता नकोत."

"मध्या, कवीच्या प्रांतांत ढवळाढवळ करूं नकोस. तुला कविता लिहून देण्याचं काम माझं. पण त्यामुळें तिचं नी तुझं जमणार कसं?"

"मध्या, कुंदाची शंका रास्त आहे. लेका, तुझी न् तिची ओळख सुद्धां नाहीं, मग तुमचं जमणार कसं?"

"त्यांलाहि उपाय शोधून काढलाय मीं-रामबाण उपाय—"

"मित्रांनो, आपलं कॉलेज तीनला सुटतं. आणि टायगर बरोबर तीन दहाला मैत्रिणींची फटावळ घेऊन स्टेशनकडे जायला निघते. ती निघाली कीं, आपण तिच्या मागोमाग वन् टू-वन् टू करीत स्टेशनपर्यंत जायचं-अगदीं मागें लागायचं म्हणेनास—"

"आपण नाहीं बुवा असले धंदे करणार, हवा तर तूं एकटा जा—"

"बाळ्याच्या म्हणण्याला माझा दुजोरा आहे" कुंद्या म्हणाला. "बाळ्या, कुंद्या, डोन्ट ईट भाव—मी असा डिफिकल्टींत सांपडलोंय म्हणून छळतां काय? थांबा, या क्षणीं हें ढेकणाचं औषध पिऊन मी जीव देतों" असं म्हणून मध्यानें डायझॉनची बाटली उचलली.

"नको—मध्या, तें औषध फुकट घालवूं नकोस. हरकत नाहीं—तुझ्या प्रेमळ पदयात्रेंत सामील व्हायला आमची कांहींच हरकत नाहीं. पण हें वन् टू—वन् टू—किती दिवस करायचं?"

"फक्त सात दिवस-पुढच्या रविवारीं डॉ. बापांनीं मला घरीं बोलावलंय गीतेवर चर्चा करायला-तेव्हां आपण तिघांनीं तिथं जायचं. तुम्ही बसा म्हाताऱ्याशीं गीतेची चर्चा करीत आणि मी टायगरशीं प्रेमाच्या कानगोष्टी करीन."

"आम्ही लोंचटासारखे त्या बापाकडे येणार नाहीं. अधिकृत आमंत्रण पाहिजे—" आम्ही ठासून सांगितलं.

"हरकत नाहीं-अधिकृत आमंत्रण देण्याची व्यवस्था करतों," असं मध्यानें उठतां उठतां आश्वासन दिलं.

मध्याच्या या प्रेमप्रकरणांत त्याला मदत करण्यासाठीं आमची मदत म्हणून आम्ही त्याच्या प्रेमपदयात्रेंत सामील झालों. मुकुंदाच्या नवकाव्याचा रतीब लायब्ररीच्या पुस्तकांतून कमल बापच्या हातीं पोंचता होईल याची मीं व्यवस्था केली होती. पण या पदयात्रेंतून फारसें कांहीं घसघशीत यश मिळेल असं कांहीं वाटेना. कारण आम्ही तिघेजण त्या पोरींच्या फटावळीपासून एका हांकेचें अंतर ठेवून चालण्याचा निश्चय केला होता. न जाणों, चिडल्या तर अनवस्था प्रसंग नको ओढवायला शिवाय त्या मागें पाहातात काय, पाहात असल्यास हंसतात काय, विशेषतः कमल बाप एकूण किती वेळां मागें वळून पाहाते आणि हंसते याची नोंद घेण्याचें अवघड काम मध्यानें माझ्यावर सोंपवलें होतें. पण या पोरींनीं आमच्याकडे एकदांहि मागें वळून पाहिलें नाहीं. पण आम्ही त्यांच्या मागें आहोंत याची त्यांना पूर्ण जाणीव असूनहि त्यांनीं आम्हाला आणि

विशेषत: टायगरनें मध्याला एका अर्थी चीत केलें होतें.

आतां या पदयात्रेंतून कांहीं निष्पन्न होईल असें दिसेना. आणि जवळ जाऊन ओळख काढण्याइतकं साहस आमच्यापैकीं एकाजवळहि नव्हतं. बरं, वाटेंत एखादा गुंड किंवा मवाली त्यांना त्रास देतोय अशी सिच्युएशन निर्माण झाली असती तर मध्या एखाद्या राजपुत्राप्रमाणें राजकन्येच्या सुटकेसाठीं धांवून गेला असता, पण हल्लीं गुंडहि पोरींच्या मागें लागत नाहींत कीं काय याची आम्हाला शंका आली. त्यामुळें शेवटीं मध्यानें पर्याय काढला कीं, आपण डॉ. वाघांच्या दवाखान्यांत जाऊं आणि त्यांची ओळख वाढवून रविवारीं सकाळीं चहाचं आमंत्रण मिळवूं. मध्यासाठीं आतां डॉक्टरच्या दवाखान्यांत जायला आम्ही तयार झालों. डॉ. वाघ हे रिटायर्ड मिलिटरी डॉक्टर असल्यामुळें त्यांच्याकडे पेशंट म्हणून कुत्रादेखील आला नव्हता. आम्ही आंत जातांच—मध्यानें विचारलें "काय, डॉक्टरसाहेब, यायचं का आंत?"

डॉक्टरनीं मध्याला ओळखलंच नाहीं. त्यांना वाटलं, हे कुणीतरी पेशंटच आले. ते म्हणाले, "डॉक्टरकडे यायचं कां असं विचारणारे पहिलेच पेशंट दिसतांहांत तुम्ही. तुम्हाला कांहीं मेंटल ट्रबल दिसतोय!"

पण इतकं म्हणून तो रिटायर्ड मेजर वाघ थांबला नाहीं तर त्यानें मध्याची मानगुटी पकडली आणि त्याला आंतल्या खोलींत नेऊन झोंपवला. साठ वर्षांच्या त्या म्हाताऱ्याची पकड इतकी जबरदस्त होती कीं, मध्याच्या तोंडांतून फेस आला आणि माझ्या आणि मुकुंदाच्या तोंडचं पाणी पळालं. मी डॉक्टरना म्हणालों— "डॉक्टर, तुम्ही त्यांना चांगले ओळखतां—"

डॉक्टर म्हणाले, "मेंटल ट्रबल असलेल्या पेशंटला मी एका दमांत ओळखतों—मला वाटतं या पोराला लहानपणीं पोलियोचा झटका येऊन गेला असावा. सध्यां मी पोलियोवर संशोधन करीत आहे त्याला ही केस चांगलीच उपयोगी पडेल."

बहुतेक या डॉक्टरचं डोकं फिरलेलं असावं असं म्हणून आम्ही शेवटचा प्रयत्न करायचं ठरवलं. मी म्हणालों "डॉक्टर—अहो याला मेंटल ट्रबल नाहीं. ट्रबल दुसरंच आहे—परवां नाहीं का तुमची त्याची बोलाचाली झाली गीतेवर तुम्ही बोललांत."

गीता हा परवलीचा शब्द ऐकतांच डॉक्टर वाघांनीं मध्याची मानगुटी सोडली. आणि त्याला अलगद खुर्चीवर ठेवीत म्हणाले—"हो हो! काय भयंकर विनोद झाला हा! तुम्ही मधु देशपांडे नाहीं का? पाहिलंत? चष्मा चढवला नाहीं कीं आमचं हें असं होतं—" असं म्हणून त्या मेजरनें मध्याच्या पाठीवर असा कांहीं प्रेमपूर्वक गुद्दा मारला कीं परत मध्याच्या तोंडांतून फेस आला.

पण प्रेमासाठीं वाटेल तेवढे गुद्दे खाण्याची मध्याची तयारी होती. त्यामुळें तो हंसत म्हणाला, 'डोन्ट वरी डॉक्टर, गैरसमजानें असं कधीं कधीं होतं—थांबा तुमची ओळखं करून देतों. हे माझे मित्र बाळाराव गीतेचे स्कॉलर आणि हे नवकवि कुंदा घाटपांडे."

"अरे वा, यांचीच ना भगवद्‌गीता सगळी पाठ आहे? आणि हे नवकवि काय? आमच्या कम्याला नवकाव्याचा भारी नाद आहे. कम्या म्हणजे आमची कमल."

"डॉक्टर उद्यां तुम्हाला वेळ आहे का सकाळीं? म्हणजे सकाळींच येऊं आम्ही तिघेजण."

"जरूर या! मी घरींच आहें आणि मोकळा आहें. याच तुम्ही. कमाहि घरीं असेल" डॉक्टर म्हणाले.

"मग बाळाराव जाऊं या ना उद्यां डॉक्टरांकडे? मध्यानें मला विचारलें

"अरे, एवढे डॉक्टर अगत्यानें बोलावताहेत, मग जायला नको?" मी म्हटलें.

डॉक्टरांच्या दवाखान्यांतून बाहेर पडल्यावर शेजारच्या इराण्याकडे जाऊन आम्ही मध्याला चहा पाजला. डॉक्टरनीं त्याची मानगूट पकडल्यामुळें त्याचे प्राण कासावीस झाले होते. आणि आमची त्या डॉक्टरकडे यथेच्छ बदनामी केल्याबद्दल आम्ही त्याला चांगलाच फैलावर घेतला.

मुकुंदा म्हणाला "बाळ्या, या मध्याची चांगलीच खोडकी जिरवायची असेल तर आपण उद्यां डॉक्टर वाघांकडे जाऊ या नको."

"मित्रानों मी तुमच्या पाया पडतो, क्षमा मागतों, शरणागताला अभय द्या" मध्या काकुळतीनें गयावया करूं लागला.

"ठीक आहे, आतां शरण आला आहेस म्हणून एक वेळ क्षमा. पण परत आमच्या परवानगीशिवाय आमच्या नांवाचा गैरउपयोग केलास तर खबरदार."

आम्ही दोघांनीं त्याला ताकीद दिली.

दुसऱ्या दिवशीं सांताक्रुजला आम्ही डॉ. शांताराम वाघ, यांच्या सांताक्रूज येथील निवासस्थानीं गेलों. डॉ. वाघ आमची वाटच पाहात होते.

"या, मंडळी या—बरं का मधुकरराव, आमची कमू तुम्हा सर्वांना चांगलीच ओळखते"

चांगलीच ओळखते म्हटल्यावर आम्ही घाबरलों. पण उसनें अवसान आणून मध्या म्हणाला "ओळख, म्हणजे तशी प्रत्यक्ष नाहीं—"

"अरेच्या! एका कॉलेजांत राहून ओळख नाहीं—कम्या, जरा इकडे ये!" डॉक्टरांनीं टायगरला हांक मारली.

त्यासरशीं कम्या उर्फ मध्याची प्रेयसी नाचत मुरकत आंत आली. तिनें आम्हाला नमस्कार केला. डॉक्टर म्हणाले "कम्या, हे मधु देशपांडे, हे कुंदा घाटपांडे नवकवि, आणि हे बाळाराम गीतापाठी."

आम्ही तिघांनीं तिला नमस्कार केला. कमल म्हणाली, "मी यांना ओळखतें पप्पा!—"

"ओळखतेस ना, मग छान! आतां तूं असं कर, या दोन नवकवींना घेऊन दिवाणखान्यांत बैस त्यांच्याशीं गप्पा मारीत. आणि मी आणि बाळाराव गीतेवर जरा चर्चा करतों."

गीतेवर चर्चा म्हणतांच माझ्या पोटांत गोळा उठला. म्हणजे हा म्हातारा आपल्याला सळो कीं पळो करून सोडणार. मध्या आणि कुंदा त्या पोरीला घेऊन दिवाणखान्यांत गेले आणि मी म्हाताऱ्याच्या तावडींत सांपडलों. त्यानें गीतेंतील सांख्य योगावर असें एक भलें मोठें प्रवचन द्यायला सुरवात केली कीं मी पुरा हैराण झालों. माझ्याशीं चर्चा म्हणजे यांचं प्रवचन ऐकण्याचं काम. त्यामुळें माझी विद्वत्ता उघडी पडली नाहीं, पण मला अक्षरश: जांभया येऊं लागल्या. शेवटीं आतां आपण उठल्याशिवाय हा म्हातारा ऐकायचा नाहीं असं समजून मी उठलों आणि म्हणालों "बरंय काकासाहेब, आतां आम्हाला निघालंच पाहिजे. पण तुमच्या सहवासांत वेळ तर छान गेला."

"कसचं कसचं—अहो तुमच्यासारखे उत्साही तरुण आजकाल आहेत कुठं?"

"नाहीं—पण तुमचा व्यासंग अपूर्व" मी म्हाताऱ्याला चढवलं. "आपला नाद आहे झालं! —अग, कमे, हे बाळाराव निघाले—" डॉक्टर म्हणाले.

(पान १७५ पहा)














अनुक्रमणिका














Tinopal BVN
Tinopal BVN




Geigy








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




# पुन्हां मी.... पुन्हां मी !



नव्या संस्कृतीच्या कलीनें आपल्याकडे जेव्हां नुसता चंचुप्रवेश केला, तेव्हां त्याचें विशेष कांहीं वाटलें नाहीं; पण आतां त्यानें थैमान घालायला सुरुवात केलेली आहे. अशा वेळीं जुन्या संस्कृतींत वाढलेल्या माणसाचा जीव कासावीस होतो. ज्याला 'शेंडा ना बुडखा' असें हें घराघरांत शिरलेलें नवें खूळ. कुंपणाला देखील विशोभित करणारा किंबहुना रात्रीच्या समयीं भयावह वाटणारा निवडुंग आज दिवाणखान्याची शोभा वाढवितो. आणि दोन पैशांच्या लाह्यांना 'पॉप कॉर्न' या नावाखालीं सहा आणे पडतात; हा कालमहिमा आहे. आपल्या जुन्या संस्कृतींत घुसलेला हा नवा पालट मर्मावर बोट ठेवून वाचकाला हंसत खेळवत ज्यांनी मागें दीपावलींतच 'असा मीं असामीं' व 'वटाट्याची चाळ' या लेखमालेंत सांगितला त्याच

## पु. ल. देशपांडे यांच्या सिद्धहस्त

अनुक्रमणिका

**मी** आणि माझा ज्येष्ठ पुत्र शंकऱ्या!

माझ्या लहानपणीं लहान मुलें शाळेंत जात. वर्गांत मास्तर आणि शाळेचा तास वाजविणारा शिपाई एवढींच मोठी माणसें असत. आतां हें बदललें. परवां शंकऱ्या त्यांच्या बाईची चिठी घेऊन आला. त्यांत त्याच्या बाईनीं मला शाळेंत भेटायला बोलावलं होतं. खालीं, आपली, सरोज खरे अशी सही. आपली नम्र लिहायचं नाहीं? घरांत 'संशयकल्लोळ' व्हायचा. नशीब, येतांना छातीशीं तसबीर घेऊन या म्हटलं नाहीं.

"मीनाताईनीं पण तुम्हांला बोलावलंय्—" नंबर तीन म्हणाली. "उद्यां तिनी मला सांगितलं, तुझ्या डॅडीना घेऊन ये"

"ही मीनाताई कोण? आणि हा डॅडी कोण?"

"अय्या!!" हवा गेलेल्या फुग्याकडे पहातांना होतो तसा चेहरा करून माझी चार वर्षे-देशीय कन्या म्हणाली. तेवढ्यांत आंतून खुलासा आला.

"अहो मीनाताई म्हणजे तिच्या मांटेसरीच्या बाई—"

"मग त्यांना मीनाताई म्हणायचं का ग? —बाईना बाई म्हणावं—"

"छल्! त्या काय बाई आहेत वाटतं—"

"अहो मांटेस्रीच्या बाईना त्यांच्या नांवानेंच हाका मारतात मुलं—"

"हें बघ, बंद कर बघूं तिची मांटेस्री! उगीच नाहीं तें खूळ! अभ्यास नाहींन् कांहीं नाहीं. दुसऱ्यांच्या पोरांचे वाढदिवस करायला काढल्या आहेत ह्या शाळा! खरं म्हणजे पांच वर्षांचीं होईपर्यंत मुलांना घरीं शिकवावं—"

"बाबा, आज ना, प्रतिमाचा वाढदिवस आहे—"

"असेल नाहींतर काय! आमच्या लहानपणीं शाळेंत फक्त पंचम जॉर्ज बादशहाचा वाढदिवस व्हायचा!"

"मग तुम्ही बादशहाला प्रेझेंट काय नेत होतां फादर—"

शंकऱ्याच्या इंग्लिशनें तर माझा जीव काढला आहे. फादर म्हणजे बाप हें शाळेंत शिकल्यापासून हें कार्टं मला दहा लोकांच्या देखत फादर म्हणूनच हांक मारतं.

"फादर काय म्हणतोस? आणि इंग्लंडच्या बादशहाला मी प्रेझंट काय नेणार? धोतर जोडी? आम्हांलाच उलट पेढा मिळायचा—"

"आम्हाला केक मिळणार—मग आम्ही हॅपी-बऽऽडे च्यू-ह्यूऽऽ" ओठाचा चंबू करून आमची मॅांटेसरी कन्या म्हणाली.

नव्या संकृतीच्या कलीनें आमच्या घरांत असा चंचुप्रवेश केला आहे. अगदीं पहातां पहातां हा बदल झाला. पण पहाता पहाता दिसला मात्र नाहीं. कारण वाढत्या वयाबरोबर जवळचं कमी दिसायला लागलं होतं.

"शंकऱ्या, तुझ्या बाईनी मला शाळेंत कशाला बोलावलय् रे?"

"हल्लीं आमच्या स्कूलमध्यें ऑल फादरना बोलावतात—मग त्यांना कागद देतात आणि शुद्धलेखन लिहून घेतात—"

"काय?" मागें मला विंचू चावला होता तेव्हां मी इतका ओरडलों नव्हतों. माझ्या ओरडण्यानें ही आंतून धांवत आली.

"काय झालं?"



'माअली'—सरोज खरे

"हा बघ काय म्हणतो—शाळेंत हल्लीं पूर्वींचे रमकडावाले, 'बच्चा भी खेलेगा—बच्चाका बाप भी खेलेगा' म्हणून खेळणीं विकायचे—तसे बच्चालाहि शिकवतात आणि त्याच्या बापालाहि शिकवतात म्हणे—"

"अहो तसं नाहीं—" हल्लीं माझ्या कुटुंबांतल्या सर्व मंडळींना माझ्या अज्ञानाची कींव करणें हाच एक उद्योग झाला आहे. "परवां सुष्माबाईचे मिस्टर जाऊन आले." हा देखील सूक्ष्म फरक ध्यानांत घेण्यासारखा. हल्लीं आम्ही एकाएकीं, अमकीचे किंवा तमकीचे 'यजमान' होतों ते संपून 'मिस्टर' झालों आहोंत.

"कशाला जाऊन आले सुष्माबाईंचे मिस्टर?"

"त्यांच्याकडून एक फार्म भरून घेतला—"

"कसला?"

"आतां बघा जाऊन कसला तो! शंकू तुझी पट्टी दे जरा—"

"म्हणजे माझ्या हातावर पट्टी विट्टी मारणार आहेत कीं काय?"

"इश्श! आलं मोजायचं आहे."

"काय?"

"ओरडायला काय झालं एवढं? वाटाण्याचे प्वाटीस करतेंय्—त्यांत एक इंच आलं घालायचं आहे किसून!"

"किस् म्हणजे नुका ना ममी—" शंकू!!

"शंकऱ्या चूप! आणि आईला ममी काय म्हणतोस? एक इंच आलं?—"

"हें काय? वन् इंच ऑफ जिंजर—"

वर संपूर्णपणें बाटत चाललं आहे हें ध्यानांत आलं. स्वयंपाकघरांत इंग्लिश पुस्तकें आणि मासिकें शिरलीं होतीं. हल्लीं सैपाक करतांना ही देखील कमरेला खाटीक बांधतात तसलें पंचाच्या मापाचें फडकें बांधायला लागली होती. लुगड्यावर चुलीवरचें कांहींहि उडत नाहीं असं बांधलं म्हणजे, हें मीं न विचारतां तिनें सांगण्याची मेहेरबानी केली होती. फळीवर पूर्वी पितळेचे डबे असत. माझ्या शर्टकोटावर ती टपलेली असे. माझे अनेक माजी कोट-शर्ट निरनिराळ्या पितळी डब्यांचे आणि बरण्यांचे आकार घेऊन फळीवर बसले होते. आतां ते जाऊन तिथें रंगीबेरंगी पत्र्याचे डबे आले होते.

"हें काय?"

"अहो, भिंतीच्या रंगाला म्याचिंग रंग नकोत का डब्यांचे?"

हें मॅचिंग रंगाचें प्रकरण तर नवा चष्मा लावून देखील मला न कळणारें होतें. प्रत्येक भिंत निराळा रंग घेऊन उभी होती. कपड्यांच्या खरेदींत पूर्वी टिकाऊ आणि मळखाऊ ह्या दोनच व्हरायटी असत. आतां स्कर्टला मॅचिंग, ब्लाउजला मॅचिंग, खुर्चीला मॅचिंग, टेबलाला मॅचिंग असे नानाप्रकार आले आहेत. कांहीं दिवसांपूर्वीं तिनें दहाबारा तांबडीं कव्हरें असलेलीं पुस्तकेंच विकत आणलीं. माझीं जुनीं पुस्तकें कुठें फेकलीं कोण जाणे! शेल्फावर

**लेखणींतून उतरलेला नव्या रंगांचा हा जीवनपट**

अनुक्रमणिका



# गौर

## इंदिरा संत

"कधिं न कसे ग, भरले डोळे;
कधीं न कांहीं ओठीं आलें;
कधीं उसाशांतून कसे ग,
कांहीं न धुमसत आलें?
—गेलीस कां ग, विसरून सगळें?"

"त्या सगळ्याच्या
डोहांतुन मज कुणी फेकलें काठावरती;
कुणी दाविली हळदपाऊलें
चित्रित जमिनीवरचीं; आणि
दिला हा कुणी करामधिं कलश खडयांचा

त्याच क्षणीं मी
शपथ घेतली;
कधीं न वघणें वळून मार्गे
कधिं न जोडणें ओठांनीं, जे
तुटले धागे;
कधिं न धाडणें डोहावरती
डोळे मागे.

तेव्हांपासुन
सोनपावलावरून सारखी
पुढें पुढें मी चालत आहे
तेव्हांचें तें
सगळें सगळें येतच आहे
माझ्यामागुन
छाया होऊन!"

• • •

आपलीं दहा लाल कव्हराचीं पुस्तकें! मला वाटलं, शंकऱ्याचीं असतील. पण "चेंजिंग सोसायटी" "हेड हंटर्स ऑफ साऊथ ऱ्होडेशिया," "मरीन इंजिनिअरिंग फॉर ब्रिगिनर्स," "हाऊ टु ईट अँड रिड्यूस" अशी कमालीची विसंवादी ग्रंथसंपत्ति लाल रंग गुंडाळून त्या शेल्फमध्यें शिरली होती.

खुलासा : भिंतीच्या प्रिमरोज रंगाला म्याचिंग पुस्तकं हवींत.

"नवराबायको एकमेकाला मॅचिंग नसली तरी चालतील—बाकी सर्व मॅचिंग हवं!" हें मी स्वगतासारखं पुटपुटलों.

"क्लबांत सगळ्या बायका मला हेंच म्हणतात," आंतून मला ऐकूं येणारं सो. गत आलं.

शेवटीं मनाचा धडा करून मी (आपली) सरोज खरे एम्. ए. एम्. एड. मुख्याध्यापिका, ही पाटी वाचून त्या फडफडत्या दारावर टिचक्या मारल्या. आंतून कांहीं उत्तर आलं नाहीं. कुठूनसा एक पट्टेवाला निघाला.

"सरोजबाईंना भेटायचं आहे?" एक कागदाचा कपटा आणि पेन्सिलीचें थोटूक माझ्या हातांत देत तो म्हणाला, "ह्याच्यावर नांव आणि बिझनेस लिहा." मीं नांव लिहून त्याच्या हातांत कपटा दिला. पट्टेवाला आंत जातांना फडफडता दरवाजा थोडासा उघडा राहिला होता—त्यांतून पाह्यचं नाहीं असं ठरवून देखील दृष्टि गेलीच. पट्टेवाल्यानें एका तरुणीच्या हातांत माझी चिठी दिली. त्या तरुणीनें कपाळावरची केसांची बट आणखी पुढें ओढली—चिमुकल्या आरशांत झटकन् पाहून नाकावर पावडरची चकती थापटली.

"ही मुख्याध्यापिका?" मी मनांत म्हणालों. मुख्याध्यापिका ह्या पदार्थाविषयीं माझा अंदाज म्हणजे सामान्यतः खुर्चीत पुरण भरावं—तसा भरलेला—जाड चष्मा—कृष्ण वर्ण—त्यांतून वीज चमकावी तशी चमकणारी तीनचार दातांची आघाडी—केस पिकलेले इ. इ.

पण सरोज खरे (आपली इं!) ही मुख्याध्यापिका भलतीच निराळी निघाली. गेल्या वीस वर्षांत मुख्याध्यापिकादेखील काय बदलल्या! हेडमास्तरिणीच्या मुख्याध्यापिका झाल्या म्हणजे इतका सडपातळ फरक पडला असेल याची कल्पना नव्हती. उद्यां श्राद्धाचा भटजी दर्भ घेऊन येण्याऐवजीं कॅडबरीची चॉकलेट घेऊन आला तर काय वाटेल? केसांची बट कपाळावर ओढणारी मुख्याध्यापिका? म्हणजे बाकीच्या अध्यापिका काय झबलीं घालून येतात कीं काय ह्या शंकऱ्याच्या शाळेंत? असल्या शाळेंतलें कारटें बापाला फादर म्हणतें हें नशीब—

असो. तर सरोज खरे (मुख्याध्यापिका—आपली इ.) यांनीं पट्टेवाल्याला 'पाठवून दे' म्हणतांना मी ऐकलें आणि कोटाचें बटण लावून सज्ज झालों.

"नमस्कार. -आपल्याला तसदी दिली हं ऽ!" सरोज खरे नुसत्या दातांनीं हें वाक्य म्हणाल्या. लिपस्टिक लावून इंग्रजी बोलतां येत असेल पण मराठी कठीण.—सुमारें तीस वर्षांपूर्वी अशाच शाळेच्या परिसरांत 'ओष्ठ्य-दंत्य-तालव्य' वगैरे आयुर्वेदांतल्या काष्टौषधींच्या नांवासारख्या वाटणाऱ्या शब्दांनीं बेजार केल्याचं मला स्मरण झालं. रंगलेल्या ओठांनीं परमपवित्र, पोप, भूमिति किंवा मामा फफे हे शब्द म्हणतां येत नाहींत. कारण ओठाला ओठ लागून वरच्या ओठाचा रंग खालच्या ओठाला व खालच्या ओठाचा वर लागून ओठाचें धनुष्य मोडून तोंडाला जुन्या सोडा वॉटरच्या बाटलींत खरी आंगठी बसवायचे तसें तोंड दिसतें. पण गेल्या वीस वर्षांत हे ओष्ठ्यवर्ण दंत्य झाल्याचें माझ्या नजरेंतून सुटलें होतें. त्यामुळें सरोज खरे बाईंनीं 'नमस्कार. आपल्याला तसदी दिली हं.' हें वाक्य 'नअस्कार. आवल्याला तसदी दिली हं.' असें बरोबर आमच्या कचेरींतली केशर मडगांवकर (अक्षरीं मडगांवकर पण उच्चारीं अडगांवकर) म्हणते तसें म्हटलें.

"वा! तसदी कसली—" मी सरोज खरे ह्या मुख्याध्यापिकेकडे न पहायचें ठरवून पाहिलें कीं पहातात तसें पहात म्हणालों.

ही मुख्याध्यापिका हल्लींच्या मासिकावरच्या चित्रासारखी दिसत होती... मुख्याध्यापक आणि मुख्याध्यापिका हे शब्द नुसते बाथरूममध्यें कडी लावून ओरडले तरी संपूर्ण स्तोत्र म्हटल्याइतके भरघोस! आणि सरोज खरे?—मनांत म्हणत होतों, शंकऱ्या नशिबवान. नाहींतर माझ्या लहानपणींचे पळसुले मास्तर! हेडमास्तर याचा अर्थ ज्याच्या खोलींत गेंड्याच्या शेपटीची छडी असते आणि जी त्यानें हातांत घेतली कीं स्वतः-चीच शेपटी हातांत घेतल्यासारखा जो दिसतो तो, अशी पहिली ते मॅट्रिक अशी कायद्यानें सात, पण स्वानुभवानें नऊ वर्षे खात्री झाली होती. त्यामुळें दारांत गणपतीची वर्गणी मागायला आला असेल म्हणून बंडू जोशाला चुकवून








शंकऱ्याला 'घरांत नाहींत म्हणून सांग' म्हणून पळावं आणि चंद्रू चार महिन्यांपूर्वी घेतलेले वीस रुपये परत करायला आलेला असावा अशी अवस्था झाली. किंवा साहेबानें दम द्यायला बोलावल्याच्या समजुतीनें आंत जावं आणि दोन इन्क्रिमेंट्स् सँक्शन झाल्याचं कळावं—किंवा परटाकडे धाडायच्या कोटांत भरलेलं सिगारेटचं पाकीट मिळावं—किंवा— जाऊं दे. फार ताणण्यांत अर्थ नाहीं. पळसुले हेडमास्तरची पातळी ब्रायडिंगची आवृत्ति दिसणार ह्या भीतीनें आंत शिरलेल्या मज पालकाला पातळां-तल्या जाहिरातींतल्या बाईसारखी सरोज खरे दिसावी म्हणजे जें कांहीं कुणाचें होईल तें माझें झालें.

"कुमार गिरीश आपला पाल्य आहे ना?" ह्या दन्त्य प्रश्नानें मला एकदम जाग आली.

'कुमार गिरीश?' मीं मनांत आमच्या सर्व वारसांचीं नांवें पटापट घेतलीं आणि 'कांहीं-तरी घोटाळा होतोय् आपला' असं त्या 'आपली'ला सांगण्यापूर्वी रात्रीच्या अंधारांत बाथरूमचें बटण एकदम सांपडावें तसें मला आठवलें कीं, शंकऱ्याचें पाळण्यांतलें नांव गिरीश आहे. मुलाला हल्लीं शाळेंत 'पाल्य' म्हणतात हें शंकऱ्याच्या प्रगति (?) पुस्तकावरून मला कळलें होतें.

"हो! माझा मोठा मुलगा. काय, अभ्यास वगैरे ठीक आहे ना त्याचा?" पुढला प्रश्न विचारतांना ओशाळलेला माझा चेहरा माझ्याच नव्या चष्म्यांतून मला दिसत होता. बोटं कापलेला शाहिस्तेखानदेखील झाकल्या मुठीनें औरंगजेबापुढें मुजरा करतांना इतका ओशाळला नसेल.

"त्याचा अभ्यास ठीक असावा, पण मला आपल्याविषयीं माहिती हवी आहे."

उजव्या खांद्यावरचा शेपटा, उपरण्यासारखा गळ्याला गुंडाळीत सरोज खरे (मुख्याध्यापिका) म्हणाली.

"माझ्याविषयीं माहिती?"

"हो—म्हणजे—आपल्याला ठाऊकच असेल कीं, शिक्षणशास्त्रांत नवीन नवीन सुधारणा होत आहेत—"

"हो ऐकलंय् मी—" शंकऱ्याला दर दोन दिवसांनीं लागणाऱ्या नव्या वह्यांच्या वाढत्या संख्येवरून नव्या सुधारणांची कल्पना मला यायला लागली होती.

"आपल्या देशांत शिक्षणाचा तिहेरी प्रचार हवा—एक म्हणजे मुलाचं शिक्षण—दुसरं पालकांचं आणि तिसरं शिक्षकांचं!" शिक्षकांचं ह्या शब्दावर गळ्यांतलें शेपट्याचें उपरणें सोडवून खांद्यावर घेत सरोज खरे म्हणाली. मुख्याध्यापिकाबाईंचा मोहक चाळा पाहून शिक्षकांचं शिक्षण कुठल्या दिशेनें चाललें आहे याचा मला अंदाज आला. शंकऱ्याचा उजेड पडतच होता. आतां आमचं शिक्षण कसं काय होणार, याची मी चिंता करीत होतों. इतक्यांत सरोज खरे बाईंनीं एक फॉर्म माझ्यापुढें टाकला.

"हा वाचा आणि भरून पाठवा." आणि स्वतःच्या समोरच्या गठ्यांतून कुमार गिरीश असें पुटपुटत एक दुसरा फॉर्म काढला. हा आधींच कोणीतरी भरलेला होता. "हं— हा गिरीशचा फॉर्म त्याच्या वर्गशिक्षिकेनं भरला आहे."

"त्या आल्या आहेत का?"

"सॉरी—त्यांचं आज नाटक आहे."

"म्हणजे त्या नाटकांत काम करतात?"

"विद्यार्थ्यांप्रमाणें शिक्षकांच्याहि अंगच्या

कलागुणांचा विकास नको का व्हायला? शिवाय शिक्षक हा उत्तम नट असावा लागतो."

हें ज्ञान मला नव्हतें. शिक्षक हा नट? माझ्या डोळ्यापुढें अनेक वर्षांपूर्वींचे पेंडसे, साठे, दंडवते, लोखंडे असे माझे सांदीपनी उभे राहिले. त्यांच्यावेळीं जर हें नवें शैक्षणिक तत्त्व असतें तर हॅम्लेटच्या बापाचें भूत, हिरण्यकश्यपु, सत्यवान--सावित्री नाटकांतला यम किंवा मृच्छकटिकांतला मांग ह्या भूमिकांना नटांचा तुटवडा पडला नसता.

"कुठल्या नाटकांत काम करतात त्या?"

"मधूच्या आत्याबाईंना मिश्या आल्या!"

"काय?"

"फार्स आहे. त्यांना फार्सिकल व्हेन फारच छान जमते."

शंकऱ्याच्या आचरटपणाचें मूळ मला सांपडलें. मी आर्किमेडीजप्रमाणें 'युरेका' म्हणून ओरडणार होतों. पण अंगावर कपडे होते आणि मी बाथरूममध्यें नव्हतों आणि शिवाय समोर सरोज खरे मुख्याध्यापिका होत्या! हीहि बात्र विसरून चाललं नसतं.

"मग देता ना आपली माहिती?"

सरोज खरे इतक्या लाडिकपणें हें वाक्य म्हणाल्या कीं, माझ्या हातून उगीचच कांहीं बरें-वाईट घडायला नको म्हणून त्या चपराश्याला आंत आणून उभें करावें असें मला वाटायला लागलें. मी वाचायला चष्मा काढून लावला.

"वाचायला चष्मा लागतो वाटतं आपल्याला?" पुन्हा शेपट्याचें उपरणें!

"हं हं—चाळिशी झाली—"

"वाटत नाहीं." माझ्या कपाळाच्या वरची बाजू पाहिल्यासारखें करीत सरोज खरे म्हणाल्या. आणि तें ऐकून माझ्या ठायीं पुरुषसुलभ लज्जा उत्पन्न झाली. मी खालीं मान घातली आणि फॉर्म वाचायला सुरुवात केली.

"म्हणजे काय आहे? कुमार गिरीशमध्यें आम्हांला कांहीं चमत्कारिक ट्रेट्स् दिसतात. अशा जराशा औट ऑफ् द वे वागणाऱ्या मुलांच्यामध्यें हे विवक्षित गुण कुठून आले याचा पूर्ण शोध करायला त्यांच्या पालकांमधल्या ट्रेट्स् पहाव्या लागतात. प्रोफेसर ऑस्ट्रोजेमची थिअरी आहे."

"प्रोफेसर ऑस्ट्रोजेमची आहे होय?" मी कोण तो प्रोफेसर ऑस्ट्रोजेम माझ्याच घरीं वारावर जेवायला येत असल्याची सलगी दाखवत विचारलें.

"हो! पेरेंट सायकॉलॉजीवर ॲथॉरिटी आहे ती—"

"प्रश्नच नाहीं! ऑस्ट्रोजेम म्हणजे काय—ही इज ए जेम—"

"ही नाहीं, शी आहे ती—"



'आहिलंत नवी भिटी किती भारकाईनें आमल्या आलकाकडे आहतात तें?'

"मी मराठी 'ही' म्हटली!" ह्या माझ्या चतुर उत्तरानें सरोज खरे दातांनून कुरमुरे उडवल्यासारखी हंसली.

"कुमार गिरीश वर्गांत झोपतो."

"झोपतो? मग आंगठे धरून उभा कां करीत नाहीं त्याला?"

"छे छे—हा त्याचा काय दोष? झोंप ही एक आनुवंशिक गोष्ट आहे."

मी समोरचा फॉर्म पाहिला. त्यावर प्रश्न होता—

"आपण दिवसांतून किती तास झोपतां?"

आतां इतरांच्या पेक्षां माझा डोळा अधिक लवकर लागतो हें खरें. पण म्हणून काय शंकऱ्यानें माझ्यांतला एवढाच गुण घ्यायचा?

"बापाप्रमाणें आईचे गुणहि मुलं घेत असतील ना?"

"तऽऽर? आतां हेंच पहा. कुमार गिरीशला नावीन्याची हौस आहे."

"हं बरोबर! हा आईचा गुण"

"उदाहरणार्थ, जें नाहीं तें हवं वाटणं. त्याच्या पुस्तकावरच्या सगळ्या बायकांच्या चित्रांना त्यानें मिश्या काढल्या आहेत."

"कदाचित् मधूच्या आत्याबाईला मिश्या आल्या नाटकाची जाहिरात वाचली असेल त्यानें!"

मीं शंका काढली. शंकऱ्याची वकिली करावी असं मला कधींच वाटलं नव्हतं. आमच्या आळींत कोणीहि त्याला बदडावें असं मी पर्मिट देऊन ठेवलं होतं सगळ्यांना! पण शाळेंतल्या शाईपेक्षां रक्त हें केव्हांहि अधिक घट्ट!

"तें मला शक्य वाटत नाहीं. कारण ह्या-खेरीज देखील वर्गांत एकदां त्यानें अंगांतला शर्ट काढून फेट्यासारखा डोक्याला बांधला होता—"

"पण हे गुण आईवरून कसा घेणार तो?"

"नावीन्याची हौस ह्या सदरांत हें येतं—"

"अस्सं! आणखी?"

"आतां हें पहा. कांहीं विशिष्ट खोडी ह्या सदरांत त्याच्या वर्गशिक्षिकेनें लिहिलं आहे कीं, मधल्या सुटींतलें स्वतःचें खाणें न खातां दुसऱ्या मुलांच्या डब्यांतून खाण्याची संवय."

"काय कारटं आहे!" मी हें म्हटलें खरें पण म्हणण्यांत जोर नव्हता. कारण गेलीं कित्येक वर्षें मी त्रिलोकेकरच्या डब्यांतलें आमलेट खात आलों आहें.

"चौतिसावा प्रश्न पहा."

"आपल्या घरच्या जेवणापेक्षां दुसऱ्यांच्या घरचें जेवण आपल्याला अधिक आवडतें का?" असा तो प्रश्न होता.

"त्यानंतर एक सदर आहे तें नीट पहा. पाल्याच्या तोंडचे वाईट शब्द—"

मी तें सदर पाहिलें. त्यांत पंचवीसएक शिव्या होत्या. त्या मी मनांतल्या मनांत



अनुक्रमणिका






वाचल्या. वर्गशिक्षिका बाईंनीं हे शब्द ते सदर भरतांना लिहिले तरी कसे, याचं मला नवल वाटलं.

"आतां ह्या घाणेरड्या शब्दांचा उगम शोधायला हवा."

शंकऱ्यानें माझें तोंडच बंद केलें होतें.

• गेल्या तीस पस्तीस वर्षांत शिक्षणक्षेत्रांत असली अचाट प्रगति झाली असेल अशी कल्पना नव्हती. मी निमूटपणानें फॉर्म भरायला सुरुवात केली—

आमच्या काळीं शिव्यांचा उगम साक्षात् पुढें शिक्षकाचें रूप घेऊन उभा असे. भूगर्भ-शास्त्रापासून ते गर्भशास्त्रापर्यंत सर्व स्थिरचर सृष्टीच्या आधारानें शिव्या निघत. दगड, धोंड्या पासून गाढवाच्या लेका—×××च्या, ×××च्या, ×××च्या, अशीं अनेक रूपें लेऊन शिक्षकांचा राग नटत असे. शाळेंतल्या शिव्या कमी पडतात म्हणून घरीं वडील रतीब घालायचे. आईची शापवाणी. मधूनच आजोबा आपला शब्दसंग्रह वटव्यासारखा मोकळा करायचे. पण पळसुले मास्तरांनीं आमच्या बाबांच्या कडून कधीं फॉर्म वगैरे भरून घेतला नाहीं. दोन कर्दनकाळ एक-मेकाकडून फॉर्म कसला भरून घेणार? मुलाला गेंड्याच्या शेपटीनें बडवणें बरें कीं वेताची छडी अधिक गुणकारी यावरच कांहीं चर्चा संभवणें शक्य होतें. कान हा शिक्षकानें पिरगळून झाल्यावर बापानें पिळावा कीं आधीं, ह्यावर कांहीं मतभेद आणि पाठ ही बुक्के मारून फोडावी कीं काठीनें, हा तपशिलाचा फरक! फार्म भरतां भरतां मधूनमधून मी मुख्या-ध्यापिका सरोज खरे यांच्याकडे चोरून पहात होतों. खोटं कां बोला? शालेय जीवनाच्या चौदा पंधरा वर्षांत भोंवतीं नुसते खवीस नाचले. कॉलेजांत जरा बरें होतें. पण वर्गांतल्या शंभर मुलांमध्यें दोन मुली हें प्रमाण. त्यांतली एक पारशी आणि दुसरी परिवर्तित खिस्ती! पहिलीला मधूच्या आत्याबाईसारख्या मिश्या आणि दुसरीचा वर्ण भाजणीचा! विद्यार्थीदशेंत असल्या खांचाखळग्यांतून गेल्यामुळें मुख्या-ध्यापिका सरोज खरे ह्यांच्यापुढें तासभर बसून मी तो फॉर्म भरला. आणि हताश होत्साता बाहेर पडलों. प्राथमिक, माध्यमिक, उच्च, सगळ्याच शिक्षणक्षेत्रांत काय विलक्षण फरक पडला! कांहीं दिवसांपूर्वी शेजारच्या भागव-तांच्या अरविंदाबरोबर आणि त्याच्या मित्रां-बरोबर त्याचा प्रोफेसर रमी खेळायला आला होता. आमचे प्रोफेसर आमच्याकडे बघून कधीं हंसले देखील नाहींत. प्रोफेसर हा माणूस आणि लिफ्टमन् हे हंसूं शकतात हें मला कधींच पटलें नाहीं. एकदां प्रोफेसर दंडवते संस्कृत शिकवतांना हंसले होते. संस्कृत नाट-कांत विनोद असतो असं त्यांनीं आम्हांला सांगितलें. आणि ततः प्रविशति विदूषकः। भो भो कर्पूर मंचक कुत्र गतः अयं दासीपुत्रः। हें वाक्य विनोदाचा उत्कृष्ट पुरावा आहे असें सांगून त्यांनीं कवळी हलवली होती. मुलें मात्र हंसलीं नाहींत तेव्हां "देन एण्टर्स द ऑफिशियल क्लाउन ॲण्ड प्रोक्लेम्स्–ओ ओ केम्फर बेड, व्हेअर हॅज दॅट सन ऑफ द मेड सर्व्हंट गॉन–" हें आर्यांग्ल भाषेंतील भाषान्तर केल्यावर मात्र मुलें हंसलीं.

"दॅट मच् लाफ्टर इज् इनफ" म्हणून ते जे गंभीर झाले ते रिटायर होईपर्यंत! आणि अरविंदाचा प्रोफेसर सिक्रेन्स जमला कीं हसून गडबडा लोळायचा. 'मेरा जूता है जापानी' वगैरे गाणीं म्हणायचा. प्रोफेसर दंडवते जयदेवाचें गीतगोविंद शिकवतांना देखील और्ध्वदेहिकाचे मंत्र म्हटल्यासारखे म्हणायचे. पीनस्तनी राधेचें वर्णन त्यांनीं "राधा व्हूज दॅट पार्ट ऑफ द फिजिक विलो द नेक ॲण्ड अबॉव्ह द ॲब्डोमेन" अशा शब्दांत केलें होतें. आणि शंकऱ्या माझ्याशीं परवां तक्रार घेऊन आला होता. मी मावळ तालुक्यांतल्या सहकारी शेतीच्या प्रयोगाविषयींचें केसरींतलें स्फुट वाचतांना बाल आवाजांत माझ्या कानावर प्रश्न आदळला. ब्लॉकमध्यें रहात असलों तरी माझीं जुनीं आदरस्थानें कायम आहेत. "फादर—(कार्ट ऐकत नाहीं!) शशिबाला जॉय कपूर-बरोबर पळून गेली कीं नाहीं हो—मिलिंद म्हणतो तिचं यश मेहरा बरोबर लव्ह आहे"—

"काय आहे?" शंकऱ्याची केस फारच बिकट व्हायला लागली होती. अशानें सरोज खरे माझ्याकडून कांहीं दिवसांनीं शंकऱ्याच्या सद्वर्तनाचा जामीन मागून घेईल कीं काय अशी भीति मला वाटायला लागली.

"लव्! अेल्थो व्ही ई लव् मायने प्यार..." शंकऱ्या गाणें म्हणूं लागला. आवाज कांहीं अगदींच वाईट नाहीं कारट्याचा. संध्याकाळीं चौपाटीवर त्याच्याकडून तें गाणें मीं संपूर्ण म्हणून घेतलें. चांगलें म्हटलें येड्यानें. त्याला शहाळें खायला घातलें. त्याच्या वयाचा मी असतांना मला 'म्हातारी उडतां न येचि तिजला—' एवढीच कविता येत होती. (पुढें मी उडणारी म्हातारी पाहिली देखील होती.) बालादपि सुभाषितं ग्राह्यम् ह्या न्यायानें मी शंकऱ्याकडून जॉयकपूर, शशिबाला—आणि ती कुठें पळून गेली, मग 'ओम् प्रकाश' नांवाच्या डायरेक्टरनें त्यांना लोणावळ्याच्या बंगल्यांत रहायला जागा कशी दिली, ओम प्रकाश कसा 'कडक' डायरेक्टर आहे. (कडक ह्या शब्दाचा गेल्या वीस वर्षांत अर्थ बदलत बदलत हल्लीं कडक म्हणजे चांगला असा अर्थ



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




झाला आहे, हें मला ठाऊक नव्हतें.) जॉयला ओमनेंच पुढें आणलें. शंकऱ्या या सगळ्यांचीं नांवें जॉय, ओम, शशी, निम्मी-शिम्मी अशीं अगदीं ही सगळी मंडळी त्याच्या बरोबर गोट्या खेळायला येत असावीत अशी करतो. शंकऱ्या-पुढें मला एकाएकीं न्यूनगंड वाटायला लागला. असल्या गुणी पोराला आपण सदैव मुस्काट फोडण्याच्या धमक्या वगैरे देतों याचें दुःख होऊं लागलें.

"माला मल्होत्रा ष्टाइल!" ह्या शंकऱ्याच्या किंचाळण्यानें मी माझ्या अंतर्मुखतेंतून बाहेर आलों. समोरच्या भेळवाल्यासमोर एक अठरा वीस वर्षांची तरुणी आगगाडींतले कोळसेवाले घालतात तसल्या काळ्या रंगाची ऐतिहासिक नाटकांत टोपराखालीं थोडीशी येणारी सुरवार असे तसली सुरवार आणि वर धाकट्या भावाचा वाटावा असा रेघारेघांचा शर्ट घालून भेळ घेत होती. डोक्यावर चिमणीचें उस्कटलेलें घरटें बसवावें तसे केस केले होते. ती मुलगी आहे हें तिच्या बरोबरच्या लाजाळू तरुणाकडे पाहिल्यावर माझ्या लक्षांत आलें.

"काय म्हणालास शंकू?".

"माला मल्होत्रा ष्टाइल्"

"म्हणजे काय?"

"हनीमोर इन् मसुरी मध्यें माला मल्होत्रा तसले कपडे घालते."

"कुठें?"

"हनीमोर इन् मसुरी—" वाळूच्या किल्ल्यावर खिशांतून एक गोटी ठेवीत शंकऱ्या म्हणाला.

"हनीमोर?—हां—हनिमून असेल—" बापरे! मीं एकदम जीभ चावली.

"हनीमून म्हणजे काय फादर?"

"भेळ हवी आहे का तुला?" मीं विषय बदलला. मग शंकऱ्यानें मला माला मल्होत्रानें कुठल्या कुठल्या पिक्चरमध्यें कडक कामें केलीं आहेत, कुठलें पिक्चर डब्बा आहे. (डब्बा म्हणजे भिकार हा नवा अर्थ! पूर्वी डबा म्हणजे त्यांत चहा–साखर–डाळ वगैरे ठेवतात त्याला म्हणत.) कुठल्या पिक्चरमध्यें 'सॉलिड्' गाणें म्हटलं आहे वगैरे समजावून सांगितलें. "तुम्हीं 'दिल् फेका दिल् पकडा' पाहिलंय् फादर—त्यांत अजितचें आणि निरुपमाचं एक साँग कडक आहे." मग वाळू थापटीत शंकऱ्या गाऊं लागला, दिल मेऽऽरा–मैने फेंका–और तुमने झटसे पकडा. दिल् मेरा मैने फेंका और तुमने फटसे छोडा—" वाळू थापटतांना शंकऱ्या अगदीं रंगून गेला होता—माझ्या बालपणींचा पितापुत्र संवाद आठवला—

"गधड्या—(ह्या शब्दाची परंपरा मी देखील सोडली नाहीं) भूभृत्च्या षष्ठीचं द्विवचन काय?"

"भू—भू"

"भू भू काय करतोस आहेस डोंबा कुत्र्या-सारखा—चालव भूभृत्—"

—मग मीं मोडका खटारा चालवल्यासारखा भूभृत् चालवीत असें. गेलीं कित्येक वर्षें हा शब्द देखील माझ्या आयुष्यांत आला नाहीं. पण भूभृत्, परस्मैपदी आणि आत्मनेपदी प्रत्यय-वर्गमूळ—घनमूळ—फुटलेले—तोटीचे हौद, —भिंतीवरच्या पाली—वसईच्या युद्धांतील तहाचीं कलमें—व्यापारी आणि मोसमी वारे



'फादर, शशिबाला जॉय कपूर बरोबर पळून गेली कीं नाहीं?'

—पुढें शेक्सपिअरच्या नाटकाऐवजीं त्याचे सोसेस फोलिओ एडिशन्—क्वार्टो एडिशन् शाकुंतलांतील द्विगुसमासांचीं उदाहरणें—सॉक्रेटिस इज ए मॉर्टल—यादवकालीन मराठींतील षष्ठी प्रत्ययाचें स्थान छे छे छे—शिक्षण या नांवाखालीं डोक्याची म्हणजे अडगळीची खोली केली होती आमच्या समस्त गुरुजनांनीं! बिगरीपासून मॅट्रिकपर्यंत तुकाराम आणि नेताजी पालकर हे फक्त दोन सिनेमे बघायला आमच्या तीर्थरूपांनीं खिशांतून सगळी इस्टेट मोकळी केल्याच्या आवेशांत तीनतीन आणे मोकळे करून पाठविलें होतें. आणि घरीं आल्यावर तुकाराम ह्या विषयावर निबंध लिहायला लावला होता. तुकारामाचें पूर्ण नांव काय? ह्या त्यांच्या प्रश्नाला विष्णुपंत पागनीस हें उत्तर दिल्यामुळें मंबाजीनें तुकोबाला बदडलें नसेल इतकें आमच्या बाबांनीं आम्हांला बदडलें होतें. बाबांच्या शेंडीच्या केसाचा देखील दाद झाला नाहीं. पुढें ग्रेटा गार्बोचा एक सिनेमा आणि टारझन् हीं दोन इंग्लिश चित्रें आमच्या खात्यांत जमा झालीं होतीं. तीं देखील जन्मदाता कोंकणांत खंड वसूल करायला गेल्याची संधी साधून! लग्न झाल्यावर कित्येक वर्षें मी हिच्याशीं किंवा ही माझ्याशीं वर तोंड वर करून बोलली नव्हती. ही माझ्याशीं पहिलें वाक्य बोलली तें "ही सुनरोखराची मात्रा तेवढी द्या नामजींना—"

सिनेमे–नाटकें आणि अन्य करमणुकींचे कार्यक्रम पाहिले असतील तर ते त्यानंतर! ...आणि इथें भर चौपाटीवर माझा ज्येष्ठ पुत्र मला माला मल्होत्रानें कुठल्या कुठल्या सिनेमांत काय काय कडक केलें आहे तें वाळूचा किल्ला बांधतां बांधतां सांगत होता. मला एकाएकीं त्याच्या पुढें न्यूनगंड वाटूं लागला—मला वाटतं न्यूनगंडच म्हणतात असं वाटलं कीं! शेवटीं मी देखील आपण कांहीं अगदींच मागासलेले नाहीं हें दाखवण्याकरतां त्याला विचारलें.

"तूं त्रिब्बोचं काम पाहिलं नाहींस?"

"कोण?" शंकऱ्या हातांत वाळूचा गोळा घेऊन म्हणाला. "त्रिब्बो-झुबेदा-सुलताना-फार कडक कामं करायच्या आमच्या लहानपणीं," मीं जुन्या जाहिरातींतलीं आठवणीच्या कप्प्यांना चिकटलेलीं कांहीं नांवें आठवीत त्याच्यावर वजन टाकायला सुरुवात केली. "तूं मास्टर निसार आणि कज्जनचं बगदाद का उंट पाहिलं असतंस तर चाट झाला असतास—"

"कडक होत्या?"

"कडक? टॉप्स्!" माझ्या ह्या शब्दांनीं शंकऱ्याच्या चेहऱ्यावर माझ्याविषयींचा आदर वाढत चाललेला मला लख्ख दिसत होता.

"कज्जन कसलीं कामं करीत होता?"

"कज्जन बाई होती-पुरुष नव्हता वेड्या-मास्टर निसार-निसार हा पुरुष!" मी देखील थोडासा गडबडलों होतों. पण 'मास्टर' निसार मुळें निसार हा पुरुष हें चटकन् ध्यानांत आलें आणि कज्जन बाई असावी असा पटकन् निष्कर्ष काढला. "तुम्हीं सज्जनचा मोहब्बतकी मुसाफरीमध्यें डान्स पाहिलाय् फादर? चा ऽ ऽ चा चाचा-" शंकर वाळूंत उड्या मारूं लागला.

"ही सज्जन कोण?"

"सज्जन बाई नाहीं--हीरो आहे!" शंकऱ्यानें माझी विकेट उडवली.

"फादर, तुम्ही स्कूलमध्यें जात होतां तेव्हां टॉप्स् व्हिलन कोण होता—"

माझ्या तोंडावर आलें होतें कीं "घरांत

बाप आणि शाळेंत गणिताचे वाघमारे मास्तर" म्हणून सांगावें. पण लगेच मीं तोंड आवरलें.

"व्हिलन ? माष्टर अफझूल खान..." आतां तुकाराम आणि नेताजी पालकर ह्या भांडवलावर आणखी काय सांगणार ?

"दोन्ही हातांत पिस्तूल घेऊन ठीस् ठीस करायचा ?"

"ठीस् ?—हो हो. दोन्ही हातांत काय—दोन हातांत दोन पिस्तूलं, दातांत जंबिया—"

"जंबी म्हणजे—"

"जंबी नव्हे—जंबिया !—म्हणजे तो शहाळे-वाला बघ—शहाळीं तासतोय ना—तसला पण असा करंजी असते तसा वाकलेला—"

"हां हां—डॅगर !"

मीं घाम पुसला.

"हो हो डॅगर—तो तोंडांत आणि पायाला तलवारी बांधलेल्या—पाठीवर तोफ असा—डोंगराच्या पायथ्यावरून—"

"पायथ्या म्हणजे ?"

"पायथ्या नव्हे—पायथा—म्हणजे डोंगराच्या खालून—"

म्हणजे डोंगराच्या ग्राऊंड फ्लोअर वरून—" माझें मराठी सुधारीत शंकऱ्या म्हणाला.

"हो—ह्याला पायथा म्हणतात—तिथून डोंगराच्या शिखरावर" शंकऱ्याच्या चेहऱ्यावर शंका फुलत होती म्हणून त्यानें विचारायच्या आंतच मीं त्याला सांगितलें—"शिखरावर म्हणजे डोंगराच्या टेरेसवर ! हातांत दोन पिस्तुलं, दातांत जंबिया—पायाला तलवारी—पाठीवर तोफ एवढें घेऊन उडी मारायचा—मास्टर..."मी खलनायकाचं काय नांव सांगितलं होतं तें. पुढली हत्यार बंदी त्याच्या अंगावर चढवण्याच्या गडबडींत विसरलों.

"अबदुलखाऽऽन !" शंकऱ्या ओरडला—" सॉलिड ! पिक्चरचं नांव काय फादर—"

"अरे खूप वर्षं झालीं—तुझ्याएवढा होतों मी..."

माझ्या डोळ्यांपुढें मी शंकऱ्या एवढा होतों तेव्हांचा माझा अवतार नको नको असें माझ्या मनःश्चक्षूंना बजावीत असतांना आला. नाकाला लागणारी शेंडी—दोन आणे शिलाईवर शिवून मिळणारी चड्डी—विनकॉलरची रेघारेघांची पैरण—कानांत भिकबाळी—डोक्याला कल्हई-वाल्यासारखी टोपी (तत्कालीन कल्हईवाला—हल्लीचा कल्हईवाला कदाचित् हॅट् घालत असेल) कपाळावर दुबोटी गंध ओढलेलें—गळ्यांत दप्तर, ह्या वेषांत अनेक वर्षें काढलीं. कॉलेजांत गेलों तेव्हां मांडीला पहिला पायजमा न् पाठीला कोट लागला होता. पायजमा शिवतांना बापानें घराबाहेर काढलें तरी जायची मनाची तयारी ठेवली होती. पण कॉलेजांत जायला लागल्यापासून तीर्थरूपांनीं बोलणेंच सोडलें होतें. कचित् 'बाजीरावांचं जेवण झालें कीं नाहीं'—असा आईला विचारलेला प्रश्न कानीं पडे. रोज जेवतांना हें आपल्याला फुकटचं गिळायला मिळतं आहे, हें ऐकावं लागे. नोकरीला लागल्यापासून तीर्थरूप काळबादेवीच्या पोष्टांत ज्या खुर्चीवर जाऊन बसले तिथूनच पेन्शनींत निघाले. मी एकुलता एक मुलगा होतों. तरी देखील नको असलेली व्ही. पी. घ्यायला लागल्यावर होतो तसला चेहरा करून ते माझ्याशीं बोलत. पोष्टांतला सगळा कळकटपणा घरांत आला होता. त्यावेळीं मला वाटतं, पोष्टांतल्या कारकुनांनीं रोज दाढी केली तर त्यांना दंड भरायला लागत असावा. कारण बाबांचे एकदोन पोष्टल स्नेही यायचे ते देखील पोष्टाच्या बंग्या ज्या कापडाच्या केलेल्या असतात त्याचे कोट आणि तपकिरीच्या डागांची नक्शी काढलेलीं धोतरें नेसून ? तास तास फक्त जी. पी. ओ., पी. एम्. जी., एम्. ओ., ए. डी., आर. पी. पी., व्ही. पी. पी., असल्या इंग्रजी मुळाक्षरांत संवाद चालत. त्या मानानें शंकऱ्या खूप भाग्यवान् ! माझे स्नेही तसले नाहींत. विजयकर, अप्पा प्रधान, दाभोळकर वगैरे माझे ऑफीसमधले कलींगज शंकऱ्याला चॉकोलेट्स् देतात. एम्. के. देशौदेशींचे परदेशी ष्टॅम्पस देतो. आमच्या बाबांचे स्नेही पोष्टांत असून परदेशी स्टांप तर सोडा पण स्वदेशी कार्ड देखील त्यावेळीं एक पैशाला मिळत असून आणीत नव्हते. गोरक्षकर शंकऱ्याबरोबर इंग्लिश गाणीं म्हणतो. बाबांचे स्नेही मला अकरावा आणि अठरावा अध्याय म्हणायला लावायचे गीतेंतला ! गीता ह्या पुस्तकानें तर माझें बालपण नासलें. जमिनींत फांद्या आणि मुळें वर असलेल्या त्या अश्वत्थ वृक्षाची गंमत सोडली तर आयुष्याचीं गोजिरवाणीं वर्षें आम्हीं धृतराष्ट्र उवाच आणि भगवान उवाच करण्यांत घालवलीं. सौमदत्ती-विकर्ण-जयद्रथ वगैरे भयंकर नांवांचे राजे तिथें मरायला आले होते हें रोज पाठ करून घेण्यांत आणि क्रोधात् भवति संमोहः हें एकहि अक्षर न कळतां बाबांच्या छडीच्या तालावर शिकून आम्हीं काय मिळवलें आणि



## हें घडलें तेव्हां

शिरीष पै

हें घडलें तेव्हां
असें वाटलें
येईल आकाशाला भरती
मेघांची तर फुटेल छाती

हें घडलें तेव्हां
असें वाटलें
चंद्र उराशीं घेइल
कर तारांचे डोळे पुसतिल

हें घडलें तेव्हां
असें वाटलें
वारा फुंकर घालिल
ओठ फुलांचे जखम चुंबतिल

परंतु तेव्हां
कांहीं...कांहीं न घडलें
मीच एकटी स्फुंदुन रडलें

शंकऱ्यानें एल् ओ व्ही इ लव मायने मुहब्बत हेंहि न कळतांच पण स्वतः होऊन आनंदानें पाठ केलें यांत काय गमावलें याचा विचार करीत शंकऱ्याचें बोट धरून मी निघालों. "ष्टॉप् !'. शंकऱ्या ओरडला—

"काय रे ?"

"तें बघ ना—"समोरची रहदारी बत्ती दाखवीत शंकू म्हणाला. तिच्यावर इंग्रजींत 'रस्ता ओलांडूं नये' अशीं अक्षरें पेटलीं होतीं. दोन अडीच तासांत कुमार गिरीशनें (त्याला

अनुक्रमणिका

आतां शंकऱ्या म्हणणें मला अवघड वाटूं लागलें) मला वरेंच कांहीं शिकवलें होतें. रस्ता ओलांडतांना त्यानें माझ्या बोटाला धरून मला पुढें नेल्याचें आठवतें !

### मी आणि आमचें अपटुडेट् हपीस !

• "कोण ? तुम्ही ?" हा प्रश्न त्या दिवशीं आमच्यां वेनसन जॉनसन् ॲण्ड मंगलदास कंपनींतल्या जवळ जवळ प्रत्येकानें कां विचारला हें नंतर सांगतों. आधीं गोखल्यांचे रास्ते कसे झाले ह्या चालीवर आमची वेनसन् जॉनसन् कंपनी ही वेनसन् जॉनसन ॲण्ड मंगळदास कशी झाली हें सांगितलें पाहिजे. गेले कांहीं महिने आमच्या ऑफिसमध्यें धोतराचा सोगा, मलमली पैरणीच्या खिशांत घालून येणाऱ्या तीन-चार लठ्ठ लोकांची वर्दळ सुरू झाली होती. पहिल्या दिवशीं जेव्हां असला छातीखालीं धोव्याच्या कपड्याचा गठ्ठा बांधल्यासारखा सोगेवाला आला तेव्हां टेलिफोनवरच्या मिस् पॅट्रिशिया मॅनहॅटन् ऊर्फ मिस् पॅट्नें त्याला हटकला होता. मिस् पॅट वेनसन् जॉनसन् कंपनींत टेलिफोन ऑपरेटर, रिसेप्शनिस्ट आणि साहेबाच्या मोटारींतून हिंडणें हीं तीन कामें करण्याबद्दल पगार घेते.

"गुड मॉर्निंग—"

"जे गोपाळ—मिस्टर फॅदरवेट इन-साइड् ?"

"प्लीज वेट—सम् वन् टु सी यू सर—" फॅदरवेट साहेबाला तिनें फोन करून वर्दी दिली. 'यस सर्. मिस्टर फेदरवेट इज बिझी ॲट द मोमेंट—"

"टॅल् हिम् मंगलदास—"

"साव काम करता है." मिस् पॅटनें सोगेवाल्याचें इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व ऐकून हिंदींत सुरुवात केली.

"साव काम करता है. तो—तो हम क्या झक मारता है ! टॅलिफोन इधर देव—" असें म्हणून मंगलदासशेठनें मिस् पॅटच्या हातचा टॅलॅफोन हिसकला. मिस् पॅट किंचाळण्यापूर्वी आपल्या रठ्ठ आवाजांत मंगलदास गडगडला—"मिस्टर फॅदरवेंट—मंगलदास स्पीकिंग कम हिअर—"

हा वेडा सरकारी कचेऱ्या सोडून आमच्या ऑफिसांत कुठें शिरला याचें आश्चर्य चेहऱ्यावर उगवण्यापूर्वी मड्डम मागें लागल्यासारखा फेदरवेट साहेब आपल्या तबेल्यांतून बाहेर पडला. "ओ—हलो—हलो—मिस्टर मंगलदास—सॉरी ओल्ड बॉय—"

कर्दनकाळ फेदरवेट साहेबाच्या चेहऱ्यावर आम्हा सर्व कारकुनांची अर्जीजी एकत्र जमवून थापली होती. अत्यंत अदबीनें त्यानें पाय फुटलेलें तें धोब्याच्या कपड्याचें गाठोडें आंत नेलें. तिरक्या नजरेनें वेनसन् जॉनसन् कंपनींतल्या सगळ्या कारकुनांनीं तें दृश्य पाहून घेतलें. फेदरवेट साहेबाला इतक्या वर्षांच्या सर्व्हिसमध्यें आज हंसतांना पाहिला असें—लंचच्या वेळीं जवळ जवळ सर्वांनीं एकमेकांना सांगितलें.

बाकी साहेबाचें तें अपरिचित हंसणें एकूण भेसूरच वाटलें.. उद्यां भायखळ्याच्या पुलाखालचा उभा पारश्याचा पुतळा खुदकन् हंसतांना जर ट्राम वळतां वळतां एखाद्यानें पाहिला तर जी अवस्था होईल तसें झालें.

तें धोतर साहेबाच्या खोलींत शिरतांना मिस् पॅटनें तर जगबुडी आली असा आविर्भाव



'लव्ह ! एल् ओ व्ही ई लव्ह याने प्यार !'

केला. तिच्या दृष्टीनें ती जगबुडी लवकरच आली आणि कांहीं महिन्यांनीं वेनसन् जॉनसन कंपनी वेनसन् जॉनसन् ॲण्ड मंगलदास झाली. शेटजी कंपनीचे मालक झाले. साहेबाचा जमाना संपला. फेदरवेट साहेब मडमेसहवर्तमान स्वगृहीं गेला. तिथें कुठल्याशा शायरमध्यें त्यानें मेणबत्त्या आणि क्रूस विकायचें दुकान काढलें आहे असें कळलें. फेदरवेटच्या जागीं बोरकर मॅनेजर झाला. बोरकरच्या जागीं त्रिलोकेकर, अशी चढती भाजणी सुरू झाली आणि नव्या राज्यांत आपलें काय होणार याच्या चिंतेंतलें कारकून महिन्याकांठीं पन्नास ते शंभर रुपये अधिक मिळवायला लागले. दारांत एक सुबक बांधणीची रिसेप्शनिस्ट आली. तिचें सकाळीं गुडमॉर्निंग ऐकून आमच्या त्या धुळकट कचेरींत अत्तर शिंपडल्यासारखें होऊं लागलें. मंडळींचे वेष बदलले. दाढ्या नैमित्तिकांतून नित्यांत आल्या. परटाच्या बिलाचे पैसे घरोघर वाढूं लागले. मालक धोतराच्या गाठोड्यांतून आला खरा पण कचेरीचें मात्र ऑफिस केलें. साहेबाच्या जमान्यांतलें आमचें देशी हपीस शेटजींच्या जमान्यांत एकदम विलायती झालें. मागनें एकाएकीं अपटुडेट झालीं. भिंतींना रंगरंगोटी झाली. टेबलखुर्च्या बदलल्या आणि कळत न कळत आम्हीहि बदललों. एके दिवशीं मानकाप्याची नाकपुडी आणि ओंठ ह्यांत एकदम मोकळी जागा दिसायला लागली. त्यानें अनेक वर्षें संगोपन करून ठेवलेल्या मिशांना चाट दिली होती. बापू कुळकर्ण्यांच्या केसांना भांग आला. आप्पा प्रधान नव्या बॉस वेसिनपर्यंत जाऊन नाक शिंकरायला लागला. आणि मी देखील... तेंच सांगत होतों...

"कोण ? तुम्ही ?—हा प्रश्न विचारण्याचें कारण तेंच होतें. पण ह्याला कारण केवळ मंगलदास शेठ किंवा नवी रिसेप्शनिस्ट अलू बोगा ही नव्हती. किंवा असलीच तर फार माफक प्रमाणांत. अलू बोगा हें नांव जरी विचित्र असलें तरी ती कुमारी येतां जातां आमच्या छातीच्या ठोक्यांची लय वाढवीत होती हें नाकबूल कशाला करा ? त्या मानानें केशर मडगांवकर आतां कंट्री वाटत होती. त्यांतून एकदां खुद्द मंगळदास शेठनीं आम्हा सर्वांना 'माय ऑफिस मस्ट लूक अप टू डॅट्' असें सांगून 'अप टू डॅट्' होण्याचा परवाना दिला होता. आणि वरिष्ठांनीं उद्यां शेंड्या ठेवा असा फतवा काढला तरी 'यस सर्' म्हणणारे आम्ही अपटुडॅट व्हायच्या मागें लागलों. शेवटीं आप्पा प्रधान म्हणाला तें खरें—"आपण काय, वझ्याचे बैल ! साहेबांनीं सूट घाला म्हटलं सूट—उद्यां नुस्ता लंगोट बांधून या म्हटलं तसे !" आणि आप्पा प्रधान येईल देखील तसा ! खंडो बल्लाळाचें रक्त आंगांत आहे म्हणाला होता एकदां ! पण ओझ्याचे बैल हें खरं ! शिंगाला झेंडू बांधा नाहीं तर पोत—पाठीवर झूल चढवा किंवा चाबूक उडवा—जोडले एकदां कीं थांब म्हणेपर्यंत चालले ! मी अप टु डेट होण्याचें कारण मात्र इतकेंच नव्हतें—

### माझी पहिली विजार

एके दिवशीं पुन्हा मला 'आपली सरोज खरे' यांची चिठी आली. मी पूर्ववत् गेलों. दार उघडलें आणि दचकलों. शंकऱ्याची ही हेडमास्तरीण निराळीच दिसत होती. म्हणजे तिनें फिक्कीचा तांब्या केसांत गुंडाळून डोक्यावर ठेवावा तसें कांहीसें आपल्या केसांचें केलें होतें.

अनुक्रमणिका







पुन्हा एकदां लिपस्टिकनें रंगवलेल्या ओठांच्या बायंडिंगमधून नवें पुस्तक उघडावें तसें आपले दांत उघडून ती हंसली आणि 'न असते' म्हणाली. मधल्या 'म'ला ओठाला ओठ लागून (तिचे स्वतःचेच !) कदाचित् बायंडिंग बिघडलें असतें.

"आवण रागवणार नसलांत तर ई आवत्याशीं जरा स्पष्ट ओलणार आहें." अशी प्रस्तावना करून तिनें शंकऱ्यानें लिहिलेला दहा ओळींचा 'माझे पपा' हा निबंध मला वाचायला दिला. त्यांत चि. शंकर यानें दहा ओळींतच त्याच्या जन्मदात्याच्या समस्त दुर्गुणांची यादी लिहिली होती.

"माझ्या पपांना आम्ही बाबा म्हणतात." मीं पहिले वाक्य वाचलें. "अजून त्याला कर्त्याप्रमाणें क्रियापद चालतें हें लक्षांत आलेलें दिसत नाहीं. बाकी आमच्या संसारांत कर्त्याप्रमाणें कांहींच चालत नाहीं. शंकऱ्यानें क्रियापद तरी कां चालवावें ?"

"आअल्या एटीच्या ऑइंट तो नाहीं आहे" सारा पवर्ग गाळून आपली सरोज खरे म्हणाली; "उढें वाचा."

पुढलें मला वाचवेना. शंकऱ्यानें माझा जणूं काय पोलीस रिपोर्ट लिहिला होता. मी धोतरानें तोंड पुसतों. कोटाच्या खिशांतून बटाटे भरून आणतों. कधीं कधीं शंकऱ्याचीं शर्टांचीं बटणें घेऊन त्याला शाळेंत उघड्या गळ्यानें पाठवितों, त्याला विड्या आणायला पाठवतों, अशा तऱ्हेच्या चुगल्या केल्या होत्या. फक्त शेवटीं 'पण माझे बाबा चांगले आहेत. अरुणच्या बाबांसारखे धोतरांत नाक पूसत नाहींत. मला चौपाटीवर शाळें दीलें' इत्यादि अस्ति पक्षीं भागहि होता.

"आहिलंत? नवी इढी किती आरकाईनें आअल्या आलकांकडे अहाते?"

"हूं!" मी ओशाळून म्हणालों. "पूर्वीच्या पिढींत हें नव्हतं—आमच्या लहानपणीं..."

पुढें मी काय बोललों तें कांहीं मला आठवत नाहीं. मात्र मनांत कांहीं तरी निर्णय घेतले गेले!

शिकारी लोक मोठ्या हौसेनें 'माझा पहिला वाघ' वगैरे लेख लिहितात. त्याप्रमाणें 'माझी पहिली विजार' हा लेख देखील चित्तथरारक होईल. मी हापिसांतल्या विजयकरला विश्वासांत घेतला. सारा जन्म धोतरांत गेलेला. आतां, चाळशी उलटल्यावर पहिली पॅंट चढवायची म्हणजे जरा अवघडच होतें. पण शंकऱ्याचा निबंध आठवूं लागला. 'टॉप्स!' मी विजार चढवून घरांत उभा राहिलों तेव्हां शंकऱ्या ओरडला. "फादर, तुम्ही आतां अशोक कुमारसारखे दिसतां—"मग धांवत जाऊन त्यानें अरुण-उज्वल-मिनी-फिनी इत्यादि आपल्या फ्रेंड्सना बोलावून आणलें. तीं कारटीं देखील राणीच्या बागेंतला नवा प्राणी पहावा तशा थाटांत माझ्याकडे पहात होतीं.

"काय? टॉप्स् आहेत कीं नाहीं माझे पपा?"

"पण टाय कुठे आहे?" एक मिनी की कोण चिरपली.

त्या संध्याकाळीं चाळीस वर्षांतच काय, पण आमच्या कुळाच्या बेचाळीस पिढ्यांत न झालेली टायची खरेदी झाली. मोजा घेतांना दुकानदारानें माझी मूठ कां दाबली कोणाला ठाऊक? तो मोजा त्यानें आधीं माझ्या मुठीला गुंडाळला. दुसऱ्या दिवशीं पायांत शिरतांना त्याला बरेच वोंगे येत होते—शेवटीं शंकऱ्यानें माझ्या पायांतले दोन्ही मोजे कातडी सपाट करून घातले. तो रोज मोजे घालतो. मधूनच मी 'अरे! उजव्या पायांतला असेल' असें म्हणून माझ्या दहा पिढ्या मोज्यांतूनच जन्माला आल्यासारखें भासवीत होतों. "रॅांग! सॉकला काय उजवा आणि डावा पाय असतो?" शंकर.

माझ्या लहानपणीं ठाऊक असलेल्या गांठी तीनच! एक शेंडीची, एक जानव्याची आणि काखेंत उठणारी प्लेगाची! टायची गांठ विजयकरनें ऑफिसच्या बाथरूममध्यें नेऊन बांधली. त्या दिवशीं सारें मुंबई शहर आपला कामधंदा सोडून मला पहाण्यासाठीं रस्त्यांत गर्दी करून आलें आहे असें मला वाटत होतें. मिनी बोगा जेव्हां मला 'हाय् यू लुक सो क्यूट' म्हणाली त्यावेळीं माझ्या कानाच्या पाळ्या तिच्या ओठाइतक्या लाल झाल्या होत्या. मी लंच टाइमच्या वेळीं मिस् लोबो टायपिस्टच्या टेबलावरच्या चिमुकल्या डिक्शनरींतून हळूच 'क्यूट'चा अर्थ पाहून घेतला! आमच्या इंग्रजीच्या ज्ञानभांडारांत 'क्यूट' हा शब्द जोशी—गोखल्यादि द्रोण—कृपांनीं कधींच घातला नव्हता.

नव्या बुटांत चालतांना उगीचच पावलाला पाऊल फुटल्यासारखें वाटत होतें. पहिल्या दिवशीं बूट काढल्यानंतर पावलावर चित्रविचित्र रेघा उमटल्या होत्या. टायनें गळाहि आवळला होता. पण बाबामधून 'पपा' व्हायचें म्हणजे ही तपश्चर्या करणें आवश्यक होतें. शंकऱ्यानें मी बूट चढवल्या दिवसापासून मला पपा म्हणायला सुरुवातहि केली होती. आणि आईची ममी झाली होती. त्यामुळें हापिसांतून घरीं येतांना ती झगा घालून उभी आहे कीं काय अशी मला सदैव धास्ती वाटत असे. पण ईश्वरकृपेनें आणि वाडवडिलांच्या पुण्याईनें (म्हणजे कांहीं ह्यांत वडील मंडळींच्या धास्तीनें) अद्यापि तसें कांहीं घडलें नाहीं. पण तिच्यांतला सूक्ष्म आणि बऱ्याच वेळां स्थूल फरकहि मला जाणवत होता.

एकदां रात्रीं शेजारच्या हर्णेकरांच्या घरीं पत्ते खेळून उशीरां परत आलों. तिनें दार उघडलें आणि मी एकदम दचकलों. तिनें आपल्या डोक्यावर फाइलला लावायच्या असतात तसल्या दोन अडीच डझन् क्लिपा लावल्या होत्या—आणि तोंडावर कसलें तरी रोगण स्थापलें होतें. पहिला प्रकार केंस कुरळे करण्यासाठीं आणि दुसऱ्या प्रकारामुळें 'त्वचेचें आरोग्य' संभाळलें जाणार होतें. हल्लीं घरांत काकडीचा उपयोग कोशिंबिरीसाठीं न होतां, त्याच्या चकत्या कापून तोंडावर चिकटवण्यासाठीं होऊं लागला. कपाटावर नाना तऱ्हेच्या बाटल्या आल्या आणि मंगलदास शेटनीं केलेली दीडशें रुपयांची पगारवाढ त्या दिशेनें आटूं लागली.

पूर्वी आमचा कबिला बाहेर पडला कीं ही वरात गोऱ्या रामाच्या नाहींतर दोन देवळाच्या दिशेला वळणार हें एका नजरेंत माणसें ओळखीत. हल्लीं माझा सूट, हिचीं तीं केसांचीं वळणें आणि पोरांचे ड्रेस यामुळें बहुतेकांची सम-



अनुक्रमणिका








जूत हें कुटुंब धोबीतलावच्या चर्चमधून वांद्याला मोतमावलीला मेणबत्त्या लावायला निघालें अशी होत असावी. कारण असाच हा कविला घेऊन पुन्हा एकदां हिच्या पारल्याच्या मावशीकडे निघालों असतांना गाडींत एक गांवठी साहेबानें —"खंच्या फॅस्ताक वैता रे?" असा कोंकणींत सवाल केला होता. ते शब्द ध्यानांत ठेवून मी दुसऱ्या दिवशीं आमच्या गोन्साल्वीसला विचारलें. तेव्हां त्यानें त्याचा मराठी तर्जुमा 'कुठल्या जत्रेला चाललास?' असा होतो असें सांगितलें. गोंयच्चे क्रिस्तांव जत्रेला फॅस्त म्हणतात हेंहि त्यानें सांगितलें. आतां म्हणजे मी फक्त तोंडांत पुट्ठ्याची विडी घेऊन बांजो वाजवणें आणि हिनें त्याच्या साथींत हुडहुडी भरल्या आवाजांत "हुऽऽऽऽ" करून गाणें एवढेंच शिल्लक राहिलें होतें.

## "मी वरच्या वर्गांत गेलों"

अलीकडे हिच्या नांवची डाकहि वाढली होती. पूर्वी म्हणजे महिन्यांतून एकदां राजापुराहून आमच्या श्वशुरांचें "चि. सौ. काशी ईस उपरी अनेक आसीरवाद..." अशा मायन्याचें खुशालीचें कार्ड आणि माझी इन्शुरन्सची नोटीस यापलीकडे पत्रव्यवहार नसे. पण आतांशा "मिसेस् घरांत आहेत का?" असें विचारणाऱ्या भगिनी आणि मिसेसच्या नांवावरचीं पत्रें देखील वाढलीं होतीं. हिच्या बोलण्यांत देखील पूर्वी 'समाजांतल्या बायका म्हणजे मेल्या...' असा उल्लेख येई तो जाऊन 'आज मंडळांत असं झालं—क्लबांत ते होते —कौन्सिलच्या मीटींगला' वगैरे शब्द ऐकूं येऊं लागले. शंकऱ्यानें माझा पपा केला. तिची ममी केली तसा भलताच फरक होऊं लागला. आतां जातां जातां मला हे मान्य केलें पाहिजे कीं ही पूर्वीपेक्षां जरा उजळ दिसूं लागली होती. आमचा तीन खोल्यांचा ब्लॉक तर अंतर्बाह्य बदलला होता. प्रत्येक भिंतीला स्वतंत्र रंग लागला होता. खिडकीवर एक दिवस मी रेलून उभा राहायला गेलों तर एका लहानशा कुंडींतलें रोप मला कचकून टोचलें.

"आईऽऽ" मी जोरांत ओरडलों.

"अगबाई—माझं क्याक्टस् मोडलं वाटतं—" ती ओरडली.

"काय?"

"मिसेस् गोऱ्यांनीं मला क्याक्टस्ची ही व्हरायटी दिली होती—"

"कसलं क्याक्टस्?"—मी त्या जीवघेण्या रोपट्याकडे पहात म्हणालों. "अग निवडुंग आहे हा—"

"इश्श! क्याक्टस् म्हणतात त्याला!"

"कोण म्हणतात?"

"इश्श! मॉडर्न लाइफमध्यें काय चाललंय् तुम्हाला ठाऊक देखील नाहीं—"

"अग निवडुंगांत काय आलंय् मॉडर्न-शंकऱ्याचा फाजीलपणा असेल..." ह्या शंकऱ्याच्या मॉडर्न लाइफबरोबर धांवतां धांवतां मला धापा लागत होत्या.

"आणि ह्या मिसेस् गोरे कोण?"

"इश्श! ॲसिस्टंट कलेक्टर गोरे आहेत त्यांच्या मिसेस्!"



मी शंकऱ्या एवढा होतों तेव्हां—

"काय? तिनं तुला हा निवडुंग दिला? कलेक्टरीण बाईंनीं? मग तूं काय तिला बाभळीचे कांटे देणार आहेस कीं काय?"

"इश्श! तुम्हाला कसं कळलं?"

"म्हणजे खरोखरच देणार आहेस?"

"ते काय?" कपाटावरचे बाभळीचे काटे दाखवीत ती म्हणाली. "उद्यां मिसेस् गोऱ्यांच्या घरीं हाय टी आहे."

मी अगदींच मागासलेल्या जमातींतला झालों होतों.

"मिसेस् गोरे बाभळीचे काटे घेऊन काय करणार?"

"अहो त्यांत पॉप् कॉर्न्स् घातलीं कीं, फुलं आल्यासारखीं दिसतात—"

मग शंकऱ्याला पाठवून दुकानांतून पॉप कॉर्न्स् आणलीं. पॉप कॉर्न्स् म्हणजे 'लाह्या' हें कळल्यावर मी थंड झालों. पण पैशाला पसाभर मिळणाऱ्या 'लाह्या' आतां सहा आणे मूठ झाल्या हें पाहून मात्र पुन्हा माझ्या अंगाची लाही झाली. आणि हिनें त्या बाभळीच्या काट्याला एक एक लाही टोचून त्या काट्यांचं झाड फुलवलें—

"अग पण हा नाहीं तो उद्योग करण्यापेक्षां फुलांची डहाळी कां नाहीं लावीत?"

"शी: ! त्यांत काय सौंदर्य आहे?"

"मग निवडुंगांत सौंदर्य आहे?"

"निवडुंग काय म्हणतां? क्याक्टस् आहे तें! मी क्याक्टस्ची गार्डन करणार आहें! काल आमच्या मंडळांत"—

"बरं काय ग"—मी तिला मध्येंच अडवून विचारलं, "तूं हल्लीं समाजांत नाहीं वाटतं जात?—"

"शी: !"

"शी?"

"तिथें लोअर मिडल् क्लासमधल्या बायका जातात"—

आतां माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. मंगळदास शेठजींच्या आणि दिल्लीला त्यांच्या नात्यांत असलेल्या एका मंत्र्याच्या कृपेनें आमची वेनसन् जॉनसन् ॲण्ड मंगळदास कंपनी कोट्यावधि रुपयांचीं कंत्राटें मिळवीत होती. आणि मी 'महिना पांचशें व अधिक' मिळविणाऱ्या सामाजिक गटांत आलों होतों. त्यामुळें कुटुंबाची बदली भगिनी समाजांतून कुठल्याश्या ललना मंडळांत झाली होती—तरीच मला शंकऱ्या म्हणाला होता—"पपा, आपण फिआट न घेतां ॲंबेसडेर घेणार कांहो? मला फिआट आवडते."

मला आमच्या कुटुंबियांची भाषा कळणें जड जाऊं लागलें होतें. कारण मुलें अवघड सवाल घेऊन येत. एकदां शंकऱ्या आणि त्याचे फ्रेंड्स् 'कॅडिलॅक् महाग कीं ब्यूक" हें विचारीत आले होते. हे मोटारींचे प्रकार आहेत हें मला विजयकरनें सांगितलें. त्या बिचाऱ्याचा मला कचेरींत आधार होता. त्यानें एकदां मला सॅनफराइज्ड्—मर्सेराइझ्ड् आणि ड्रुवेनाइझ्ड् मधला फरक तासभर समजावून दिला होता.

"म्हणजे आतां घरांत तूं निवडुंगाची बाग करणार! आणखी काय?"

"अहो असं बॅकवर्ड राहून कसं चालेल?"

घरांत निवडुंगें आलीं कीं, माणसें फॉरवर्ड कशीं होतात हें मला कधींहि कळणार नाहीं. नवी भाषा अवघड खरी! चहाबरोबर खायला आलें कीं, तो 'हाय टी' होतो—'व्हिम्' याचा

गोखले मास्तरांनीं लहर असा अर्थ शिकवला होता तो बदलून मोरी धुवायची पावडर असा केव्हां झाला हें कळलेंच नव्हतें मला! आणि एके दिवशीं सकाळीं मला जाग आली तेव्हां ही डोक्यावर पुस्तक घेऊन चालतांना दिसली. डोक्यांत ज्ञान घुसवायचा हा नवा प्रकार मीं कधींहि पाहिला नव्हता. मी डोळे किलकिले करून तिचें तें चालणें पहात होतों.

"हें काय?" माझ्या ह्या प्रश्नानें तिच्या डोक्यावरचा दासबोध खालीं पडला.

"इश्श! काय दचकलें मी?"

"तूं नुसती दचकलीस पण दासबोध डोक्यावर घेऊन काय हिंडते आहेस? हें कसलं व्रत!" पूर्वी प्रतिपदेपासून दासनवमी-पर्यंत मी अनोश्या पोटानें दासबोध वाचीत असें. आणि गटे, शाकुंतल डोक्यावर घेऊन नाचला म्हणतात! तशी ही दासबोधाची आलवणांत गुंडाळलेली पोथी डोक्यावर घेऊन आमच्या बेडरूममध्यें (हल्लीं ह्या खोलीला बेडरूम म्हणायला लागलों होतों आम्ही!) गस्त घालीत होती.

"अग हें काय? डोक्यावर पोथी घेऊन काय करते आहेस?"

"चाल सुधारते त्यामुळें!"

पोथी न उघडतां डोक्यावर घेऊन हिंडल्या-वर चाल सुधारते हें ऐकून मी निपचित पडलों. समर्थांनीं मूर्खांचीं इतकीं लक्षणें लिहून देखील अजून बरींच शिल्लक उरलीं आहेत ह्याची मला खात्रीच पटली. "काल आमच्या कौन्सिलमध्यें—" ती सांगूं लागली.

पूर्वी रॅंग्लर परांजपे, फिरोजशहा मेथा—सर जमशेटजी वगैरे वरच्या क्लासची मंडळी कौन्सिलांत जात. आतां आमची ही देखील कौन्सिलांत जाऊन काय करते कांहीं ध्यानांत येईना.

"कसलं काऊन्सिल?"

"अहो आमचं लेडीज काउन्सिल नाहीं का?" तिनें माझ्या अज्ञानाची कींव करीत म्हटलें. माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. मंगळदास शेठजींच्या कृपेनें मी हापिसांत 'बॉस'

हाय, यू लुक सो क्यूट!

झालों होतों. नवी तरतरीत कारकून मंडळी मला हल्लीं 'बॉस' म्हणत होती आणि घरांत ही पूर्वी नुसती वूमन होती ती लेडी झाली होती. आधुनिक स्त्रियांची 'बायका-महिला-वनिता आणि लेडीज्', अशी नवी चातुर्वर्ण्य पद्धति मला हळूहळू उमगायला लागली होती.

"मग काय झालं तुमच्या असेंब्लींत?"

"असेंब्ली नव्हे काऊन्सिल! तिथें थ्रिटी नारिएलवालाचें लेक्चर होतं."

"कुणाचं?"

"थ्रिटी नारिएलवाला."

"थ्रिटी? ही कसली पदवी आहे?"

"नांव आहे! तिचं—"

थ्रिटी? मला फार तर एखादी विडी ठाऊक.

"असं! थ्रिटी काय?"

"हो! काल तिनें 'चालावं कसं' ह्याच्यावर व्याख्यान दिलें."

"डोक्यावर दासबोध घेऊन चालावं म्हणाली ती! पारशी लोक धार्मिक हो बाकी!"

"दासबोधच घ्यायला हवा असं नाहीं कांहीं! कुठलंहि पुस्तक डोक्यावर घेऊन चालावं—"

"म्हणजे आतां तूं बाजारांत पुस्तक डोक्या-वर घेऊन चालणार कीं काय?"

"इश्श! काय ब्याकवर्ड आहांत हो तुम्ही?"

ह्या शिवीची मला आतां संवय झाली आहे.

"अहो असं पुस्तक डोक्यावर घेऊन चाललं कीं नाहीं, म्हणजे चालींत ग्रेस येते."

"हें बघ, आपल्याला करायचीय् काय ग्रेस—"

"वा! थ्रिटी म्हणाली कीं, माणूस चाल-ण्याच्या ग्रेसवरून ओळखला जातो. तुम्हाला देखील पोक काढून चालायची संवय आहे."

"अग पण किती वर्षें झालीं आपल्या लग्नाला?"

"त्याचा काय संबंध—चाळिसाव्या वर्षीं तर माणसाचं खरं जीवन सुरू होतं."

हल्लीं घरांत जीं बायकांचीं म्हणून मासिकें यायला लागलीं आहेत त्यांतलीं कोणतीं वाक्यें मला कधीं ऐकावीं लागतील हें सांगतां येत नाहीं.

"हें बघ—इतकीं वर्षें माझं पोक तुझ्या डोळ्यांत आलं नाहीं आणि तुझ्या चालण्यांत ग्रेस नाहीं हें देखील तूं आतां ह्या दास—बोधावर हात ठेवून म्हणालीस म्हणूनच कळलं. नाहीं त्या गोष्टी हव्या आहेत कशाला आपल्याला—"

"थ्रिटी म्हणाली होती कीं, पुरुष माणसांचा तुम्हांला विरोध होईल म्हणून—"

"थ्रिटीचं लग्न झालंय का ?"

"झालं होतं—"

"अरे अरे अरे !—मग आतां ही विधवा-बाई उगीच लोकांची चाल सुधारायच्या कुठें मागें लागली आहे ! अग्यारींत जावं, देव देव करावं–झेंद अवेस्था वाचावा, डोक्यावर न घेतां—"

"इश्श ! खरंच तुम्ही ब्याकवर्ड आहांत. थ्रिटीनें डायवोर्स घेतला—पहिला नवरा डोळ्याचा डॉक्टर होता. दुसऱ्या एका डॉक्टरशीं लग्न झालंय तिचं !"

फार्वर्डपणांत देखील आजारीपणांत बदलतात तसे डॉक्टर नवरे बदलायचे असतात ही माहिती नवी होती. "हें पहा !" कधीं नाहीं तो मी जरा कडक आवाज काढून म्हणालों. "ही खुळं आपल्याला परवडणारीं नाहींत."

पण साऱ्या घरांत मीच खुळा राहिलों होतों. निवडुंगाच्या कुंड्या खोलीची शोभा वाढवतात आणि दासबोध डोक्यावर घेऊन चालण्यासाठीं समर्थांनीं लिहिला हें कांहीं समजूं शकत नव्हतें मला !

## मी नव्या जगांत शिरतों

पूर्वी कंपनींतल्या नानू सरंजाम्याबरोबर कांहीं चमत्कारिक माणसें पाहाण्याचा योग येत असे. दोन वर्षांपूर्वींच नानूनें कंपनी सोडली. खरं म्हणजे कंपनीनें त्याला सोडलें. अगदीं गोणत्यांत घालून मांजर सोडतात तसें सोडलें. कारण नानू दिवसेंदिवस रंगावर काळ्या चौकड्या असलेला शर्ट—पायांत पुणेरी जोडे, हनवटीवर बोहऱ्या-सारखी दाढी आणि डोक्याला गुलाम महमद बक्षी सारखी फरक्याप घालून आला. आप्पा प्रधान—मी—लांजेकर वगैरे धोतरवाले लोक तर त्याचा तो अवतार पाहून भेदरलों होतों. या वेषांत आमचें हपीस तर जाऊं दे, पण भेंडीबाजारांतल्या हॉटेलांतला बाहेरवाला म्हणून नेमतांना सुद्धां तिथल्या मालकानें देखील हाजी अलीच्या पीराचा कौल घेतला असता. खिशांत फक्त सुराच कमी होता. दुपारचा चहा त्याला पाजायच्या निमित्तानें मीं त्याला बाहेर काढला. त्यावेळीं आमची वेन्सन् जॉनसन् कंपनी वेन्सन् जॉन्सन ॲण्ड मंगळदास झाली नव्हती. त्यामुळें कंपनींतले गोन्सालव्हिस, विजयकर वगैरे अपवाद सोडले तर बाकीचे आम्ही लोक धोतर–वालेच होतों. त्यांत नानू हा असा जगावेगळा



"त्याला निवडुंग काय म्हणता—
क्यॅक्टस आहे तें !"

ड्रेस करून आल्याबरोबर गोन्सालविसनें हळूच माझ्या कानांत तो 'ब्लडी कॅम्युनिष्ट झाला आहे' असें सांगितलें.

मीं नानूला भीत भीत त्याच्या ड्रेसाविषयीं पृच्छा केली. नानू माझ्याकडे पाहून तुच्छतेनें हंसला. त्याला तुच्छतेखेरीज इतर कुठल्याहि भावनेनें हंसताना मी कधीं पाहिलें नाहीं. त्यामुळें त्याच्या तुच्छतेचा माझ्या मनावर तसा कांहीं परिणाम झाला नाहीं.

"रागावूं नका हं नानबा—"

"रागावूं नको ?–कां रागावूं नको ? आमची सगळी पिढीच मुळीं रागावलेली आहे. आम्ही सगळे ॲंग्री यंग मेन आहोंत—"

नानू पिढी–समाज–जनता ह्या सगळ्या मंडळींना आपापल्या कामाला सोडून थोडासा स्वतःविषयीं विचार करील तर किती भलें होईल? पण नाहीं. तो कपभर चहा देखील इराण्याचा निषेध केल्यासारखा पितो.

"तुमची सगळी पिढी रागावली आहे ! कुणावर ?" माझ्या 'कुणावर ?' ह्या प्रश्नानें नानू जरासा गांगरला. खिशांतून त्यानें हातरुमाल काढून घाम टिपला. बक्षीछाप टोपीचा कोण आणखी तिरका केला. एका टेबलावर कोट्टोपी, बंद गळ्याचा शर्ट, धोतरछाप पोशाखांतला मी आणि मोहरमम्धल्या वाघासारखा समोर बसलेला नानू हें दृश्य आजूबाजूचे लोक अशा कांहीं विचित्र नजरेनें पहात होते कीं, चहाच्या घोटा घोटाबरोबर मी ओशाळत चाललों होतों.

"कुणावर रागावलों आहों ? साऱ्या जगावर ! काय दिलं तुमच्या पिढीनें आम्हांला ? युद्ध ! महागाई ! लांच लुचपत—"

जगाला ह्या सगळ्या गोष्टी हिटलर वगैरे मंडळींनीं बहाल केल्या होत्या अशी माझी समजूत होती.

"पण हा राग असा पट्ट्यापट्ट्याचा शर्ट घालून कशाला काढायला हवा ?"

"तुम्ही प्रत्येक गोष्टीचें व्हलगरायझेशन् करतां ! नीति अनीतीच्या सगळ्या कल्पना

ढवळून काढल्या पाहिजेत—और एक चाय लाव गरम !" शेवटलें वाक्य कप गोळा करायला आलेल्या वेटरला उद्देशून होतें.

नीति अनीतीच्या कल्पना नानू काळ्या चौकड्यांचा लांबडा शर्ट घालून कशा काय ढवळणार होता तोच जाणे! नीति अनीति म्हणजे काय खीर आहे कीं बासुंदी ? की बसले आहेत आपले ढवळीत. पण नानू फारच हातांबाहेर गेला. आपण 'संतत तरुण' आहोंत हें दाखवायला त्यानें काय तऱ्हातऱ्हा सुरू केल्या ! आठवडेच्या आठवडे आंघोळ दाढी न करतां कचेरींत येऊं लागला. कामाच्या वेळेंत गोष्टी लिहीत बसला. आप्पा प्रधानचा राग त्याच्या गोष्टीवर नव्हता. कारण त्या त्यानें कधीं वाचल्याहि नाहींत. पण ऑफिसची स्टेशनरी वापरून गोष्टी लिहितो म्हणून आप्पा प्रधान रागावला.

"साली लॉयल्टी, ऑनेस्टी, म्हणून काय आहे का नाहीं ? घरीं ह्या लोकांहीं कांहींहि केलं तरी आपलं आब्जेक्शन् नाहीं. पण हापिस टाइममध्यें ज्यांहीं त्यांहीं आपलें काम केलं पायजे ! वर पुन्हा खिचांत हॉफीसची स्टेशन्री घालून जातो. एखादेवेळीं साह्यबाहीं पाह्यलं म्हणजे आफत होईल."

त्याप्रमाणें 'साहेबाहीं' पाह्यलं. नानू पट्टे ओढलेल्या वाघाच्या कातड्यासारख्या कापडाचा बुशकोट आणि लाल तुमान घालून आला होता. त्या महिन्याचा आणि पुढल्या तीन महिन्याचा पगार देऊन नानूची पाठवणी केली.

नानू आतां भलताच संतत झाला होता. त्या संततपणांत देखील माझ्यावर त्याचा जीव होता. शिवाय शंकऱ्याची त्याची फार दोस्ती. नानू स्वतःला शंकऱ्याच्या पिढीचा प्रतिनिधि समजे ! ही देखील मला नानू 'जिनीयस्' आहे म्हणाली. मुलांच्या नादानें हल्लीं ही सारखं इंग्रजी पेरीत असते. इतके दिवस 'जिन्नस' तेवढा ठाऊक असणारी ही आतां नानू 'जिनियस' आहे वगैरे बोलायला लागली आणि एके दिवशीं तिनें मला धक्काच दिला.

"अहो मला जरा नान् सरंजाम्याची ओळख कशी करायची तें सांगा ना—"

"काय ?" दाढी करतांना माझी हनुवटी तीन इंच कापली गेली.

"नान् सरंजाम्यांचं काऊन्सिलांत व्याख्यान आहे."

नानूचा नान् झाला होता. वास्तविक शिखाच्या हॉटेलांत तोच मला एकदां जेवायला घेऊन गेला होता तेव्हां त्यानें मला बॅडमिंटनच्या रॅकेटच्या आकाराच्या भक्कम चपातीला 'नान्' म्हणतात म्हणुन सांगितलं होतं. नानूचा नान् झाला आणि अशीच त्याची दाढी वाढत राहिली असती तर एखाद दिवशीं तो दारांत नानकसिंग सरंजामे म्हणून आला असता. हा 'संतत तरुण' काय करील तें सांगणें अवघड होतें.

"नानूची तुझी ओळख नव्यानें काय करून द्यायची—"

"अहो माझी नव्हे. कौंसिलांतल्या लेडीज्‌पुढें नान् सरंजाम्यांचा टॉक आहे. त्यांनीं बोलायचं कबूल केलं आहे. मी त्यांचा सुरवातीला परिचय करून देणार आहें."




समर्थांच्या उपदेशानें 'चालींत' सुधारणा !

"सांग आमच्या ह्यांच्या हापिसांत होता—आठ आठ दिवस आंघोळ करीना. हिरवे तांबडे शर्ट घालून हिंडायला लागला तशी एक दिवस साहेबानं त्याची गठडी वळली दोन वर्षांपूर्वी !"

"हापिसांत नोकरी करीत रहाणं हीच कांहीं जीवनाची इतिकर्तव्यता नाहीं" बायको एका दमांत हल्लीं हीं वाक्यें बोलते. दासबोध डोक्यावर घेऊन तिचा दम देखील टिकायला लागला आहे.

"मग मी उद्यां तांबडे सद्रे घालून दाढी वाढवून हिंडूं का ?"

"लाल रंग हे बंडाचे प्रतीक आहे !"

"आंघोळीचं पाणी काढ !" मी सुद्धां कधीं कधीं गर्जूं शकतों.

दिवसेंदिवस माझ्या घरांत मीच परदेशी होत चाललों होतों कीं काय कळेना.

"फादर फादर" शंकऱ्या मला बिछान्यांत हलवून हलवून उठवीत होता. "ममीचा फोटो!" मी डोळे चोळीत पाहिलें. कुठल्याशा वर्तमानपत्रांत नानूला पुष्पहार समर्पण करतांना काउन्सिलच्या एक सदस्य भगिनी म्हणून हिचा फोटो आला होता. यापूर्वी मी मॅट्रिक झालों तेव्हां एकदां माझं नांव छापून आलं होतं. त्यानंतर नंबरांची पद्धत सुरू झाली. ह्या वर्तमानपत्रांत चक्क आमची मिसेस छापून आली होती.

### ...आणि मी अध्यक्षहि होतों.

त्या फोटोनें आमचें जुनें घर उध्वस्त केलें आणि आम्ही नव्या जगांत शिरलों. इकडे मंगळदासशेठचा धंदा भलत्याच तेजींत होता. वर्षांतून तीन तीन बोनस मिळायला लागले. ते कचेरींतून हिच्या हातांत देईपर्यंत मला दिसत. पुढें ते कुठें जात कोण जाणे. आमच्या वस्तींत पेपरांत छापून आलेली महिला म्हणजे फक्त आमची हीच असल्यामुळें त्या परिसरांत मलाहि उगीचच किंमत आली. आणि ज्या भानगडींतून आजन्म अलिप्त होतों अशा लफड्यांत मला गुंतावें लागलें. गल्लींतल्या बॅडमिंटन् क्लबाचा मी अध्यक्ष झालों. आमच्या ब्लॉक्सच्या मध्यें एक चौक होता. तिथें अनेक वर्षे माणसें फूल धोपटीत. मी त्यांच्याशीं संबंध ठेवला नव्हता. खेळ ह्या गोष्टीशीं माझें कधींच जमलें नाहीं. माझा स्वभाव बैठा. त्यामुळें पत्ते हा एकमेव खेळ मला प्रिय! क्रिकेटच्या चौरंगीसामन्यांत एकेकाळीं सी. के. नायडूला बॉम्बे जिमखान्यावर ज्या प्रत्येक सिक्सरनंतर शेंकडों टाळ्या पडल्या त्यांत रॅली ब्रदर्सच्या गच्चीवरून फुकटांत पडलेली टाळी माझी! एवढाच क्रिकेटशीं संबंध. टेनिस बॅडमिंटन् ऐकून माहिती. हल्लीं हापिसांत देखील टूर्नामेंट्स् सुरू झाल्या होत्या. त्यांत बॅडमिंटनचीं फुलं आणायला विजयकर-


'आम्हीं सगळे अँग्री यंग मेन आहोंत!'

बरोबर एकदां धोबीतलावला गेलों होतों. माणसानें उगीच जाळीच्या इकडून तिकडून फुलें उडवीत नाचावें हे मला कधींच पटलें नाहीं. आमच्या चिंचखरे ब्लॉक्सच्या 'फ्रेंड्स् ओन बॅडमिंटन क्लब'चे आपण अध्यक्ष व्हा असं सांगायला जेव्हां कांहीं तरुण मंडळी आली तेव्हां मला धक्काच बसला. चिंचखरे ब्लॉकमध्यें आम्हीं रहायला येऊन पंधरावीस वर्षांहून अधिक वर्षे झालीं होतीं. गेल्या युद्धातल्या पळापळींत ज्या कांहीं थोड्या लोकांनी श्रेष्ठ धारिष्ट्य दाखवून मुंबईत रिकामे पडलेले ब्लॉक पटकावले त्यांपैकीं मी होतों. झांशीच्या राणीचें स्मरण करून 'जर्मन येवो वा जपानी—मी माझी मुंबई सोडणार नाहीं'–(आणि वेन्सन् जॉन्सन् कंपनी) अशा निर्धारानें मी मुंबईत राहिलों होतों. ही अध्यक्षपदाची विनंति करायला आलेली तरुण मंडळी हां हां म्हणतां तरुण झाली होती. विशेषतः गुप्तेकाकांची निमा तर भलतीच स्मार्ट दिसत होती.

"काय वडील ठीक आहेत?" मी आपलं उगीचच हा इसम तिच्याकडे पहात राहिलाय् हें लक्षांत येऊं नये म्हणून विचारले. •

"डॅडी जर्मनीला गेले आहेत." निमा म्हणाली.

हल्लीं सगळ्यांचेच बाप डॅडी झाले आहेत, हें नव्हतं मला ठाऊक.

"अस्सं! केव्हां येणार परत?"

"दोन किंवा तीन मंथ्स् नंतर!"

"काय सहज गेले आहेत?"

"तिथें बिझनेस कॉंट्रॅक्ट्स् करायचे आहेत. शिवाय फॅक्टरीसाठीं मशिनरीची ऑर्डर प्लेस करायची म्हणून—" गुप्ते बटणांची फॅक्टरी चालवीत.

"बोटींनीं गेले का—"

"नाही–फ्लाय करून गेले—"

"बोइंग"—शंकऱ्या ओरडला त्याला त्याहि शास्त्रातलें खूप कळतें. "बोइंग सेवन ओ सेवन!"

"गप रे!" तो कांहींतरी चुकीचें बोलला असेल म्हणून मी त्याला जामलें.

"हो—गिरीश म्हणतो तें राईट आहे अंकल् डॅडी सेवन् ओ सेवन् नीच गेले—"

"आधीं सुपर कॉन्स्टलेशन् जात होते.—" शंकऱ्यानें माझ्या ज्ञानांत आणखी भर घातली.

अनुक्रमणिका

निमाच्या मराठीवरून आमच्या घरांत कांहीं वर्षांनी सुरू होणाऱ्या मराठी गद्याच्या नव्या अवताराची कल्पना येत होती.

"तूं आतां कितवींत आहेस?" मी तिला विचारलं.

"मी सीनिअर बी. ए. ला आहें--"

"ऑं! बसा ना. उभे का तुम्ही लोक?"

ही फ्रॉक घालणारी गुसे काकाची मुलगी सीनिअर बी. ए. ला?

एक आवाज फुटतोय् न फुटतोय् अशा बेताचा तरुण म्हणाला. त्यानें कपाळावर केसाच्या बटीचा आठाचा आंकडा काढला होता.

"नाहीं तर आम्ही आंटीला सांगूं—" निमा म्हणाली.

"ही आंटी कोण?"

ह्या माझ्या प्रश्नावर खोलींतली ती सगळी नवी पिढी खदखदून हंसली.



"साला असाच 'मामा' आम्हांला अध्यक्ष हवा होता"—एक कारटें

"मग अंकल, तुम्ही चेअरमन् व्हा!" दुसरा एक तरुण म्हणाला.

"पण मला कांहीं तुमच्या त्या बॅडमिंटन्-मधलं कळत नाहीं."

"म्हणून तर आम्ही तुम्हाला रिक्वेस्ट करायला आलों."

"डॅडी ऑंटी इज ममी" शंकऱ्या मदतीला आला. "ओ! कुठें गेली तुझी आंटी?"

पुन्हा एकदां ती पिढी खिदळली. "माझी आंटी? डॅडी, तुम्ही सगळ्यांना जॉनी वाकर-सारखं लाफिंग करायला लावाल!" शंकऱ्या-पुढें इलाज नाहीं.

"गप रे—"

"मग अंकल, तुम्ही चेअरमन व्हाच!" निमी म्हणाली.

"नीना कुमारी!" शंकऱ्या पिंजऱ्यांतला पोपट जसा अकारण 'क्यॅर्र' करून ओरडतो तसा ओरडला. शंकऱ्याच्या उद्‌गाराला तरुण पिढी पुन्हा हंसली.

"कोण नीना कुमारी?"

"निमाला सगळेजण नीना कुमारी म्हणतात. आणि ह्याला, दिलीप कुमार!"

"ए चूप रे" निमानें शंकऱ्याचा गालगुच्चा घेतला. चिरंजीव शंकर, आमची आंटी वगैरे मंडळींनी आसमंतात बरीच लोकप्रियता मिळवली होती. केसांचे आठ केलेला दिलीप कुमारहि शंकऱ्याचा फ्रेंड होता.

"पण ज्याला बॅड्मिंटनमधलं कांहींच कळत नाहीं त्याचा काय उपयोग?"

"पण म्हणून तर तुम्ही चेअरमन् व्हा!"

"पूर्वी कोण होते?"

"नरसिंगराव!"

"उज्ज्वलचे डॅडी!" पुरवणी माहिती खात्याचे प्रमुख शंकरराव म्हणाले.

"मग त्यांना तर स्पोर्ट्स्‌मध्यें फार इंटरेस्ट आहे!" हळूहळू माझं मराठी देखील नवीं वळणं घेऊं लागलं. मी नरसिंगरावाला उड्या मारतांना पाहिलं होतं.

"पग ते स्वतःच कोर्टाचं पझेशन् घेऊन बसतात."

"म्हणजे तुमचं प्रकरण कोर्टाबिर्टात गेलंय् कीं काय?"

ह्या माझ्या वाक्यानंतर तर नव्या पिढीनें हंसताना टाळ्या वाजवल्या. पुढल्या पंधरा मिनिटांत—निमा—आशुतोष पाळंदे (प्रेस-वाल्या पाळंद्याचा!)—जगदीश निमकर (ह्याचा डॅडी शिपवर असतो)—आणि मधून मधून चि. शंकर यांनीं मला बॅडमिंटन आणि तत्सम खेळ यांविषयीं भरपूर माहिती दिली. "आम्हाला डॅबल् करणारा चेअरमन् नको! तुम्हाला गेममध्यें इंट्रेस्ट नाहीं त्यामुळें तुम्ही पार्शीलिटी करणार नाहीं. मिस्टर एन्. राव सारखे आपल्या डॉटर्सनाच चान्स द्यायचे."

"मग एव्हढा चान्स मिळाल्यावर ती टूर्नो-मेंटस्‌मध्यें चॅंपिअन् आली तर काय वंडर?" आशुतोष. "तुम्ही नुसते फॉर द सेक ऑफ नेम रहा—क्लब आम्ही चालवतों. शिवाय तुम्ही वयोवृद्ध आहांत।" निमाला हा एकच मराठी शब्द ज्या कुठल्या दुष्टानें शिकवला होता त्याचें डोकें फोडावें असें मला वाटलें. आणि अशा तऱ्हेनें मी चिंचखरे ब्लॉक्सच्या फ्रेंड्स् ओन् बॅडमिंटन् क्लबचा चेअरमन् झालों.

"थॅंक्यू अंकल—"तरुण पिढी शेकहँड करीत निघाली. जातां जातां पाळंद्याच्या पोरानें एक वाक्य जिना उतरण्यापूर्वी बोलायची घाई करायला नको होती. "साला असलाच मामा आपल्याला चेअरमन् पायजे होता—आतां नरसिंग रावच्या गॅंगला येऊं दे कोर्टावर—"

नव्या जगांत हळू हळू डोकावून पाहायला मीं सुरुवात केली होती. फक्त एकच प्रश्न मला पडला होता, नवी पिढी सगळ्या जगावर रागावली आहे म्हणाला होता नान्। ती कुठली पिढी मग? ही पिढी फक्त नरसिंगरावावरच रागावली होती. आणि बरोबर आहे. आपल्याच पोरींना खेळायला देतो म्हणजे काय! आमची पिढी देखील असल्या बापावर रागावली असती.

इतक्यांत दार उघडून आमच्या मिसेस् आल्या. हल्लीं ती दिवसांतून दहा तास सार्व-जनिक कामांतच असावी असें वाटतें.

"कुठें गेली होतीस ग?"

"कौन्सिलची इलेक्शन् होती."

"रविवारीं सकाळीं?—तुमच्या लेडीजना काय स्वैंपाकबियपाक आहे का नाहीं?"

"रविवारीं काय फक्त पुरुषांनींच सुटी घ्यावी? बायकांनीं घेऊं नये? नान् हेच म्हणाले!"

"नान्! त्याला काय म्हणायला? ब्रह्मचारी तो. कुठल्याहि पिंपळावर जाऊन बसेल गिळायला."

"कौन्सिलची जाइंट सेक्रेटरी म्हणून निव-डून आलें मी—"

"फूः!"

"फूः करण्यासारखं काय त्याच्यांत?"

"जाइंट सेक्रेटरीच ना? मी चेअरमन् झालों."

"काय?" झोपेंत भूत पाहिल्यासारखं माझ्याकडे ती पहात म्हणाली.

"हो हो चेअरमन"

"यस् ममी! डॅडी चेअरमन्!" शंकऱ्यानें चोंच खुपसली. "चेअरमन् चेअे आर एम् ए मन्!" 'आपली' सरोज खरे हेंच इंग्रजी शिकवते त्याला.

"कसले चेअरमन्?"

"फ्रेंडस क्लब बॅडमिंटन् कोर्टाचा!"

त्या क्षणीं माझ्याकडे हिनें ज्या डोळ्यांनीं पाहिलें तसें इतक्या वर्षांच्या संसारांत दोनदां जरी पाहिलें असतें तरी समर्थांच्या 'जगीं सर्व सूखी असा कोण आहे?' ह्या प्रश्नाला "मी!" असें मीं जोरांत उत्तर दिलें असतें.

### तो मी आणि हा मी.

आतां बूट आणि विजारींत मी रुळलों आहें. चिंचखरे ब्लॉकमधली तरुण पिढी मला आतां 'हाय् अंकल्' म्हणते. किंबहुना त्यांनीं मला आरे मिल्क कॉलनीच्या ट्रिप मध्यें आग्रहानें नेलें. आणि माझ्या भोंवतीं 'फेर धरून 'ही इज ए जॉली गुड फेलो' कीं काय गाणेंहि इंग्रजी ब्यांडच्या चालीवर म्हटलें.




अशावेळीं माझ्या डोळ्यांत पाणी येतें. आणि माझी पंचाईत होते. हीं पोरें वेळींअवेळीं मल भाषणें करायला लावतात. पहिल्या भाषणाच्या वेळीं मला गीता आठवली होती. आणि अर्जुनाचीं गात्रें कशीं सीदन्ति झालीं असतील याची पूर्ण कल्पना आली होती. आतां मी निर्ढावलों.

शंकऱ्याची मला शिकवणी चालू आहेच. हल्लीं मला एखादी गोष्ट 'टॉपूस्' आहे की 'सॉलिड्' आहे हें नीट समजायला लागलें आहे. त्याबरोबरच टॉपूस् कधीं टॉपस् नसतें आणि सॉलिड्हि सॉलिड नसतें हेंहि उमगूं लागलें आहे.

कांहीं दिवसांपूर्वीं एक जुना ग्रूप फोटो सांपडला. वेनसन् जॉनसन् कंपनीच्या स्टाफचा! त्यांतला माझा फोटो आणि आमच्या चिंचखरे ब्लॉक्समधल्या वार्षिक स्नेहसंमेलनांतला माझा फोटो पाहून 'हें चित्र पहा आणि तें चित्र पहा' असें माझ्या मनाशींच मी म्हणालों. मात्र ह्यांतलें कुठलें चित्र चांगलें तें कांहीं मला कळलें नाहीं—कळणार नाहीं.

माझे कर्दनकाळ हेडमास्तर बरे कीं शंकऱ्याची निरोष्ठ भाषेंत बोलणारी सरोज खरे बरी? जेवतांना 'गिळा फुकटचें मिळतंय् तें' म्हणणारे आमचे तीर्थरुप, आजारी पडलों तेव्हां ओल्या पंचानें मारुतीला शंभर प्रदक्षिणा घालीत. मी शंकऱ्याला आणि त्यानंतरच्या नंबरांना व्हिटामिन-युक्त आहार मिळाला कीं नाहीं याची चिंता करतों. रागावणें सुटलेंच आहे. आमच्या तीर्थरूपांपुढें जर मीं माला मल्होत्रा एवढीं पांच अक्षरें म्हटलीं असतीं तरी कानशिलाखालीं पांच बोटें उठलीं असतीं. शंकऱ्या मला हळूच येऊन—ब्लॉकमधली अमकी तमक्यावर लव्ह करते म्हणून सांगतो! ह्यांतला कुठला पितापुत्र प्रसंग चांगला?

हपिसांतलें वातावरण रंगीबेरंगी झालें आहे. पण "नव्या रिक्रुटांना कंपनीचें प्रेम नाहीं दिसत," असें आप्पा प्रधान म्हणतो. आम्हांला तरी प्रेम होतें कीं केवळ त्या गोऱ्या साहेबाची धास्तीच होती हें ठामपणें नाहीं सांगतां येत!

मात्र साऱ्या घरांत कमालीच्या उत्साहांत कुणी असेल तर ही! तिचीं कौन्सिलें आणि परिषदा यांना सुमार नाहीं. पण सैपाकघरांत कोळिष्टक नाहीं. आणि कधीं नाहीं तो शंकऱ्या हल्लीं कपबश्या विसळून पुसून ठेवायला लागलाय्. त्याच्या शाळेंत हेंहि शिकवतात म्हणे!

आणि अगदीं खाजगीच आहे, पण सांगतोंच—पूर्वीपेक्षां ही, तो दासबोध डोक्यावर घेतला म्हणून कीं केसांना चाप लावते म्हणून देव जाणे, पण फार जणींत उठून दिसते! पूर्वीचा हिचा फोटो पहावत नाहीं!

परवां बोनस आला. मी फारां दिवसांनीं हिला म्हणालों, "तुला काय बांगड्या बिंगड्या करून घ्यायच्या असतील तर घे हो"—तशी—अजून विश्वास बसत नाहीं माझा, खरं कीं स्वप्न तें—ती चटकन् म्हणाली,

"त्यापेक्षां नवं रिस्टवाच घ्या तुम्हांला चांगलंसं—मामंजींचं तें पाकेट वाच अगदीं जुन्या फ्याशनचं आहे—"

"राहूं दे, बाबांची तेवढीच आठवण आहे..."

अजूनहि तेंच घड्याळ वापरतों. खिशांतून काढलें कीं वाटतें, जुन्या काय नि नव्या काय, घड्याळांच्या तबकड्या नि पट्टे बदलतात—सुखानं टळलेली दुपार पहायला तबकडीन् पट्टा काय उपयोगाचा? घड्याळाचं काय आणि माणसाचं काय, आंतलं तोल सांभाळणारं चाक नीट राहिलं कीं फार पुढेंहि जाण्याची भीति नाहीं नि फार मागेंहि पडण्याची नाहीं!!



• • •



अनुक्रमणिका

# वाघाची शिकार

(पान १४४ वरून)

डॉक्टरांच्या हांकेसरशी कमल, मध्या आणि कुंदा तिघेजण बाहेर आले. तिघेहि खुषींत होते. "बरंय मधुकरराव, परत एकदां या असेच—" असं कमलनें म्हटल्यावर मी समजलों कीं मध्यानें जिंकली.

बाहेर पडतांच मी मध्याला म्हटलं, "मध्या, तू आणि कुंदा चांगल्या गुळगुळू गोष्टी करीत होतां आणि. मला मात्र त्या म्हाताऱ्याच्या तोंडीं दिलंत. त्यानें असं काय मला छळलंय."

"बाळ्या, एकदां हें जमूं दे माझं. मग या या उपकाराबद्दल माझ्या कातड्याचे जोडे तुझ्या पायांत घालीन" मध्या म्हणाला.

"मध्या, पण आतां ही उमेदवारी, पदयात्रा, गीताप्रवचन—सारं कांहीं बंद—आतां लवकरच तूं या प्रश्नाचा सोक्षमोक्ष लावला पाहिजेस—"

"येस् मध्या—आतां लवकरच तूं कमलसमोर आपलं हृदय खुलं कर—" कुंदा म्हणाला.

"नाहीं रे बाबा, तिला सरळ आणि स्पष्ट विचारायची आपली ताकद नाहीं."

"मग मध्या, हें जमायचं कसं?"

"तेंच तर मला समजत नाहीं." मध्या म्हणाला.

"मी सांगूं—तूं तिला एक प्रेमपत्र पाठव." कुंदा म्हणाला.

"प्रेमपत्र! म्हणजे निकालच लागला. ती तें प्रेमपत्र घेऊन सरळ आपल्या प्रिन्सिपॉलकडे गेली म्हणजे टार मेलों."

"मग तिलां कळवायचं कसं?"

"त्याला एकच उपाय—तो म्हणजे बाळ्या, तूं कमलची गांठ घे आणि तिला सांग कीं आमच्या मधूचं तुमच्यावर प्रेम आहे."

"कमाल आहे तुझी—मी काय तुझा दूत आहें—आणि कुणाला कळलं तर लोक तुला आणि मला वेड्यांत काढतील."

"कुंदा तूं कर ना एवढं माझं काम!"

"मध्या, आपल्या हातून असले धंदे नाहीं होणार." कुंदा म्हणाला.

"कुंदा—तूं जर नाहीं म्हणालास तर माझी अवस्था काय होईल याची तुला कल्पना आहे काय?"

"आणि जर का हें प्रकरण शेकलं तर माझी अवस्था काय होईल याचा तूं विचार केला आहेस का?"

"कुंदा—तूं नाहीं म्हणूं नकोस—तूंच मध्याची केस फार चांगल्या तऱ्हेनें मांडशील तिच्यापुढं. वंशवृद्ध मागसाचं आक्रंदन—वगैरे वगैरे."

"बाळ्या—अशी नवकाव्याची चेष्टा करणार असशील तर मी मुळींच कांहीं करणार नाहीं—आणि मध्या, ज्याला आपलं हृदय प्रियेसमोर उघडं करतां येत नाहीं त्यानें प्रेमाच्या फंदांत तरी कशाला पडावं!"...कुंदा म्हणाला.

"कविराज, असे निष्ठूर होऊं नका. मीं पाया पडतों" मध्यानें अक्षरशः लोटांगण घातलं.

"बरंय भिऊं नकोस प्रेमवीरा! येत्या गुरुवारच्या मुहूर्तावर कॅफे गुडलकमध्यें दादर स्टेशन समोरच्या हॉटेलांत मी तुझी केस कुंदासमोर मांडतों. तुम्ही हॉटेलमध्यें बाहेर बसा. मी आंत स्पेशलरूममध्यें—"

"कुंदा, भलतासलता चावटपणा करायचा नाहीं."

"अरे वहिनीशीं भलता लघळपणा मी कसा करीन."

"ऑल राईट-ठरलं—येत्या गुरुवारीं तीन वाजतां."

"वाघाच्या शिकारीचा सोक्षमोक्ष!" असं म्हणून आम्ही होस्टेलवर परतलों.

गुरुवार उजाडला. मधूनें स्वच्छ आंघोळ करून दत्ताला हार घातला आणि मला एक पेढा दिला. आय. ए. एस. च्या परीक्षेला जणूं बसायचं अशा रीतीनें मध्याची छाती धडधडत होती. आम्ही तीन वाजतां कॅफे गुडलकमध्यें हजर झालों. बरोबर सव्वातीनला कुंदा आणि कमल तिथं आली. आम्ही अशा ठिकाणीं बसलों होतों कीं कमलला आम्ही दिसणार नाहीं. कुंदानें आमच्या दिशेनें तिचं लक्ष नाहीं असं पाहून रुमाल फडकवला.

एकेक मिनिट युगासारखं भासत होतं आम्हाला. पांच मिनिटं झालीं. मध्याच्या छातीचे ठोके जलद पडायला लागले. दहा मिनिटांनीं समोरच्या स्पेशल रूमचं दार उघडलं. प्रथम कमल बाण बाहेर पडली आणि इकडे तिकडे न पाहतां स्टेशनांत शिरली. मागून कुंदा बाहेर पडला.

कुंदाचा चेहेरा साफ उतरला होता. त्याच्या पडेल चेहऱ्यावरून मी समजून चुकलों कीं मध्याचं ऑफल झालेलं आहे. कुंदा अ मध्या समोर येऊन बसला आणि म्हणाला "बाळ्या—डबल कॉफी मागव—माझं डोकं गरगरतंय."

कुंदा, तुला कॉफीचा वेत पावतों—पण झालं काय तें अगोदर सांग" मध्यानें विचारलें.

"तुझ्या चेहेऱ्यावरून मध्याची शिकार हुकलेली दिसतेय?"

"मित्रांनो, मी तुम्हाला काय सांगूं आणि कसं सांगूं? कुंदा म्हणाला

"घाबरूं नको—मला चपलेनें मारते असं म्हणाली काय? मध्यानें विचारलें.

"छे छे!—"

"मग प्रिन्सिपॉलकडे घेऊन जातें असं म्हणाली काय?" नाहीं रे बाबा—तसं कांहींच म्हणाली नाहीं ती—मी तुझी केस फार चांगल्या तऱ्हेनें मांडली—पण—"

"पण काय—स्पष्ट बोल" मध्यानें विचारलें.

ती म्हणाली—"मुकुंदा, माझं तुझ्यावरच प्रेम जडलंय."

• • •

# फुकट्या मारुती

(पान ३७ वरून)

उल्लेख आढळतो. आपल्या प्रवृत्तीस अनुसरून त्यांनीं या विषयाची पाठ धरली, बहुत कष्ट केले—पत्रव्यवहार, बखरी, बाके, कैफियती, थैल्या, चरित्रें हीं सगळीं पुन्हापुन्हा पालथीं घातलीं; नवीं साधनें मिळवलीं—आणि फुकट्या मारुतीचा छडा लावला. दुर्दैव असें कीं, हें संशोधन प्रसिद्ध करण्यासाठीं त्यांनीं जे अस्सल कागदपत्र एकत्र जमवले होते ते जलप्रलयाच्या त्या काळ–दुपारीं डोळ्यांदेखत मुटामाईनें लांबवले. त्यांच्याजवळील आणखीहि असेंच अगणित साहित्य नष्ट झालें. तीस वर्षांच्या अविरत श्रमांवर तीस मिनिटांत पाणी पडलें. असें म्हणतात कीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं संगमपुलाच्या कठड्यांत अडकलेले कांहीं कागद सांपडले त्यांत नाना फडणीसाच्या दहाव्या लग्नाच्या याद्या होत्या! असो. 'फुकट्या मारुती' वरील आपलें संशोधन आमच्या या स्नेह्यांकडून प्रसिद्ध होण्याचा संभव नाहीं—कारण 'नामूलं लिख्यते किंचित्' हा त्यांचा ठाम बाणा आहे. तेव्हां त्यांच्याकडून जें ऐकलें त्यावर आमचें हें लिहिणें 'सजवलें' आहे.

अगोदर नांवासंबंधीं. श्रीरामप्रभूचे एकनिष्ठ अनुयायी म्हणून जे दैवतपदीं पोंचले ते श्रीहनुमंत तथा मारुती यांना 'फुकट्या' हें विशेषण लावणें हें पावित्र्यविडंबन होय अशी परस्थांची भावना होणें साहजिक आहे; परंतु पुण्यपत्तनस्थांस तसें कदापि वाटावयाचें नाहीं. कां कीं देवांस माणसांसारखें घरगुतीपणानें वागवणें हें त्यांच्या अंगवळणीं पडलें आहे. (माणसांना तीं क्षुद्र जीवयोनींतील असल्यासारखे अहंकारानें वागवणें ही त्याच वळणाची दुसरी बाजू हा श्री. काका वराडकरांचा सिद्धांत केवळ आकसाचा आहे!) त्यांत उपमर्द नाहीं, आपुलकी आहे. आणि हीं विशेषणें खरोखर त्या देवांचीं नव्हेत. खुद्द खुन्या मुरलीधरांवर 'तसला' भयंकर आरोप कधींच नव्हता. आरोप असलाच तर फार तर संगदोषाचा. तेंच 'छिनाल बालाजी' विषयीं आणि मारुतीरायाच्या 'पत्र्या' 'गवती' इत्यादि स्थानिक अवतारभेदांविषयीं. त्यांतच 'फुकट्या मारुती' आला; तो 'फुकट्या' कसा बनला याचीच ही कथा आहे. आदरें ऐकावी.

प्रस्तुत देवस्थानाची स्थापना निश्चित कधीं व कोणी केली हें सांगतां येणें कठीण आहे. कोणी पुंडम राऊळ नामें महानुभाव सतराव्या शतकाच्या आरंभीं यात्रा करीत पुण्यास आला होता. चिंतोबास या शिष्यानें 'सकळी' लिपींत लिहून ठेवलेल्या त्याच्या "लीळा" हल्लींच उजेडांत आल्या आहेत. त्यांत गांवांत दिसलेल्या एका देवळाचा उल्लेख आहे: "गोसावी पुनवडा बीजें केले: दक्षिणाभिमुख हणमंताचे देऊळ: तेयाचा आंगणीं पींपळु" असें आहे. म्हणून तेंच हें देऊळ असें म्हणणें बरोबर नाही. पुनवड म्हणजे पुणें असा तर्क करायला जागा आहे. "चिंतोबासें भणितलें: तो देसू चिकटा: तेथ जाओ नै ए:" पुढें आहे: "गोसावी ताकभातु ओरपण-करीती." असो. देऊळ तेवढें प्राचीन नाहीं. गो. ब्रा. प्र. श्री शिवाजीमहाराज यांच्या अष्टप्रधानांपैकीं एकानें शके १६०१ च्या चैत्री पौर्णिमेस त्या देवस्थानाचें उद्घाटन केलें असावें असें मानण्यास पेडगांवकर बखरींत आधार आहे. आणखी असें कीं, श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या प्रेरणेनें (आणि त्यांच्या त्रिवार्षिक आध्यात्मिक योजनेचा भाग म्हणून) महाराष्ट्रदेशीं या सुमारास मारुतीच्या मूर्ति स्थापन झाल्या त्या 'दक्षिण-पुच्छ' (म्हणजे शेपटाच्या गोंड्याला उजवीकडे 'मुरडीव' असलेल्या) आहेत, तशीच ही होती. असो.

छत्रपति राजाराम महाराजांनीं जींजीहून यवनांचा वेढा शिताफीनें पार करून "दहा होन भार आला दर्जाचा सिंदूर" पाठविला तो याच मारुतीवर चढविण्यासाठीं असेल का? असेलहि. पण एवढें निश्चित कीं, या स्थानाला माहात्म्य प्राप्त झालें तें पेशवाईच्या उत्तरार्धांत. स्वराज्याचें साम्राज्य होऊं घातलें होतें; पुणें दरबारचें वैभव हरघडीं वाढत होतें. विद्वानांना असा दाता त्रिखंडांत लाभणें नाहीं अशी श्रीमंत पेशव्यांची कीर्ति लाहोर–मुलतानपासून रामेश्वरापर्यंत गाजत होती. तिच्या आणि पेशव्यांच्या व अन्य मुत्सद्दी-सरदारांच्या सुवासानें देशोदेशींहून ब्राह्मण पुण्याची दिशा धरूं लागले—वऱ्हाड, कोंकण, कर्णाटक, तेलंगण, असल्या दूरच्या भागांतून. 'गुळाप्रति जैशा मुंग्या' तसे (पण रांग न लावतां) ते येत होते. "ब्राह्मण थोडी विद्या जहाली कांही म्हणतां येवो लागले ते पुणें गांवाची वाट पुसो लागती" असा मजकूर 'तवारिखे औंध' ऊर्फ 'पंतांची खतावणी' या ग्रंथांत आहे. रमणा संपला, लाखांची दक्षिणा वाटून पेशव्यांचा खजिना रिता झाला, सरदार दरकदार आणि शिपाईप्यादे मुलुखगिरीसाठीं उत्तरेप्रत रवाना झाले, तरी "बरकड ब्राह्मणें" परत जाण्यास राजी नहींत अशी तक्रार सालोसाल पेशव्यांपुढें स्थानिक ब्रह्मवृंदाकडून गुदरली जाई. 'घाशीरामनाम्यांत' याचा अनेक कलमांत प्रपंच केला आहे. त्यांच्या उपरेगिरीचीं आणि लोचटपणाचीं उदाहरणें आहेत. "केवळ सोवळें आणि पळीपंचपात्री घेवोन चारी दिशानी गर्दी करतात जैसे उभ्या पिकावर टोळ. श्रावण भाद्रपद संपला तरी दसरा दिवाळी संक्रांत किंक्रांत असें करीत शिमग्यापर्यंत डसून राहतात. जातांना दोन घोडीं वाकतील येवढा ऐवज लाटून नेतात. विद्या म्हणावी तर चित्रावतीचा मंत्र म्हणण्यापुरती. पण शहरांत बेदिली व अनीति माजवितात. या अनिष्टास जोडा नाही. ईश्वरें नेमिलें न चुके." इत्यादि. त्यांचें परिपत्य कसें करावें याविषयीं घाशीरामानें नानांशीं मसलत केल्याचें एका कागदांत नमूद आहे. शेवटीं पारिपत्य झालें तें घाशीरामाचें! पुण्यांतील विद्वानांची संख्या झपाट्यानें वाढतच राहिली. दशग्रंथ आणि षड्दर्शनें कोळून प्यालेल्या पंडितांपासून ते पंचांग वाचून संकल्प सांगण्यापर्यंत विद्वत्तेच्या इयत्ता दक्षिणेसाठीं दरबारनें मंजूर केल्याच होत्या. त्यांतहि न बसणारे विद्वान कांहीं तरी क्लृप्ति काढून रमण्यांत प्रवेश मिळवीत. कोणी सुंठीचे पट्टे ओढून सर्दीपडशानें घसा बसल्याचें सोंग करतो व खुणांवर भागवतो; कोणी कांहीं तरी रेकतो आणि सांगतो कीं आमच्या देशीं संस्कृत असेंच म्हणतात; कोणी आपलें कुळनाम आणि गोत्र यांची वर्णी कोठल्या दरवाज्यावर अधिक लागेल याचा तपास घेतो; तर जे विशेष चलाख ते परीक्षक काय विचारणार याची अगोदरच बातमी काढून ठेवतात. असो. नानांनीं असें योजिलें होतें म्हणतात कीं, निगनीस महाराष्ट्र भाषेंत शुद्धलेखन घालावें व ऱ्हस्वदीर्घांकडे डोळेझांक करून अनुनासिकें तरी सर्व जागच्याजागीं आहेत याची खात्री करून घ्यावी व मगच दक्षिणा द्यावी. पण तें बारगळलें. चातुर्मासांत पेशव्यांच्या या श्रावणांतल्या रमण्याशिवाय आणखीहि कोठें कोठें दानधर्म होत असेच. दोघातिघां मातबर सरदारांच्या वाड्यांत दक्षिणा वाटली जाई. फार काय, पुणें दरबारांतील धर्मनिष्ठ निजामाचा वकील आणि मुंबईच्या टोपीकर इंग्रजाचा वकील यांनींहि कांहीं काळ "वैदिकांस पुराणिकांस व कळावंतास उत्तेजन देणेसाठीं" खैरात सुरूं ठेवली होती. तेथेंहि झुंबड उडे. टोपीकर तर पुण्यातल्या त्याच्या अडत्यांकरवीं हरप्रकारें पैसा आणि खुशामत पेरीत होता. त्याची तारीफ फार चाले. पुराणा—कीर्त-






नांतून होई. बुधवारांतील पोथ्यांच्या आणि शुक्रवारांतील हलवायांच्या कांहीं दुकानांत अशा स्तुतिपाठकांचे अड्डे हमेशा बसत. ते पेशव्यांच्या हिराबागेंतील रमण्यांत जाणाऱ्यांस बहुधा तुच्छ लेखीत. हें वितुष्ट पोट-जातीच्या कुरकुरीवरून कीं शास्त्रांतील कसल्या वादंगावरून कीं केवळ अन्यत्र दक्षिणा अधिक मिळते म्हणून याबाबत निश्चित माहिती नाहीं.

शास्त्रीपंडितांखेरीज पुण्यांत तेव्हां कलावंतांनाहि महापूर आला होता. चितारीच तऱ्हेतऱ्हेचे होते. ते बरेचसे जयपूर-जोधपूरकडून आलेले. कोणी फूल हुंगणाऱ्या रावांची तसवीर काढण्यांत तरबेज, कोणी हुक्का ओढणाऱ्या राण्यांची, कोणी हत्तींची झुंज, तर कोणीं श्रीकृष्णाचें ध्यान रंगविण्यांत. कोणी पोथ्यांत विषयाप्रमाणें चित्रें रेखाटण्यांत कुशल तर कोणी भिंतीवर देवादिकांचीं चित्रें रंगविण्यांत. शाडूच्या, धातूच्या, संगमरवरी मूर्ति करणारे होते; नक्षीकाम करणारे कारीगार आणि मिनेगार. गायक-वादकांचे लोट वाहात होते; टप्पा गाणारे, ध्रुपदिये, ख्यालिये, कर्नाटकी बाज गाणारे होते; पखवाजी, कर्णेकरी, सनईवाले, सारंगिये होते. कलावंतिणींच्या ताफ्यांबरोबरचे साजिंदेहि गांवांतून वेळींअवेळीं ठुमकत. सिरोंज आणि नरगुंदचे ताफे विशेष मशहूर. त्याशिवाय नटवे, दशावतारी, दशावधानी—कांहीं विचारूं नका. चंद्रगडचा कोणी उत्तमराव बहुरूपी आला होता. मोठा गुणी. त्याचे खेळ करायला पुरेशी कनात गांवांत मिळेना अशीं माणसें धांवत ते पाहायला.

पुराणाकीर्तनांनाहि देवळें आणि वाडे पुरे पडेनात. महिपतीबुवा ताहराबादकरांचेच तीनचार शिष्य एका वेळीं गांवांत मुक्काम ठोकून असत. त्यांच्या ताम्हनांत पैसा मावत नसे. वर खाशी बिदागी. पुराण सांगणाऱ्यांत तळेगांवच्या धोंडुबुवा-भगीरथाची कीरत थोर. बायाबापड्यांची मोठी गर्दी जमे. धोंडुबुवा आपलीच कथा रंगवीत आणि डोळ्यांतून पाणी काढीत—स्वतःच्या देखील. कवींची तर पुण्यांत पेठ फुटली होती. असें म्हणत त्यावेळीं कीं उंबऱ्या गणपतीपासून कसब्या गणपतीपर्यंत दहा लक्ष कविता लिहून तयार आहे. घराघरांतून बाडांच्या थापी लागलेल्या असत. अण्णा आटपाडीकरासारख्या शीघ्र कवीच्या माडीवर ही दाटी. मोठा कसबी माणूस. तो कलावंतिणींना गौळणी लिहून देई, टाळकऱ्यांना अभंग पुरवी, आणि कीर्तनकारांना आर्या, श्लोक, साक्या करून देई. इतकेंच नव्हे तर राजकारणांतहि त्याचा बोरू कुरकुरु चाले. बारभाईची फत्ते व्हायला त्याच्या कवनांचा बराच हातभार लागला असें बोललें जाई. चौकाचौकांत शाहीर त्याचीं कवनें म्हणत. असें किती वर्णावें ! कोणी नामांकित कटाव करी; कोणी असा कीं फटके करण्यांत त्याचा हात धरतां येत नसे. कोण्या गहन–पंडितानें संस्कृतच्या धर्तीवर मराठींत 'आनंदी-चम्पू' काव्य केलें; पण "त्यांत मराठीपेक्षां संस्कृतच अधिक" ही अण्णाची चाटूक्ति सर्वांना पटली ! कवि तसेच ज्योतिषी आणि मांत्रिक. नाना फडणीसांना त्यांचा फार नाद. त्यांना कशाकशाला मुहूर्त लागे; आणि मंत्रांची गरज भासे. वैद्यांची चलती होतीच; इथले होते. परदेशी होते. कनोजच्या गोमतीप्रसादचा फार दबदबा होता. शहरभर चूर्णं, भस्में आणि चाटणें यांचा वास दरवळायचा, त्याशिवाय युनानी दवा. हैदराबादचे मुस्तफा हकीम यांच्या शागीर्दांना मोठ्यांकडचीं बोलावणीं असत. आणि नवीन कलम म्हणजे फिरंगी पाद्री. छातीवर टिचक्या मारीत आणि लहान शिशांतून कसलीं रंगीत ओखदें देत. खुद्द पेशव्यांकडे त्यांची ये जा असे. शिवाय घोड्यांचे पागा वैद्य असत आणि पोपटमैनांची तंदुरुस्ती पाहणारेहि होते. मल्लविद्या, तिरंदाजी शिकविणारे होते.

असें पुणें विद्यांचें आणि कलांचें माहेरघर झालें होतें त्याकाळची ही गोष्ट आहे. फुकऱ्या मारुतीचें माहात्म्य मोठें होतें. उन्हें उतरलीं कीं त्या देवळांत आणि ओवरींत शास्त्री पडित आणि कसबी कलावंत जमूं लागत. वस्तुतः पुण्यांमध्यें बोळामागें दोनतीन देव आणि देवळें असत; पण बोळाबाहेरच्यांनीं अगत्यानें यावें असें भाग्य थोड्या देवांचें. अशीं मानाचीं देवस्थानें पांचसात तरी होतीं. पर्वतीवरील देवदेवेश्वराचें पहिलें. तेथील वहिवाट मुख्यतः अंतरंगांतील दरबाऱ्यांची, तेथें राजकारणी मसलती व्हायच्या. बेलबाग तुळशीबागेंत राजकारण्यांची दुसरी फळी आणि त्यांच्याशीं घसट ठेवणाऱ्या संभावितांची गर्दी असे. सोमवारांतल्या नागेश्वराला जात ते मुख्यतः देवासाठीं आणि पुराणकीर्तनांतून कानावर कांहीं हरिनाम पडावें यासाठीं. अशी प्रत्येकाची खास वहिवाट, तशी फुकऱ्या मारुतीचीहि होती. आणि त्या वहिवाटदारांना त्याचा फार अभिमान असे. घारोपंत कऱ्हाडकरांची ही आर्या प्रसिद्ध होती :

आमुच्या देवांमाजीं धन्य असे एक मारुती फुकट्या
वस्त्रांमाजी जेवी धन्य तुपाचा सुवास ज्या मुकट्या

पण तें नंतरचें. आरंभीं प्रथा अशी की विद्वानांनीं तेथें जमावें, आणि नदीचा गारवा अंगावर घेतघेत आपापल्या शास्त्रांतील कांहीं शंकाफेड करून घ्यावी, अन्य शास्त्रांविषयीं कांहीं पुसावें. येथें एका बाजूला राजकारणाचें वारें नव्हतें; शनिवारवाड्यांतील आणि सरदारांच्या सदरेंतील खलबतांशीं येथें कोणाला कर्तव्य नसे. असें म्हणतात कीं पानपतच्या हाहाकाराची वार्ता आली त्या दिवशीं संध्याकाळींहि या मारुतीसमोर मध्वाचार्य आणि रामानुजाचार्य यांच्या अनुयायांत कंदन माजलें; तें कदाचित् खरें नसेल, पण त्याठिकाणीं एके काळीं अशा वादांतच विद्वान् माणसें रमत हें खरें. विद्वानच तेव्हां असूया, अहंकार, असहिष्णुता इत्यादि विकार असावयाचेच. पण स्वार्थ नसे, तेंच कलावंतांसंबंधीं. तेहि हळूहळू तेथें जमूं लागले. विद्वानांच्या संपर्कानें त्यांनाहि वादाची चटक लागली. ध्रुपद श्रेष्ठ कीं टप्पा की ख्याल यावर गवय्ये तोंडे आणि गळे शिणवीत. त्यांत पुन्हा घराण्याचा पोट-वाद. अटीतटीचे सामने व्हायचे; त्यांत शास्त्रीमंडळीहि रस घेत. इतर शिष्टहि. वाग्भट हरि हा फडणिशींतला बाकबगार कामदार, पण गायनांतला त्याचा अधिकार त्याहूनहि मोटा. तो तावातावानें बोले; पण दुराग्रहानें नाहीं. थोरल्या माधवरावांच्या दिवसांत तो ध्रुपदियांच्या बाजूनें बोले; सवाई माधवरावांच्या अमदानींत तो टप्प्याचें समर्थन करूं लागला; आणि दुसऱ्या बाजीरावाच्या काळांत तो ख्यालाशिवाय बात नाहीं म्हणूं लागला! पुन्हां आपण सगळें गाऊन दाखवी. बंगळूरच्या अय्याशास्त्र्याचें जरा निराळें. भिकबाळीला झटका देत मोठा लाघवी बोले, काकवी झिरपल्यासारखा. पाठशाळेंत तो काव्य अलंकार यांची संथा देई. त्या विषयांत तो इतका मुरब्बी होता कीं पाळगीगवळिणींशीं त्याच होयांत बोले; मग गायनावर कसा बोले हें काय पुसावें? चित्रकारहि अशा वादांत सामील होऊं लागले. तेहि आपल्या कसल्या कसल्या वादांचे फराटे ओढत. सगळ्या वादांचा एकमेळ होऊं लागला. मौज अशी झाली कीं गायनाविषयीं बोलत असतां कोणी चित्रकलेची रंगीत भाषा वापरायला लागला; चित्रकलेंत कोणी छंदःशास्त्राचें गण बसवून दाखवले; आणि काव्यांत तर कलांची खिचडी बनवीत. अय्याशास्त्री तर एकदां म्हणाले "कविकुलगुरू कालिदासांत कारुण्याची मींड असते." इमारतखान्यांत असाच एक हुन्नरी कामदार होता. तो कोणत्याहि कलेचें गणित दगडचुन्यांत बसवून देई म्हणे (व्याकरणाचें सुद्धां); कवितेला ओळंबा लावून तिची 'बंदीश' तपासे. हळूहळू हें वाढत चाललें; इतर कसबें त्यांत घुसूं लागलीं. नर्तकांची तोड्यांची भाषा आली, सुवर्णकार आपल्या तोड्यांचें सांगूं लागले, कबुतरबाज पंखांच्या तालाचें आणूं लागले. पण तें दुसऱ्याच्या कलेविषयीं. कोणी सुगंधी म्हणालाच कीं आर्येला वाळ्याचा वास असतो आणि कामदेला हिऱ्याचा. असें गोलकारी बोलणें होई; कोणाचें कोणाला नीट समजेना (सिंहस्थांतील यात्रेला जसे दहा भाषांचे लोक एका उपाध्याशीं एका वेळी बोलतात तसे.) पण सगळेच एकमेकां "वाहवा, काय विद्वत्ता, काय रसिकता" असें म्हणत. पण माणसें चांगली; हेतु उत्तम. सगळ्या कलांचें ज्ञान व्हावें ही सद्बुद्धि. एखादा असाहि असे कीं ज्यास कोणतीच कला उमगत नसे, पण सर्वांचें ऐकून घेऊन शेवटीं निर्णय दिल्यासारखा तो सगळ्या कलामागील तत्त्व काय त्याचें फारच नव्या दृष्टीनें विवरण करी. पण तें चालायचेंच. कळलें नाही तरी कानावरून चार व्युत्पन्न शब्द जायचे; सुस्वरांनी मन भरून जायचे.

हें पुढें कमीकमी होत गेलें. दक्षिणार्थींच्या झुंडी येऊं लागल्या. त्यांतहि मोठे विद्वान् आणि कसबी असत; पण भेसळ फार, आणि बुद्धि नेहमीच निर्मळ नसे. हळूहळू सगळेच डागळले. शास्त्रचिकित्सा कमी होऊन दुसऱ्याला काय बिदागी मिळाली, किती बोलावणीं आलीं, कोणाचा आश्रय लाभला याची चिकित्सा वाढली. हेवेदावे सुरू झाले, क्षुद्र कारवाया वाढल्या. थोरथोर त्यांत गुंतूं लागले. एवढा मोठा नारो शंकर कवि. एकदां मांडी घातली कीं पांचपांचशे कविता लिही असा लौकिक. त्याच्यासाठीं हिऱ्याची शाई घोटायला एक शागीर्द खपत असे. शनवारवाड्यांत श्रीमंतांच्या तबकांतून विडा घ्यायचा तो. पण गणपतीपुढें कीं नवरात्रांत सरदार विंचुरकरांनीं त्याचा आणि ग्वाल्हेर दरबारचा कवि बापूभैय्या याचा एकत्र सत्कार करून त्यांना प्रत्येकीं चांदीच्या ताटांतून एकावन्न रुपये दिले आणि पगडी बांधली तेव्हां नारोपंतानें काय करावें? त्यानें सगळ्यांसमक्ष दोघांचेहि रुपये छनूछन् मोजले आणि दोन्ही पगड्या बारीक नजरेनें पाहिल्या आणि शेवटीं आपल्या पगडीला दोन झिरमिळ्या कमी आहेत यांत आपली मानहानि झाली असें खड्या सुरांत म्हणून तबक पैसे आणि पगडी घेऊन तो तडफेनें बाहेर पडला!

हे तो एका व्युत्पन्न कवीचें; मग इतरांचें काय वर्णावें! स्वार्थाला सुमार राहिला नाहीं. तो कसा पुरवावा एवढाच बिचार. पदरचें न

सारतां पुख्खा कसा झोडतां येईल इकडे लक्ष लागलें. संध्याकाळीं मारुतीच्या देवळांत जमले कीं अगोदर उन्हाळ्यापावसाळ्या निवारच्या, जे गैरहजर त्यांची निंदा व्हायची आणि बोलणें वायचें तें भोजनावर. "कसें काय, शास्त्रीबुवा, काल गोळे सावकारांकडे काय बेत होता?" पक्वान्नेंच नव्हे तर चटण्याकोशिंबिरीपर्यंत खोदूनखोदून चौकशी व्हायची. बेत उत्तम आणि यजमान उदार असें समजलें तर सावकाराशीं संधान बांधायचें; त्याचे आश्रित आणि खिदमतगार यांनाहि मोठेपणा द्यायचा. "नाहीं जाहला असा सावकार कलियुगी" असलीं कवनें करावचीं. मग दुसऱ्यानें नवा सावकार अथवा व्यापारी पाहावा अशी रीत पडली.

पण असे सावकार किती पुरणार? आणि सगळ्यांपाशीच वर्णी लागत नसे. आणि एकदां परान्नक्षुधा प्रज्वलित झाली कीं कोठें हात पसरावे याचाहि विवेक राहीना. लग्नसराई म्हणजे पुण्याचें आतांप्रमाणें तेव्हांहि वैभव. झांशी दप्तरांतील पुण्याहून आलेल्या एका पत्रांत आहेच कीं "या वैशाखांत येथें लाख जिलबी फुटली; लाडवांचा हिशेब नसे." त्यावेळचीं तीं लग्नकार्यें; कोण आला कोण गेला याची गणति नाहीं असा ऐसपैस वारदाना. या बुभुक्षित पंडितांचें आणि कलावंतांचें फावे. सरळ जाऊन यजमानास सांगावें "आम्ही दशग्रंथी ब्राह्मण. वधू-वरास वैदिक आशीर्वाद द्यावयास आलों आहों." त्यांनींहि अदबीनें म्हणावें, "यावें, बसावें; भोजनाचा अनुग्रह करावा" किंवा यांनीं सांगावें, "आम्ही शरायुद्दिनखाँसाहेबांचे शागीर्द; अठरा वर्षें उस्तादांची पिकदाणी धुतली. या मंगल समारंभांत आमच्या मशहूर घराण्याची गायकी सुनवावी म्हणतो", किंवा "आम्ही फडणे तस्वीरकारांचे चेले"; किंवा "आम्ही वधूवरांचीं आणि उभय व्याह्यांचीं नांवें गोंवून मंगलाष्टकें करून देतों." कोण यजमान नको म्हणणार? तसा एखादा खाष्ट असलाच तर अन्य उपाय असत. कधीं गोत्रप्रवर किंवा कुंडलीसंबंधीं किल्मिष उत्पन्न करावयाचें; कधीं कुजबुज उठवावी कीं वरपरीक्षेच्या वेळीं वरानें खडे लिहिले ते खरे दुसऱ्या कोणी तरी लिहून दिलेले होते. आणखी कसलींकसलीं विघ्नें आणि अपशकून निर्माण करावयाचे. इतकें करूनहि कधीं सगळें सुरळीत झालें तर तिघांचौघांनीं भरदस्त पोशाख घालून तसेंच मंडपांत शिरावयाचें, एकमेकाचें आदरानें स्वागत करून पंगत गाठावयाची आणि तेथेंहि एकमेकांना आग्रह करायचा.

पण लग्नें कांहीं बारमहा चालू नसतात. एरव्हीं दुसऱ्या क्लृप्त्या काढाव्या लागत. पोटाला चांगलें चुंगलें कोठें मिळेल याची बातमी काढायची; हीं मोठीं माणसें; त्यांना शिष्य असत, आदरानें त्यांच्यामागून फिरणारे असत. त्यांचा उपयोग करून घ्यायचा. कटाक्ष मात्र भोजन उंची असावें यावर. तशीं गरिबाघरचीं आमंत्रणें येतच, मोठ्या प्रेमादरानें येत. त्यांना विचारायचें "पक्वान्नें काय आहेत?" त्यांनीं म्हटलें 'खीर' तर गुरकावून सांगायचें "एकच! घाल एखाद्या भिक्षुकास;" किंवा 'गुळपोळी' म्हटलें तर खेंकसायचें "म्हशीस घाल..." वर आत्मसमर्थन असें. "पाक हें शास्त्र आणि कलाहि आहे. आमच्यासारख्या असामान्य रसिकांना त्यांत जें सर्वोत्कृष्ट तेंच हवें, तडजोड नको."

कधीं आपापसांत गळेपडूपणा करावा. "वाः वाः विश्वंभरशास्त्री, आपल्या गृहिणीची पुरणपोळी जेहत्ते नामांकित इति श्रुणुते." शास्त्रीबोवांनीं गाफीलपणें होय म्हटलें कीं आटपलेंच. "मग कधीं मिळविणार तृप्त अतिथीचा आशीर्वाद?" केव्हां केव्हां देवळांत केवळ दर्शनासाठीं आलेल्या संभावित गृहस्थालाहि अडचणींत टाकायचें, "कां हो, 'करंजीत







करंजी रमाकाकूंची करंजी' असा जिचा लौकिक आम्ही ऐकत आलों ती आपलीच स्त्री का ? मग कधीं बोलावतां पडताळा घ्यायला ?" तो बिचारा गृहस्थ कांहीं बोलण्याआधींच दोघेतिघेजण त्याला घेरून त्याच्या घराच्या दिशेनें चालू लागत.

हीच भाषा त्या देवळांत चालायची. आतां तत्त्वज्ञानाचे पंथ आणि काव्यनाटकांतील सौंदर्य आणि कलेंतील घराणीं यांतील वादस्थळांचा कोणी तेथें फारसा उल्लेखहि करेना. केलाच तर चुटक्या आणि जांभयांचें उत्तर मिळे. आतां चर्चा होई ती खाण्यापिण्याच्या वेगवेगळ्या ढाजांची रुचीच्या ढंगांची. अगदीं अटीतटीनें होई. कोणी कर्नाटकी कडबूची महती सांगावी, कोणी म्हणावें मथुरेच्या रबडीला तोड नाहीं, कोणी बंगालचा रसगुल्ला वाखाणावा. असे देशोदेशीचे अभिमान उफाळून यायचे. तसेच जातीपोटजातींचेहि. देशस्थ-कोंकणस्थांचे दरबारी मतभेद अगदी ताटांपर्यंत आले. अन्यजाती होत्याच. पण या विषयाच्या चर्वणानें जणूं लाळ सुटून नेहमीचे मतभेद आणि अभिमान मऊ होत, आणि विरून जात. जातिभेद निष्ठेनें पाळणाऱ्या त्या पुण्यांत या मारुतीच्या साक्षीनें ते निर्बंध शिथिल होऊं लागले—निदान रोटीव्यवहारांत. ते उघडपणें मोडणें शक्य नव्हतें, कारण धर्मसंरक्षक राजसत्तेनें शिक्षा केली असती. सासवडचा भट जनार्दन नागनाथ यानें प्रवासांत कोणा कोष्टयाकडे अन्न घेतलें म्हणून त्यास ब्रह्मवृंदानें दिलेल्या प्रायश्चित्ताशिवाय कैद व दंडाची शिक्षा झाल्याचें वर्तमान दवंडी पिटून समस्तांस जाहीर करण्यांत आलें होतें. तेव्हां सांभाळणें बरें. मग अभक्ष्यभक्षणाचें काय लिहावें ? मारुतीस येणारे शास्त्रीपंडित आणि ब्राह्मण कलावंत यांपैकीं पुष्कळांस त्याविषयीं कुतूहल उत्पन्न झालें आणि कुतूहल शमल्यावर चटक लागली. पुर्तुगेजांच्या गोवें प्रांतांतील गोपाळकृष्ण शेणवी हा कलावंत कांहीं कामानिमित्त पुण्यास आला होता. तो गायन करी, मृदंग वाजवी, तसबिरी काढी, आणि कविता लिही असा हरहुन्नरी. वर पाककुशल आणि वाणीचाहि रसाळ. माशांचीं कालवणें आणि आमट्या यांसंबंधीं तो अशा भक्तीनें बोले कीं ऐकणाऱ्यांच्या क्षुधेस चिमटा काढावा. फुकट्या मारुतीसमोर त्यानें दोनतीनदां असें मत्स्यावताराचें संकीर्तन केलें तेव्हां वाईकर गोविंदशास्त्री, पंडितराव पैठणकर, रंगनाथ कुळकर्णी पारनेरकर, नारायण तांबे चित्रकार यांनीं त्यास एका बाजूस नेऊन आपल्या बोलण्याची प्रचीति त्यांस करून देण्याचा आग्रह केला. तो तयार झाला. असें ठरलें कीं कात्रजच्या बागेंतील एखाद्या निवांत स्थळीं ती पाकसिद्धि करून भक्षावयाची. आयत्या वेळीं आणखी दोन शास्त्री हजर झाले. त्यांपैकीं एकानें आदले दिवशीं माशांचें नांव काढतांच उपरणें नाकास लावलें होतें आणि दुसऱ्यानें 'अनाचार' म्हटलें होतें. समस्त बेत नेमिल्याप्रमाणें पार पडत आला. पण तलावाची देखरेख करणाऱ्या कामदारानें त्यांस पकडलें, शेवटीं त्यास थोडें कालवण देऊन सुटका करून घेतली. तोहि ब्राह्मण होता.

अभक्ष्यभक्षणाच्या इतर प्रकारांचीहि तरतूद होऊं लागली. त्यासाठींहि सावध राजकारण लढवावें लागे. शहरांत म्लेंच्छ होतेच, पण त्यांच्याशी असा संपर्क ठेवणें कठीण होतें. मग सरदार हंबीरराव घोरपड्यांची कुळंबीण गांठ अथवा गौरा रहिमतपूरकर नायकीण हिच्या साजिंद्यास गांठ आणि मसालेदार बकऱ्याची सागुती किंवा कोंबडी मिळव असें सुरू झालें. तीहि खावयाची ती नदीपार होऊन हिंगण्यास नाहींतर दूर वानवडीस. चतुःशृंगीकडे शाक्तांचा अड्डा असे; तें अभक्ष्य तेंच भक्षीत, अपेय तेंच पीत आणि वर्ज्य तें करीत असा त्यांचा बदलौकिक. त्या अघोरी पंथाचा संपर्क टाळणें अवश्य होतें.

लखनऊच्या नंदलाल पखवाजीस गुळाचें व इतर जातीचें मद्य करण्याची कला अवगत आहे असें मारुतीसमोरील त्याच्या बोलण्यावरून समजल्यामुळें कांहीं जणांनीं त्याचा स्नेह जोडला, आणि आपलें कसब (रसायणांतील) दाखविण्यास त्यास उद्युक्त केलें. विठ्ठलवाडीस एका झोंपडींत त्यानें सर्व सिद्धता केली; अनेक शास्त्रीपंडित आणि कवि-कीर्तनकार पुराणिक आमंत्रण दिल्यासारखे तेथें पोचले. नंदलालच्या कलेचा सुवास पर्वतीवरील देवदेवेश्वरापर्यंत पोचला असें म्हणतात. कारवाई जाहली आणि नंदलालास मुसक्या बांधून कोतवालींत नेलें. पुढें कोतवालाच्या घरांतच त्यास कैद करून ठेवलें म्हणतात.

फुकट्या मारुतीस येणाऱ्या पंडितांचा असा धर्म घडत गेला. संध्याकाळीं तेथें जावें तें रात्रीची व दुसरे दिवशीं दुपारची पुडी कोठें लाभेल याच्या विवेचनेसाठीं. त्यांच्यापैकीं बहुतांपाशीं पैका होता, भरलेलीं घरदारें होतीं. पण शक्यतोंवर स्वतःचें खाऊं नये अशी बुद्धि त्यांस होऊं लागली. त्यांत फुशारकीहि वाटे. या करणीमुळें संभावित गृहस्थ तें देऊळ वर्ज्य मानूं लागले; गरती स्त्री तर त्या बाजूस फिरकेना. कारण कोण हट्ट करील आणि भोजनसुख मागेल याची खात्री नव्हती. पंडितांपैकींहि जे अशा वर्तनाच्या अगदींच आहारीं गेले नव्हते त्यांना त्याची अरुचि उत्पन्न झाली. त्यांच्यापैकीं जे भिडस्त त्यांना त्याचा ताप होऊं लागला. पान, तंबाखू, तपकीर जवळ बाळगण्याची सोय उरली नाहीं; ती आपलीच समजूत कोणीहि धृष्टपणें उचली.

अशी अवनति होत गेली त्या काळांतच त्या स्थानास 'फुकट्या मारुती' हें नांव पडलें. असें मानावयास जागा आहे कीं त्यापूर्वी कांहीं काळ त्यास 'पुखल्या मारुती' म्हणत. दुसऱ्या एका संदर्भांत "पुखला-फुका-फुकटा" (अनादरार्थे टा) अशी व्युत्पत्ति रा. रा. म्हाळसाकांत बोंगाळे कोशकार यांनीं लावून दाखविलीच आहे. असो. पेशवाईचा अंत होण्याच्या सुमारास या देवस्थानास दुर्लौकिकानें ग्रासलें. तेथील वर्दळ हळूहळू ओसरली. असें म्हणतात कीं शास्त्र आणि कला यांविषयीं महान् आदर बाळगून नियमानें तेथें येणाऱ्या एका सज्जनास त्या पंडितांनीं संपूर्ण नागवलें; तेव्हां त्यानें तळातळाट होऊन शाप दिला कीं जो त्या देवळांत जाईल त्याच्या पोटांत आग पडेल. ही दंतकथाच असावी, पण इतकें मात्र खरें कीं त्या देवळांत कोणी जाईना. पुजारी नाहींसा झाला. मारुतीला शनिवारीं देखील तेल-शेंदूर चढेना; गिलावा पडून गेला त्याची कुणी डागडुजी करेना. उलट बिचाऱ्या मारुतीला फुकट्या ही उपाधी निष्कारण चिकटली.

—मधूनमधून मुठेला पूर येत, आणि कांठावरचें हें देऊळ खिळखिळे करीत... देवळाचा देऊळपणा संपला तेव्हां त्या दगडविटांचे कोणीहि कांहीं करावें... मारुतीरायच कधीं अंतर्धान पावले कोणाला कळलें नाहीं... कोणी वास्तपुस्त केली नाहीं.

शेवटीं परवाच्या महापुरांत उरलें सुरलें काय होतें तें नष्ट झालें. नांव पूर्वीच गेलें होतें, आतां निशाणीहि गेली.

■ ■ ■

अनुक्रमणिका










श्रीराम कामत

*"गांवाला काय तूं ओळखत नाहींस ?" बाप्पा विरघळून सांगत होता. "सरळ गोष्ट उरफाटी बघायची आणि उभं आडवं करायची रीतच लोकांची ! आणि मीसुद्धां गाढव यांच्या नादीं लागलों. अर्जुन परवानं बायको पळवली म्हणून पोलिसांत तक्रार गुदरून मोकळा झालों...*

करकरीत दुपार सावल्या परतत होती. कोरड्या आकाशांत सूर्य नुमताच जळत नि जाळत होता. तलखीनं कासावीस होऊन जमीन धापा टाकीत होती. सड्यावर चुकार वारा उसासत होता.

आणि दुपारच्या या पाराला शंकरबाप्पा मागिलदारीं रहाटावर पाणी लावत होता. म्हातारा तरी साठीच्या घरांत आलेला. आतां या वयांत अंगमेहनतीचीं कामं त्याला झेपत नव्हतीं. थोड्या श्रमानंहि पाय थकत, हात उचलत नसत. रहाटाचं पाणी ओढायला बाप्पाचं अवसान मुळीच आटलं होतं.

पण म्हाताऱ्याची जिद्द कायम होती. उतारवयांतसुद्धां तिला अस्मान ठेंगणं होतं, क्षितिजं पावलावर होतीं. होय! आणि फक्त ही जिद्दच बाप्पाच्या आयुष्यांत आज शिल्लक होती. आणि—आणि शिल्लक होती बाप्पाची बाग. किंबहुना ही बाग म्हणजे त्याच्या जिद्दीचं मूर्त स्वरूप होतं. बाग होती तोंवर बाप्पाची जिद्द होती. आणि हें दोन्ही होतं तोंवर म्हातारा जिवंत राहणार होता. मरणार नव्हता. मरायला तयार नव्हता.

बाप्पाला पोरबाळ नव्हतं. म्हणूनही असेल, पोटच्या पोराच्या मायेनं बागेची तो निगा ठेवी. या कामीं त्यानं कुचराई केली नाहीं, कधीं चालढकल लावली नाहीं. रोज दुपारला लटपटत्या पायानं तो रहाटावर बसायचा, हात चालेनातसे होईपर्यंत पाणी वर उपसायचा. आणि मग खचल्या कमरेनं उभ्या बागेला पाणी शिंपत राहायचा.

अर्थांत त्याचे हे श्रम वाया जात नव्हते. कागावीडि दृष्ट लागावी अशीच होती बाप्पाची बाग. उफाड्याच्या पोरीसारखी. कशी जीवन-रसानं मुसमुसलेली, चैतन्यानं तरारलेली. इथं माडांच्या पेंडीला तरी शेंशंभर नारळ लटकत. आंब्याचिकूचीं कलमं हंगामांत फळफळून जमिनीपर्यंत वाकत. मिऱ्या फणस घे म्हणून फुटे.

गांवांत लोकं म्हणत, "फुकट राबतोय् म्हातारा. अशानं गचकन् राम म्हणेल एकदिवस. आणि हाडाचीं काडं करून यानं जतन केलेली ही बाग आयती त्या सटवीच्या पदरांत पडेल."

लोकं बोलत बाप्पाच्या पाठीमागं. समोर कांहीं बोलायची सोय नव्हती. म्हातारा आग्यावेताळ होता. तोंडाचाही तसाच जबर. चवताळला कीं मग कोणाचा मुलाहिजा त्याला ठाऊक नव्हता. सरळ आईवरून सुरुवात करून शंकरबाप्पा आपल्या इरसाल रांगड्या भाषेंत शिव्याशाप देत सुटे. विचित्र हातवारे करीत आणि एका हातानं पंचाची कास सावरीत सारा दिवस मग तो बडबडत राही. "भांचोद! टपून आहेत. बेत रचताहेत, कट करताहेत. रोज एकेक फतवा काढून येतात. सांगतात, बाप्पा देऊन टाका बाग वहिवाटीला. वय झालं तुमचं. मी विचारतों एकट्या बाप्पाचंच वय झालं—आं! काय रे? खेटरांनीं फोडलं पाहिजे एकेकाला. त्याचं लायकीचे. काळजी पडली आहे—बाप्पाची काळजी! मरेल बिरेल तर! अरे, मेला तर मरणार आहे शंकरबाप्पा. होय! आणि आधींच सांगून ठेवतों, माझ्या मढ्याला तुम्हीं हात लावला नाहीं तरी चालेल फुकट विटाळ नको तुमचा. खूप ओळखून आहे मी. बाप्पा मेलेला तुम्हाला नको आहे. तो जगायला हवा—जगलाच पाहिजे. बाप्पा मेला बिला तर ही बाग तुमच्या घशांत नाहीं पडणार रे! ती जाईल माझ्या बायकोच्या ताब्यांत. थूः तुमची..."

शंकरबाप्पाचं तोंड हें असं एकदां सुरू झालं कीं थांबणं कठीण! गांवांत लोकं म्हणत म्हातारचळ लागलंय. साठी बुद्धि नाठी झाली आहे. बाप्पाचं आडनांव होतं अवधी. त्याच्यापुढं लोक फक्त सा जोडत. गांवांत पोराबाळांनासुद्धां हें नांव पाठ होतं. शंकरबाप्पा रस्त्यानं जाऊं लागला कीं मागं पोरं ओरडत, "अवद्सा—अवद्सा आली." आणि बाप्पा मागं वळून बघेपर्यंत चट् कुठच्या कुठं पळून जात. कधीं हाताला लागत नसत. आणि तेंच बरं होतं! चुकून एखादं पोरगं जरी बाप्पाच्या हातीं लागतं तर धडगत नव्हती. म्हाताऱ्यानं त्याचा सरळ जीव घेतला असता. सोडलं नसतं. आणि हंसत मग फासावर गेला असता तो.

वाड्यांतील पोरांचा आणि बाप्पाचा तर उभा दावा. बाप्पाच्या अंगांत दुर्वासाचं बळ असतं तर शाप देऊन या सगळ्या पोरांना त्यानं खाक केलं असतं. पण बाप्पाकडे तें बळ नव्हतं. आणि म्हणूनच हातांतली काठी आणि बागेंतील दगडधोंडे यांच्यावर भिस्त ठेवून बागेची तो राखण करी. आत्ता सुद्धां रहाटावर बसला असला तरी त्याचे डोळे आणि कान समोर मळ्यांतल्या बांधाकडे होते. पोरांची टोळधाड कधींहि येण्याची शक्यता होती.

बाप्पाला हें कळत नव्हतं असं नाहीं. जीवनाची बागशाही उध्वस्त झाल्यावर तो सावध झाला होता—जागा झाला होता. काय उपयोग? खूप उशीर झाला होता.

...दादबा राण्याबरोबर चकाट्या पिटत आणि चुनातंबाखु चोळत बाप्पा गांवांत भटके. मागं त्याची पार्वती, पोरवयच तिचं, पोरंसोरं गोळा करून मागील दारीं आंब्यावर सुरपारंब्या खेळे. घरांत सर्वांना ठाऊक होतं. त्याच्या मोठ्या भावाला, म्हाताऱ्या आईला, जानकीवहिनीलासुद्धां. पण पण पोर रमतेय रमूं दे. उद्यां संसारांत पण रमेल. या आशेनं जाणतीं माणसं स्वस्थ राहिलीं आणि तशा पारूच्या मागण्या वाढूं लागल्या. तिला नट्टापट्टा सुचूं लागला. वासाचीं तेलें आणि उंची पावडरी लागूं लागल्या. जीभ चुरुचुरु बोलायला शिकली. आणि याबद्दल दाब द्यायचा सोडून तिचा आबाभावोजी उलट कौतुकच करीत राहिला.

आणि तसं मग एक दिवस माडीवर बाप्पाकडे जायचं पार्वतीनं साफ नाकारलें. सांगितलं, "वहिनी, आम्हींच तेवढं वर बाप्पांकडे कां ग झोंपायचं? काशाच्या वाटीनं त्यांच्या पायांना तेल चोळत बसायचं? माझे हात किनई दुखतात. मी नाहीं जा! तूंच जा वहिनी. मी झोंपतें आबाभावोजींच्या खोलींत. त्यांचीं कामं करायला बरंच वाटेल मला."

"वेडीतर नाहींस पार्वती! अग उभाचं मागुन त्याला." जानकीवहिनी पारूची समजूत काढूं लागली. पण बारा वर्षांच्या या पोरटीला समजायचं कसं? कुठच्या भाषेंत. "अग, नवरा आहे तो तुझा. त्याची सेवा केलीस तर औक्ष वाढेल, कुंकूं बळ धरील पोरी."

"हूंः! हा माझा नवरा? असला म्हातारा?" पार्वती फुरंगटली. नाराजीनं तिनं मान उडवली. पाट आदळले. "मला नको म्हातारा नवरा. बरोबरीचीं पोरं चिडवतात ग!"

"काय चिडवतात?"

"चिडवतात. म्हातारा नवरा करशील गो, झुरून खंगून मरशील गो...आणि किनई वहिनी, पोरं सांगतात. बाप्पांचं या गांवांत लग्न होत नव्हतं. म्हणून गोव्यांत मावाळला जाऊन लग्न केलं त्यांनीं लग्न केलं म्हणे माझ्याशीं. मला विकत घेतली शंभर रुपयांना. हूंः!"

"कोणीं? कोणीं सांगितलं हें तुला?" जिन्यावरून बाप्पा ओरडला.

"सांगितलं मसण्यानं. खोटं असलं तर बोला." पारूनं नवऱ्याला प्रथमच उलट प्रश्न केला. मान उचलून सरळ डोळ्याला डोळा दिला.

आणि निरुत्तर होऊन बाप्पानं आयुष्यांत पहिल्यानंच खालीं मान घातली.. पार्वतीच्या समोर पुन्हां कधींहि ती उचलली नाहीं......

---

बाजूचा हौद काठोकाठ भरला होता. खळखळत सिमीटाच्या पाटांतून पाणी धांवत होतं.

आणि रहाट मात्र करकरत होता, किरकिरत होता. स्वतःभोवती फिरतांनादेखील वेश कुरकुरत होता. उगाच ! कांहीं कारण नव्हतं !

...शंकरबाप्पासुद्धां तेव्हां असाच कुरकुत असे.

घरच्या लोकांच्या नादीं लागला आणि म्हातारपणीं बाप्पा लग्नाच्या फंदांत पडला. लग्न होत नव्हतं काय? बाप्पानं गांवाला लग्न करूनच दाखवलं. अशीतशी नाहीं; कोणाच्याही डोळ्यांत भरेल, डोक्यात चढेल अशी फटाकडी पोर त्याचा नांवानं कुंकूं लावूं लागली. मुळचीच खटनट आणि बाजिंदी ही पारू, पदरांत आली ती वयाची जाणीव घेऊन आणि जवानीचे रंगढंग शिकून. पुरुषांच्या आशाळभूत नजरा तिला कळत होत्या. तिला बघून त्यांच्या आवाजांत अन् वागण्यांत होणारा बदल तिच्या लक्षांत आला होता. तिच्या संबंधानं त्यांच्यांत होणारी कुजबुजहि तिला ऐकूं येत होती. आणि...आणि पार्वतीला गंमत वाटत होती. जसा कांहीं खेळच होता तो तिचा. मनाचा विरंगुळा होता.

इकडे शंकरबाप्पाचा मनस्ताप वाढत होता. पार्वती घरांत कोणाला जुमानत नव्हती कीं मानत नव्हती. घरांतच टिकत नव्हती तर घरकामांत हात कशाला घालील! गोडीगुलाबीनं सांगून पाहिलं, धाक देऊन निदटाऊन बघितलं. छे! कांहीं परिणाम होईना. तेव्हा मात्र जानकीवहिनी विथरली. पार्वतीला तिनं उभं आडवं छेडलं.

पार्वती पोर राहिली नव्हती. पक्की झाली होती. सगळी अक्कल आली होती तिला. कुत्सितपणे तिनं म्हटलं, "लोकांना ग कां माझ्या पंचायती? आहे मला नवरा. विचारूं दे त्याला."

"भावोजी विचारत नाहींत. म्हणून तर बोललें मी."

"वांझोटीच तूं! दुसऱ्याचं सुख खुपणारच तुला. तुझ्या पोटांत दुखायचंच." पार्वती उद्धटपणं म्हणाली आणि खोः खोः हंसत सुटली.

"वांझोटी–वांझोटी मी? वेशरम, निर्लज्ज! नरकांत जाशील या अशा गुणांनीं." जानकीवहिनी फणकाऱ्यानं ओरडली आणि हातांनी तोंड झाकून घेऊन हुंदके देत आपल्या खोलींत गेली.

सकाळला हें घडलं. दुपारला बाहेर पडलेला शंकरबाप्पा सांजला घरांत शिरला तेव्हां त्याला कळलं कीं जानकीवहिनी माहेरीं गेली. चांगले दोनतीन महिने तिथंच रहाणार. स्वैंपाकघरांत त्याची म्हातारी आई कुडबुडत होती.

"आई तूं?" बाप्पानं अचंबून विचारलं.

"शंकरा, आलास बाबा?" म्हातारी पुटपुटली, "पिठलं झालं का बघ रे जरा."

"ती कुठं?"

"एक गेली माहेरीं. दुसरी गेली अशीच कुठं? मी नाहीं विचारलं."

"मीच विचारतों. येऊं देत तर खरी. आणि आई आतां हें अखेरचं."

"नको विचारूंस." म्हातारीनं सांगितलं.

"नको विचारूं? जाब नको विचारूं? गांवांत लोकं काय वाटले तें बोलतात" बाप्पा उसळून म्हणाला, "हंसं होतंय माझं."

"बोलूं देत एका कानांत ऐकून घे. दुसऱ्या कानानं सोडून दे."

"पण—पण हें असं कुठवर चालणार?"

"पोर झालं कीं येईल आपसूक ताळ्यावर. तूं काळजी करूं नकोस शंकरा."

शंकरबाप्पा काळजी नाहीं, भरीला स्वैंपाकपाणी करूं लागला. घरांत मोठा दीर आणि नवरा रांधत होते. म्हातारी सासू विचारी धडपडत राबत होती. पार्वती जशी त्या गांवचीच नव्हती. आणि असली तरी तिला याचं कांहीं नव्हतं.

आबा बाप्पाला सांगे "घरकामांत हिनं लक्ष घालावं म्हणून जानकीला मीं माहेरीं धाडली."

बाप्पा उत्तर करी, "तसं असेल तर वहिनीनं परत येणं बरं."

यावर आबा चिडून म्हणे, "तूं तरी अगदींच हा कसा रे? ती तुझी बायको आहे शंकर."

बाप्पा सांगे, "तें काम तूंच कर. या घरांत वडील तूं. तेव्हां अधिकार तुझा."

"अधिकार खरा. पण तिनं तो मानला पाहिजे."

"मानत नाहीं म्हणजे? फोडून काढ वेतानं."

"मारानं वठणीवर यायला पार्वती लहान नाहीं राहिली शंकर. मूलबाळ असतं तर..." जीभ चावत आबाभट वाक्य अर्धवट सोडून देई. तमाखूची पिंक थुंकण्याचं निमित्त करून बाप्पा बाहेर निघून जाई.

हें असं चाललं होतं. जड पावलानं दिवस येत—काळं करून जात. आणि मग? व्हायचं तेंच झालं.

एके रात्रीं शंकरबाप्पाचा वडील भाऊ आबाभट घरदार, नांवगांव, सगळं सगळं टाकून परागंदा झाला. दोन ओळींची एक चिठी तेवढी देवघरांत पूजेच्या ताम्हाणांत सांपडली लिहिलं होतं. 'घात झाला. घर गेलं. कूळ बुडालं. मी फसलों. तुला फसवलं जातों मी आशीर्वाद.'

"शंभो! जय शंभो! जय जय शंभो!!" शंकरबाप्पा ओरडत सुटला. पिंडीवर डोकं आपटत बसला.

उन्हाची तिरीप बाजूला हौदांतील पाण्यावर लखकन् चमकली. ओरपून बाप्पाच्या डोळ्यासमोर पुढंमागं करूं लागली. त्याच्या अधू दृष्टींत चकवा दाटला. स्मृतिभ्रंश झाल्यागत भांबावून बाप्पा थांबला. मस्तकांत

भोंवरा गरगरत होता. तरंग उठत होते. वर्तुळं गोळा होत होती. रहाटावर डेंक टेकून तो निपचित बसून राहिला. क्षणभर शंकरबाप्पा स्वतःला विसरला. सनाथीच्या शून्यांत विरून गेला. किरणांच्या कवडशांत रंगून अन् भंगून गेला. सावल्यांशीं धुळवड खेळत दंगून राहिला.

"आक आक! कक् काक!" रामफळीच्या माथ्यावर बसलेला तो हुप्प्या वानर शंकरबाप्पाला केव्हांपासून वेंगाडत बसला होता. दांत विचकून चिडवीत होता. रामफळाचे थोडे अर्धवट चावून दुस्वासानं खालीं टाकत होता.

जरा उशीराच असेल! बाप्पाचं हुप्प्याकडे लक्ष गेलं. त्याची तंद्री चाळवली. डोळे उघडून काचेचीं बुबुळं त्यानं आवाजाच्या दिशेनं रोखलीं. बाकदारसारखी मान उंचावून हजामत खाजवीत तो बघूं लागला.

"काळतोंड्या, तूं आलास?" बाप्पा ओरडला. विहिरीवरच्या बाजूला झाला. "वाटच बघतों आहे रे तुझी!"

त्यांची चांगली ओळख होती. शंकरबाप्पा वानराला पुरा ओळखून होता. त्याच्या इतकं किंबहुना अधिकच प्रेम होतं या हुप्प्याचं बाप्पाच्या बागेवर. या बाबतींत दोघे प्रतिस्पर्धी होते. त्याच भावनेनं एकमेकांकडे बघत. डुगडुगं साधण्यासाठीं टपून असत.

"हुप्प!" वानरानं बुभुक्कार केला. खालच्या फांदीवर उतरून दांत काढून तो चकचक करूं लागला.

बाप्पा स्वस्थ उभा होता. उघड्या डोळ्यांनीं बघत. दगडं उचलून तो हुप्प्याच्या मागं लागला नाहीं. 'हाः हूः! अरारऽ दरारऽ' करीत तोंड वाजवीत राहिला नाहीं.

"बऱ्याच दिवसांत दिसला नाहींस. वाटलं मेलास का काय!" बाप्पानं हुप्प्याशीं बोलणं काढलं.

"आक–आक!" वानरानं जाब केला.

"होय रे खारतोंड्या होय! तुझीच मिरास पुरली आहे त्या रामफळीच्या मुळाशीं. ती तूं नाहीं सांभाळायची तर कोणी? मी?"

"चक्-चक्! आऽ! हुप्प्यानं कानावर हात ठेवले.

"वनदेवीच्या मसनवटींत पापाची माती नको म्हणून तें कारटं मीच पुरलं. पुरलं इथं, या रामफळीच्या मुळाशीं जिवंत नव्हे. मेलेलं. आणि मीं नाहीं मारलं. साथींत तें दगावलं."

"हुप्प हुप्प! चक्!"

"चूप! ओरडूं नकोस! तूं खरा कोण आहेस हें गांवांत लोकांना अजून ठाऊक झालेलं नाहीं. त्यांना वाटतं आहे तूं आहेत अर्जुन्या परब. माझ्या पार्वतीला फूस लावून त्यानंच घराबाहेर काढलो. वाईट चालीला लावली. मेल्यावर हा अर्जुन्या हुप्प्या होऊन या बागेंत वावरतो आहे असा गांवांत समज आहे. पण तो खरा नाहीं. त्यांत बिलकुल तथ्य नाहीं. अर्जुन्या परबानं पारूला बिघडवलं नाहीं. पोर मेलं तसा तिच्या मनानं धसका घेतला. हाय खाल्ली. म्हणूं लागली, या घराला भावोजींचा शाप बाधतो आहे. भावोजी—भावोजी! सर्वत्र अन् सारखा एक आवाज तिला दिसूं लागला; भासूं लागला. आणि अशा परिस्थितींत पार्वती घर सोडून गेली तर तो तिचा दोष नव्हता. आणि प्रसंगाला अर्जून परब पुढं झाला तर तो त्याचा दोष नव्हता. नाहीं तरी बायकांच्या अडचणी अर्जुन्याला बरोबर समजत..."

म्हाताऱ्यानं आज हें काय नवीनच खूळ डोक्यांत घेतलं आहे? हुप्प्याला समजेना. वास लागायची खोटी कीं पिसाळल्या कुत्र्यासारखा हाः हूः करीत फुकटरान उठवणारा हा माणूस खुशाल आपला उभाच आहे. तोंड वाजतं आहे. वाजायचंच! संवयच आहे ती या प्राण्याची. पण हा येरडा माणसांतच दिसत नाहीं आज. चिडत नाही, तंटत नाहीं. वर तोंड करून थांबत–ओरडत नाही. हट्! याला म्हणावं तरी काय! हुप्प्या अंग खाजवीत बसला. वाकड्या नानेनं इकडेतिकडे टेहळूं लागला.

खालीं शंकरबाप्पाचं तोंड चालू होतं. दादबा राण्याशीं बोलत नाहीं इतक्या सलगीनं तो सांगत होता. आणि दादबा बाप्पाचा जानीदोस्त होता. इतकी दोस्ती कीं तोड नव्हती. अशीच कसलीशी सांथ साथ आली. तींत या दोघांचीं पोरं अटोपलीं. दादबाचं पोर आधी गेलं. बाप्पाचं पोर आंचके देत पडलं होतं पार्वतीच्या मांडीवर. तरीहि सवड काढून बाप्पा गेलाच दोस्ताच्या घरीं सांत्वनाला. सांगितलन, "दादबा, लेक गेला तुझा. पण दुःख करूं नकोस.

माझं पोरंहि तिकीट काढून आहे देवगडचं. कोणाचा का असेना? पण वंशाला म्हण, वंशखंडनाला म्हण आधार होता." ही बातमी गांवांत कशी काय झाली कुणास ठाऊक! लोकं बाप्पाला फिदी फिदी हंसूं लागली. पण बाप्पाची खात्री होती दादबानं ही गोष्ट फोडलेली नाहीं.

हा असा विश्वास होता बाप्पाचा दादबा राणेवर. पण त्यालासुद्धां बोलला नव्हता अशा गोष्टी त्यानं काढल्या होत्या. हुप्प्याला त्या कळत होत्या, शब्दन् शब्द कळत होता. याबद्दल बाप्पाचो खात्री होती.

"गांवाला काय तूं ओळखत नाहींस?" बाप्पा विरघळून सांगत होता. "सरळ गोष्ट उफराटी बनवायची आणि उभं काम आडवं करायची रीतच लोकांची! आणि मीसुद्धां गाढव यांच्या नादीं लागलों. अर्जुन परबानं बायको पळवली म्हणून पोलिसांत तक्रार गुदरून मोकळा. पोलिसांनीं थेट मुंबईपर्यंत तपास करून दोघांना पकडलं आणि गांवीं आणलं. खटला उद्यां कोर्टांत उभा रहाणार तर आधल्या दिवशीं पार्वतीनं रस्त्यांत गांठलं. दादबा होताच बरोबर. त्याला साद घातलीन् तिनं. हुकूम केला, 'माझ्या नवऱ्याला सांगा केस काढून घ्या.' तिच्याकडे पहाण्याचं मीं टाळलं. अनुभवानं मला ठाऊक झालं होतं, पार्वतीच्या डोळ्याला डोळा दिला कीं झालं, अवसानघात झालाच! तशीच विलक्षण जरब होती तिच्या नजरेंत. माझा आवाज बिलकूल बंदच होई. वाटूं लागे मी तिचा गुलाम—हुकुमाचा ताबेदार. हाताला धरून दादबाला मीं ओढलं. पुढं चालूं लागलों. तसा पार्वतीनहि दादबाचा हात धरला. म्हणाली, 'कोर्टापुढं सगळं सांगून टाकीन मी. ती वादळी रात्र. हे, मी अन् भावोजी भावोजी. परागंदा कां झाले? सगळं सगळं मी सांगून टाकणार...' आयुष्यांत पहिल्यानंच मी शहाणपणा केला. खटला आपसांत मिटवला..."

हुप्प्या कंटाळला होता. या थेरड्याला तर उपरति झालेली त्याला दिसत होती. त्याच्यामागं लागण्यांत अर्थ नव्हता. त्यापेक्षां त्याला उद्योगाला लावलेलं बरं असा त्यानं विचार केला. शेपूट उभारून उडी मारण्याच्या तयारीनं तो बाजूला आंब्याच्या झाडाकडे बघूं लागला. किल्या डोळ्यानं मधलं अंतर अजमावूं लागला.

त्याचा हा उद्देश ध्यानीं आला तसा शंकरबाप्पा एकदम चवताळला. ओरडला, "कळतोंड्या, थांब. पळून जातोय्, हलकट! कुठं जाणार रे!" बाप्पा हें अशा कांही विचित्र आवाजांत ओरडला कीं हुप्प्याचं उलटं काळीज देखील तळमळलं. तो वरमला, शरमल्यासारखा झाला. चूपचाप जागच्याजागीं थांबला. उचंबळून बाप्पाकडे बघत राहिला.

शंकरबाप्पा काष्ठासारखा उभा होता. डोळ्यांत झिंग. दोन्ही खाचांत बुबुळं थिजलेलीं. म्हाताऱ्याच्या विद्रूप चेहऱ्यावर थंड प्रेतकळा होती. केस रोमरोमीं ताठरून उभे होते. श्वास मात्र जोरानं चालू होता. आणि चालू होतं तोंड. तें वाजतच होतं. पण आवाज बाप्पाचा नव्हता. त्याच्या मुखानं कोणी दुसराच बोलत होता. घोगरा, भसडा आवाज आंतल्या आंत घुमत अन् आवर्जत निघत होता. म्हटला तर अर्थ होता. म्हटला तर नव्हता.

"गेल्या जन्मीचं पाप जळतं आहे काळजांत. तरीच नरकांत चैन पडत नाहीं तुला. म्हणून—म्हणून येतो आहेस इथं. ठाऊक आहे मला. शेपूट लावलंस आणि तोंड काळं केलंस म्हणून हा बाप्पा फसणार आहे होय रे तुझ्या सोंगाला? अरे रामभक्त मारुतीचा वंश या झाडाला कधीं पाय लावणार नाहीं. रामाइनकंच रामफळीचं झाड पवित्र असतं वानराला. हें जर खरं तर तूं वानर कसा काय रे? आंऽ! ओळखलं कीं नाहीं बरोबर. जपजाप्य करीत आबा परमुलुखांत मेला. बरं झालं! ब्रह्महत्या टळली! पण ती बातमी गांवांत झाली तशीं लोकं खवळलीं. आबाभट मोठा माणूस पडला ना! एक प्रतिष्ठित पुरोहित. गंगामाईसारख्या स्वच्छ चारित्र्याचा. हात्तिच्या! गांवाला काय माहीत? माहीत एक मला. पण कोणत्या तोंडानं सांगूं? आणि माहीत होतं पार्वतीला. नवऱ्याचं नांव आणि कुंकूं कधींच पुसून टाकलं होतं तिनं. गांवांत राजरोस तो तसला धंदा चालवला होता. आणि तरीसुद्धां माझ्या दळभद्र्या घराच्या अब्रूची तिला काळजी होती. नाहीं! पारूनं तोंडावाटे ब्रदेखील निघूं दिला नाहीं. निमूट सगळं सहन केलं. उलथलास तूं, गांव उलटलं तिच्यावर. उभ्या गांवचा रोष तिनं पत्करला. रडली नाहीं, चिडली नाहीं. तुझ्या पापाला वाचा फोडली नाहीं. गांवानं तिच्या आयुष्याचीं लक्तरं लक्तरं केलीं,......

"अर्जुन परब बिचारा माझ्याकडे धांवत यायचा. तोंड वेंगाडत सांगत बसायचा, 'बाप्पा, चार दिवसांची उपाशी आहे बघा तुमची बायको. दुसरं तरी काय करणार? आहेच काय घरांत? धान्याचा गोटादेखील नाहीं. गांवानं धंदा साफ बसविला आहे. कांहीं विचारलं पुसलं तर म्हणते वीष दे. बाकी तसा वाईटच माणूस मी! पण हें काम कांहीं माझ्यानं होणार नाहीं. बाप्पा, तुमालाच करायला हवं तें. एक म्हणजे तुमचा अधिकार आहे. दुसरं वीष विकत घ्यायला पैसा आहे तुमच्यापाशीं.' त्याच्या हातावर मुकाट्यानं मी पाच दहा रुपये ठेवायचा. दाणाकोंडा, कापडचोपड काय घरांत असेल तें स्वाधीन करून उसासे टाकत बसायचा. तेवढंच समाधान! मनाला थोडं बरं वाटे..."

"पण—पण हे बनावट सुखसुद्धां माझ्या नशिबीं नव्हतं. कसं न् काय देव जाणे! पार्वतीच्या कानीं गेलं कीं अर्जुना जळू कसा शंकरबाप्पाला डसला आहे. वेश्यानं चैन चालवली आहे. ऐकलं मात्र आणि तडक ती निघालीच. रहाटावर मी बसलों होतों तिथं समोर ठाकली. धुमसत म्हणाली, 'असं तुमच्या अन्नावर जगण्यापेक्षां जीवच देतें मी. म्हणजे सुटेन तरी! तुम्हीपण सुटाल!' आ वासून मी बघत राहिलों. आंवढा जड झाला होता. शब्द फुटेनाच. ती बेफाम पोर समोर विहिरीच्या कांठावर चढलेली...आणि मग नक्की काय झालं आजहि मला सांगतां येणार नाहीं

कळलंच नाहीं. आठवतं मात्र. होय, हें आणि पुढचं सगळं आठवतं. कारण तोंपर्यंत मीं शुद्धीवर आलों होतों. पार्वतीच्या शेजारीं मी उभा होतों. माझ्याकडे बघत एक एक पाऊल ती मागं सरकत होती. तिचा चेहरा भयानं पांढराफटक पडला होता. शुष्क स्वरांत ती पुटपुटत होती, 'चुकलें मी. क्षमा करा—क्षमा करा भावोजी. फिरून नाहीं येणार. या घरात कधींच पाऊल टाकणार नाहीं...माझ्या जागीं भावोजी दिसत होता तिला. जशी ती मला ओळखत नव्हती किंवा ओळखत असूनहि नातं विसरली होती. खरं होतं! तिचंच खरं होतं! नवरा असूनहि तिच्या हिशेबीं मी नसल्यासारखाच होतों. आणि हें जर खोटं, तर जगांत कांहींच खरं नाहीं!...पार्वती गेली. निघून गेली. मी तिला जाऊं दिलं. अडवलं नाहीं. कां अडवूं? कशासाठीं? कोणासाठीं? माझ्यापाशीं प्रश्न होते—उत्तरं नव्हतीं. त्यानंतर चार दिवसांनीं अर्जुन्या परत बोंबलत आला. तिला शिव्याशाप करू लागला. सांगू लागला, 'बाप्पा, तुमची बायको उडाली. कोणी गुजराथी शेठ गांठलान् रांडेनं. त्याच्यासंग मुंबईला पळून गेली बघा. कायदेशीर मालक तुम्ही. म्हणून वर्दी दिली. म्हणत असाल तर चोटीला धरून फरफटत आणतों सटवीला. मात्र वाटखर्चासाठीं रुपये देऊन ठेवा पांचपन्नास आं! बाप्पा कसं?' मी त्याला जाब केला नाहीं. भात बडवण्याची काठी पडली होती ओसरीवर. तीच उचलून अर्जुन्याकडे पाहिलं. पण तो होता चलाख. एका उडींत पार फाटक गांठलन् त्यानं...

"गांवात सुरुवातीला लोकांना वाटलं बरं झालं! ब्याद गेली! पण कोणाच्यातरी लक्षांत आलं आणि तशी मात्र खळबळ उडाली. गांवांत चर्चेचा तो एकच विषय होऊन राहिला. माझ्या मागं सगळी इस्टेट कायद्यानं तिची आहे, तिच्याकडेच जाणार आहे. बाप्पा उलथायची वाटच बघते आहे बघा?—हें असलं बोलणं वावटळीसारखं सुरू झालं. आणि गांवकीच्या प्रेमाचा तुफान वर्षाव माझ्यावर कोसळूं लागला त्यांत मी भिजून चिपचिंब झालों आहे, बुडून वाहून चाललों आहें. हा बाप्पा आज त्याचा राहिलेला नाहीं. तो सगळ्या गांवाचा झाला आहे. गांवकीचा झाला आहे. अरे, कुठं अंग मोडून आलं तरी उभं गांव माझ्या समाचाराला लोटतं. कढू काढ्यांचा रतीब चालू होतो. सुई टोंचून जातो तो डॉक्टर. बाप्पाला आवडतं म्हणून एकादं दुसरं पक्वान्न घरांत येऊन पडतं. अगदीं बादशाही थाट आहे मांझा. कांहीं कांहीं कमी पडूं देत नाहींत हीं लोकं. शंकरबाप्पाला गांव मरूं देणार नाहीं. त्यानं जगलंच पाहिजे, जिवंत राहिलंच पाहिजे. मी मेलों आणि माझी इस्टेट एका बाजारबसवीला पडली कीं गांवची इभ्रत जाईल. इथल्या लोकांच्या माणुसकीला डांबर लागेल. या दुनियेंत न्यायच शिल्लक रहाणार नाहीं. वाः! छान! खूप छान!—दुनिया गेली खड्ड्यांत! आणि गांवाच्या प्रेमावर मी थुंकतों. छेः छेः! बाप्पाला तुमचं कांहीं नको. प्रेम नको, उपकार नकोत. कशा—कशाची गरज नाहीं मला. बायकोला गांवांतून उठवली. आतां टपले आहेत माझ्या इस्टेटीवर. एकजात सगळे निमकहराम; विश्वासघातकी. जन्मस्थानींसुद्धां कर्म करून ठेवतील...".

"हुप्प! हुऽ हुप्प!" रामफळीवर हुप्प्यानं जोरांत साथ दिली. म्हणजे त्याला पण हें पटलं होतं.

"तूंदेखील त्यांतलाच, खापरतोंड्या." बाप्पा डिवचून त्याच्या अंगावर खेकसला. "नाहीं. त्यांच्यापेक्षांहि चांडाळ. आपल्या कर्मानं मेलास खरा. पण मरतांना सुद्धां वासना ठेवलीसच पार्वतीवर. म्हणून तर आतां विरक्या घालतो आहेस या घराभोंवतीं. आत्रा, तूं वानरयोनींत शिरलास म्हणून हा बाप्पा ओळख विसरणार आहे का काय रे तुझी. वेडा, बिलकुल पागल! वडील भाऊ तूं—पण मी तुला पहिल्यानच ओळखला तूं बेपत्ता झालास त्या रात्रीं. ती भीषण वादळी रात्र मी कसा विसरेन? माझ्या आयुष्यांत फक्त ती तेवढीच घटना आहे. बाकी सगळा कापूस. पिंजून वाती वळत बसावें...बाहेर वादळानं जोर केला होता. विजा कडकडत तुटत होत्या. ढग गडगडत फुटत होते. ही असली वादळरात्र म्हणजे माझी बांचावर धारण. गांवांत सर्वांना माहीत नव्हतं टाऊक काय तें पार्वतीला. तिला हें ठाऊक असतं तर वर माडीवर माझ्याकडे झोपायला तिनं तीच रात्र निवडली नसती. पलंगावर मी नाहींसं दिसतांच पोर हबकली. सादा घालत सुटली, 'बाप्पा, बाप्पा!' मी कांहीं त्या ऐकल्या नाहींत. तिच्या हातातील कंदिलाचा प्रकाशही मला दिसला नाहीं. पलंगाखालीं, कानांत गच्च बोटं, डोळे मिट्ट झाकून घेतलेले, अंगावर एकदोन गाद्या, तोंडानं रामरक्षा म्हणतों आहे, धापा टाकतो आहे अशी माझी अवस्था! ती पहिली आणि पार्वती हंसतच सुटली. जोरजोरानं हंसू लागली. कानात गच्च बोटं आणि तरीहि मला तिचं हंसणं ऐकूं आलं. म्हणजे केवढ्या मोठ्यानं ती हंसत असेल, कल्पना कर! दचकून तोंडावरची गादी मी थोडी बाजूला केली आणि चाहूल घेतली. तर ही!—पार्वती! ती बोलत होती नि हंसत होती. 'बाई, बाई? काय हो तुमची दशा. या गडगडाटाची भीति वाटते म्हणून धीरासाठीं तुमच्याकडे आलें. झोंपायला हो! आणि तुम्ही तर मुडदा होऊन लडबडताय तिकडे. हीः हीः! नशिब माझं'...एक नाहीं दोन नाहीं. मी जाब केला नाहीं. गादी तोंडावर ओढून घेतली आणि श्वास रोधून जप करीत बसलों...आणि आत्रा, तूं मात्र संधि साधलीस. तूं—तूंच मुर्दाडा—" हात उडवीत बाप्पा हुप्प्याला बजावूं लागला, "तूंच घर मोडलंस, कूळ बुडवलंस, स्वतः मेलास आणि तिलाहि पार आयुष्यांतून उठवलीस."

"चक चक!" संवयीनं वानरानं दात विचकले. तोंड वेंगाडलं.

"आत्रा, ही काय अवदसा आठवली रे तुला? माझं ऐक. आतां मेल्यावर तरी शुद्धीवर ये. ही दुष्ट वासना सोडून दे. पार्वतीला नको पिडूंस. यापुढं तिला तुझा ताप होतां नये या घरांस पाया पडतों तुझ्या








आता. ही एवढी तरी भीक घालच मला." आणि बाप्पानं हात जोडले.

"हुप ! हुऽप्प !" त्यानं नकार दिला. हरकत घेतली.

तसा बाप्पा त्याची समजूत घालूं लागला, "कां ? शंका आहे तुला आता ? पार्वती परत येण.र नाहीं असं वाटतं तुला. ती येणार, मी सांगतों. आज ना उद्यां, कधीं तरी एक दिवस आपल्या मालकीच्या घरीं तिला यावंच लागेल गांव काय लःख म्हणतं. म्हणतं मी मेलों कीं बसल्या-जागीं मुंबईला एका लेखानं पार्वती ही इस्टेट विकून टाकणार. अशक्य ! पैज आपली. तूं सांगशील ती पैज. प्राणाचं मोल पडलं तरी कबूल आहे मला. मी मरण्यापूर्वींच पार्वती माझ्याकडे परत येईल ! बोल आहेस तयार पैजेला ? जिची वस्तु तिच्या स्वाधीन केली कीं मग मोकळाच आहे मी. तुझ्याबरोबर मसणांतहि यायला मग तयारी आहे माझी."

"आक चक ! हूः हूः हुप्प !" हुप्प्यानं उत्साहानं आवाज उठवला. बाप्पाशीं पैज मारायला तो राजी झाला.

तेव्हां मात्र शंकरबाप्पाचं टाळकं फिरलं. तो एकदम विथरला. पिसाटा-सारख्या उड्या मारीत सुटला. "हूः हूः हुप्प, आता तुझ्या शेपटाला तूप." असं ओरडूं लागला. लहानपणीं दहीकाल्यांत ऐकलेलं गाणं त्याला आठवलं. तेंच तारस्वरांत तो म्हणूं लागला, "किती झालें हें छान, अंगीं आलें अवसान, मम वैऱ्याचा प्राण आतां घेतों क्षणीं."

आणि भलेमोठे धोंडे उचलून तो हुप्प्यावर फेकून मारूं लागला. वानर या झाडावरून त्या झाडावर थयथय उड्या मारूं लागला. आणि वेडापिसा बाप्पा अवधाण त्याच्यामागं लागला. कोठून एवढं बळ आलं होतं त्याला ? एक देव जाणे आणि दुसरा बाप्पा ! पण देवाला बोलतांच येत नव्हतं. आणि शंकरबाप्पा या घटकेला तरी बोलण्याच्या मनःस्थितींत नव्हता.

नाहींतरी माणूसदेखील एक प्राणीच आहे. विशेष म्हणजे वानराचा वंशज. शंकरबाप्पाचा एकूण अवतार बघून दादबा राणेला तरी तसंच वाटलं. वाटलं वानरांत तंटा चालला आहे.

म्हणजे त्याचं असं झालं ! बाप्पाच्या नांवचं पत्र पोस्टमननं दिलं दादबाच्या हातीं. तें देण्यासाठीं दादबा आला होता. बाप्पाला शोधत तो मागील दारीं गेला. बघतो तर वानरांसंगं बाप्पा गोंधळ नाचत राहिलाय् !



आतां हंसायचं कीं रडायचं याच्या या पिशाच्च चाळ्यांना दादबा राणे हंसूं लागला, बाप्पा, "अरे झालं काय तुला ?" त्यानं विचारलं.

"आ ! कोण रे ?" बाप्पानं वळून मागं बघितलं "दादबा, तूंच होय !"

"अरे वानर तो. त्याच्या नादीं लागला आहेस तें काय म्हणावं तुला ?"

"ओळखलें नाहींस तूं दादबा. अरे बाबा—बाबाभट आहे तो." बाप्पानं आपला शोध सांगून टाकला. दादबानें त्याला अर्ध्यावरच तोडलं सांगितलं, "बाप्पा पत्र आहे तुझं."

"पत्र ? माझं ?" शंकरबाप्पाला बोध होईना. जन्मांत त्याला कधी पत्र आलं नव्हतं. कोणाला कधीं कारणच पडलं नव्हतं.

तसं दादबा राण्यानं पाकीटच त्याच्या हातांत ठेवलं. बाप्पा तें उलटून परतून बघत राहिला. म्हणजे हें खरं आहे ? का दादबा चेष्टा करतो आहे—त्याला कळेना.

"अरे बघत राहिलास तो फोड तें ! वाचून बघ." हें देखील दादबानंच सुचवलं.

शंकरबाप्पानं पाकीट फोडलं. आंत दोन चिठोरीं होतीं. बाप्पा वाचूं लागला. पण म्हाताऱ्याला दिसत नव्हतं. दिसत होत्या फक्त रेघोट्या. तो पुटपुटला, दिसत नाहीं मला. तूंच वाच दादबा."

"मला वाचतां येत नाहीं रे ! नाही तर इतका वेळ काय स्वस्थ बसलों असतों ? माझी चाळिशी घे. बघ जमतं तर."

दादबाची चाळिशी लावून बाप्पा वाचूं लागला. लिहिलं होतं, "कळविण्यास दुःख होतं की आपलं कुटुंब श्रीमती पार्वतीबाई अवधि यांना काल दुपारीं देवाज्ञा झाली. त्य नीं तुम्हांला लिहिलेल पत्र सोबत जोडलं आहे. पार्वतीबाईच्या मृत्युपत्रान्वयें त्यांची इकडील सर्व मिळकत (अंदाजें रुपये दीड लाख) तुम्हांला मिळावयाची आहे. तरी याबाबतींत तातडतोब तजवीज करण्याची कृपा करावी. आपला..."

"बाप्पा—अरे काय हें खरं आहे ?" दादबा राणेला काय बोलावं कळेना. जीभच चिकटून बसली.

त्याला उत्तर देण्याच्या भानगडींत शंकरबाप्पा पडला नाहीं. तो दुसरं पत्र वाचूं लागला होता...'प्रणिपात. मला दोष देऊं नका. नाहीं तरी नायकिणीचीच पोर मी. जातीवर गेलें. फक्त मावोजींना ही गोष्ट कळली होतीं. त्या वादळी रात्रीला ओटीवर अर्जुन परबाबरोबर त्यांनीं मला पाहिलं. अर्थात् मला मग सगळं सांगावं लागलं. कळून स्वस्थ बसणं त्यांना शक्य नव्हतं. भावोजी मायेचं घर नि जन्माचं गांव सोडून बेपत्ता झाले.... आयुष्यांत तुम्हांला मीं कांहींच दिलं नाहीं. तरी कायद्यानं तुम्हीच माझे मालक, आणि मला तरी दुसरं कोण आहे—पार्वती."

"दीड लाख—दीड लाख रुपये ! अराराऽ ! बाप्पा, काम जोखमीचं दिसतं. तुझ्या माझ्या पल्ल्याबाहेरचं. वकिलामार्फतच करून टाकूं. कसं ? दीड लाख ! तूं बडी आसामी झालास रे बाप्पा !" दादबा राणे बेत करूं लागला. मनसुबे रचत बसला.

आणि शंकरबाप्पा बाजूला विचारांची भट्टी लावून बसला होता. "रांडेची ! नायकिणच होती तर ! आणि मीहि असा गाढव ? छे ! बिलकुल अर्थ नाहीं..." त्याचं मन झोकांड्या खात होतं.

• • •



*....सद्दिशीं उघडणारा! लखलखता! धारदार! शब्द न करतां हवेंतून येणारा आणि गपद्दिशीं प्राण घेणारा! माझ्यापाशींहि आहे. खिशांत आहे. खिशांत तरी कशाला? हा काय?....*



अच्युत बर्वे

मी सुखांत होतों. फार सुखांत होतों. सर्वसाधारणपणें माणसें इतकीं सुखांत नसतात. कांहीं असलीं तरी सर्वकाळ नसतात. दिवसांतला कांहीं वेळ किंवा महिन्यांतले कांहीं दिवसच सुख वांट्यास येतें. पण सुखाची माझ्यावर खास मेहेरनजर होती. चवीनें खावें तसा मजेच्या नाना परी मी भोगीत होतों. काम करण्यांत मला मजा वाटत होती, मित्रांशीं गप्पागोष्टी करण्यांत आनंद वाटत होता, फार काय, रस्त्यावरून साधें चालायचें झालें तरी चेंडूनें उशी घेत जावें तसा मी मजेंत चालत असें. जसा मी कधीं कुणाचा कंटाळा करीत नव्हतों तसेंच कधीं कुणी मला टाळीत नव्हतें. तोंडावर एक पाठीमागें दुसरें, असें मी करीत नव्हतों. सगळा मामला खुला होता. लोकांपाशीं मी मोकळेपणानें वागत होतों. त्यांच्यापासून घेत होतों तसेंच त्यांना देतहि होतो. होय, गरजू माणसाला मागचा पुढचा विचार न करतां मी जरूर देत होतों. कुणाला कांहीं देण्यासारखीच माझी स्थिति होती. रडत कुथत जे पन्नाशींत गांठतां येतें तें मी पस्तीशींतच साधलें होतें. मला काय कमी होतें? झकपैकीं नोकरी होती, आकर्षक व्यक्तिमत्व होतं, घराची ओढ लागावी अशी हंसतमुख पत्नी आणि मुलें होतीं; खरोखर, एखाद्या रंजक कादंबरींतल्या नायकाप्रमाणें माझी स्थिति होती. सुख हें माझ्या-साठींच जन्माला आलेलें आहे असें मला वाटत होतें आणि मी तसाच वागत होतों. उरलेल्या आयुष्यभर असेंच सुख भोगणार होतों. उरलेलें आयुष्य किती होतें कुणास ठाऊक, पण तें भरपूर असणार ह्याविषयीं माझी खात्री होती. अगदीं काल परवा पर्यंत होती—अगदीं काल परवां पर्यंत...

शनिवारचा दिवस होता. एक वाजतांच ऑफिस सुटलेलें होतें. बाहेरचें काम आटपून मी ऑफिसमध्यें परतत होतो. घड्याळांत दीड वाजला

होता. पण आज मला वेळेची पर्वा नव्हती. फार मोठा बकरा मी कापला होता. असाध्य वाटत होतें तें साध्य केलें होतें. माझा हा पराक्रम माझ्या सहकाऱ्यांच्या कानावर घालायला मी उत्सुक होतों. उशीर झाल्यामुळें आतां कुणी ऑफिसमध्यें भेटणार नाहीं म्हणून थोडेंफार वाईट वाटत होतें. पण तरीहीं मी आनंदांत होतों. स्वतःवर खूष होतों. रक्तांत खेळणारा आनंद आणि मनाची खुषी शीळेवाटे बाहेर पडत होती. शीळेचा आवाज चढवीतच मी केबिनचें दार उघडलें. आंत कुणी नसेल अशी माझी कल्पना होती पण माझे दोघे सहकारी गंभीरपणें एकमेकांशीं कांहींतरी बोलत बसलेले होते. त्यांना पाहून मी दरवाजांतून म्हटलें, "आधीं माझं अभिनंदन करा."

"शूः—हळू बोल"

"कां रे बाबा!" आणि त्यांच्याकडे पहात म्हटलं, "अरे असे सुतक्यासारखे काय बसून राहिलांत!"

"वेळच तशी आहे"

"बॅनर्जी, असं उगाच बोलूं नको. वेळ मोठी छान आहे. फार मोठं काम करून मी आलों आहें. मी काय सांगतों तें ऐका तर खरं—"

"आधीं आम्ही काय सांगतों तें ऐक."

ते दोघे काय सांगणार तें मी अंदाजानें ताडलें होतें. ऑफिस सुटल्यावर माझ्या केबिनमध्यें माझी वाट पहात बसून राहिलेले हे माझे सहकारी नेहमीपेक्षां वेगळं असं काय सांगणार होते! कामांत कुठें तरी घोटाळा झाला असेल आणि तो माझ्या कानावर घालून माझी सल्लामसलत घेण्याचा त्यांचा विचार असणार हें आजवरच्या अनुभवानें मीं ताडलें होतें. हंसल्यासारखें करीत मीं विचारलें, "पावरी, अरे काय भानगड आहे!"

"भानगडच आहे" आणि आजूबाजूला पाहून कानोसा घेतल्यासारखें करून तो म्हणाला, "बॅनर्जी, तूंच सांग."

त्या दोघांच्या चलबिचल अवस्थेवरून कांहींतरी फार मोठा घोंटाळा झालेला दिसत होता. तावडतोब हालचाल करून कांहीं निस्तरतां येण्यासारखें असलें तर पहावें असा विचार करून मीं म्हटलें, "काय असेल तें झटकन् सांगा."

"आम्ही विमल पांडेविषयीं सांगणार होतों."

"तो तर आपली नोकरी सोडून आठपंधरा दिवसांनीं जाणार आहे. त्याच्याविषयीं ऐकण्यासारखें आतां काय राहिलें आहे?" आणि असें विचारीत असतांना पांडेविषयींचे विचार माझ्या मनांत येऊन गेले. पांडे आमच्या कंपनींत गेलीं दोन वर्षें होता. दुय्यम अधिकारी म्हणून माझ्या हाताखालीं काम करीत होता. हुषार पण आळशी आणि गैरशिस्त असलेल्या ह्या माणसानें बरेच वेळां माझ्याकडून बोलून घेतलें होतें. चूक झाली असतां ती कबूल करण्याचा चांगुलपणा तो कधींच दाखवीत नसे. उलट आपलेंच कसें बरोबर हें पटवून द्यायचा प्रयत्न करी. माझ्याशीं तो वचकून वागे. पण माझ्या सहकाऱ्यांशीं अरेरावी करी. भडक माथ्यानें वागे. वादविवाद घाली. गुरगुरत राही. त्याच्या जागीं दुसरा एखादा असता तर त्याला मी केव्हांच नोकरींतून कमी केलें असतें. पण पांडेपाशीं असामान्य हुषारी होती. अडचणीच्या वेळीं तो असा एखादा मुद्दा मांडी किंवा तोड सुचवी कीं, मी थक्क होत असें. केवळ त्याच्या ह्या गुणाकडे पाहून इतर दुर्गुणांकडे मी डोळेझाक केली होती. त्याला आपणहून कधीं जायला सांगायचें नाहीं पण कांहीं कारणानें तो जातों म्हणाला तर थांबवायचें नाहीं असें मी त्याच्या बाबतींत ठरवून टाकलें होतें. त्याच बरोबर तो डोक्यांत राख घालून कधींतरी निघून जाणार हेंहि मला ठाऊक होतें. आणि मला वाटत होतें तें गेल्याच महिन्यांत खरें ठरलें होतें. दिल्लीला चांगली नोकरी मिळत असल्याच्या सबबीवर त्यानें राजीनामा सादर केला होता. तसें करतांना त्यानें रीतसर महिन्याची नोटीस दिली होती पण पंधरा दिवस आधीं जायची परवानगी असावी म्हणून विनंती केली होती. सहकाऱ्यांचा विचार घेऊन मी त्याचा राजीनामा स्वीकारला होता पण त्यानें केलेली विनंती मान्य केली नव्हती. ह्याविषयीं तक्रारीच्या सुरांत तो इतर स्टाफपाशीं बोलला होता. अशा कुरकुरीकडे मी नेहमीं प्रमाणें लक्ष दिलें नव्हतें. मी माझ्या निश्चयापासून ढळत नाहीं असें पाहून त्यानें पुन्हा एकदां माझ्यापाशीं बोलणें काढलें होतें. शक्य असतें तर मुदती आधीं जायला मी त्याला परवानगी दिली असती. पण त्याच्याकडून कामाचा तपशीलवार चार्ज घ्यायचा होता, तो बघत असलेल्या डिपार्टमेंटचे देण्याघेण्याचे व्यवहार, त्यानें लेखी वा तोंडी इतरांना दिलेलीं आश्वासनें ह्या साऱ्या गोष्टी निस्तरायच्या होत्या. हे सगळें व्यवस्थित उरकायचें म्हणजे महिनाभर सहज लागणार होता. त्यामुळें कठोर होऊन मला नकार द्यावा लागला होता. पावरीला त्यानें कामाचा चार्ज द्यावा, सगळे व्यवहार तपशीलवार समजावून सांगावे आणि हें सारें आटपलें कीं मगच त्यानें मला पुन्हा भेटावें असें निक्षून सांगितलें होतें. त्याप्रमाणें पावरी आणि तो एकत्र बसूं लागले होते. त्याच्यापासून कामाचा चार्ज घ्यायला सुरुवात झाली होती....

आणि आतां बॅनर्जी म्हणत होता, "आम्ही विमल पांडे विषयीं सांगणार होतों." कुणी सांगून त्याच्याविषयीं ऐकण्यासारखें आतां काय राहिलें होतें! मी तसें विचारलें तेव्हां पावरी म्हणाला,

"तो तपशीलवार कांहीं सांगत नाहीं. विचारालें तर उडवाउडवीचीं उत्तरें देतो. चिडीला येतो."

"मग त्याला माझ्याकडे घेऊन ये. मी पाहतों काय करायचें तें."

माझें हें बोलणें ऐकून पावरीनें सुटकेचा श्वास टाकला. एखाद्या संकटांतून सुटका झाल्याप्रमाणें त्याचा चेहरा खुलला. त्याच्या अंगावर टाकलेली जबाबदारी मी माझ्या अंगावर घेतलेली पाहून त्याला इतका आनंद कां झाला असावा तें माझ्या लक्षांत येईना. शंका येऊन मी त्याला विचारलें,

"पावरी, तूं त्याला घाबरत तर नाहीं?"

"घाबरण्यासारखीच स्थिति आहे" आणि बॅनर्जीकडे पहात तो म्हणाला,

"हाच काय तें सांगेल."

बॅनर्जीनें सांगितलेली हकीकत फार विचित्र होती. पांडेच्या पत्नीनें घडली गोष्ट रडत रडत मिसेस बॅनर्जीला सांगली होती. घाबऱ्याघुबऱ्या झालेल्या मिसेस बॅनर्जीने ती नवऱ्याच्या कानावर घातली होती. आणि आतां माझ्यापर्यंत येऊन पोहचली होती. मिसेस पांडेचा धीर सुटणें अगदीं साहजिक होतें. पांडे चमत्कारिकच वागला होता. आदल्या रात्रीं फार उशीरा तो घरीं परतला होता. उशीर झालेला असलेला तरी नेहमींप्रमाणें झिंगलेला नव्हता. पण भलतेंच खूळ डोक्यांत घेऊन आला होता. आल्या आल्याच त्याने बायकोचा हात हातात घेतला होता आणि तिच्याकडे चमत्कारिक नजरेनें पहात हात मोडेल अशा तऱ्हेनें पिरगाळला होता. 'सोडा मला, सोडा मला' म्हणून ती किंचाळूं लागली तिला त्यानें तेव्हां ढकलून दिलें होतें आणि स्वतः रडूं लागला होता. तो असा चमत्कारिक वागत आहे आणि रडत आहे हें पाहून कांहींतरी




संकट आलें असावें अशा विचारानें ती उठून उभी राहिली आणि पुढें झाली. पण ती जवळ गेली तसा तो पुन्हा ओरडूं लागला, 'दूर हो– दूर हो—'

"असं काय करतां ?"

"आधीं माझ्यापासून दूर हो. दृष्टीसमोरुन नाहींशी हो. माझ्या हातात खून आहे. ह्या, ह्या हातात खून आहे."

"असं काय वेड्यासारखं बोलता ?"

"माझ्या या हातात खून आहे. मी कुणाचा तरी खून करणार आहें. आजच कळलं मला. आजच."

"कुणी सांगितलं ?"

"कुणी सांगायला कशाला हवं ? ही हातावरची रेषाच बोलते आहे. सगळं स्पष्ट आहे. टाळतां येणार नाहीं. मी खून करणार आहें. माझ्या हातून कुणाचा तरी खून होणार आहे. ह्या आठपंधरा दिवसांत... कदाचित् आज उद्यांहि. तोच सांगत होता..."

"कोण सांगत होता ?"

"त्याच्याशीं तुला काय करायचं आहे ?" आणि तिच्याकडे चमत्कारिक नजरेनें पहात तो म्हणाला होता, 'खून होणार आहे. रक्त सांडणार आहे. कदाचित् आजहि. ह्या क्षणींसुद्धां" आणि तो एकदम पुढें झाला होता. पण त्याच्या हातीं न लागतां ती आंतल्या खोलींत पळाली होती आणि तिनें घाई करून दरवाजाला कडी लावून घेतली होती. थोडावेळ तो दरवाजावर धक्के मारीत राहिला होता. दरवाजावर बसणारे धक्के थांबले आणि बाहेरच्या खोलींत कांहींतरी फुटल्याचा फार मोठा आवाज झाला. आणि मग सगळे शांत झाले होते. सकाळीं उजाडल्यावर तिनें कशीबशी आपली सुटका करून घेतली होती. आधारासाठीं ती खारला आपल्या भावाकडे निघून गेली होती.

बॅनर्जीच्या तोंडून हें सगळें ऐकून मी अस्वस्थ झालों. काय बोलावें तेंच मला सुचेना. किती आनंदांत मी ऑफिसमध्यें आलों होतों आणि आतां हें काय ऐकत होतों ! पांडेनें असें कां वागावें तें माझ्या लक्षांत येईना. तो भडक वागत असला तरी इतका भडक पूर्वी कधीं वागला नव्हता. तो बिथरेल असें वेडेवाकडें भविष्य कुणी वर्तवलें असावें तें लक्षांत येईना. ह्या साऱ्याचा काय शेवट होणार आहे तेंहि कळेना. विचार करूं लागलों तसा मी सुन्न झालों. पण तसें न दाखवतां विचारलें, "तो आज ऑफिसमध्यें आला होता काय ?"

"नाहीं. आला नाहीं तेंच चांगलें झालें" पावरी पुरता घाबरलेला दिसत होता. सहज म्हणून मी म्हटलें, "आज आला नाहीं तरी सोमवारीं येईल."

"सोमवारीं आला तर त्याला तुम्ही ऑफिसमध्यें घेणार ?"

"काय हरकत आहे ?"

"पण अशा माथेफिरू माणसाच्या संगतींत काम करायचें म्हणजे..." आणि बोलणें अर्धवट सोडून दुजोऱ्यासाठीं तो बॅनर्जीकडे पाहूं लागला. पण बॅनर्जी अस्वस्थ झालेला असला तरी त्याच्याइतका घाबरलेला दिसत नव्हता. माझ्याकडे पहात बॅनर्जी म्हणाला, "जरा सावधगिरीनें वागलें म्हणजे झालें."

"बरोबर आहे. अशा वेळींच खंबीरपणानें त्याला तोंड दिलें पाहिजे" आणि पावरीकडे बघत म्हटले, "अजून त्याच्याकडून सगळा चार्ज तर घ्यायचा आहे."

"पण तो आतां तुम्ही घेणार आहां." पावरीचें बोलणें ऐकून त्या



तशा वेळींहि मला हंसूं आलें. त्याला दिलासा देत मी म्हटलें, "तूं कांहीं काळजी करूं नको. मी बघून घेईन त्याला."

'तूं कांहीं काळजी करूं नको' असें मोठ्या दमाचांत मी पावरीला सांगितलें होतें पण विचार करूं लागलों तसें घडल्या प्रकारांतलें गांभीर्य माझ्या लक्षांत येऊं लागलें. कुठच्याहि क्षणीं कांहींहि कानावर येण्याची शक्यता होती. त्याच्या घरीं काय झालें असेल त्याचा मला अंदाजच करतां येत नव्हता. राहून राहून प्रश्न पडत होता कीं, त्यानें असें कां वागावें ? विचार करूं लागलों तशी अनेक संभाव्य कारणें मनांत येऊं लागलीं. कुणी खरोखरच तशा प्रकारचें भविष्य सांगितल्यामुळें, बायकोविषयींच्या कांहीं संशयामुळें, वारंवार पिण्यामुळें किंवा अति जागरणामुळें तर तो असा वागत नव्हता ? पण कांहींहि झालें तरी त्याचें वागणें काळजी करण्यासारखें होतें. पावरीनें बोलून दाखवलेल्या भितींत तसें तथ्य होतें. केव्हांहि कांहींही होण्याची शक्यता होती. जास्तींत जास्त काय होऊं शकेल याचा मी विचार करूं लागलों आणि कमालीचा अस्वस्थ झालों. भलभलते विचार मनांत येऊं लागले. ह्या विचारांना हुसकावून लावीत मी मनाला बजावलें कीं उगाच विचार करायचा नाहीं, ऐकलेल्या गोष्टीची कुठें वाच्यता करायची नाहीं, एवढेच काय पण कांहीं कानावर आलेलेंच नाहीं अशा तऱ्हेनें वागायचें. सोमवारीं तो भेटला तरी आपणहून त्याच्यापाशीं कांहीं विषय काढायचा नाहीं.

सोमवारीं ऑफिस सुरू झालें आणि तो आल्याचें कळलें तेव्हां मी बॅनर्जीला माझ्या केबिनमध्यें बोलावून घेतलें आणि त्याला निरोप पाठवला. पण बराच वेळ झाला तरी तो आला नाहीं. पुन्हा निरोप पाठवला तेव्हां तो आला आणि सरळ खुर्चीवर येऊन बसला. ह्या दोन दिवसांत तो पार बदलेला दिसत होता. जागरण केलेल्या माणसानें अपुऱ्या झोपेंतून उठल्यावर दिसावें तसा तो दिसत होता. केस पिंजारलेले होते आणि डोळे तांबारले होते. बॅनर्जीकडे किंवा माझ्याकडे न पाहतां तो डोक्यावर गरगरणाऱ्या पंख्याकडेच पहात राहिला. त्याचें लक्ष वेधून घेत मी म्हटलें, "तुमच्या कामाचा चार्ज मी घेणार आहें."

"पावरीला काय झालें ?" आणि प्रश्न विचारतांना तो चमत्कारिक हंसला. पण त्याच्या हंसण्याकडे दुर्लक्ष करून मी म्हटलें,

"पावरीला इतर कामें आहेत त्यामुळें तुमच्याकडून मींच सगळें समजावून घेईन" आणि त्याच्याकडे रोखून पहात म्हटलें, "आजपासूनच सुरुवात करूं."

"माझी प्रकृति ठीक नाहीं."

"ठीक नाहीं म्हणजे काय होतें ?"

"दिवस चढूं लागतो तसें माझें डोकें भडकत जातें. फुटेल असें वाटतें." तो सांगत असलेली माहिती महत्त्वाची होती. त्यानें आणखी बोलावें म्हणून मी विचारलें, "आणखी काय होतं ?"

"कांहीं नाहीं." आणि माझ्यावरची नजर काढून तो डोक्यावर गरगरणाऱ्या पंख्याकडे पुन्हा पाहूं लागला. त्याच्याशीं सहानुभूतीनें वागणें आवश्यक आहे असें वाटून मी म्हटलें, "डॉक्टरला कां भेटत नाही ?"

"डॉक्टर काय सांगेल तें मला ठाऊक आहे."

"नुसतें ठाऊक असून पुरेसें नाहीं. डॉक्टर देईल तें औषध घेतलें कीं बरें वाटेल" आणि बॅनर्जीकडे पहात मी म्हटलें, "चार वाजतां मला मोकळा वेळ आहे. त्यावेळीं ह्यांना घेऊन आपण आपल्या कंपनीच्या डॉक्टरकडे जाऊं." माझें हें बोलणें ऐकून एकदम उभा रहात तो म्हणाला, "तशी कांहीं आवश्यकता नाहीं."








"तें आम्ही पाहूं"

"तुमची मर्जी !" आणि झटदिशीं तो केबिनच्या बाहेर पडला.

त्याचें वागणें आणि बोलणें त्याच्याविषयीं शंका येईल असें होतें. मनांत आलेल्या शंकेचा बॅनर्जीपाशीं उल्लेख करायला मला प्रशस्त वाटत नव्हतें. डॉक्टर सांगेल तें ऐकणें आणि कांहीं दिवस त्याला रजा घ्यायला सांगणें एवढेंच आतां माझ्या हातांत राहिलें होतें. हुषार माणसाचा असा शेवट होणें मला पटत नव्हतें. पण पटलें न पटलें तरी तो आतां त्याच मार्गावर होता. बॅनर्जीकडे पहात म्हटलें, "कुणाचें नशीब कांहीं आपण बदलूं शकत नाहीं. पण आपल्याकडून होईल तेवढें त्याच्यासाठीं केलें पाहिजे. आजच्या आज त्याला डॉक्टरकडे घेऊन गेले पाहिजे. वेळच्या वेळीं काळजी घेतली तरच आशा आहे."

"खरं आहे" आणि जड पावलांनीं बॅनर्जी कामाला निघून गेला.

काय गंमत पहा! पांडे कुठच्या मार्गावर आहे तें लक्षांत येऊन एकीकडे वाईट वाटत होतें आणि त्याचवेळीं त्याच्यापासून तशा प्रकारचा कांहीं धोका नाहीं म्हणून बरेंहि वाटत होतें. सुटल्यासारखें वाटत होतें. तशा प्रकारची भीति वाटून पावरी उगाच घाबरला होता. त्याला बोलावून सगळें सांगावें असा मी विचार करीत आहें तोंच पावरी घाबऱ्या घाबऱ्या आंत आला. थरथर कांपत माझ्यासमोर उभा राहिला. ह्या भित्र्या माणसाला कशा प्रकारें सगळें समजावून द्यावें त्याचा विचार करीतच मी विचारलें "अरे इतकं घाबरायला काय झालं ?"

"घाबरूं नको तर काय करूं? तो—तो"

"तो—तो काय ? भित्रा कुठचा ! तसं घाबरायचं कांहींसुद्धां कारण नाही. त्याच्या डोक्यावर जरा परिणाम झाला आहे—"

"नुसता परिणाम नाहीं. डोकं साफ फिरलं आहे."

"नाहीं रे बाबा—"

"तुम्ही आतां कांहीं सांगितलंत तरी माझा विश्वास बसणार नाहीं. ह्या—ह्या डोळ्यांनीं पाहिलं आहे."

"काय पाहिलंस ?"

"त्याच्या हातांत चाकू आहे. एवढा मोठा. स्प्रिंगचा—"

खुर्चीवरून उठत मी विचारलें, "काय म्हणालास !"

"चाकू—उघडा चाकू आहे त्याच्या हातांत" आणि ढेपाळल्याप्रमाणें पावरी एकदम खुर्चीवर बसला. बसल्या बसल्याच सांगूं लागला, "त्याला तुम्ही जायला सांगणार नसलेत तर उद्यांपासून मी रजेवर जाईन."

"अरे पण तो तुला कांहीं बोलला का ?"

"चाकू बघितल्यावर मी कशाला जातोंय् बोलायला !" आणि काकुळतीला आल्याप्रमाणें तो विनवूं लागला, "उद्यांपासून मला रजा द्या." त्याला शांत करीत मी म्हटलें, "मीच जाऊन पाहतो"

"नको नको. तुम्ही त्याच्यासमोर जाऊं नका."

"असं घाबरून चालणार नाहीं." मनातून मी घाबरलों होतों. पण धीर केला आणि केबिनच्या बाहेर पडलों. सावधपणें त्याच्या छोट्या केबिनमध्यें शिरलों आणि हांक मारली, "बिमल—"

"अं!" माझा आवाज ऐकून तो एकदम दचकला. हातांतला चाकू काळ दाबून त्यानें बंद केला. त्याच्या हातावर लक्ष ठेवीत विचारलें,

"काय चाललं आहे !"

"कुठं काय ?"

"ह्या एवढ्या मोठ्या चाकूशीं कसला खेळ चालला आहे !"

"कांहीं नाहीं. कांहीं नाही. पेन्सिल करीत होतों—"

"बघूं तुझी पेन्सिल" मी त्याला बरोबर पकडला होता. त्याच्यापाशीं पेन्सिलच नव्हती. गांगरल्याप्रमाणें तो माझ्याकडे पाहूं लागला तेव्हां मी म्हटलें, "आण तो चाकू इकडे."

"हा—हा चाकू"

"तोच. आण इकडे" आणि त्याच्या हातांतून चाकू काढून घेतला. तसाच मागें वळलों आणि केबिनमध्यें आलों. मुठींत धरलेला चाकू घामानें साफ भिजला होता. काय करावें, कसें वागावें, येऊं घातलेल्या प्रसंगाला कसें तोंड द्यावें कांहीं कळेना. विचार करीत मी तसाच बसून राहिलों. एवढ्यांत केबिनचा दरवाजा वाजला आणि मी एकदम दचकलों. उघड्या दरवाजांतून शिपाई आंत येत असलेला पाहून सावरून बसलों. तो टेबलापाशीं आला तेव्हां विचारलें, "काय पाहिजे ?"

"तुम्हीच बोलावलंत—"

"कुणी मी ?"

"होय साहेब, बेल वाजली."

"हां–हां" मी स्वतःला सावरून घेतलें पण काय झालें असावें तें माझ्या लक्षांत आलें. विचाराच्या भरांत बझरच्या बटनाला माझा हात लागला होता आणि बाहेर बझर वाजला होता. आणि मी कांहीं कामासाठीं बेल वाजवली असावी अशा समजुतीने शिपाई विचारीत होता, "काय पाहिजे ?"

"ऑफिसमधें जरा नीट लक्ष ठेव."

"होय साहेब—"

"पांडेवर विशेष लक्ष असूं दे."

बोलावें कीं बोलूं नये अशा विचारांत शिपाई क्षणभर पडला आणि मग एकदम म्हणाला, "चकरल्यासारखें वागतात पांडेसाहेब—"

"ठाऊक आहे मला. म्हणूनच सांगतों नीट लक्ष ठेव."

पांडेचें वागणें शिपायाच्याहि लक्षांत आलें होतें. त्याच्या वागण्याचा बभ्रा होण्यापूर्वींच उपाययोजना करणें आवश्यक होतें. मी बॅनर्जीला बोलावून घेतलें आणि चाकूचा प्रकार त्याच्या कानावर घातला. चाकू पाहून तोहि घाबरला. विचारूं लागला, "आतां काय करायचें ?"

"तेंच तुला विचारतों आहें."

काय करायचें तें आम्हा दोघांना कळत होतें आणि कळत नव्हतेंहि अशा परिस्थितीत आमच्या जागीं दुसरे कुणी असते तर त्यानी काय केलें असते ते आम्हाला कळत होते. पण कळत असूनहि अनेक कारणांमुळें ते कळत नसल्यासारखेंच होतें. रिपोर्ट करून त्याचा बंदोबस्त करतां येण्यासारखा होता. पण परिणामीं त्याच्या आणि आमच्याहि दृष्टीनें तें हितावह ठरणार नव्हतें. त्याच्या बाबतींत बॅनर्जीची स्थिति विशेष नाजुक होती. मिसेस पांडे त्यांची नातेवाईक लागत होती. पांडेच्या आयुष्याचें नुकसान होईल असें कांहीं करायला बॅनर्जीला प्रसस्त वाटणार नाहीं हें मी जाणून होतों. त्यामुळें इतर कुणीहि केल्या असल्या त्या गोष्टी आमच्या मनांत आल्या तरी आम्ही त्या गोष्टींचा उल्लेख केला नाहीं. काय करायचें, असे अगतिक होऊन एकमेकाला विचारीत राहिलों. मोठी कठीण परिस्थिति होती. आग विझवायची होती पण ती विझवण्याकरतां पाणी वापरायचें नव्हतें आणि त्याचबरोबर आगीची कुणाला झळ लागणार नाहीं म्हणून दक्षताहि घ्यायची होती. शेवटीं बॅनर्जी म्हणाला, "त्याला आपण रजेवर जायला सांगूं."

"तें तर ठरलेलंच आहे. पण तेंहि कसं सांगायचं हा प्रश्नच आहे."

"कां ?"






"एक दिवसहि त्याला सुट्टी द्यायला आपण तयार नव्हतों. आतां सैलपणा दाखवूं लागलों तर काय समजायचं तें तो समजेल. फार हुषार माणूस आहे तो. आपण त्याच्या वागण्याला घाबरतों आहों हें तात्काळ त्याच्या लक्षांत येईल. आणि कदाचित् तो आणखी चेकाळल्यासारखा वागूं लागेल."

"खरं आहे." आणि विचार करीत बॅनर्जी म्हणाला, "डॉक्टर-कडूनच आपण तें त्याच्या कानावर घालूं."

"ठीक आहे" बॅनर्जीनें सुचवलेली तोड पटून मी म्हटलें,

"मग आतांच त्याला डॉक्टरकडे घेऊन जाऊं."

पण त्यानें आम्हाला गुंगारा दिलेला होता. आमच्याबरोबर डॉक्टरकडे यायला तो विशेष राजी नाहीं हें आमच्या लक्षांत आलेलें होतें. पण तें टाळण्यासाठीं तो अशी चलाखी करील असें वाटलें नव्हतें. शिपायाला सांगून तो केव्हांच पसार झाला होता. आतां आज तरी डॉक्टरकडे जाणें जमत नाहीं असें पाहून मी बॅनर्जीला म्हटलें, "तुझे आणि आमचे संबंध चांगले आहेत—"

"होते—"

"असं कां म्हणतोस ?"

"आतां त्याच्या मनांत माझ्याविषयीं काय आहे कुणास ठाऊक !"

"तेंच समजावून घ्यायला मी तुला सांगणार आहें."

"म्हणजे ?"

"एकमेकांच्या घरीं तुमचें जाणें येणें आहे. त्यामुळें आज मुद्दाम तू त्याच्या घरीं गेलास तरी त्याला कांहीं संशय येणार नाहीं. जातांना कुणाला तरी बरोबर घेऊन जा. जमलें तर त्याच्या मनांत काय आहे तें समजावून घे. काम कठीण असलें तरी सावधगिरीनें वागलास म्हणजे झालें."

दुसऱ्या दिवशीं मी ऑफिसमध्यें गेलों तेव्हां माझे डोळे चुरचुरत होते. आदल्या रात्रीं मनांत डोकावणाऱ्या नाना शंकांनीं आणि विचारांनीं डोळ्याला डोळा लागला नव्हता. ऑफिसमध्यें घडत असलेला प्रकार मी घरीं मुद्दामच कुणापाशीं बोललों नव्हतों. सगळें मनांतल्या मनांत ठेवलें होतें आणि त्याचाच फार त्रास झाला होता. आणि आतां बॅनर्जीकडून काय समजतें म्हणून दडपल्यासारखें वाटत होतें. पण माझ्या मनाची चलबिचल मी कुणाला समजूं दिली नाहीं. तसाच केबिनमध्यें शिरलों. पावरीकडून आलेली तार टेबलावर माझी वाट पहात होती. भाऊ अत्यवस्थ असल्यामुळें तो तडकाफडकी संजाणला निघून गेला होता. भावाला बरें वाटल्याशिव परतणार नव्हता. त्याचें संजाणला निघून जाणें आणि तिथून तार पाठवणें मी समजूं शकत होतों. पण कांहीं बोलण्यांत अर्थ नव्हता. तिघे होतों. आतां दोघेच राहिलों होतों...दोघेच !

केबिनचें दार उघडून बॅनर्जी आंत आला तेव्हां मी म्हटलें," ये—तुझीच वाट पहात होतों" आणि विचारलें, "भेटला ?"

"भेटला—"

"कशी आहे त्याची प्रकृति ?"

"प्रकृति गेली खड्ड्यांत. डोक्यावर खरोखरच परिणाम झाला आहे कीं ढोंग करतो आहे कांहीं कळत नाहीं"

"म्हणजे ?"

"तर्कशुद्ध बोलत होता. डावपेंचाचें बोलणें करीत होता. भलतंच कांहीं बोलत होता—"

"काय बोलत होता ?"

"कुणाचा तरी खून करण्याचे विचार त्याच्या मनांत घोळताहेत..."

"त्याच्यापासचा चाकू तर मी काढून घेतला आहे."

"असा एक चाकू गेला तरी पांचपंचवीस मी जमवले आहेत असं सांगत होता. त्याचा डाव नक्की कुणावर आहे तें समजत नाहीं. पण पावरीला जपून वागायला सांगितलं पाहिजे."

"पावरी आजपासून रजेवर गेला आहे."

"मग तुम्ही काळजीनं वागलं पाहिजे."

"माझ्याविषयीं तसं कांहीं बोलत होता ?"

स्पष्ट बोलला नाहीं. पण तुमच्याविषयीं चिडीनें बोलत होता. यशस्वीपणाची तुमची गुर्मी उतरवली पाहिजे असं म्हणत होता."

"पण मी—मी तर तसा कधीं वागत नाहीं. कुणीहि सांगेल."

"वेड्या माणसाला तें कळायला हवं ना ?"

"असं अर्धवट बोलूं नको. काय असेल तें स्पष्ट सांग."

बॅनर्जी सांगत होता आणि माझ्या अंगाला दरदरून घाम सुटत होता. त्यानें सांगितलेली हकीगत फार भयंकर होती. कुणाचा तरी खून करायचा विचार त्याच्या मनांत निश्चितच होता. तशी तो दोघाचौघांचीं नांवें घेत होता. ह्या दोघांचौघांत पावरीचें आणि माझें नांव होतें. आमच्यासारख्या माणसांची जगांतून हकालपट्टी केली पाहिजे असें तो म्हणत होता. आतां तो हें वेडाच्या भरांत बोलत होता कीं खरोखरच तसें त्याच्या मनांत होतें तें कळत नव्हतें त्याच्या डोक्यावर खरोखर परिणाम झाला आहे किंवा नाहीं तेंहि समजत नव्हतें. त्याच्या फॅमिली डॉक्टरना नक्की असे कांहीं निदान करता येत नव्हते. पग त्याच्या








घराण्यांत वेडाची भावना होती. त्याच्या चुलत्याला वेड लागलेलें होतें. वेडाच्या भरांत ते कुणाचा तरी खून करायला निघाले होते आणि तें जमलें नाहीं म्हणून त्यांनीं आत्महत्या केली होती. काकाचा वारसा पुतण्या चालवू पहात होता. फरक एवढाच होता कीं त्याच्या हातीं कुणी लागतें कीं तो स्वतःच बळी जातो तें ठरायचें होतें. पण कांहीं असलें तरी हें फार भयंकर होतें. त्याच्या हातीं लागणारा माणूस मीहि असण्याची शक्यता होती. बॅनर्जी सांगत होता आणि आदल्या दिवशीं त्याच्या हातांतून काढून घेतलेल्या चाकूचें पातें एक-सारखें नजरेसमोर येत होतें. खिशांत ठेवलेला चाकू शरिराला टोंचला तेव्हां मी एकदम बॅनर्जीला म्हटलें, "बस्स् झालें. आतां तडकाफडकी त्याचा निकाल लावतों. टेलिफोन करून पोलिसांना कळवतो."

"नको नको —"

"कां ?"

"जड जाईल आपणाला तें. त्याच्याविरुद्ध निश्चित असा कोणताच पुरावा आपल्यापाशीं नाहीं. शिवाय—"

"शिवाय काय ?"

"पोलिसांत कुणी कळवलं तें त्याला कळेल आणि मग भलतीच आफत ओढवेल."

"मग अशा स्थितींत करायचं तरी काय ?" आणि हताशपणें मी केबिनमधें फेऱ्या मारूं लागलों. मध्येंच बॅनर्जीला विचारलें, "तो जायला अजून किती दिवस आहेत ?"

"सात आठ तरी आहेत —"

"मग हे एवढे दिवस त्याला रजा घ्यायला सांग."

"सांगून पाहिलं पण रजा घ्यायला तो तयार नाहीं. रोज ऑफिसमधें येणार असं म्हणणें—"

"जुलूम आहे हा—जुलूम आहे" आणि मी पुन्हा फेऱ्या मारूं लागलों. पाय लटपटूं लागले आणि घशाला कोरड पडली तसा खुर्चीवर येऊन बसलों. बेल वाजवून पाणी मागवलें आणि बॅनर्जीकडे शून्यपणें पाहूं लागलों. मला धीर देण्याकरतां तो कांहीं बोलू लागला पण आतां कांहीं ऐकण्याच्या स्थितींत मी नव्हतों. खुणेनेंच मी त्याला जायला सांगितलें. बॅनर्जी गेला आणि पाणी घेऊन शिपाई आंत आला. पाण्याचा घोट घेत त्याला विचारलें, "पांडे आला आहे ?"

"आले आहेत. बोलावूं ?"

"कशाला ?"

"तुमची ते चौकशी करीत होते. तुम्ही आले आहांत का असं विचारीत होते." तो माझी कशाकरितां चौकशी करीत होता ? आजच कांहीं करायचें त्याच्या मनांत होतें कीं काय ! तसेंच असेल असें पुन्हापुन्हा वाटूं लागलें आणि मी कमालीचा घाबरलों. टेबलावर पसरलेले कागद तसेच टाकीत मी शिपायाला म्हटलं, "मी बाहेर जातों. लक्ष ठेव—" आणि मागचापुढचा विचार न करतां मी तडक ऑफिसच्या बाहेर पडलों.

माझ्यावर हें काय भलतेंच संकट आलें होतें ! किती सुखांत होतों मी ! आणि आतां तें काय होत होतें ! स्वप्नातसुद्धां मी कुणाचें वाईट चिंतिलें नव्हतें. कुणी डूक ठेऊन मला मारायला निघावें असा वागलों नव्हतों. पांडेशीं तर नेहमींच विशेष सहानुभूतीनें वागलों होतों. आणि आज तोच माझ्या जिवावर उठला होता. कुठच्याहि क्षणीं, पाठींत चाकू बसण्याची शक्यता होती. तो समोरासमोर आला तर प्रतिकार तरी करतां येण्याची शक्यता होती. पण त्यानें छुपा हल्ला केला तर काय करायचें ? केबिनमध्यें शिरून एकदम अंगावर धावला तर त्याला कसें तोंड द्यायचें ? ऑफिसमध्यें फिरत असतांना, वाटेंत किंवा जिन्यावरच त्यानें गांठलें तर काय करायचें ? ह्या माथेफिरू माणसापासून स्वतःचें संरक्षण कसें करायचें कांहीं कळेना. विचार करूं लागलों आणि वाटलें कीं मी अगदीं एकटा आहें—अगदीं एकटा...

ऑफिसमधून बाहेर पडलों तो सरळ मित्राच्या ऑफिसमध्यें जाऊन थडकलों. मला भलत्याच वेळीं आलेला पाहून तो विचारांत पडला. माझ्या चेहऱ्याकडे पहात त्यानें विचारलें, "तुला बरें वाटत नाहीं काय ?"

"ठीक आहे."

"मग तुझा चेहरा पांढराफटक कां पडला आहे ?"

"सांगतों" आणि जसें जमेल तसें सगळें मी सांगून टाकलें. तो विचारांत पडलेला पाहून मी विचारले, "आतां काय करायचें ?"

"करूं—कांहींतरी करूं"

"उशीर होण्यापूर्वी केलेलें चांगलें" आणि मीं केविलवाणें हसलों.

"अरे असा घाबरूं नको. मी आहें ना."

"तूं आहेस रे. पण वेळ आली तर मला एकट्यालाच जावं लागेल."

"खुळा कीं काय तूं !" आणि विचार करीत त्यानें विचारलें, "त्याला तुझ्या घरचा पत्ता ठाऊक आहे काय ?"

"तसा एकदोनदां तो घरीं आला होता" आणि शंका येऊन विचारलें, "पण तूं हें कशाकरता विचारीत आहेस ?"

"सहज" आणि त्यानें विचारलें, "वहिनीला सावध करून ठेवलं आहेस कीं नाही ?"

"नाहीं—"

"मग आधीं घरीं जा आणि सगळा प्रकार त्यांच्या कानावर घालून ठेव." आणि माझ्याकडे पहात तो म्हणाला, "नाहींतर असं करूं, मीच येतों तुझ्याबरोबर." काय बोलावें मला कळेना. माझ्यासाठीं माझा हा मित्र हातांतलें काम टाकून माझ्याबरोबर यायला तयार होता. कुणाच्या तरी आधाराची मला जरूर होती. माझ्याबरोबर तो बाहेर पडला तेव्हां इतका वेळ गलबललेला माझा जीव थाऱ्यावर आला. घर जवळ आलें तेव्हां मी विचारलें, "त्याला माझा पत्ता ठाऊक आहे कीं नाहीं तें कशाकरतां विचारीत होतास ?"

"अरे ह्या वेड्या माणसांचा भरंवसा कुणी द्यावा ? तूं ऑफिसांत नाहींस असें पाहून घरींहि जायचा तुझ्या तो." तो बोलला आणि माझें हृदय थाड् थाड् उडूं लागलें. घरांत माझी बायको होती, सोन्यासारखीं मुलें होतीं. स्वतःवर कोसळूं पाहणाऱ्या संकटाची त्यांना कांहींच कल्पना नव्हती. माझ्या आनंदी संसाराचें करुण चित्र नजरेसमोर उभें राहिलें आणि मी मित्राला एकदम विचारलें, "तो घरीं गेला असेल का रे ?"

"तूं म्हणजे असा आहेस. तुझ्याजवळ कांहीं बोलण्यांत अर्थ नाहीं."

घरांत पाऊल टाकीपर्यंत माझ्या जीवांत जीव नव्हता. मी अवेळीं आलेला पाहून बायकोने विचाले, कांहीं, प्रकृति ठीक आहे ना ?"

"ठीक आहे" आणि श्वास टाकून म्हटलें, "आधीं पंखा लाव"

"तुम्ही असे घाबरलेले कां ?" आणि मित्राकडे वळून तिनें विचारलें "काय प्रकार आहे ?"

त्यानें आणि मी जसें जमेल तसें सगळें तिच्या कानावर घातलें. तिचा हंसरा चेहरा एकदम मावळला. माझ्याकडे पहात ती म्हणाली, "तुम्ही आधी आंतल्या खोलींत येऊन बसा बघूं"







अनुक्रमणिका

"वहिनी, तसें घाबरण्यासारखें नाहीं."

"नाहीं कसें ? ह्यांच्या जीवावर तो उठला—" आणि बोलतां बोलतां तिचा आवाज कांपरा येऊं लागला तेव्हां तिला मध्येंच थांबवीत मी बळेंबळेंच म्हटलें, "अग अशी घाबरूं नको."

"नाहीं घाबरत. पण तुम्ही आतां माझ्या दृष्टीसमोरून हलायचं नाहीं. उद्यांपासून रजा घ्या—"

पावरीनें रजा घेतली म्हणून मी आज सकाळींच हंसलों होतों. बॅनर्जीनें सांगितलेली माहिती ऐकून रजा घ्यायचा विचार माझ्याहि मनांत डोकावून गेला होता. शक्य असतें तर मीहि रजा घेतली असती. पण एवढ्या सहजासहजीं मला रजा मिळणें शक्य नव्हतें. आणि आतां ती म्हणत होती, 'उद्यांपासून रजा घ्या.'

"रजा मिळणार नाहीं—"

"मिळणार नाहीं कशी ! रजा घ्या आणि आपण आपल्या गांवीं जाऊं"

"रजा मिळणार नाहीं म्हणून सांगतों ना !" बोलतां बोलतां माझा तोल गेला आणि आवाज एकदम चढला.

"अरे पण तूं असा चिडतोस कशाला ?" आणि माझा मित्र मला शांत करूं लागला. तो माझी समजूत घालूं लागला आणि मला एकदम भडभडून येईल असें वाटूं लागलें. कुणीच कांहीं बोलत नाहीं असें पाहून ती म्हणाली, "भाऊजी, तुम्ही तरी ह्यांना कांहीं सांगा."

"वहिनी, तुम्ही उगीच धीर सोडूं नका. ह्याची पुण्याई फार मोठी आहे. ह्यानें नुसता शब्द टाकला तरी पाचपंचवीस माणसं रात्रंदिवस संरक्षण करतील ह्याचं."

"त्याचबरोबर पोलिसांतहि कळवूं."

"नको नको—"

"कां ?"

मी कारण सांगितलें आणि म्हटलें, "सगळीकडूनच कोंडी केली आहे त्यानें माझी."

"तुम्ही कांहीं काळजी करूं नका."

मी आश्चर्यानें तिच्याकडे पहात राहिलों. माझ्या तोंडून बातमी ऐकून ती कमालीची घाबरली होती. तिचा हंसरा चेहरा काळवंडला होता. त्याच्या कचाट्यांतून सुटण्यासाठीं रजा घेऊन गांवीं जाण्याचा विचारहि तिनें बोलून दाखवला होता. पोलिसांत कळवायचें सुचवून पाहिलें होतें. आणि ह्यापैकीं कांहींच शक्य नसल्यामुळें मी हातपाय गाळले आहेत असं पाहून आतां ती मला धीर देत होती. 'तुम्ही कांहीं काळजी करूं नका' असं सांगून म्हणत होती, "स्पेशल ब्रँचचे घोलप माझ्या ओळखीचे आहेत. टेलिफोन करून सगळं त्यांच्या कानावर घालतें. त्यांचा सल्ला विचारतें" आणि डिरेक्टरीमधून ती त्यांचा नंबर शोधूं लागली.

दुसऱ्या दिवशीं मी घोलपसाहेबांच्या ऑफिसमध्यें गेलों तेव्हां ते माझीच वाट पहात होते. त्यांनीं माझ्याकडे एकदां नीट पाहून घेतलं आणि माझ्याबरोबर असलेल्या मित्राकडे पाहून विचारलं, "हे कोण ?"

"माझे स्नेही आहेत."

"मग हरकत नाहीं" आणि म्हटलं, "सांगा आतां. सगळं तपशीलवार सांगा."

काय सांगायचें आणि कसें सांगायचें तें आतां मला पाठ झालें होतें. तरीहि त्यांच्यासमोर बोलतांना मी अडखळूं लागलों. मी अडखळूं लागलों कीं एखादा प्रश्न विचारून ते मला बोलतं करीत. नानातऱ्हेचे प्रश्न विचारून त्यांनीं बारीकसारीक तपशीलासह सगळं समजावून घेतलं. माझ्याकडे रोखून पहात म्हटलं, "तुम्ही माझ्यापासून कांहींतरी लपवून ठेवीत आहां." काय बोलावें मला कळेना. जें घडलें होतें तें सगळं मी सांगितलं होतं. मी बोलत नाहीं असं पाहून ते म्हणाले, "तुम्ही सांगतां त्यावरून तुमचा खून करायला त्यानें कां प्रवृत्त व्हावें तें कळत नाहीं."

"वेड्या माणसाला कांहीं कारण थोडच लागतं !" माझ्या मित्राचे बोलणें ऐकून ते म्हणाले, "तुम्हाला वाटतं तसा तो वेडा झालेला वाटत नाहीं. वेड असलंच तर तें खून करायचं आहे. आणि मला कळत नाहीं कीं ह्यांच्याच पाठीं त्यानें कां लागावें !" माझेच विचार ते बोलून दाखवीत होते. मलाहि वारंवार प्रश्न पडत होता कीं माझाच डूक त्यानें कां धरावा ! मी त्याचे असें काय वाईट केलें होतें कीं त्यानें असें माझ्या जीवावर उठावें ! मी तसें बोलून दाखवलें तेव्हां ते म्हणाले, "तेंच आपण शोधून काढूं. मी ह्या माणसाविषयीं रिपोर्ट मागवलाच आहे. पण तुम्हीहि मला मदत केली पाहिजे" आणि त्यांनीं विचारलें, "ह्या माणसाच्या घरीं तुमचें कितपत जाणेंयेणें आहे ?"

"मुळींच नाहीं. मी एकदांहि गेलेला नाहीं."

"फार छान" आणि त्याच दमांत त्यांनीं विचारले, "मिसेस पांडेला तुम्ही ओळखतां कीं नाही ?"

"ओळखतों"

"कितपत ?"

ह्या प्रश्नाचा रोख मी समजूं शकत होतों. हें काय माझ्या नशिबीं आलें होतें ! कसातऱ्हेचे प्रश्न मला ऐकून घ्यावे लागत होते ! वाटलं कीं मी तशा तऱ्हेचा माणूस नाहीं हें त्यांना सांगून टाकावं. मित्रांशीं, ओळखीच्या लोकांशी किंवा ज्या घरांचीं दारें माझ्यासाठीं नेहमीं उघडीं असतात तिथें दगाबाजी करायचा विचार माझ्या मनांतहि येत नाहीं असं निक्षून सांगावं. पण कांहीं सांगून त्यांचे प्रश्न थांबणार नव्हते. ते विचारीत होते आणि मी उत्तरें देत होतों. माझे किती धिडवडे निघणार होते कुणास ठाऊक !

मी दिलेलीं उत्तरें ऐकून त्यांचें समाधान झालें असावें. कारण प्रश्न थांबवून ते म्हणाले, "तुम्हाला घाबरण्याचं कांहीं कारण नाहीं. सावध राहिलेत म्हणजे झालं." प्रत्येकजण मला हेंच सांगत होता. पण न घाबरण्यासाठीं काय करायचें तें मात्र कुणी सुचवीत नव्हता. घोलपसाहेबहि एवढंच सांगून मुलाखत संपवतात कीं काय अशा मी विचारांत आहें तोंच ते म्हणाले, "तुम्ही घाबरले आहांत असं त्याला दाखवूं नका. नेहमींप्रमाणें हंसत खेळत वागा. नेहमींप्रमाणें ऑफिसमध्यें जा. तुमच्या नेहमींच्या व्यवहारांत कुठल्याहि तऱ्हेनें खंड पडूं देऊं नका."

हें सगळं बोलायला सोपं होतं. इथें दुसऱ्या क्षणाची शाश्वती नव्हती आणि ते मला हंसत खेळत वागायला सांगत होते. कसं शक्य होतं हें ! मी तसं विचारलं तेव्हां ते म्हणाले, "सारा सातआठ दिवसांचा तर प्रश्न आहे. मी तुम्हांला संरक्षण देणार आहें; माझे लोक तुमच्यावर लक्ष ठेवतील. साध्या पोषाखातली आमचीं माणसं नेहमीं तुमच्या आजूबाजूला असतील. अगदीं ह्या क्षणापासून. माझ्यावर विश्वास ठेवा, कांहीं विपरीत होणार नाहीं." आणि माझ्या पाठीवर थाप मारीत त्यांनीं विचारलं, "मग तर नेहमीसारखं वागायला हरकत नाहीं !" त्यांचे आभार मानून आम्ही जायला निघालों तेव्हां ते म्हणाले,








काहीं अवशिष्ट राग



तलम पातळें रंगवलेलीं छापुनि चित्रविचित्र
डोइवरी टोपली–टाकुनी खांद्यावर छत्र
गल्लोगल्लीं फिरे कुणी वा दुकान कोठें मांडुनि
दिवसाच्या चौथ्या प्रहरीं हा सिद्ध जाहला

‘मुलतानी’—

“आतां जरासुद्धां काळजी करूं नका. मात्र जरा सावधगिरीनें वागा म्हणजे झालं.”

त्यांच्या ऑफिसमधून आम्ही बाहेर पडलों तेव्हां मी मित्राला म्हटलं, “हें चांगलं झालं नाहीं!”

“तूं उगाच घाबरतोस—”

“आता कुठें घाबरतों आहें?” आणि म्हटलं, “पण काय रे—”

“आतां आणखी काय?”

“घोलपसाहेबांचे लोक माझं संरक्षण करणार आहेत हे खरं. पण पण ऑफिसमध्यें काय करायचं?”

“त्याची नको काळजी करूं.”

आणि मी काळजी करू नये अशीच व्यवस्था सार्‍यांनीं केली. मी एकटा आहें, मला एकट्यानेंच संकटाशीं झगडायचें आहे असें वाटून मी जवळ जवळ कोसळलों होतों. पण माझ्या सग्यासोयर्‍यांनीं, मित्रांनीं आणि हितचिंतकांनीं मला साथ दिली. पुन्हा उभा केला. मी कुठेंहि गेलों तरी माझ्याभोंवती माणसें राहूं लागलीं. घरांत सोबतील नातेवाईक येऊन राहिले, बाहेर कुठें जाऊं लागलों तर घोलपसाहेबांची माणसें आगेमागें राहूं लागलीं आणि ऑफिसमध्यें माझे मित्र येत जात राहिले. केबिनमध्यें माझ्याबरोबर कुणी ना कुणी बसत राहिले. केबिनच्या बाहेर दरवाजाशीं शिपाई उभा राहूं लागला. ऑफिसमध्यें मी कुठेंहि फिरलों तरी शिपाई मागें मागें राहूं लागला. ‘मी ठीक आहे ना’ म्हणून फोनवरून वारंवार विचारणा होऊं लागली. उरावरचे भीतीचे ओझें कमी होऊं लागलें पण उपकाराचे ओझें वाढूं लागले. ह्या ओझ्याखालीं मी दडपला जाऊं लागलों. गुदमरू लागलों. स्वतःच्या प्राण धोक्यांत घालून हीं माणसें मला जपत होतीं. जणूं माझें संरक्षण करणें एवढेंच त्यांना ठाऊक होतें. त्याच भावनेनें तीं वागत होतीं. त्याची सावलीहि माझ्यावर पडूं नये म्हणून दक्षता बाळगीत होती.



पण असं असूनहि त्यानें दोन तीन वेळां मला गांठायचा प्रयत्न केला. केबिनचे दार उघडून तो डोकावून पाही आणि माझ्याबरोबर आंत कुणी बसलेलें आहे असें दिसलें कीं माघारी वळे. असाच तो एकदां माघारी वळूं लागला तेव्हां हांक मारून मीच त्याला आंत बोलावून घेतलें. तो आंत आला तसा माझा मित्र सावध होऊन त्याच्या हालचालीकडे लक्ष ठेवूं लागला. पाठोपाठ शिपाईहि आंत आला. तो थोडाफार गांगरला पण धीर करून खुर्चीवर बसला. त्याच्याकडे पहात मी म्हटलें, “तुम्हांला माझ्याशीं कांहीं बोलायचं आहे असं दिसतं.”

“हो—”

“बोला—”

खुर्चीवर त्याच्या शेजारीं बसलेल्या माझ्या मित्राकडे आणि त्याच्यावर लक्ष ठेवून पण काम चालू आहे असे भासवीत उभा असलेल्या शिपायाकडे पहात तो म्हणाला, “खाजगी बोलायचं होतं.”

“कांहीं हरकत नाहीं. बोला.”

“पण” आणि त्या दोघांकडे तो पुन्हा पाहूं लागला. शिपायाला खूण करून मी बाहेर जायला सांगितलं आणि त्याला म्हटलं,

“ह्यांच्या देखत खाजगी बोलायला हरकत नाहीं. माझे मित्रच आहेत हे.”

कुचंबणा झाल्याप्रमाणें त्यानें चुळबूळ केली आणि माझ्याकडे पहात म्हटलं, “तुम्ही हल्लीं अवस्थ दिसतां—”

“अस्सं!” आणि म्हटलं, “तुम्ही माझ्यावर फार बारकाईनें लक्ष ठेवलेलं दिसतं.”

“नाहीं. तसंच कांहीं नाहीं. वाटलं तें आपलं बोललों” आणि त्यानें एकदम विचारलें, “तुम्हाला कुणाची भीति वाटते काय?”

“मी कशाला कुणाला घाबरू?”

“तेंच मी तुम्हाला सांगणार होतों. Relax Completel yrelax. तुम्हाला कुणीसुद्धा कांहीं करणार नाहीं.”

“पण कुणी कांहीं करणार आहे हें कसं कळलं तुम्हाला?” माझ्या ह्या प्रश्नावर तो गडबडला. काय उत्तर द्यावें त्याचा विचार करीत राहिला. तो बोलत नाहीं असें पाहून मी म्हटलें, “हेंच सांगायचं होतं काय?”

“नाहीं नाहीं. मी तुम्हाला बोलावणं करायला आलों होतों. माझ्या घरीं तुम्ही चहाला यावं अशी माझी इच्छा आहे” आणि घाईला आल्याप्रमाणें त्यानें विचारलं, “केव्हां येतां?”

तो केव्हां जाणार तें मला ठाऊक होतं. रविवारच्या फ्रॉंटियरचीं त्यानें तिकिटें काढलेलीं होतीं. विचार केल्यासारखें करीत मी म्हटलें, “दोनचार दिवस फार गडबडींत आहें. तरीहि तुमच्याकडे येईन. येत्या सोमवारचें ठरवा.”

“सोमवार म्हणजे उशीर होतो—”

“कां बरं?”

“रविवारीं निघायचं ठरवलं आहे मी—”

“मग चहाचं राहूं दे—”

“नाहीं. माझा जायचा बेत पुढें ढकलीन मी. पण सोमवारीं तुम्ही चहाला आलंच पाहिजे.”

'मुंबईत असलों तर येतोंच' असं मला म्हणायचं होतं पण गडबडींत मी म्हटलं, "असलों तर येतोंच."

"तेंहि खरं" आणि चमत्कारिकपणें हंसत तो केबिनच्या बाहेर पडला.

ही आणखी भलतीच आफत मी ओढवून घेतली होती. मला वाटलं होतं कीं, मी एकटा हातीं लागत नाहीं असं पाहून तो माझा नाद सोडून देईल. पण त्यानें माझा पिच्छाच पुरवायचा ठरवलेलें दिसत होतें. माझ्याशीं असें डावपेंचाचे धोरण ठेवीत होता आणि मनांतला हेतु पुरा होत नाहीं असें पाहून इतरांशीं पिसाळल्यासारखा वागूं लागला होता. आणि तें सारें आपल्याच तोंडानें बॅनर्जीला सांगत होता. सकाळीं बसमधून ऑफिसला येतांना झटका आल्याप्रमाणें तो वागला होता. फाऊंटनला बस वळली आणि उन्हाची तिरीप त्याच्या डोळ्यावर आली. डोकें भणाणलें आणि हात शिवशिवूं लागले. आपण काय करीत आहों हें ध्यानांत यायच्या आंत त्यानें पुढ्यांत बसलेल्या पॅसेंजरची मान पकडली होती. बसमध्यें एकच गोंधळ उडाला होता. धक्के मारून लोकांनीं त्याला बसमधून टाकून दिलें होतें. आणि हें सारें त्यानें बॅनर्जीला सांगितलें होतें.

हें त्याचें असें पिसाळल्यासारखें वागणें आणि आपल्याच तोंडानें तें सांगणें हा त्याच्या वागण्यांतला एखादा डाव होता कीं काय तें कळत नव्हतें. सगळें त्याला पद्धतशीरपणें तर उरकावयाचें नव्हतें ! वेडाचे ढोंग पांघरून तर माझा काटा काढावयाचा नव्हता ! मी तसें बॅनर्जीला विचारलें तेव्हा तो म्हणाला, "कुणी सांगावें ! तो तुमच्या पाठीं आहे एवढें मात्र खरें—"

"असला तरी मी आतां त्याच्या हातीं लागत नाहीं. कडेकोट बंदोबस्तांत आहें मी—"

"असे किती दिवस राहणार तें पाहतो असं म्हणत होता—"

"पण रविवारी तर तो जाणार आहे."

"तुमच्यासाठीं थांबणार आहे."

"म्हणजे सोमवारीं मी खरोखरच चढाला जाईन..."

"साहेबांनीं चढाला आलंच पाहिजे असं म्हणत होता."

"तो ढीग म्हणेल."

"तुम्ही एकदां जाऊन यावं हें चांगलं."

"बॅनर्जी, तूंच का हे मला सांगतो आहेस ?"

"तुमच्या चांगल्यासाठींच सांगतो आहें. मीहि येईन त्या दिवशीं. दोघांचौघा मित्रांना घेऊन जाऊं. चांगले तयारीनें जाऊं."

"नाहीं. तें कदापि होणार नाहीं."

"पहा तुम्ही. पण जावं हें चांगलं."

"कां ?"

"किती दिवस हा मनस्ताप सहन करणार तुम्ही ?"

"म्हणजे ?"

"तुमचा अंत पाहणार आहे तो. कितीहि दिवस लागले तरी मुंबई सोडणार नाहीं असं म्हणतो."

मी मनांतून एकदम टरकलों. पण माझ्याभोंवतीं संरक्षणाचें एवढें कडें असतांना तसें दाखवणें खरोखरच भेकडपणाचें ठरलें असतें. आवाज चढवीत मी म्हटलें, "पाहूंच मग काय होतें तें."

"उगाच आततायीपणा करूं नका. इरेला पडूं नका."

"कांहींसुद्धां सांगूं नको मला. निरोप कळव माझा त्याला. सांग कीं माझ्या अंगावर हात पडण्यापूर्वीं खांडोळीं होतील त्याचीं."

"हात न टाकतां काम उरकायचा बेत आहे त्याचा—"

"स्पष्ट बोल काय तें"

"सांगतों. सावध करण्याकरतां सांगतों. पण माझ्यावर असे रागावूं नका—"

"सांग लौकर—"

"चाकू फेकून मारण्याची प्रॅक्टिस करतो आहे तो."

नाहीं सहन होत आतां हें. नाहीं सहन होत. किती दिवस सोसायचं ! किती दिवस संरक्षण घेऊन वागायचं ? किती दिवस जीव मुठींत घेऊन वावरायचं ? एकदां सोक्षमोक्ष लागलाच पाहिजे. नाहींतर

(पान २१० पहा)

# नवें नाटक

( पान ९ वरून )

खो खो हसत नारद उत्तरले, 'ह्या आधुनिक गोष्टी तुला कळायच्या नाहीत, हें विसरलोंच होतों मी. हें तिकीट काढणारं पोस्ट-खातं तुझ्या वेळीं असतं, तर तुझ्या यक्षानं बायकोला मेघाबरोबर संदेश पाठविला नसता ! त्यानं तिला 'एक्सप्रेस पत्र' धाडलं असतं. तार ठोकली असती. तो तिच्याशीं फोनवरून बोलला असता !'

'एक्सप्रेस पत्र,' 'तार', 'फोन' हे शब्द ऐकून कालिदास वेड्यासारखा नारदांकडे पाहूं लागला. ते हसत म्हणाले, 'तुझ्या वेळचं जग आतां राहिलं नाही बाबा ! फार सुधारणा झाल्याहेत पृथ्वीतलावर चल! जातां जाता सारं तुला सांगतों मी. माझ्याबरोबर अदृश्य रूपानं तुला सर्वत्र संचार करतां येईल. कुठल्याहि भाषेत कुणी बोलत असलं तरी तुला तें कळेल. अंतर्ज्ञानानें प्रत्येक मनुष्याचं चरित्र मला चटकन् समजतं तें मी तुला सांगत जाईन. सुंदर नाट्यकृति निर्माण करायला तुझ्यासारख्या महाकवीला आणखी काय हवं ?'

३

नारदमुनि कालिदासासह पृथ्वीवर उतरले, ते पाषाणपुरांतल्या एका महाविद्यालयाच्या वर्गांतच! तिथे 'शाकुन्तला'चें अध्ययन चाललें होतें.

एक हडकुळा पोरगेला प्राध्यापक व्यासपीठावर उभा होता. एका लठ्ठ पुस्तकांत डोकें खुपसून 'निसर्गकन्या शकुन्तला' या विषयावरलें एका इंग्रज पंडिताचें मत तो वाचून दाखवीत होता. प्राध्यापकांचें वाचन वर्गात सुरू नसून बाहेर रस्त्यावर चाललें आहे, असें अनेक मुलांच्या चेहेऱ्यांवरून वाटत होतें ! शकुंतलेच्या हरिणीवरल्या प्रेमाचा उल्लेख होतांच मागच्या बाकावरल्या एका टोकाने 'म्यॅांव्-म्यॅांव्' केलें ! त्याला दुसऱ्या टोकाकडून उत्तर मिळालें, 'भुक्-भुक्' !

प्राध्यापकांनीं हातांतल्या इंग्रज ग्रंथकाराला टेबलावर आपटलें. ते ओरडले, 'सायलेन्स ! शाकुंतल वाचतोंय आपण ! अर्नाळकरांची रहस्यकथा नाही ! महाकवि गटे हें नाटक डोक्यावर घेऊन नाचला होता !'

'मग तुम्ही तें हातांत कां घेतां ?' मागच्या बाकावरला हिटलरी मिशांचा अभिमान बाळगणारा एक वीर पुटपुटला ! त्या बाकावर हशा उसळला. प्राध्यापक पुन्हा ओरडले, 'सायलेन्स !'

इतक्यांत पुढल्या बाकावरला एक गोरटेला, कुरळ्या केसांचा मुलगा उठला. 'सर, माझी एक शंका आहे.'

'बोला.' प्राध्यापक गुरगुरले !

'कालिदास हा अश्लील लेखक आहे काय ?'

'कोण म्हणतं असं ?' प्राध्यापक खेकसले !

"आमचे काका म्हणतात ! ते 'संस्कृति-संवर्धक मंडळ'चे दुय्यम चिटणीस आहेत. त्यांनी आज सकाळीं मला प्रियंवदेच्या एका वाक्याचा अर्थ विचारला. बोलतां बोलतां तो क्षणभर थांबला. मग चाचरत म्हणाला, 'आत्मनः पयोधर विस्तारयितृ यौवनं उपालंभस्व' या वाक्याचा काकांनी अर्थ विचारला मला. तो सांगायची मला लाज वाटूं लागली. त्याबरोबर ते म्हणाले, 'अश्लील, अश्लील म्हणतात तें हेंच.'

'यांत अश्लील काय आहे सर ?' मागून एक आवाज आला.

'आम्हांला याचा अर्थ कळला नाही सर' लगेच दुसरा आवाज आला ! वर्गात एकच गोंधळ सुरू झाला. मुलींवर कागदी बाण येऊन पडूं लागले !

नारदमुनींचा हात धरून बाहेर जात कालिदास म्हणाला, 'मुनिवर्य, तरुण मुली आपापसांत एकमेकींची नेहमी थट्टा मस्करी करतात. त्या थट्टेचा एक नमुना म्हणून हें वाक्य मीं लिहिलं. माझ्या अर्थाचा असा अनर्थ होईल—'

नारदमुनि म्हणाले, 'त्यांत कसला आलाय् अनर्थ ? पिढ्यान् पिढ्या विद्यार्थी तुझ्या शाकुन्तलाचा अभ्यास करताहेत इथं केवढा गौरव आहे हा तुझा !'

ते उपहासाने बोलत आहेत कीं काय, अशी कालिदासाला शंका आली. तो खाली मान घालून त्यांच्या मागून मुकाट्याने जाऊं लागला.

४

ते दोघे एका चित्रपटगृहाजवळ आले.

'हें काय ?' कालिदासाने कुतूहलाने प्रश्न केला.

'इथंच जायचंय आपल्याला ! तुझ्या नाटकावरनं तयार केलेला मद्रदेशीय चित्रपट इथं सुरू आहे.'

चित्रपट गृहाच्या इमारतीवर एक भलें मोठें भडक चित्र दिसत होतें. त्या चित्रांतली तरुणी कमींत कमी दोन-तीन मुलांची आई असावी. तिच्या कडेवर एक चिमुकली घागर होती. पण ती पाणी आणायला चालली आहे, असें कांही त्या चित्रावरून वाटत नव्हतें ! तिच्या अनेक अवयवांना अकारण दिलेला उठाव—

कालिदासाने रुष्ट स्वराने विचारलें,

'ही—ही बाई कोण ?'

नारदमुनि हसत उत्तरले, 'अरे वेड्या, तुझी मानसकन्या तुला ओळखतां येत नाही ?'

मालवांतल्या वनभागांतले ते दोन निरागस डोळे कालिदासाला आठवले. आपल्या काळजांत कुणीतरी तीव्र शस्त्र खुपसलें आहे आणि तिथल्या रक्ताने हें समोरचें चित्र रंगविलें आहे, असें त्याला वाटलें !

दोघे आंत गेले. चित्रपटगृह तुडुंब भरलें होतें. सारे प्रेक्षक पडद्यावर चाललेल्या नृत्यांत गुंग होऊन गेले होते !

कालिदासाने प्रश्न केला, 'या कोण नाचताहेत ?'

नारद हसत उत्तरले, 'आज झालंय् तरी काय तुला असं ? ही मधली तुझी शकुन्तला ! बाकीच्या तिच्या मैत्रिणी !'

'या अशा नाचताहेत कशासाठी ?'

शकुंतलेच्या विवाहाला कण्वाचा आशीर्वाद मिळाला, तेव्हां ती आनंदानं लाजली, असं तूंच लिहिलं आहेस ना ?'

'हो.'

'त्यावेळीं तिला झालेला आनंद व्यक्त करण्यासाठीं दिग्दर्शकानं हें नृत्य घातलं आहे !'

'कण्वमहर्षि आणि गौतमीआत्या यांना या नृत्यांत दिग्दर्शकानं भाग घ्यायला लावलं नाही हें आपलं भाग्य,' असें कालिदासाच्या मनांत आलें. तो नारदांना म्हणाला, 'मुनिवर्य, कण्वांनीं आशीर्वाद दिला त्यावेळी शकुन्तलेनं काय केलं असेल सांगूं ! ती धावत आपल्या आवडत्या हरिणीपाशी गेली असेल ! तिच्या कानांत तिनं हें गुपित सांगितलं असेल ! ती धावत आपल्या लाडक्या वनज्योत्स्नेकडे गेली










असेल. नुसत्या स्पर्शानं आपलं हें गुपित तिनं तिला सांगितलं असेल! छे छे छे! हें बघवत नाहीं मला. चला इथनं मुनिराज!'

५

ते एका सभागृहासमोर आले. दारांत ठेवलेल्या काळ्या फळ्यावर 'महाकवि कालिदास' अशीं अक्षरें स्पष्ट दिसत होतीं. या सभागृहांत आपल्या काव्य नाटकांची चर्चा सुरू असावी असा कालिदासाने तर्क केला. त्याच्या मनावर आलेलें निराशेचें पटल दूर झालें.

ते सभागृहांत गेले. कालिदासाने चोहीकडे पाहिलें. पुढल्या रांगेंत बसलेली आणि खूप नट्टापट्टा केलेली एक पुरंध्री चक्क झोपली होती! तिच्या घोरण्याच्या आवाजाने झोपमोड झाल्यामुळेच कीं काय, शेजारची 'बॉब्कट्' केलेली बाई तिच्याकडे डोळे वटारुन पहात होती! मागच्या रांगेंतल्या दोन तरुण मुली किलविलत विणकाम करीत होत्या. त्यांच्या शेजारींच एक म्हातारे गृहस्थ हातांतल्या अंकांतलीं नटींचीं चित्रें चविष्टपणाने पाहत होते. मधूनच ते खिशांतून शेंगदाण्याचा पुडा काढीत आणि त्यांतले चारदोन दाणे तोंडांत टाकीत!

व्यासपीठावर पगडी घातलेले एक गृहस्थ तावातावाने बोलत होते. अध्यक्ष म्हणून बसलेला मनुष्य शिकाऊ शिल्पकारानें बनविलेल्या पुतळ्यासारखा दिसत होता! 'मेघदूतांतला रामगिरी नागपूरपाशींच आहे', असें वक्ते अट्टाहासानें सांगत होते! त्यांनीं रामगिरीहून अलकेकडे जाणाऱ्या मेघाच्या मार्गाचा नकाशा मागच्या भिंतीवर लावला. हातांतल्या छडीने त्या नकाशावरलें प्रत्येक स्थळ दाखवूं लागले. आपल्या काव्याचा भूगोलाशीं इतका निकट संबंध असेल, याची कालिदासाला आत्तांपर्यंत कल्पना नव्हती! त्याच्या मनांत आलें, जें जें सुंदर आपण पाहिलें, तें तें 'मेघदूतां'त आणण्याचा आपण प्रयत्न केला—मेघाच्या मार्गाचा नकाशा काढून मग कांहीं आपण 'मेघदूत' लिहायला बसलों नाहीं!

पहिल्या गृहस्थांचें वक्तव्य संपतांच दुसरे गृहस्थ टुणकन् उडी मारुन व्यासपीठावर आले. ते बोडके होते. 'रामगिरी नागपूरकडे नाही, भवभूति विदर्भांत झाला तसा कालिदासाचाहि त्या भागाशीं निकट संबंध होता हें दाखविण्याकरिता पगडीवाले पंडित या बोटावरची थुंकी त्या बोटावर करीत आहेत,' असें त्यांनीं सांगितलें! मेघ ज्या वाटेने अलकेकडे गेला, तिचा नकाशा त्यांनीहि आणला होता. त्या मार्गक्रमणाचें वेळापत्रकहि ते सांगूं लागले! 'वकील खोटा साक्षीदार तयार करतो त्याप्रमाणें पहिल्या पंडितांनी आपल्या नकाशांत बनवाबनवी केली आहे', असें त्यांनी ठासून विधान केलें! लगेच सभेच्या एका भागांतून 'शेम, शेम' अशी आरोळी उठली. त्याबरोबर दुसऱ्या भागांतून 'खाली बसा, खाली बसा' असा आरडाओरडा सुरू झाला. 'ब्रह्मदेव खाली आला तरी सत्य खाली बसणार नाही!' असें वक्ते ओरडले! लगेच सभेंत गोंधळ सुरू झाला. 'शांत व्हा, शांत व्हा,' म्हणून चारदोन लोक ओरडत होते, पण त्यांचें कुणी ऐकेना!

ठिणगीचें रूपांतर ज्वाळेंत व्हावें आणि त्या ज्वाळेमुळें एखाद्या मोठ्या घराला आग लागावी तशी सभेची स्थिति झाली! कांही लोक व्यासपीठाकडे धावले, कांही बाहेर जाऊं लागले. विणकाम करणाऱ्या मुली 'अय्या! अगबाई!' असे उद्गार काढीत पळत सुटल्या. पहिल्या रांकेत झोपलेल्या बाई डोळे उघडून 'सभा संपली का?' म्हणून विचारूं लागल्या!

व्यासपीठावर दोन्ही पक्ष नुद्यावरुन गुद्यावर आले होते! इतक्यांत दारांतून कुणीतरी बाहेर ओरडत गेलें, 'पोलीस, पोलीस!'

६

सभागृहांतून बाहेर पडल्यावर कालिदास खिन्न स्वरांत म्हणाला, 'मुनिराज, 'मेघदूता'च्या पायीं मारामाऱ्या होतील, अशी पुसट शंका मला आली असती, तरी तें लिहिण्याचा मूर्खपणा मीं केला नसता! या पाषाणपुरांत पाहिलं तेवढं पुष्कळ झालं! आतां अवंतीला चला!'

नारद हसत उत्तरले, 'छे छे छे! तें शक्य नाही! अवंतीपेक्षाहि या नगरांत तुझं भव्य स्मारक होणार आहे म्हणे! त्या समितीची सभा आत्ताच आहे. ती पाहिल्याशिवाय तूं जाणार?'

दोघे नगराबाहेर पडले. लवकरच ते एका प्रशस्त बंगल्याजवळ आले. बंगल्याभोंवतीं मोठी बाग होती. अंगठींत खडा चमकावा, तसा त्या बागेच्या मध्यभागीं बंगला उठून दिसत होता!

कालिदासाने विचारलें, 'हा प्रासाद कुणाचा?'

'मनमोहन मुंदडा यांचा बंगला आहे हा! 'कालिदास-स्मारक-समिती'चे अध्यक्ष आहेत ते!'

'शाकुंतल वाचलंय् वाटतं त्यांनी?'

'छे छे! शेटजींना वाचायला वेळ कुठं आहे? त्यांना फक्त सुभाषित ठाऊक आहे—'वेळ म्हणजे पैसा!''

'मग ते—'

'केवळ लोकाग्रहास्तव ते या समितीचे अध्यक्ष झाले आहेत. म्हणजे त्यांच्याकडनं मोठी देणगी मिळेल या आशेनं लोकांनीं त्यांना अध्यक्ष केलं आहे!'

'हे श्रेष्ठी कसला व्यापार करतात?'

'सोन्यापासनं दालचिनीपर्यंत कसलाहि! लढाईच्या काळांत त्यांनी काळाबाजार केला! भरपूर पैसा मिळवला! त्या पैशाच्या बळावर सारे धंदे करतात ते! आता ज्या दिवाणखान्यांत आपण जाणार आहोंत, त्याच्याखाली शेटजींचं मोठं तळघर आहे!'

'सोन्याचा मोठा साठा असेल तिथं.'

'छेः! तिथं फक्त पंचवीस कारकून असतात! ते खोटे हिशेब लिहिण्याचं काम—'

बोलतां बोलतां दोघांनी दिवाणखान्यांत प्रवेश केला. मध्यभागीं सुटाबुटांत खुर्चीवर बसलेले गुबगुबीत गृहस्थ मुंदडा शेटजी असावेत, हें कालिदासाने ताडलें. त्यांच्या दोन्ही बाजूंना दहा-पंधरा मंडळी खुर्च्यांवर बसली होती. त्या सर्वांचें खाणें-पिणें चाललें होतें! तें पाहून कालिदास कुजबुजला, 'वाट चुकलांत तुम्ही मुनिराज! इथं सभा नाही आज!'

नारद हसून उत्तरले, 'अरे बाबा, खाणंपिणं हा आधुनिक सभा-संमेलनांतला फार महत्त्वाचा भाग आहे! कांही सभांत तो शेवटीं साजरा होतो. पण आज इथं भरतवाक्याची नांदी झालेली दिसतेय!'

लवकरच 'स्मारक-समिती'चे सर्व सभासद हात रुमालांनी तोंडें पुशीत कामासाठी सुसज्ज झाले! अध्यक्ष मुंदडा शेठजी भाषण करण्याकरितां उठले. ते म्हणाले, 'मित्र हो, आपली समिति कशासाठी नेमली आहे, तें तुम्हां सर्वांना ठाऊक आहेच. कालिदास नांवाचा एक फार मोठा कवि आपल्या देशांत होऊन गेला, असं म्हणतात. (सभेंत सौम्य हास्य.) 'म्हणतात' असं मी म्हणालों तें माणसानं नेहमीं खरं बोलावं म्हणून. महात्मा गांधींच्या पायापाशीं आम्हीं सत्याचे धडे घेतले आहेत, (टाळ्या) हें आम्ही तुम्हाला सांगायला हवं असं नाहीं. कालिदासाविषयीं आम्हाला फार फार फार आदर आहे. त्याचीं सारीं पुस्तकं सोनेरी बाइंडींग करून आम्ही आमच्या कपाटांत ठेवलीं आहेत.' शेटजींनीं मोठ्या अभिमानाने मागे वळून एका सुंदर कपाटाकडे बोट दाखवलें. मग खाकरून घसा साफ करीत ते बोलूं लागले, 'अमेरिकेला गेलेले आमचे थोरले सुपुत्र परत येऊन उद्योगधंदा पाहूं लागले, म्हणजे आम्ही हीं सारीं पुस्तकं वाचणार आहोंत. काशीहून शास्त्री बोलावून वाचणार आहोंत. सारांश काय, कालिदास हा फार मोठा कवि आहे! इतका मोठा—इतका भयंकर मोठा—' शेटजींना पुढें काय बोलायचें तें सुचेना! त्यांनी आपले दोन्ही हात उंच दूर करून कालिदासाचें मोठेपण श्रोत्यांना पटविण्याचा प्रयत्न केला!

त्यांच्या त्या अभिनयाकडे कालिदास केविलवाण्या मुद्रेने पाहूं लागला.

शेटजी पुढे बोलूं लागले, 'या फार मोठ्या कवीचं स्मारक इतर ठिकाणांप्रमाणं आपल्या शहरांतहि झालं पाहिजे. तें कोणत्या तऱ्हेचं असावं, हें आजच्या सभेंत ठरवाचं आहे.'

शेटजी खाली बसले. टाळ्या वाजल्या! मग जुना कोट आणि बिन-इस्त्रीची गांधी टोपी घातलेला एक मध्यम वयाचा मनुष्य उठून म्हणाला, 'आपण किती पैसे जमवू शकूं तें आधीं ठरवूं या. मग—'

'खाली बसा.' त्या गृहस्थाच्या डाव्या बाजूला बसलेल्या धष्टपुष्ट माणसानें त्याच्या कोटाची बाही ओढीत म्हटलें! मास्तर मुकाट्याने खाली बसले!

कालिदासाने विचारलें, 'मुनिवर्य, हा गलेलठ्ठ मनुष्य कोण?'

नारद उत्तरले, 'तो इथल्या पहिलवानाचा पुढारी आहे. त्याचं नांव बारीकराव तथा गुंडाप्पा तथा काकसाहेब!'

शेटजींच्या उजव्या हाताकडल्या पहिल्या खुर्चीवर बसलेल्या एक स्थूल बाई हळूहळू उठून बोलूं लागल्या. त्या म्हणाल्या, 'एक अनाथाश्रम काढून या महाकवीचं स्मारक करावं अशी माझी सूचना आहे.'

बाईची ही सूचना ऐकून तीनचार खुर्च्या चुळबुळल्या! त्यांत मास्तरांचीहि खुर्ची होती! पण कुणीच कांही बोललें नाहीं!

कालिदासाने कपाळाला हात लावून विचारलें, 'या बाई कोण?'

'ती इथल्या एका श्रीमंत सासऱ्याची सून आहे. एका व्यसनी संस्थानिकाचा खाजगी कारभारी होता तो!'

बाई पुढे बोलूं लागल्या, 'अनाथाश्रमांची आज फार जरुरी आहे. आपल्याला समाजांत नीति उरलेली नाही! धर्म राहिलेला नाहीं! कुमारी माता आणि अनाथ बालकं ह्यांच्या समस्या आ वासून आपल्यापुढं उभ्या आहेत! या विषयावरला आपल्या गावांत पंचवीस आठवडे चाललेला चित्रपट मी रोज बघत होतें! तुम्हीहि तो खूप वेळां पाहिला असेल! तेव्हा अनाथाश्रमाचं महत्त्व सांगून मी तुमचा वेळ घेऊं इच्छीत नाहीं. माझ्या या सूचनेशीं खुद्द कालिदासाचा संबंध आहे, हें विसरूं नका! शाकुन्तलाच्या कथानकाचा थोडा विचार करा. त्या नाटकांत राजाला खुणेची अंगठी मिळते ती केवळ योगायोगानं! ती मिळाली नसती तर? तर शकुंतला आणि तिचा मुलगा यांना जन्मभर एखाद्या अनाथाश्रमांतच राहावं लागलं असतं!'

आपण मोठी तरवार मारून आलों, असा भाव मुद्रेवर दर्शवीत बाई खालीं बसल्या! लगेच एक उंच, धिप्पाड गृहस्थ ताडकन् उठले. त्यांनी आपल्या करड्या मिशांचे आकडे विंचवाच्या शेपटीप्रमाणे वर वळविले होते! मरदार चेहरा आणि रुबाबदार पोषाख यांवरून ते लष्करी अधिकारी असावेत, हें उघड दिसत होतें. आपण बिगुल फुंकीत आहोंत अशा थाटांत ते म्हणाले, 'शारदादेवीं'च्या सूचनेला माझा सक्त विरोध आहे. अनाथाश्रम काढणें म्हणजे अनीतीला उत्तेजन देण्यासारखं आहे. हा कालिदास कुठल्या तरी वेश्येच्या घरीं मेला, असं मीं कुठं तरी वाचलंय. ती दंतकथा असो नाही तर सत्यकथा असो, त्यांच्या नांवानं आपण जें स्मारक करणार, तें नीति आणि शिस्त

अनुक्रमणिका








यांना उत्तेजन देणारंच असलं पाहिजे. ज्या समाजांत शिस्त नाही तो सुस्त होतो. (टाळ्या) आज आपल्या देशाच्या संरक्षणासाठी शूर जवानांची जरुरी आहे. म्हणून गोरगरिबांचीं बाळंतपणं शास्त्रोक्त पद्धतीन झालीं पाहिजेत. त्यांच्या मुलांना पौष्टिक खाणं मिळालं पाहिजे. तीं मोठीं झालीं कीं त्यांना लष्करी शिक्षण दिलं पाहिजे. यासाठीं माझी अशी सूचना आहे कीं आपल्या या सुंदर इतिहासप्रसिद्ध पाषाणपुरांत 'कालिदास मॅटर्निटी होम', 'कालिदास अन्नपूर्णागृह' आणि 'कालिदास मिलिटरी स्कूल' अशा तीन संस्था काढाव्यात.

गुंडाप्पाकडे भीत भीत पाहत मास्तर उठले आणि म्हणाले, 'प्रसूतिगृह ही गरिबांची आजकालची निकडीची गरज आहे. पण कालिदासाचं स्मारक म्हणून तें काढणं—हें—हें आपलं अगदीच हें होईल!'

ढगांच्या गडगडाटाशीं स्पर्धा करणारें हास्य करीत समशेर बहाद्दर उद्गारले, 'शाळेंत काय शिकवितां तुम्ही मास्तर? कालिदासानं 'कुमारसंभव' म्हणून एक पुस्तक लिहिलं आहे, याचा पत्ता तरी आहे का तुम्हाला? मॅटर्निटी होममध्यें तरी दुसरं काय होतं? कुमारसंभव—फार झालं तर कुमारीसंभव!'

आपल्या या कोटीवर खूष होऊन ते खदखदा हसूं लागले. गुंडाप्पा तथा काकासाहेब यांनीं या तिमजली हसण्यांत त्यांना साथ दिली?

मास्तर चिमणीएवढें तोंड करून खाली बसले. 'कालिदासानं रघुवंश लिहिला म्हणून त्याच्या स्मारकादाखल नगराध्यक्ष पोटभरे यांच्या घराण्याचा इतिहास तयार करावा अशी सूचना कुणी केली नाही हें आपलं भाग्य!' असें ते मनांत म्हणत होते!

स्मारकासंबंधींच्या आणखी कांही सूचना सभेपुढे आल्या असत्या. पण मुंद्रडा शेटजी घड्याळाकडे पाहत उठले आणि म्हणाले, 'आमच्या ज्यू सिगारेट कंपनी'ची वार्षिक सभा आहे आज. मला तिकडं जायचंय. तेव्हा पांच मिणिटांत सभेचें काम आटपूण टाकूं!'

आता ही मंडळी आपलें कसलें स्मारक करतात, या आशंकेने कालिदास अस्वस्थ झाला! नारदांचा हात ओढून 'आपण बाहेर जाऊं या' असें त्याने सुचविलें. पण मुनिराज जागेवरून हलेनात!

पुन्हा घड्याळाकडे पाहत शेटजी म्हणाले, 'बाकीचा विचार तुम्ही मंडळी सावकाश करा. आधी आकडे घ्या सर्वांचे! माझा आकडा पांचशें एक!'

शेटजींचा आकडा ऐकतांच समितीचे बहुतेक सभासद एकमेकांकडे टकमक पाहूं लागले. शेवटीं संधिवात झालेल्या माणसासारखे मास्तर हळूहळू उठले. ते धीर करून म्हणाले, 'कालिदासाच्या स्मारकासाठी निदान-निदान लाख रुपये तरी लागतील! त्या मानानं हा आकडा अगदीच—अगदीच' मग एकदोन आवंढे गिळून ते म्हणाले, 'शेटजींनी निदान पांच हजार तरी—'

शेटजी एकदम उसळले. हातवारे करीत मास्तरांना उद्देशून ते म्हणाले, 'पैसे काय झाडाला लागतात मास्तर? तुमचं आपलं ठीक आहे! तुम्हाला इणकम् टॅक्स-विणकम् टॅक्स असली कांही कटकट नाही! पण हे सरकारचे कर आम्हांला कसे कापूण काढताहेत तें—'

शारदादेवी लगबगीने उठून म्हणाल्या, 'शेटजी म्हणतात तें अगदी बरोबर आहे. या कूळकायद्यानं आमचं उत्पन्न इतकं कमी झालंय की—'

बंदुकींतून गोळी सुटावी तसे समशेर बहाद्दर उठले आणि म्हणाले, 'शारदादेवींना माझा पूर्ण पाठिंबा आहे! अहो, आमचं पेन्शनच आम्हांला पुरत नाही, अशी स्थिति आहे! मास्तर ब्रँडीच्या बाटलीला बाजारांत

### काहीं अवशिष्ट राग



धूत वस्त्र ज्या देहीं शोभे, पळितान्हण हातीं घेऊन
चंदनरेषा काळ्या भालीं उभ्याआडव्या शुभ्र लावुनी
वेणि शेंडिची तुरुतुरू हाले, नजर नासिकेसमोर दंग
रस्त्यानें हा भरभर चाले, कधीं ना बोले राग

'तिलंग'—



काय पडतं हें ठाऊक आहे का?' जीभ चावीत ते एकदम खाली बसले!

बारीकराव तथा गुंडाप्पा डुलतझुलत उठले आणि म्हणाले, 'पैशाची कसली फिकीर करतांय तुम्ही लोक? लाख रुपये मी एकटा जमवून देईन.'

सारी मंडळी—त्यांत शेटजीसुद्धा होते—आश्चर्यानें त्यांच्याकडे पाहूं लागली. या गुंडाप्पाला वेडबिड तर लागलें नाही, अशी शंकाहि दोघांतिघांच्या मनांत येऊन गेली.

सर्वांकडे वीरश्रीने पाहत गुंडाप्पा म्हणाले, 'कालिदासाचं स्मारक करा, नाहीं तर त्याच्या बापाचं करा! कुस्त्यांचीं दोन दणदणीत मैदानं केलीं की लाख रुपये—'

नारदांचा हात धरून त्यांना बाहेर ओढून नेत कालिदास म्हणाला, 'चला मुनिराज, लवकर चला.'

'कुठं?'

'परत स्वर्गात.'

'म्हणजे? नव्या नाटकाची सामुग्री मिळाली तुला?'

'मी स्वर्गात परत जातोंय तो नाटक लिहायला नाही.'

'मग?'

'माझ्या एका मित्राचा शोध करून त्याला पृथ्वीवर आणायला!

'हा कोण बुवा तुझा मित्र?'

'नाटककार मोलियर! तोच हें नवं नाटक चांगलं लिहील!' • • •

*जपानी घरांच्या खोल्यांना, निदान चा-शित्सु (चहा घेण्याची खोली) ला तरी चित्रविचित्र रंग देऊन एक उल्हसित वातावरण निर्माण करण्याची जी प्रथा आहे तिला जगांत तोड नाहीं. ह्या रंगसंगतीच्या सर्वश्रेष्ठ कलाकुसरीला जपानी काव्यांत 'आताशी—मगाशी' असा शब्द आहे. ह्या शब्दाचा अर्थ होतो इंद्रधनुष्य.*

# आताशी मगाशी



शां. शं. रेगे

आंतरराष्ट्रीय जपानी लोकांची शिरगणति करण्याच्या निमित्तानें भारतांत आलेले डॉ. नोटामारू ह्यांचा माझा परिचय 'कोकवा'मध्यें झाला. मध्यंतरी मला अतिसाराची व्यथा असल्यामुळें ओला चहा पिण्याचा सल्ला आमच्या डॉक्टरांनीं दिला होता. चिनी रेस्टोरॉंमध्यें उत्कृष्ट ओला चहा मिळतो म्हणून मीं ऐकलें होतें. त्यामुळें आमच्या ऑफिसच्या जवळच असलेल्या 'कोकवा'मध्यें मीं गेलों. चहा जरा महाग पडला पण चांगला वाटला. विशेष म्हणजे साखर न घालतां घुटक्या घुटक्यानें इवल्याशा पेल्यांत फुंकून फुंकून तासभर पिण्याची गम्मत कांहीं और होती. पुढें हळू हळू चाऊचाऊ खाण्याचा सराव झाला आणि मग कांहीं दिवसांनीं चिनी पाकशास्त्राचे बारकावे उमगण्याइतपत माझी प्रगति झाली. 'कोकवा' हें मूळ चिनी रेस्टोरॉं असले तरि आंतरराष्ट्रीय पदार्थ पुरविण्यांत त्याची ख्याति होती. काश्मिरी इंदुरसा, पंजाबी खालीपूप, परभी छविना, पोरबंदरी खरवस, म्हैसूरी पोकवडा, मद्रासी मोरकुलंबू वडा, इटालियन फिलेटस, फ्रेंच क्रॅब कॉकटेल, हवाई शिकमपूर, चिनी चोचामूचा व जपानी टेंपूरा हे कोकवाचे गाजलेले पदार्थ.

अशा या कोकवाच्या प्रांगणांत (आंत जागा नसल्यामुळें) वेताच्या खुर्चीवर एके दिवशीं संध्याकाळीं बसलों असतांना डॉ. नोटामरूंची स्वारी टॅक्सीतून उतरली. छोट्या टॅक्सीचं मिटर आणि मोठ्या टॅक्सीचे दर ह्यामुळें झालेल्या झगड्यांत मध्यस्थ म्हणून टॅक्सीड्रायव्हरनें मला पाचारण केलें आणि हें दराचें कोष्टक समजावून देतांना त्या जपानी (का चिनी) अभ्यागताची माझ्या भलेपणाबद्दल इतकी खात्री झाली, कीं त्यांनीं मला ओढतच आपल्या राखीव टेबलाजवळ नेऊन बसवलें. 'कोकवा'चे मालक ली चँग यु युवान हे स्वतां पीत अभ्यागताच्या स्वागतासाठीं दरवाजांत उभे होते. डॉ. नोटामारूकडे पहात पहात त्यांनीं मान अदबीनें वाकविली आणि 'सेनसेई निप्पोन' असं ते तीनदां म्हणाले. डॉ. नोटामारूंनीं माझ्याकडे पाहत ली चँगला कांहींतरी सांगितलें व त्यावर चँगनं जें उत्तर दिलें व माझ्याकडे पाहून मान लववित्री त्यावरून मीं अर्थ केला कीं हा माझा आज पाहुणा आहे. चँगनींहि सांगितलं असावं कीं ते माझेहि नेहमीचे गिऱ्हाइक आहेत.

खुर्चीवर बसल्यावर नोटामारूंनीं "शोचुमिमाई" अशी चँगना पृच्छा केली. (जपानहून परत आल्यानंतर मला समजलं कीं 'कसा काय उन्हाळा' हा अर्थ ह्या शब्दांचा होतो) त्याला चँगनीं 'तईतांग' असं कांहींसं उत्तर दिलं. इतक्यांत वेटर येऊन त्यांनीं सूपसाठीं पेले व काटक्या ठेवल्या. मीं मेनूकडे तिरक्या नजरेनं हळूच पाहिलं त्यावर 'चवानमुशी' असं टाइप केलेलं दिसलं. सूप आणलं गेलं आणि डॉ. नोटामारूंनीं प्रथम आपल्या पेल्यांत ओतलं आणि नंतर भांडं माझ्यापुढं केलं. मीं दोन डावलं सूप पेल्यांत ओतून घेतलं. डॉ. नोटामारू 'हाशी'नें सूप चाखत होते.



अनुक्रमणिका

मला तें कांहीं जमण्यासारखं नसल्यामुळें मी मात्र चमच्यानं सूप भुरकलं. त्यानंतर 'कामाबोको' 'माटसुटाके', 'गोमा–अबुरा टेम्पुरा', 'कावारा-सेम्बेई' व त्यानंतर 'शिंचा' असे एकएक पदार्थ पोटांत रिचवून जेवण संपल्यावर डॉ. नोटामारूंनीं ली चँग यु युवानना 'ओमेदेतो' असं म्हणून अभिवादन केलं. मींसुद्धां भरल्या पोटानं लवून 'शुक्रिया' असं म्हटलं आणि आम्हीं दोघं 'कोकवा'बाहेर आलों.

जेवणसंपेपर्यंत डॉ. नोटामारूंचा आणि माझा परिचय वाढला होता. त्यांना कामचलाऊ इंग्रजी येत असल्यामुळं माझे प्रश्न समजणं सोपं होतं. डॉ. नोटामारू ह्यांचे खापरपणजोबा चीनमध्यें सरकारी वकील म्हणून गेले होते. चीनमध्यें तीन पिढ्या गेल्यामुळं चिनी जीवन व चिनी संस्कृति ह्यांचा परिणाम नोटामारू कुटुंबावर झाला होता. त्यांच्या कुटुंबाचं मूळ नाव फुकागावा. पण डॉक्टरमजकुरांच्या आजोबांना नुवो देवीच्या कृपाप्रसादानं बरकत प्राप्त झाली म्हणून नुवोटामारू हें नांव त्यांनीं धारण केलं व त्याचं सुटसुटित पर्यवसान नोटामारू हें प्रचारांत आलं. डॉ. नोटामारू ह्यांचं प्रशिक्षण गोटाकंवे विद्याकुलांत होऊन त्यांनीं 'स्युतसाई', 'च्युजेन' इत्यादि परीक्षांत प्राविण्य संपादन केल्यानंतर ते 'चिनशिइ' म्हणून स्नातक झाले. पुढें चीनजपान संबंध बिघडल्यानंतर नोटामारू कुटुंबाला जपानला परागंदा व्हावं लागलं आणि तिथं ह्या पदिक विद्वानाची डायटच्या एका विरोधी पक्षाच्या सल्लागार म्हणून नेमणूक झाली. ह्या विद्वानाच्या चाणाक्ष व भांडकुदळ स्वभावामुळं प्रतिपक्षांत 'आमानोजाकु' हें 'अडाना' (टोपणनांव) त्यांना पडलं. गेलीं कांहीं वर्षं ते सरकारी नोकरींत 'कोसेकी' (जनगणना अधिकारी) म्हणून काम करीत होते व त्याच कामासाठीं सध्यां ते इकडे आले होते. पूर्वीं मी जनगणनाखात्यांत टेंपरवारी गणक म्हणून काम करीत असल्यामुळं डॉ. नोटामारूंचं व माझं विशेष जमलं. ह्याच माझ्या अनुभावाच्या जोरावर डॉ. नोटामारूंनीं माझी शिफारस करून जपानला आपल्याच खात्यांत नेमणूक करून घेतों म्हणून सांगितलं. इकडच्या चीजवस्तूंची मीं सर्व व्यवस्था करून खोली (थकलेल्या भाड्यासह) पगडी घेऊन पेइंग टेनन्टला दिली व मी जपानच्या दौऱ्यावर निघालों.

ओकनाबोकूशी स्टीम कंपनीची 'नाकामारू' ह्या सुप्रसिद्ध प्रवासी बोटींतून माझा प्रवास व्हायचा होता. ह्याच बोटींतून जागतिक पेन्सिल परिषदेचे प्रतिनिधि जपानला चालले होते. जगांतले पेन्सिल निर्माण करणारे कारखाने, पेन्सिली विकणारे दुकानदार व पेन्सिलीनें लिहिणारे लेखक ह्यांच्या संघटनेंतर्फे ही परिषद 'कानाझावा' ह्या शहरीं भरणार होती. एका तिकिटांत डबल प्रवास, राहण्या-जेवणाची फुकट सोय आणि पेन्सिलीच्या विविध नमुन्यांचें वांटप ह्या सवलतीमुळं जरी प्रतिनिधींची संख्या भरपूर होती, तरी हें मात्र नुसतं निमित्त होतं. प्रतिनिधी जपानला जाणार होते ते 'साके' पिऊन टर्र होण्यासाठीं, शिबाझावाच्या उष्ण झऱ्यांत डुंबण्यासाठीं, हानामी पार्टीतून फुलें पाहण्यासाठीं, योशिवाराच्या गैशा न्याहाळण्यासाठीं, दैबुत्सुची घंटा पाहण्यासाठीं, गिंझांतल्या युराकुचोचें भग्न सौन्दर्य पहाण्यासाठीं, झोकामारूच्या क्रीडाकेलींसाठीं, इकेबाना पुष्परचना शिकण्यासाठीं— किंवा इतर कहीं प्रच्छन्न आणि प्रक्षित कार्यपूर्तीसाठीं. बोटीच्या प्रवासांतच ह्या सर्व भौगोलिक आणि भौतिक ज्ञानाची माझी उजळणी पक्की झाली. डॉ. नोटामारू बंदरावर आले होते. त्यांना मीं बोटींतूनच पाहिलं. बोट धक्क्याला लागली. इंजिनं थांबलीं. धक्क्यावरच्या डोलकाठीवर 'हिनोमारूं (राष्ट्रीय निशाण) वर चढविलं गेलं. बोटीचा सेवकवर्ग, सर्व प्रवासी आणि जनसंमर्द मान लववून स्तब्ध उभा राहिला. बोटीवरच्या ध्वनिप्रसारकांतून राष्ट्रगीताचे स्वर ऐकूं लागले. बोट वाऱ्यामुळें थोडथोडी डुलत होती. त्यामुळं तोल संभाळून तटस्थ उभं राहाणं मुष्किल ठरत होतं. तितक्यांत माझ्या बुटावरून वर चढत गेलेला एक डोंगळा माझ्या पोटरीवर वळवळूं लागला. त्यामुळं मला पाय हलवणं भाग पडलं. इतक्या खड्या जनसंमर्दांत हाललेले माझे पाय मालिनाच्या दृष्टीस पडले. त्यानं डोळ्यांनीं दाखवलेली नापसंति पाहून मला शरमल्यासारखं झालं. राष्ट्रगीत संपलं. प्रवासी एकएक शिडीवरून उतरूं लागले. माझी पाळी येतांच मालिमानं मला हटकलं व बाजूला केलं. मागचे प्रवासी माझ्या पुढं निघून गेले व शेवटपर्यंत मीं रखडलों. मला जाऊं देतांना मालिना माझ्याकडे असा तुच्छतेनं पाहूं लागला कीं मुकाट्यानं चालूं लागलों. बाहेर पडतां पडतां माझ्या कानावर 'गामां असे शब्द आले. मला वाटलं माझ्या स्थूलपणाला उद्देशून ही उपमा असावी.

डॉ. नोटामारुंनीं मला मोटरमध्यें बसवलं आणि आमची मोटर निघाली. मी त्यांना बसतांबसतांच 'सेनसेई' असं म्हणतांच त्यांनीं 'सोमुवॉगोतमो' असे कांहीं तरी शब्द म्हटले. 'सुस्वागतम्' हे भारतांत शिकलेले शब्द त्यांच्या स्मरणांत राहिले असल्याचं मला जेवढं कौतुक वाटलं त्याहूनहि मला जपानी अभिवादनाचे शब्द येनात ह्याचंच त्यांना आश्चर्य वाटलं. पण माझ्या खिशांत असलेला प्रवासी कोश मी प्रवासांत घोकत होतों हें माझं मलाच ठाऊक होतं. सहज मला आठवण झाली आणि हळूच कोश उघडून मी 'गामा' शब्दाचा अर्थ पाहिला. एकदम माझं डोकं तापलं. मी पाय आपटले. नोटामारूंनीं दचकून मागं पाहिलं. मीं 'अॅन्ट' म्हणून त्यांना सांगितलं. पण खरोखरच पाय झाडतांच मघांचा बोटींतला डोंगळा खालीं पडला. माझ्या अपमानाचें कारण होणाऱ्या त्या डोंगळ्याला संतापून मीं टाचेखालीं चुरडून टाकलं. गामा ह्या शब्दाचा मला मजूर होणाऱ्या पहिलवान या अर्थाऐवजीं जपानी भाषेत बेडूक असा क्षुद्र अर्थ निघतो ह्याचा मला संताप आला.

डॉ. नोटामारूंनीं आपली गाडी एका 'हाटोगो'च्या दारांत उभी केली. हाटोगा म्हणजे हॉटेल. पण जुन्या पद्धतीचं. तिथं राहण्याबद्दल चार्ज करत नाहींत. चहा व केक्‌ दररोज देतात व त्याचाहि चार्ज घेत नाहींत. प्रवासी हॉटेल सोडतांना त्याला जेवणाचं बिल जातं आणि नोकरांना टिप्स देऊन त्याशिवाय मालकाला कांहीं तरी 'चडाई' (म्हणजे बक्षीस) द्यायची. आणि मालकहि प्रवाशाला एखादा टॉवेल अगर पंखा असं कहीं तरी देऊन परतफेड करतो. डॉ. नोटामारूंनीं मला मालकाच्या हवालीं केलं व त्याला कांहीं तरी जपानी भाषेत सांगून मला इंग्रजींत 'आपण संध्याकाळी येईन तोपर्यंत विश्रांति घ्या' असं सांगितलं.

माझी खोली रस्त्याकडची होती. तिच्या खिडक्यांना चित्रविचित्र गवती पडदे टांगलेले होते. माझं सामान एका बाजूला ठेवून सेवक निघून गेला. मी कपडे काढून पायजमा चढवला आणि खोलीचं निरीक्षण करूं लागलों तोंच एक स्त्री दार उघडून खोलींत आली. तिच्या हातावर कांहीं कपडे व साबणाची वडी होती. खोलींतल्या बाथरूममध्यें वस्तू ठेवून 'काटाबिरा' असं ती म्हणाली आणि खोलीबाहेर जाऊन तिनं दार लावून घेतलं. मी कोश काढून शब्दाचा अर्थ पाहिला. त्याचा अर्थ स्नान असा सांपडला. ती जपानी तरुणी बाहेर गेली तरी तिच्या चित्रविचित्र वेषकेशभूषेनं मी बावरून गेलों







अनुक्रमणिका

होतों. चित्रांत पाहिलेल्या गैशासारखी ती वाटत होती. ह्या हॉटेलांत गैशा आपल्या सेवेला आहेत ह्या विचारानं मी हुरळून गेलों. पायजमा काढून मी चड्डीनं स्नानगृहांत शिरलों आणि तिथल्या टबमध्यें उतरलों. गरम पाण्याचा स्पर्श देहाला उत्साहपूर्ण वाटला. जन्मांत प्रथमच मी टबबाथ घेत होतो त्यामुळं अंगाला साबण कसा लावावा ह्याचं मला कोडं पडलं. थोडा वेळ पाण्यांत बसल्यावर मी पाण्याबाहेर आलों आणि साबणाची छोटी वडी उचलून अंगाला चोळली. सुगंधानं मन प्रसन्न झालं. साबण लावला पण अंग कसं धुवायचं कारण तपेली कुठं आढळेना. अखेर हातानंच अंगावर बाहेर पाणी उडवून घेतलं. खोलींत ओल होऊं लागली म्हणून गोंधळून पुन्हां एकएक अवयव टबमध्यें सोडून त्याचा साबण काढूं लागलों. टबचं पाणी साबणाचं झालं तेव्हां आणखी अंग स्वच्छ करायच्या भानगडींत न पडतां तिथं ठेवलेल्या लुंगी-सारख्या पंचानं अंग पुसलं. पंचा ओला झाला तरी अंग कोरडं होईना म्हणून तसाच गुंडाळला, चड्डी टबमधल्या पाण्यांत खळखळावली आणि बाहेर पडणार तोंच बुळबुळीत जमिनीवरून पाय सरकला अन् साष्टांगनमस्कार घातला. जरा चुकलं; डोकं टबवरच आपटायचं पण वाचलं. साबणाची वडी मात्र खालीं पडलेली चुकून तोंडांत गेली आणि तोंड तुरट झालं. अखेर कसाबसा उठलों, टबमधल्या पाण्याचा चूळ भरून तो पुन्हां टबमध्यें थुंकला, आणि चिकट अंग तिथल्या दुसऱ्या वस्त्रानं पुसून तोल सावरीत बाहेर आलों. खोलीच्या उघड्या दारांत हॉटेल मालक नोकर आणि ती सौंदर्यखनी उभी दिसली. मला वाटतं माझ्या पड-ण्याच्या आवाजानं ही गर्दी जमली असावी. माझ्या पंचांत गुंडाळलेल्या अर्धनग्न देहानें तिच्या नजरेस मीं पडलों ह्याची मला लाज वाटून मी पळत पुन्हां बाथरूममध्यें शिरलों, दार घट्ट लावून घेतलें. बराच वेळ मी तिथेंच तिष्ठत राहिलों. कांहीं वेळानं कानोसा घेतला आणि मंडळी गेली असल्याचा अंदाज येऊन बाथरूमबाहेर आलों. दारांत आतां कोणीच नव्हतं. मी धाडकन् खोलीचं दार लावून घेतलं आणि कपडे चढवले. टेबलावर हॉटेलचा दैनंदिन कार्यक्रम असलेलं कार्ड ठेवलेलं दिसलं. त्यावरून बारा वाजतां भोजनगृहांत भोजन आहे असं कळलं. बारा वाजायची वेळ मघाशींच बाथरूममध्यें आली होती असं आरशांतल्या प्रतिमेला कोटी करून बजावलं आणि केसावर ब्रश फिरवून स्नानगृहाकडे जाण्यासाठीं बाहेर पडलों. भोजनगृहाच्या दरवाजांतच वेटरनं मला अडवलं आणि तो कांहीं तरी बोलला. मला अर्थ लागेना तेव्हां मालकाला त्यानं हाक मारली. मालकाला इंग्रजी येत होतं. त्यानं अदबीनं सांगितलं कीं भोजनगृहांत जेवण्यासाठीं हा इंग्लिश ड्रेस चालणार नाहीं. 'युकाटा' नेसूनच आलं पाहिजे.

युकाटा म्हणजे एक प्रकारचा गाउन आणि तो जपानमध्यें विशिष्टपणें उन्हाळ्यांत वापरतात. त्या बाईनें (की गैशानें) आंघोळीच्या खोलींत एक फुरोशिकी (ज्याला मी पंचा अथवा लुंगी समजलो) व हा युकाटा ठेवला होता. मी फुरोशिकीनं प्रथम अंग पुसलं तें रीतीला धरून होतं पण त्याच्यामागं युकाटा टांगलेला होता. मी पडल्यानंतर पुन्हां चिकट अंग पुसल्यामुळं तो ओला झाला आणि शिवाय खालीं पाण्यांत पडल्यामुळं पेहेरण्यास निरुपयोगी झाला होता. आतां तोडगा काय कीं आज नुसता थंडा फराळ अशा आशंकेत असतांना वेटर माझं जेवण घेऊन खोलींत आला. भूक फार लागल्यामुळं जेवण थंड असूनहि चविष्ट वाटलं. जेवल्यानतर मीं कपडे बदलून पायजमा चढवला अन् पलंगा-वर झोंपी गेलों.

संध्याकाळीं मीं जागा झालों तेव्हां अंग दुखत होतें. डॉ. नोटामारू ठरल्याप्रमाणें आले आणि जपानच्या प्रेक्षणीय स्थळाची आम्ही चर्चा केली. मीं कपडे चढवले आणि त्यांच्या मोटारींत बसून आम्ही जपान पाहण्यास निघालों. त्या मघां प्यालेल्या औषधानं मला कसं तरंगत फिरल्यासारखं वाटत होतं. डॉक्टरांनीं मोटार गिओनच्या दिशेनें चालवली होती....

...जपानमध्यें पाहाण्यासारख्या ज्या चिजा आहेत, त्यांत गैशांचा नंबर पहिला लागतो. डॉ. नोटामारूंनीं मला गैशा दाखवण्याचं कबूल केलं होतं. 'गैशा' ह्या प्रकाराबद्दल मला फारच उत्सुकता होती. आम्ही क्योटोला जातांना वाटेंत नोटामारू मला गैशाची माहिती सांगत होते. "...क्योटो हे गैशा-व्यवसायाचं मुख्य केंद्र आहे. इथून पुढं फुकागावा, यानागिबाशी, योशिचो, क्योबाशी, होरिएयो इथ गैशाचीं उपकेंद्रं आहेत. योशिवारा इथं गैशा संस्कृतीचा उगम आहे (हा शब्द ऐकतच मला व्युत्पत्तिकोशांतला वारयोषिता ह्या शब्दाचा संदर्भ कळला). १७६१ सालीं गैशा हा शब्द प्रचारांत आला (म्हणजे जपान आमच्या बराच मागं दिसतो. आमच्या मेनका, उर्वशी, रंभा किती

तरी प्राचीन. म्हणजे भारतीय संस्कृति ही सर्वांत जुनी हे गैशांच्या बाबतींत तरी सिद्ध होतं) गैशांचं जग बंदिस्त असतं (असणारच. अहो! असे छंद उघड्यावर करूं लागले तर शिष्ट सद्गृहस्थांची अब्रू चव्हाट्यावर यायची) त्यांची चाय-घरं (चायला! हाच शब्द इथं वापरतात तर) म्हणजे किल्लवजा इमारतींत— तटबंदी आणि दाट उपवनाच्या आंत असतात. (वा! झकास सोय. कुठंहि आपलं झुडपांत पडून राहावं) आणि वाटेवरच्या वाटसरूला किंवा फाजील (बुद्धीच्या) प्रवाश्याला आंत एकदम प्रवेश मिळणं मुश्किल असतं. (छान म्हणजे एकदम 'हाय क्लास' ॲटमोसफियर असणार)...

"आपण आतां गिऑनच्या रस्त्यावर आलों. गिऑनचे दोन भाग आहेत—अ वर्ग आणि ब वर्ग. अ वर्ग विभागांत सुमारें चारशें गैशा आणि पस्तीस मैको आहेत. मैको म्हणजे उमेदवार गैशा (छान, छान! म्हणजे ॲप्रेन्टिस). मैको ओळखायची सोपी रीत आहे. ती आपल्या किमोनोभोवतीं 'दारारी' बांधतांना छातीजवळून गुंडाळते, आणि गैशा कमरे जवळ गुंडाळते. गैशाघराच्या मालकिणीचं नांव 'ओकामिसान' अथवा ओकासनि (अरेच्या! जपानमध्येंहि 'ओकासा' पॉप्युलर आहे वाटतं). ओकासान गरीब आईबापांच्या मुली विकत घेते आणि त्यांना गैशा बनवते (तनुविक्रय पाप महा. व्हेरी बॅड). ती त्यांना वस्त्र अन्न पुरवते आणि त्यांच्या शिक्षणाचा खर्च करते. ओकासानचा हा खर्च भरून काढण्यासाठीं तिला आणखी एका किफायतशीर मार्गाचा अवलंब करणें प्राप्त ठरतें. प्रत्येक गैशासाठीं ती एक सधन 'दान्नासान' हेरते. ह्या गैशाघरांतील १४ ते १८ वयाची गैशा 'दान्नासान' निवडतो आणि त्याबद्दल ओकासानला तो कित्येक लक्ष येन किंमत देतो (काय हा काळाबाजार?) आणि जेव्हां त्याची इच्छा असेल तेव्हां तिला त्याच्या सेवेला हजर राहावें लागतें......"

अशा रम्य कथा ऐकतां ऐकतां आमची मोटार अ विभागांत येऊन पोंचते. पण कुणा एका गैशाला नीट न वागवल्याबद्दल आज तिथं अन्नसत्याग्रह आणि लाक्षणिक संप असतो म्हणून ब विभागाकडे आम्ही वळतों. ब विभागातल्या घरांसमोर 'होझुकी-चोचिन' म्हणजे लाल कंदील टांगलेले असतात. तिथल्या एका घरांत आम्ही शिरतों. मी उत्सुकतेनें थेट आंत शिरूं लागतों तो एक किमोनोकन्या मला सस्मित अडवते आणि माझे बूट काढूं लागते. माझ्या एका बुटाच्या नाडीची गांठ घट्ट बसलेली असते. बराच वेळ त्या किमोनोकन्येच्या नाजुक हातांना ती सुटत नाहीं आणि मी तर अधिर झालेलों असतों म्हणून मी जोरानें ती तोडून पाय मोकळे करतों. ती किमोनोकन्या एक सपातांचा जोड आणून माझ्या पायांत घालते (माझ्या पायांत मोजे नसतातच). एवढ्या वेळांत डॉ. नोटामारूहि सज्ज होऊन ममासानशीं बोलत असतात. आंतल्या चित्र-विचित्र खोलींत आम्ही प्रवेशतों. खोलींत

कोन्या चकचकीत मखमली चट्या आंथरलेल्या असतात व त्यावर अधूनमधून चौरंग ठेवलेले असतात. चौरंगाच्या सभोवार रेशमी गिर्द्या टाकलेल्या असतात. माझी मार्गदात्री रमणी आम्हांला 'दोझो' म्हणून विनंति करते. मी नवखाच असतों. मला तिथली भाषा, उच्चार आणि वातावरण बावरून टाकतें. मी नोटामारूं कडे वळून बघतों. ते पाय दुमडून एका गिर्दीवर ढोबरी बैठक मारतात. मी पण तसें करू लागतों. एक पाय जेमतेम दुमडतो दुसरा दुमडण्याच्या प्रयत्नांत पॅन्टचा पार्श्वभाग दगा देतो. मी गांगरतों (ह्यचसाठीं सॅन्फोराइज्ड कपडे शिवणें योग्य असतें) व परमेश्वराचा धांवा करतो (प्रभुजी, राखो लाज हमारी) माझी धडपड व धडधड त्या किमोनोकन्येच्या ध्यानांत येते कीं काय नकळे ती सुवर्णहास्य हंसते. मी थिजून जातो. इतक्यांत ममासान एक लांकडी कोरीव पेटी डॉ. नोटामारूंच्या पुढें करून उघडते त्यांत सुगंधी सिगरेट्स् असतात. डॉक्टर मजकूर एक उचलतात आणि पेटवतात. नंतर माझी पाळी येते. मीहि उपचार म्हणून एक उचलतों. प्रमासान आंत निघून जाते. थोड्या वेळांत साकेचे कलश आणि कांचपात्रें समोर येतात. पात्रांत साके ओतली जाते. एवढा छोटासा पेला मी एका घुटक्यांत संपवतों. डॉक्टर मात्र थेंब थेंब चाटीत सावकाश पितात. गैशा माझा रिकामा कप पाहून चकीत होते. ती कांहीं तरी किणकिणी बोलते व माझा कप पुन्हां भरते. डॉ. नोटामारू मला 'साकाझुकी'ची रीत सांगतात. आतां मी नाईलाजानें एकच घोट घेऊन पेला साजुकोच्या हवालीं करतों. (ह्या किमोनाकन्येचं नांव साजुको आहे आणि तें तिच्या साजूक देहयष्टीला अपूर वाटतें). साजुको ती उष्टी साकी पिऊन माझी मैत्रिण बनते (आमच्या स्त्रिया मात्र असलें उष्टावण आजकाल निषिद्ध मानतात!). आतां मी पेला भरून तिला देतों (कारण मगच मला आणखी पेला मिळवण्याची शक्यता असते.) ही तिथली रीत आहे.

आतां खाणें सुरू होतें. थोड्याच वेळानें आणखी एक किमोनोकन्या खोलींत प्रवेशते. साजुकोपेक्षां ही जास्त मोहक वाटते (कदाचित् हा साकेचा परिणाम असावा) साजुकोला नेत्रांच्या मासोळ्या नाचविण्याची संवय असते. ती जणुं हातांत रोमन्सचा 'सेन्सु' (पंखा) घेऊन प्रणयाच्या गालिच्यावर परीचीं पावलें टाकीत येते अशी वाटते. तिच्या आश्वासक दर्शनानें वातावरण कसं निभ्रांत झाल्यासारखं वाटतं. मी हळूंच माझ्या सपाता काढतो. माझ्या पायांना तातामीचा (चटई) रेशमी स्पर्श गुदगुल्या करतो. ह्या कोमलांगीचं नांव उमेको (जर्दाळू) असतं. ती गिर्दीवर बसून प्रथम डॉ. नोटामारूंशीं मंदमधुर स्वरानं बोलते. थोडंसं बोलल्यानंतर तिचे बदामी डोळे माझ्याकडे वळतात. मला आश्चर्य वाटतं. ती माझ्याशीं सुबोध हिंदींत बोलूं लागते.

"क्या आप भारतके रहिवासी हैं?"

"जी हां"

"शायद आप बम्बईमेंही हमेशा रहते हैं?"

"हां."

"मैं भी कुछसाल पहले बम्बईमें रहती थी."

"अच्छा, बहोत खूब."

"आपको फोरास रोड मालूम होगा?—"

मी एकदम हा प्रश्न ऐकून दचकतों व क्षणभर निरुत्तर होतों.

"उसके नजदिक वेलासिस रोडपर हमारे चचा रहते थे."

आतां मी सुटकेचा निःश्वास टाकतों, व 'हां ठीक' म्हणतों.

"अब बम्बई पहिले जैसीहि है या कुछ सफासुथरी है?"

"नहीं नहीं, बम्बई तो आजकल बहोत बदल गयी है. अब पहिले जैसे रास्तोंपर अंधेरा नहीं छाता......"

"...चौपाटीपर तो आजकल जादा भीड लगती होगी न"

"आजकलहि ये बात नहीं. हमेशाहि चौपाटि भरी रहती है."

"क्यों, चौपाटीपर भेल और पानीपुरी अबतक मिलती है न?"

मीं तिच्या माहितीपूर्ण पृच्छेनं चकीत होऊन गेलों होतों. ती पुढं विचारीत होती...

"पाणीपुरीकी आदत मुझे बहुत थी. इससे ही मेरी तब्यत बिगडी और मुझे वापस जाना पडा."

माझ्या तोंडाला पाणी सुटूं लागलं होतं.

उमेको पुढं सांगत होती, आणि विचारतहि होती.

"हमारे यहां कारासूको लोक बुरे मानते हैं. लेकिन मुझको वे बडे प्यारे लगते. चौपाटीपर जाकर घंटे घंटे तक मै कागसूकी (कौव्वे) क्रीडा देखती थी. क्या अभीभी कौव्वे वहांके पूतले-पर बैठते है न? उनका डौल और आवाज कितना प्यारा होता है."

"हां, हां क्यूं नहीं."

"आपको यहां देखकर अचानक कौव्वेकी याद आई..."

मी पुन्हां दचकतों.

"...बम्बईकी याद आई. पाणीपुरीकी याद आई..."

उमेकोनें प्रेमभरित मुद्रेनें मला एक कप साके दिली

रात्र बरीच झाल्यासारखी वाटली. डॉ. नोटा-मारू कंटाळले होते. त्यांनीं बिल मागावलें आणि पैसे देऊन आम्हीं उठलो. उठतां उठतांच मला माझ्या पॅंटची पुन्हां आठवण झाली. मी सावर-तच उठलों व पाठीमागें हात धरत बाहेर आलों. आम्हीं सपाता काढल्या. उमेकोनें माझे बूट चढ-वले. एका बुटाचा बंद मघांशींच तोडला होता तो तसाच शिरकटावून मी निरोप घेतला खिशांत हात घातला तो एक चवली आढळली. उमेकोला मीं ती भेट दिली. तीहि खूप होऊन म्हणाली—

"बम्बईके मेहमानोंकी यह मेरी यादगार रहेगी. शुक्रिया..." तिचे डोळे पाणावले. माझं काळिज कलकललं. माझ्या हृदयांतली अनुरक्ति विजेच्या दिव्यांतल्या केसरासारखी प्रज्वलत होती. माझा तोल जातो हें पाहून उमेकोनं मला अधार दिला. मला तिचा स्पर्श बोंचू लागला.

"आरिगातो, आरिगातो, आरिगातो गोझाय् मास्ता" उमेको आम्हांला निरोप देते आणि मोटारीच्या गादीवर मी सूनकपणें अंग घुसळतों तो आमची मोटार सुरू होते.

...दुसऱ्या दिवशीं सकाळीं डॉ. नोटामारू खोलीच्या दारांतूनच ओरडत आंत आले.

"कमॉन्—आय इल शो यू ए फेमस स्पॉट."

मीं सकाळीं उठून आन्हिक उरकून तयार होतोंच. सपाता काढून मी बूट चढवले आणि चार पावलं चालणार तो बंद नसलेल्या बुटांतून पाय गपकन् बाहेर पडला. जरा चुकलं, माझा पाय तरी मुरगळला असता अथवा माझें अधःपतन तरि झालें असतें. माझी अडचण ओळखून नोटामारू विचारांत पडले. आज रविवार होता. नाडीजोड तर विकत घेणें प्राप्त होतें. अखेरीस माझ्या वरच्या खिशांतल्या रेशमी रुमालानें बूट पायाला गच्च आवळून बांधला आणि तो दिसूं नये म्हणून पॅंट जरा पोटाखालीं बांधली. आम्हीं निघालों तेव्हां रस्त्यावर सन्नाटा होता. कुठून तरी दरवळणारा

मुरासाकीचा उन्मादक गंध मला विव्हल करीत होता. काल रात्रीं परततांना रस्त्यांत दुतर्फा आढळलेलं जपानी कलात्मकतेचं प्रमाणशीर सिंचन–ते टांगते चोचिन (कंदील) त्या किणकिणणाऱ्या फुरिन (घंटा), ते भिर-भिरणारे बदामी डोळे, ते चित्रविचित्र किमोनो—माझं मन त्या आठवणीनं कसं कोथिंबिरीच्या वासाप्रमाणं मोहरून गेलं. आम्हीं बऱ्याच गल्ल्या पालथ्या घातल्या पण सर्व दुकानं बंदच आढळलीं. अखेर एका कोपऱ्यांतलं बुटाचं दुकान अर्धवट उघडं आढळलं. आम्हीं दुकानदाराला आमची अडचण सांगितली. पण दुर्दैवानं त्याच्याकडे एकच नाडी शिल्लक निघाली आणि तीहि पांढरी (माझे बूट काळे होते). मी अगदीं निराश झालों—इतक्यांत तो म्हणाला थांबा, कांहीं जमतें का पाहातों असें म्हणून त्यानें दाराशीं असलेल्या काथ्याच्या पायपुसण्याचा एक दोरा अलगद खेंचला आणि तो वळवून इच्छित लांबीचा केला. मग त्यानें पणती पेटवून काजळी तयार केली आणि तिच्यांत तेल घालून ती दोरी रंगवली आणि तीं सफेत नाडीहि दहापंधरा मिनिटांत माझ्या बुटाच्या नाड्या तयार झाल्या. (मीं जुन्या नाड्या हळूच खिशांत घातल्या) मला वाटलें, ह्या खटाटोपाबद्दल हा भरपूर पैसे उकळील. पण त्यानें आकार केला बरोबर दोन आणे—तयार नाडीला पडला असता तेवढा. मला नवीन मानवतेचें दर्शन घडलें आणि तेथें माझे कर आपोआप जुळले.

...आमची गाडी टोक्योच्या येडोगावाशी भागांत चालली होती. नोटामारूंनीं गाडी एके ठिकाणीं उभी केली. "तो पाहिलात का योडो-बाशी फूल" डॉ. नोटामारू म्हणाले.

ह्या पुलाला पूर्वी सुगातामिझू नो-हाशी (अदृश्य पूल) असं म्हणत असत. ह्या इथं पूर्वी एक कुरो सुझुकी नांवाचा एक जमीनदार होता. त्याची मुलगी त्सुयुनो एके दिवशीं नाहींशी झाली. त्या दिवशीं वादळ झालं होतं आणि सुझुकीच्या घरांतून एक साप निघून त्या पुलाखालीं जातांना कुणीसा पाहिला होता म्हणे. दुसऱ्या दिवशीं वादळ संपल्यावर तो पूलहि अदृश्य झालेला आढळला. त्या दिवसापासून त्या पुलावरून कोणी जाण्यास धजत नाहीं असं म्हणतात. मला पूल कुठं दिसला नाहीं. कसा दिसणार? अदृश्य पूल होता ना तो!

ती हृदयद्रावक कथा ऐकून माझं मन विषण्ण झालं होत. माझ्या पायावर काहीं तरी वळवळलं



असं वाटलं. 'साप, साप' म्हणून मी उडी मारली आणि बेशुद्ध झालों...

...जागा झालों तो मी माझ्या खोलींत. डॉ. नोटामारू माझ्याजवळ बसून मला 'उचिवा'नें वारा घालत होते. मला त्यांनीं थोडी 'साके' दिली आणि हुशारी आल्यावर माझ्या हातांत माझी तुटकी बुटाची नाडी दिली. हिलाच साप समजून मी ओरडलों होतों. मी शरमलों आणि हळूच पॅन्टच्या खिशांत हात घातला. खिशाला भोंक पडलेलें मला आढळलें......

संध्याकाळीं कानाझावाला गेलों. तिथं आजपासून पेन्सिल परिषद भरत होती होती. आमची मोटार मारुनोचींतून गेली तेव्हां तिथल्या भव्य इमारती आणि रस्ते पाहून मला वरळीची आठवण झाली. मी जरा मोटार थांबवून जिनतानच्या गोळ्या विकत घेतल्या त्या जिनतानच्या गोळ्यांची चव मला मधुर वाटत होती त्याहून डबीवर चित्रित केलेली जपानी मधुरिका अधिक प्यारी लागत होती.

कानाझावाची परिषद ही एक तिथल्या लोकांना अलौकिक पर्वणी वाटली. जपानमध्यें पेन्सिल ही पवित्र मानली जाते (जशी आपण गोमाता मानतों) जपानमध्यें मूल जन्माला आलं की त्याच्या कपाळाला काळ्या पेन्सिलीनं खूण करतात. त्याच्या 'तान्जोबी'च्या (वाढदिवसाच्या) दिवशीं पेन्सिलीच्या तासण्याचा धूप त्याच्या पाळण्याखालीं घालतात. ऑक्टोबरांतल्या एबिसुको सणाच्या दिवशीं सुक्या मालाचे दुकानदार पेन्सिलीची रोषणाई करतात. उचिगामीच्या उत्सवांतहि चंदनाच्या पेन्सिली देवी समोर जाळतात. शिंची-गो-सान सणाच्या दिवशीं शाळांत-मुलांना पेन्सिली वांटतात. विवाहांत संगमोत्सुक वधुवरांनीं एकांतांत प्रथम पेन्सिलीची पूजा केली पाहिजे असें शिंटो सांगतो. एवढंच नव्हे तर उरावॉने (दिवंगताला तर्पण) समारंभांत उराला पेन्सिली लावून शोकप्रदर्शन करण्याची चाल जपानांत आहे. सारांश, पेन्सिल ही जपानी संस्कृतीची आदि, मध्य आणि अंत आहे असें गणलें जातें. असे हे पेन्सिलीचे जनक आज कानाझावाच्या तोमिनाका हॉलमध्यें जमले होते.

आम्हीं हॉलच्या दाराशीं जातांच आम्हांला एक जपानी पोस्टर दिसला. तो वाचून डॉ. नोटामारूंनीं कांहीं नोटा दरवाजांतल्या कारकुनाला दिल्या. आम्हांला कांहीं पत्रकं व एक छोटी कागदी पेटी देण्यांत आली. दरवाजांत हें साहित्य घेऊन जतांच तिथल्या द्वारपालानें तें छोटें बॉक्स घेऊन फोडलें व आंतली एक पेन्सिल काढून ती जवळच्या यंत्रांत घालून तासून दिली व एक फीत लावलेला बॅच दिला. आमच्या तासलेल्या पेन्सिलीचा रंग पाहून आम्हांला पुढच्या रांगांत बसविण्यांत आलें.

परिषद सुरू झाली होती. स्टेजवर कुणाचं तरी भाषण चाललं होतं. प्रेक्षागृहांत गडबड चालू होती तरी स्टेजवरच्या वक्त्यांना त्याची जाणीवच नव्हती असं वाटत होतं. हें कसं काय म्हणून मी नोटामारूंना विचारतांच त्यांनीं 'तोमिनाका हॉल'च्या अत्याधुनिक सर्जनवैशिष्ट्याची माहिती मला सांगितली. ही इमारत म्हणजे आधुनिक अद्वितीय वास्तुशिल्पानें निर्मिलेली एक किमया. स्थापत्यशास्त्रातल्या विशिष्ट अनुभवांत पदार्थविज्ञानशास्त्रांतलीं सिद्ध प्रमेयं वितळवून त्याच्या कलापूर्ण मिश्रणानं ह्या इमारतीचा कणन्कण चर्चित केलेला आहे. ही इमारत बांधतांना जगांतले अनेक खड्या आवाजाचे लोक मुद्दाम आमंत्रित केले होते व बांधकामाच्या सिमिटाच्या यंत्रांत त्यांची बसण्याची सोय करून एकेकानं खड्या– अगदीं टीपेतल्या मैदानी आवाजांत आपलं भाषण, गायन, काव्यवाचन म्हणून दाखवायचं. रासायनिक कृतीनं हा तीव्र ध्वनि त्या सिमिटांत बेमालूम तऱ्हेनं मिसळला जात असे. हेंच सिमेन्ट इथं वापरलं गेल्यामुळं जगांतला सर्व कर्कश ध्वनि जणूं ह्या इमारतीच्या वास्तूंत गाडून टाकला गेला आहे. (तुमच्या, एकीं भारतीय सांस्कृतिक शिष्टमंडळांतील सदस्याचा आवाज चिरका कां आहे हें तुम्हांला समजलं असेलच. अर्थात् त्यांना गडगंज नुकसान भरपाई व बिन आवाजी नोकरी देण्यांत आली त्यामुळं त्यांना त्यांच्या गेलेल्या आवाजाचं विशेष वाईट वाटलं नाहीं.) ह्यामुळेंच ह्या प्रेक्षागृहांत कोण कितीहि ओरडला तरी त्याचा ध्वनि हें भींतींतलें नादब्रह्म आत्मसात् करून घेतं आणि इतरांना त्यांचा उपद्रव होत नाहीं.

...परिषद चालू होती. मला भूक लागली होती म्हणून मी नोटामारूना डिवचलं. आम्ही उठून बाहेर आलों. बाजूच्या व्हरांड्याजवळच्या बागेंत चायघराची सोय होती. तिथं जाऊन चवानमुशी, टेम्पुरा आणि खाटापावा (म्हणजे पुडिंग, तळलेला मासा आणि आंबट पाव) वर ताव मारून, पलीकडच्या विश्रांतीकक्षांतल्या तमामीवर जाऊन लोळण घेतली. नोटामारूंनीं माझ्याकडे एक विडी मागितली. त्यांना अलीकडे माझ्या विडीची फार चटक लागली होती. विडी ओढून होतांच आम्ही पुन्हां हॉलमध्यें गेलों. पण थोड्या वेळांतच भोजनासाठीं मध्यंतर झालें आणि प्रतिनिधी व वक्ते उठूं लागले. आज 'बार बोममारचे' मध्यें प्रतिनिधींना खाना होता. हा बार म्हणजे पोर्तुगीज प्रतिनिधींचें जपानी रसशास्त्राला आव्हान होतें. बारचें नांव सपक असलें तरी दर्शन मात्र भडक होतें. इथं ततामी नव्हत्या कीं गिरद्या नव्हत्या. साके-





ऐवजीं 'मसिएरा'चा आणि टेम्पुराऐवजीं खेकड्यांचा रतीब होता. शिष्टसंमत प्रथेप्रमाणं प्रत्येक प्रतिनिधीनं आंत निर्माण केलेल्या कृत्रिम तळ्यांतला खेंकडा चिमट्यानं उचलायचा आणि शिजवायची तऱ्हा, आपलं नांव अगर नंबर 'शेफ'ला सांगायचा, व मसिएराची बाटली उचलून टेबलाकडे जायचं. पांचसात मिनिटांत अचूक तुमच्या टेबलाकडे तुमचा खेंकडा चालत येत असे. वेटरला आणखी हवं तें सांगून आपण खेकड्याचा फन्ना उडवायचा. टेबलावर कांटेचमच्याबरोबर छिन्नी आणि हातोडीहि ठेवलेली आढळली. आमचीं पोटं सुन्न असल्यामुळं आम्ही फक्त 'मासिएरा' चढवत त्या ठोकाठोकीत आमची मनःशांति बुडवून टाकण्याचा प्रयत्न करीत होतों.

...परिषदेंत मी एकमेव भारतीय प्रतिनिधि असल्यामुळें परस्पर परिचयाच्या कार्यक्रमांत माझं कौतुक विशेष झालं. माझ्या अपरोक्ष माझं व्याख्यान जाहीर केलं गेलं, आणि तिथल्या आतिथ्यानें तर मला अक्षरशः जखडून टाकण्यांत आलं. इतकं की डा. नोटामारूंना माझा वाडविस्तरा प्रतिनिधि-निवासांत पोचा... पाळी आली. प्रत्येक प्रतिनिधीनें मला आप... पल्या कारखान्यांतल्या पेन्सिलींचा जुडगा बक्षिस दिला. माझ्या खोलीच्या कोपऱ्यांत ह्या सर्व उपहारांचा ढीग रचतां रचतां माझे टाके ढीले झाले.

त्या तीन दिवसांत माझ्या सुप्त अष्टपैलुत्वाची जाणीव परिषदेनं मला करून दिली. अनेक वेळां तर परिषदेच्या चालू कार्यक्रमाला फांटा देऊन माझ्या विविध कार्यक्रमांचें प्रदर्शन झालें. मला मुरली येते असं मी कुणाकडे तरी बोललों तर अचानक माझ्या हातांत जपानी बांबूची मुरली खुपसली गेली. रंगमंचावर मला ततामीवर बसवण्यांत आलं. बाजूला कुणीतरी 'सामिसेन' घेऊन बसला आणि एक स्पॅनिश मी मुरलींत छातींतली हवा भरतों नभरतों तोच कुणी कुठून तरी खंजिरी खणखणवीत स्टेजवर चढला. पांवा वाजवण्यापूर्वी घसा ओला करावा म्हणून पाणी मागितलं पण आली साकेची बाटली. आणि दोन तीन घोट पोटांत जातांच मी मुरलीला तोंड लावलें. मीं काय वाजवलं कुणास ठाऊक पण आमच्या कार... ('पंताचा ...मारे हेड... करून दाखविले ... पाईप्स, असो मी एकदम पॉप्युलर मात्र खरें.

......दुसऱ्या दिवशीं आम्ही प्रतिनिधि स्थळं (गांवांतील) बघायला गेलों. गिन्झामध्यें कोणी जुगार खेळायला बसले, कोण गेशाघरांत शिरले, मी आणि हाँगकाँगचा काइ मान मात्र बाजारात हिंडत होतो. खरं म्हटलं तर माझे हे झांकून देण्याचे दिवस पण जपानची ही कलात्मकता, ही सौंदर्यदृष्टि—तुमचं अवघं अंतरंग रांधून टाकणारी ही गंमत बाजारी खैर जुगारांत बुडवून टाकण्याची कल्पना मला सहन होत नाहीं. ती चमचम करणारी चैतन्याची इंद्रफुलें दुरूनच पाहत पाहत, आजूबाजूला दरवळत असलेल्या टेम्पुराच्या सुरासांच्या, चेरीच्या समिश्र गंधांत उन्माद चढून आम्ही



अनुक्रमणिका

असं वाटलं. 'साप, साप' म्हणून मी उडी मारली आणि बेशुद्ध झालों...

...जागा झालों तो मी माझ्या खोलींत. डॉ. नोटामारू माझ्याजवळ बसून मला 'उचित' वारा घालत होते. मला त्यांनीं थोडीत जागा झालों दिली आणि हुशारी आल्या होती. मी जपानमध्यें माझी नोकरी आलों होतों—डॉ. नोटामारूंच्या खात्यांत काम करून या लढवय्या जपानची सेवा करण्यास आलों होतों. पण केली मात्र ही धिंगामस्ती अन् तमाशा. माझी मलाच उपरति झाली आणि मी फिनोमिशाची मनांतल्या मनांत क्षमा मागितली.

सकाळीं लवकर उठून पुन्हां डॉ. नोटामारूंच्या आश्रमार्थ जाण्याचा विचार केला. परिषदेचं सूर कालच वाजलं होतं. मीं चौकशी केली तेव्हां माझं सामान बांधून पुढें पाठविलं गेल्याची सांगतो तर्फे मिळाली. कांहीं वेळानं बसेस आल्या आणि प्रतिनिधी आंत बसले. स्थानिक कार्य-कर्त्यांनीं मोठ्या प्रेमाचा निरोप दिला. मीं प्रतिनिधींना पांचवून परत येणार होतों त्यामुळं मला ह्या निरोपाचं विशेष कौतुक वाटलं नाहीं.

...बोटीच्या धक्क्यावर प्रतिनिधी पोचले तेव्हां बोट सुटण्याची वेळ झाली होती. सुदैवानें आजहि 'नाकामारू' सेवेला सिद्ध होती. मी प्रत्येकाचा निरोप घेत होतों. इतक्यात कुणी तरि मला हांक मारतं. धक्क्यावर उमेको उभी होती. मी तिला हात हलवून 'आलोंच' म्हणून सांगितलं आणि काइमानशीं खालीं बोलण्यास गेलों. तो राष्ट्रगीत वाजवलं गेलं. सगळे जागच्या-जागीं तटस्थ झाले आणि (पूर्वीचा अनुभव ध्यानांत घेऊन) मीहि गीत संपवलं. वर शिडी काढल्याचा आवाज झाला म्हणून मीहि धक्क्यावर उतरण्यासाठीं धांवत निघालों. तो शिडी काढलेली आढळली. माझा सगळाच घोटाळा झाला सामान हॉटेलांत आणि मी बोटींत. पण काय करणार नाइलाज होता. उमेको धक्क्यावरून मंदमंद स्मित करीत 'सायोनारा' असं रुमाल हलवून मला सांगत होती. मी गोंधळूनच गेलों. धक्क्यावर उडी मारायचा विचार करून कठड्यावर चढतों तों मालिमानें मला खेचलें. बोट सुटली आणि मी हात हालवून जपानचा निरोप घेतला 'सायोनारा' ...'सायोनारा'...

जपानचं इंद्रधनुष्य आतां हळूहळू नाहींसं होतं आणि प्रतिनिधींच्या हास्यकल्लोळांत बोट पुढं पुढं चालली होती.

■ ■ ■



## धार

(पान १९७ वरून) डोकें फिरेल. वेड लागेल. त्याच्यासारखें. त्यांच्यासारखें तरी कसे! वेड हा त्याचा डाव आहे. ढोंग आहे. पण मला मात्र खरोखरीच वेड लागेल. आयुष्यांतून मी कायमचा उठेन. कायमचा. त्यापेक्षां—त्यापेक्षां एकदा काय व्हायचें तें झालेले काय वाईट! किती दिवस असें दिवाभीतासारखें वागायचें? किती दिवस लोकांना त्रास द्यायचा? किती दिवस असं नामुष्कीनं जगायचं? चाकू फेकून मारण्याची प्रॅक्टिस करतो आहे म्हणे! चाकू! स्प्रिंगचा चाकू! खट्‌दिशी उघडणारा! लखलखता! धारदार! शब्द न करतां हवेंतून येणारा आणि गपदिशीं प्राण घेणारा! प्राणच जायचा तर तो माझा काय म्हणून? त्याचा कां नाहीं? त्याचाच. त्याचाच. आहे. माझ्यापाशींहि चाकू आहे. खिशांत आहे. खिशांत तरी कशाला? हा काय—हातांत आहे. कळ दाबली कीं कसा खटदिशीं उघडतो. त्याचाच चाकू त्याच्याच पोटांत—कुठें आहे तो? कुठें आहे? हात कसे शिवशिवताहेत. कुठें आहे हरामखोर?

"काय हवं आहे तुम्हाला? काय हवं आहे?"

अरे हें काय! मी त्याला शोधतो आहें. त्या हरामखोर पांडेला शोधतों आहे आणि इथं कसा आलों! हे घोलपसाहेब मला काय विचारीत आहेत? सांगूं त्यांना कीं तो हवा आहे? हो सांगतोंच. सांगून मोकळा होतों. सांगायला मी तोंड उघडलें आणि ओरडलों,

"वांचवा. वांचवा."

"तेंच करतों आहें इतके दिवस. तुम्हालाच वांचवतों आहें—"

"मला नव्हे. त्याला वांचवा. त्याला. माझ्यापासून त्याला वांचवा. नाहींतर हा चाकू हा असा त्याच्या पोटांत बसेल—" आणि मी काय करीत आहे तें माझ्या लक्षांत येण्यापूर्वींच चाकूचे धारधार पातें कचदिशीं टेबलाच्या पोटांत घुसलें.

● ● ●

हें मासिक मालक संपादक, मुद्रक, श्री. दीनानाथ दलाल यांनीं आवाज प्रिंटर्स, मांदी चेंबर्स, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ ४२ केनेडी ब्रीज, मुंबई येथें प्रकाशित केलें.

